# काळे पाणी



सावरकर भवन, राजा ठाकूर पथ, शनिवार पेठ, पुणे.

दूरध्वनी :+९१२०२५५४४७५१



**प्रकल्प संचालक : रणजित विक्रम सावरकर**

प्रकल्प समन्वयक : अशोक रामचंद्र शिंदे

**हे पुस्तक आसामी, बंगाली, इंग्रजी, गुजराथी, हिंदी, कन्नड, मल्याळम, मराठी, ओडिया, पंजाबी, तमिळ, तेलुगु या भाषांमध्ये उपलब्ध आहे.**

# काळे पाणी

एक

" आई, म्हण ना, एक ओवी तरी म्हण ना तू. जा! आम्ही तेवढ्या तुला ओव्या म्हणाव्या गोड गोड, पण तू तेवढी मला एक देखील ओवी म्हणू नये अं!" मालतीने झोपाळ्यावर आणखी एक उंच झोका घेत घेत लाडिकपणे रमाबाईंना म्हंटले.

"एक ग का बाळ? एक लाख ओवी म्हणेन बरे बाळे तुला, पण आता तुझ्या आईचा स्वर तुझ्यासारखा मंजूळ राहिला नाही. केळीच्या सोलपटाच्या धाग्यात झेंडूची फुल ओवता आली, तरी जुईच्या फुलांची माळ ओवायची तर मऊ मऊ रेशमाच कोवळे सूतच हवे. नाही तर माळेची फुल मात्र नासून जायची. प्रेमळ ओव्या तुझ्या गोड सुरामधे, असतात त्याहून लडिवाळ लागतात. म्हणून अशा लडिवाळ ओव्या तुम्ही मुलींनी म्हणायच्या नि आम्ही आयांनी ऐकायच्या. मी ओवी म्हंटली तर चीर गेलेल्या सतारीसारखे गाण्यातले गोडपण गळून जाऊन माझ्या चिरकत्या आवाजाचे मात्र तुला हसू येईल."

"येऊ दे हसू आले तर! हसू तरी गंमत वाटल्याचेच ना! माझी गंमतीची करमणूक करायला तरी म्हंटल्याचे पाहिजेत दोन - चार ओव्या तुला! देवाच्या ओव्या नि स्तोत्र ग कशी तास तास म्हणतेस? तेव्हा नाही वाटते आवाज चिरकत? पण माझ्यावरच्या चार- दोन ओव्या म्हणायच्या तर लगेच सतारी चिरकतात! आयांनी मुलींच्या ओव्या नुसत्या ऐकायच्या असत्या तर आयांनी म्हणायच्या ओव्या ग कशाला कुणी रचून ठेवल्या असत्या? पण आयांनी म्हणावयाच्या किती तरी मायाळू ओव्या रचलेल्या असतात. मला देखील काही येताहेत बरे का!"

"मग तू आई झालीस ना म्हणजे म्हण बरे तुझ्या बाळाला!" रमाबाई मनापासून हसल्या.

लाजेने ओशाळलेल्या स्वरात मालती रुसून म्हणाली, "मी आपली म्हणेन नाही तर न म्हणेन जा! तू नाही ना म्हणत मला एखादी गोड ओवी?"

आणि लगेच आईला लगटून आणि तिच्या हनुवटीशी आपली चिमुरड्या ओठांची जिवणी लावून ती किशोरी आर्जवू लागली.

"हे ग काय असे? तू माझी आई ना? मग तू नाही तर कोण ग म्हणेल मला आईच्या लाडांची ओवी?"

"तू माझी आई ना?" हे त्या तिच्या एकुलत्या एका मुलीचे लडिवाळ ऐकताच रमाबाईंच्या हृदयात वात्सल्याचे इतके भरते आले की, एखाद्या पित्या लेकरासारखे त्या तिच्या लेकराचे ते सुरेख मुख आपल्या छातीशीच लावावेसे तिला वाटले आणि मालतीचे मटामटा मुके घेण्यासाठी रमाबाईंचे ओठ फुरफुरले. पण आईचे प्रेम जितके उत्कट असते तितकेच वयात येऊ लागलेल्या मुलींशी वागताना ते संकोची असते.

मालतीच्या गालाला अगदी लागते आलेले आपले तोंड मागे घेऊन तिच्या आईने त्या वयात येऊ लागलेल्या लेकीच्या वदनाला दोन्ही हातात क्षणभर दाबून तेवढे धरले आणि हळूच मागे सारीत मालतीला आश्वासिले, “म्हणते बरे बाळ तुला ओव्या! दोन-तीनच अं पण!”

“हं, आता खरी गंमत!” असे उल्हासून मालतीने झोपाळ्याला भुईकडून चवड्यांच्या नेटाने रेटून झोक्यामागून झोके दिले. “हे काय? म्हण ना. एखाद्या अंगचुकार गवयासारखी तालसूर लावण्यातच अर्धी रात्र काय घालवतेस?” असे मालतीने पुन्हा एकदा कोपराने डिवचताच रमाबाईंच्या तोंडाशी जी ओवी आली ती त्या म्हण लागल्या.

अगे रत्नांचिया खाणी । नको मिरवू ऐट मोठी।
बघ माझ्याही ये पोटी । रत्न ‘माला’ ।। १।।
जाता येता राजकुंवरा । नको पाहू लोभूनिया ।
दृष्ट पडेल माझीया । मालतीला ।। २।।
देते माझे पुण्य सारे । सात जन्मवेरी ।
माझ्या रक्षावे श्रीहरी । लेकुरा या ।। ३।।
पुरोनी उरू द्यावी । जन्मभरी नारायणा ।
कन्या माझी सुलक्षणा । एकूलती ।। ४।।

‘एकुलती’ हा शब्द गाण्याच्या नादात उच्चारला जाताच एकदम जसा विंचू डसावा तशी कोण्या तीव्र दुःखाची आठवण होऊन रमाबाईंचे मन व्याकूळ झाले. आपल्या मुलीला अशा आनंदाच्या भरात ते शल्य बोचू देऊन व्याकुळवू नये म्हणून रमाबाईंनी तोंडावर जरी खिन्नतेची छाया उमटू दिली नाही तरी ते गाणे मात्र त्यांच्या तोंडाबाहेर निघण्याचे अकस्मात् बंद झाले. मालतीला वाटले की, ओव्या म्हणताना आईला दम लागला ह्यामुळे ती सहसा चूप बसली असावी. आईला विसावा द्यावा आणि गाण्याची गोड लहर तिला आलेली होती तीही उडू नये म्हणून आपली पाळी आली असे समजत ती स्वतःच पुढच्या ओव्या म्हणू लागली. तिच्या आईने तिला ज्या ममतेने रसरसलेल्या ओव्या म्हंटल्या होत्या, त्यांच्या त्या गोड शब्दाशब्दागणिक तिच्या हृदयाला आनंदाच्या गुदगुल्या झाल्या होत्या. प्रियकराच्या प्रेमळ आराधना ऐकण्याची ओढ लागणाच्या आधी मुलींना आईच्या लडिवाळ कौतुकासारखी गोडी दुसऱ्या कशात बहुधा वाटत नाही.

संध्याकाळच्या वेळी पश्चिमेकडची समोरची बाजू उघडी असलेल्या आपल्या ओटीवरच्या झोपाळ्यावर बसलेली ती सुरेख सडपातळ बांध्याची किशोरी आपल्या सुस्वर गाण्याची माधुरी आपणच उपभोगीत उंच उंच झोके घेऊ लागली. झोपाळा एका बाजूच्या उंचीवरून उतरत असता वाऱ्याने तिच्या पाठीवरचा पदर फडफड करीत जेव्हा उडे, तेव्हा वाटे की, संध्याकाळी दूरवरच्या घरट्यांकडे उडत जाणाऱ्या कोण्या सुंदर पक्ष्यांच्या थव्यांतील मागे राहिलेले हे पाखरूही असे पंख उभारून लकेरीमागून लकेर घेत घेत उल्हासाच्या आकाशात आता उडून जाते की काय कोण जाणे!

माऊलीची माया । न ये आणिकाला ।
पोवळ्या माणिकाला । रंग चढे ।। १।।
नये आणिकाला । माया ही माऊलीची ।
छाया देवाच्या दयेची । भूमीवरी ।। २।।
माऊलीची माया । कन्यापुत्रात वाटली ।
वाट्या प्रत्येकाच्या तरी । सारीचि ये ।। ३।।
जीवाला देते जीव । जीव देईन आपूला ।
चाफा कशाने सूकला । भाईराजा ।। ४।।
माझे ग आयुष्य । कमी करोनी मारुती ।
घाल शंभर पूरती । भाईराजाला ।। ५।।

गाण्याच्या ओघात मालती आता जी ओवी तोंडी येईल ती गात चालली होती. पहिल्या ओव्या तिच्या मनाच्या बोलीत रचलेल्या होत्या. तिच्या आईवर जी तिची लडिवाळ ममता होती, तीच त्या ओव्या निवडून निवडून मालतीच्या कंठाच्या सनईतून गात होती. परंतु पुढच्या ओव्या अर्थासाठी निवडून म्हंटल्या नव्हत्या; तर त्या मराठी गवई हिंदी पदांचा अर्थ तितकासा न बघता जसा त्या गाण्यांतील चालीच्याच हौसेसाठी काय तो ती पदे गातो, अशी ती गात गेली. पण तिच्या आईचे लक्ष त्या ओव्यांतील अर्थाकडेही वेधलेले असल्यामुळे मालती तिच्या भाईराजाला लागू असलेल्या ओव्या गाण्याच्या भरात जेव्हा गात चालली, तेव्हा तिच्या आईचे ऊर दुःखाने दाटत येऊन आता रडूच कोसळते की काय अशी तिला भीति पडली. तिच्या त्या दुःखाची छाया मालतीच्या त्या हसत्याखेळत्या आनंदावर पडून तो काळवंडून जाऊ नये म्हणून रमाबाईंनी तिला असह्य होते चाललेल्या ह्या मालतीच्या ओव्या बंद पडाव्या ह्यासाठी मालतीला मध्येच हटकले,

“माले, बाळ, थांब गडे. भोवळ येऊ लागली बघ मला. किती मेले उंच झोके घेतेस हे!”

असे निमित्त काढून भुईला आपल्या पायांचा दट्ट्या देत आईने झोपाळा थांबवला, त्यासरशी मालतीच काय ती त्या झोपाळ्यावरून खाली उतरली नाही, तर उंच लकेऱ्यांच्या झोक्यात बेभान झालेले तिचे मनही त्या गाण्याच्या खाली झोपाळ्यावरून उतरले आणि भानावर आले.

पाहाते तो आईचे डोळे पाण्याने डंवरलेले! तोंड दुःखाच्या तीव्र स्मृतीने गोरेमोरे झालेले! मालतीच्या तत्काळ ध्यानात आले की, होय ना होय, आपल्या वारलेल्या वडील भावाची आईला आठवण झाली असावी आणि आपल्या तोंडातून सहजी बाहेर पडलेल्या भावावरील ओव्यांनीच तिचे मन भडभडून आले असावे! तिच्या आईला तिच्या नाहीशा झालेल्या वडील पुत्राची आठवण - त्या प्रसंगाला इतकी वर्षे उलटली तरी- अधून मधून असे काही विशेष निमित्त घडले की अगदी एखाद्या ताज्या दुःखासारखी असह्य होते असे आणि ती ममताळू आई ढसाढसा रडत असे. मालतीला त्या त्या वेळी आईची समजूत कशी काढायची, आईच्या त्या दुःखावेगाला टाळणारा नसला तरी बधिरविणारा उतारा कोणता, तोही मालतीला ठाऊक होता.

तिने पटकन् आईच्या मांडीवर डोके टेकले, त्यासरशी तिचे तोंड गोरेमोरे आपण होऊनच झाले; तिच्या डोळ्यांतही पाणी आपण होऊनच टचकन् आले आणि मग तिच्या सवयीप्रमाणे तशा आपल्या मुखाला आईच्या हनुवटीपर्यंत उचलून मालती काकुळतीने बोलली,

"असे काय बरे आई? मी तुझ्या मनाला आनंदविण्यासाठी ओव्या म्हणू लागले तो चुकून तुझ्या दुःखाची खपलीच अशी उचकटून बसले! कशा मेल्या सुचल्या त्या ओव्या काय की!"

मालतीच्या मनाला ती चुकी इतकी बोचलेली दिसली की, तिच्या आईला स्वतःच्या मागच्या दुःखापेक्षा त्या स्फुंदू लागलेल्या लेकीचे चालू दुःखच साहवेनासे झाले आणि रमाबाई झटकन् रडे गिळून मालतीचेच समाधान करू लागल्या.

"वेडी कुठली! अग, तुझ्या ओव्यांनी नव्हे बरे! मीच ओवी म्हणता म्हणता तुला माझे एकुलते लेकरू असे म्हणून गेले ना, त्याच मला वाईट वाटले बरे एवढे! देवाने मला दोन लेकरे दिली असता माझ्या दैवाने एक हिसडून नेऊन एकच तेवढे उरू दिले ते शल्य मला सहसा बोचले! उगी बाळ! तू नाही बरे माझ्या दुःखाची खपली उचकटलीस. उलट त्या दुःखाला किंचित तरी हलक करणार जर काही रसायन असेल तर ते तुझ्या ह्या आनंदी मुखावेरील सुखाच हसूच काय ते होय! झाले ते काही परत का येत? तुझ्या भावाची तुझ्यावर इतकी ममता असे की, तुला मी त्याच्या वियोगाच्या दुःखानंसुद्धा रडवले तर तो माझ्यावर रागावेल; त्याचा आत्मा जिथे असेल तिथे तळमळेल! तू त्याच्याच ठिकाणी आहेस ना मला! मग तुझ्यातच माझी दोन्ही लेकरे सामावलेली आहेत, नाही का? उगी! अग हो, आज त्या नव्या आलेल्या साधूच्या भजनाला रात्री जायच आहे ना? चल तर ऊठ. आता पेटत घालते मी, तू झाडलोट- पाटपाणी कर. आपली जेवणे उरकतात तो नायडूबाई येतीलच बोलवायला!"

त्या मायलेकी घरात गेल्या. हे एक लहानसे टुमदार घर रमाबाईंनी गेल्या महिन्यातच मथुरेला क्षेत्रनिवासासाठी येऊन स्वतंत्रपणे भाड्याने घेतले होते.

रमाबाईंचे भ्रतार, त्यांना दोन मुले झाल्यावर एकाएकी वारले. रमाबाईंचा चरितार्थ सुखवस्तूपणे चालू शकेल इतका पैसा आणि काही दागिने त्यांच्या भ्रताराने मागे ठेवले होते. त्यावर रमाबाईंनी आपल्या दोन्ही मुलांची जोपासना काही वर्षे नागपूरकडच्या त्यांच्या मूळच्या गावीच केली. पुढे त्यांच्या पुत्राला सैन्यामध्ये नोकरी लागली. तो तिकडे गेला तेव्हा त्यांची कन्या मालतीच काय ती रमाबाईपाशी उरली. दोन-चार वर्षांतच हिंदुस्थानबाहेरील इंग्रजांशी चाललेल्या कोण्या लढाईवर हिंदी सैन्य धाडण्यात आले. त्यात रमाबाईंच्या पुत्रालाही जावे लागले. परंतु तिकडे गेल्यावर तो जवळजवळ बेपत्ताच झाला. मोठ्या खटपटीनंतर रमाबाईंना एकदाचे अधिकाऱ्यांकडून कळले की, तो सैनिक काही कारणाने अधिकाऱ्यांशी भांडून फरारी झाला असून बहुधा शत्रु पक्षाकडून मारला गेला असावा!

त्या गोष्टीला पाच-सहा वर्षे उलटून गेली होती. रमाबाईंचा पुत्र सैन्यात गेला, तो तिकडेच वारला, ही गोष्ट रमाबाईंच्या गावी लोकांना इतकी पटली होती की, आता तिचा सगळ्यांना

विसरही पडला होता. पण रमाबाईंना त्याचा पूर्ण विसर कसा पडेल? त्यांना आपल्या पुत्राचा विसर पडला नव्हता. इतकेच नव्हे, तर तो पुत्र मारला गेला आणि आता ह्या लोकी पुन्हा कधीच भेटणार नाही, हेही त्यांना केव्हा केव्हा खरे वाटत नसे. लढाईत मारल्या गेलेल्या सैनिकांच्या अगदी प्रेमातल्या नातलगांमध्ये ही मनोवृत्ति बहुधा अशीच आढळून येते. अजूनही रमाबाईंना तो त्यांचा पुत्र मारला गेला हे केव्हा केव्हा खरे वाटेनासे होई. कोणतीही आशा उरली नव्हती तरी शंका काही फिटेना. त्यांचा पुत्र दूरदेशी लढाईवर जाऊन मेला हे शब्ददेखील उच्चारणे त्यांच्या जिवावर येऊन त्या म्हणायचेच भाग पडले तर इतकेच म्हणत की, माझा वडील मुलगा तिकडे लढाईत नाहीसा झाला.

पुत्राच्या मृत्युचे वर्तमान कळवल्यानंतर दुःखाने खचलेल्या त्या बाईचा जीव तिच्या उरलेल्या एकुलत्या एका मुलीच्या मायेवरचे काय तो जगत होता. मालतीचे कोडकौतुक करण्यात त्यांनी काही कमी करू नये, ती जी वाढू लागली तीही चंद्रकलेसारखीच अधिकाधिक शोभिवंत दिसू लागली. तिच्या त्या लडिवाळ, चपल पण सुशील चालण्याबोलण्यामध्ये असा काही मोहकपणा असे की, तिच्या आईच्याच नव्हे, तर जो जो तिला पाही त्याच्या त्याच्या नयनाला आणि मनाला ती चतुर्थीची चंद्रकला पाहिल्यासारखाच आनंद होई. सुरेख मोती पाहिले की ते कोण्या तरी शोभिवंत अलंकाराचीच सामग्री आहे, हे जसे सहजी वाटते, तसे कोण्यातरी मोहक, मंगल आणि सुखकारक जीवनासाठीच हिला निर्मिली असावी, असे त्या किशोरीला पाहताच वाटू लागे, तिला आता चौदावे वर्ष उलटून गेले होते आणि तिच्या आईच्या मनात तिच्या भविष्याविषयी सोनेरी आशांचे आणि आकांक्षांचे एक उद्यानचे उद्यान बहरू लागले होते.

रमाबाईंची फार दिवसांची मैत्रीण म्हणजे सूतिका अन्नपूर्णाबाई नायडू ह्या होते. त्या आजकाल मथुरेला नोकरीवर होत्या. त्यांच्या आग्रहाने आणि तीर्थयात्रा करण्याची रमाबाईंच्या देवलसी मनाला आवड असल्यामुळे, त्या मालतीसह महिना-पंधरा दिवसांसाठी मथुरेला आल्या होत्या. मथुरेची प्रख्यात स्थले, मंदिरे आणि साधुसंत हयांची दर्शने घेण्यात त्यांचा मुख्य पुरोहित आणि वाटाड्याही ह्या नायडूबाईच असते. त्यांनाही साधुसंतांची मोठी आवड असे. कोणीही नवा साधु मथुरेला प्रख्यातीला आला की त्याचा उपदेश ऐकायला आणि प्रसंगी यथाशक्ति सेवाही करायला अन्नपूर्णाबाई नायडू सहसा चुकत नसते.

त्यांच्या घराशेजारच्या घाटावरचे गेल्या महिन्यात जो एक योगानंद नावाचा साधु आपल्या शिष्यांसह येऊन उतरला होता, त्याच्याकडे सध्या अन्नपूर्णाबाई नायडू भजन पूजन-दर्शनार्थ जाऊ येऊ लागल्या होत्या, त्या योगानंदस्वामींना भूतभविष्यवर्तमान जाणण्याची दैविक शक्ति आहे असा जिकडे तिकडे गाजावाजा होते चालला. रात्री त्या साधूच्या मठीत भजनाचा गजर भरात आला की त्या नामसंकीर्तनाच्या रंगात शतावधि लोक रंगून जाऊन भक्तिभराने नाचू लागते. नायडूबाईंच्या तोंडून योगानंदस्वामींना रमाबाईंची माहिती कळली तेव्हा त्यांनी देवाचा प्रसाद स्वतःच्या हस्ते, त्यांच्या विशेष कृपेने निदर्शक म्हणून रमाबाईंना धाडला. रमाबाई मालतीसह त्या

भजनोत्सवालाही गेल्या दोन-तीन रात्री जाते असते. स्वतः योगानंदांनीही एकदा-दोनदा थोडीफार विचारपूस करण्याची कृपा रमाबाईवर केली होती.

योगानंदांविषयी गावातील कुटाळ टोळीतही काही टवाळकी होऊ नये इतके त्यांचे वर्तन देवलसी, निलार्भ, सरळ आणि साधे असे. भजनात ते रंगले म्हणजे त्या सत्पुरुषाचे, जगाचे वा देहाचे भानच सुटे असे दिसे. त्यांची मुख्य साधना भजन हेच असे. बाकी कोणताही ढोंग-धत्तुरा त्यांच्या मठात दिसते नव्हता. शिष्यसंप्रदाय मात्र भरपूर, त्या साधूच्या मागेमागे शिस्तीने चालताना, मठात शिस्तीने वागताना, नेहमी आढळे. मथुरेतून त्यांचा तळ आता लवकरच हलणार होता. त्यासाठी ह्या शेवटच्या सप्ताहात भजनांची धुमश्चक्री चालू होती. शेकडो लोक रात्री तेथे दाटत असते.

रमाबाई मालतीला घेऊन आजच्या रात्रीच्या भजनोत्सवाला तेथेच जाणार होत्या. त्या मायलेकींनी रात्रीचे जेवण आटोपले न आटोपले तोच नायडूबाईंची थाप दारावर पडली, लगेच त्या तिघीजणी घाटावरील स्वामीजींच्या मठाकडे जाण्यासाठी लगबगीने निघाल्या.

***

दोन

रमाबाई मालतीसह जो भजनाच्या ठिकाणी पोचतात तो प्रमाणे मोठमोठ्या झांजा घेऊन पन्नास-पाऊणशे गोसावी साधुसंत योगानंदाच्या भोवती घेर धरून नामसंकीर्तनाचा गजर चालू आहे; मुख्य दहा-वीस शिष्य ते पखवाज, मृदुंग, वीणा, झांज प्रभृति, वाद्ये ताल-सूर-ठेका ठाकठीकपणे धरून योगानंद महंतांच्या अगदी सन्निध सज्ज आहेत आणि मध्यभागी कधी बसून तर कधी भक्तीच्या आवेशात उठून योगानंदजी उंच, खड्या आणि तन्मय स्वरात भजने म्हणत आहेत! त्या दूरवर दाटीतून आत जायची सोयच नव्हती. पण नायडूबाईंच्या वशिल्याने आधीच त्यांना महंतांच्या मंदिरातील राखीव जागी नेऊन बसवण्यासाठी एक शिष्य ठेवलेला होता. त्याने त्या मंडळींना वाटेने पाहताच योगानंदजींच्या आज्ञेप्रमाणे त्या तिघींनाही नेऊन बसवले.

इकडे भजनाचा रंग भरात आला होता. श्रीमत् साधु तुलसीदासजींच्या एका पदाचे ते ते चरण त्या शंभर भजनिकांच्या शंभर कंठांनी परिपुष्ट अशा स्वरात उंच उंच चढून दुमदुमत राहिले-

तुलसी मगन भये । हरिगुणगानोमे ।।<br>
मगन भये । हरिगुणगानोंमे ।। ध्रु. ।।<br>
कोई चढे हाथी घोडा पालखी सजाके ।।<br>
साधु चले पैया पैया चिटियां बचाके ।।<br>
मगन भये । हरिगुणगानोंमे ।। तुलसी।।

झांजांचा झणझणाट रक्ताचा बिंदु न् बिंदु थरथरवू लागला. भक्तिरसाच्या डोहात सारा समाज जणू डुंबत होता! हरिनामावाचून इतर कोणत्याही मनोवृत्तीचा ध्वनि ऐकू येईनासा झाला; पण तो एकाचा दुसऱ्याला तेवढा ऐकू येईनासा झाला की ज्याला त्याला देखील ऐकू येत नव्हता, ते कोणी सांगावे?

इतक्यात त्या उंच चढलेल्या शतकंठनिनादी सुराला पदाची चरणे योगानंदजी एकटेच इतक्या तल्लीनपणे म्हणू लागले की, शिष्यादिक भजनिकांनी झांजांची गोंगाटी साथ बंद करून चिपळ्यांची साथ धरली. "तुलसी मगन भये । हरिगुणगानोंमे ।।" हे चरण गोड उलटापालटीने हळुवार सुरात गात गात योगानंद उभे राहिले.

त्या पदाचा अर्थ काही योगानंद सांगत नव्हते. पण ज्यांना कळे त्यांना त्या भजनात अर्थाचे ग्रंथ ऐकू येत. ह्या जीवनाची साधना जो तो आपल्या आवडीप्रमाणे आचरीत आहे; आनंदाच्या मागे जो तो लागला आहे; कोणी भोगातून तर कोणी योगांतून; जशी ज्याची आणि जितकी ज्याची मनाची उन्नती तशी त्याची आवड; 'स्वभावो मूर्ध्नि तिष्ठते!' तेव्हा बाह्य साधनांचा वाद हवा कशाला? तुम्हाला आनंद होईल त्यात तुम्ही रमा, त्यांना आनंद होईल त्यात ते रमोत. माझ्यापुरते विचाराल तर "तुलसी मगन भये । हरिगुणगानोंमें, हरिगुणगानोमे । हरिगुणगानोंमे ।।

कोणी उंच चंदनी पलंगावर गाद्या-गिरद्यात लोळण्यासाठी खटपटत आहेत; त्यांना त्यात आनंद वाटतो. पण कोणी असलेल्या पलंगांनाच नव्हे, तर कामुक पत्नींनाही सोडून देऊन एखाद्या

बुद्धासारखे बोधिवटाखाली, उघड्यावाघड्या स्थळी, नुसत्या भुईवर पडून झोपत आहेत; त्यांना खरी गाढ अशी झोप तेथे लागते. गाढ झोप लागावी हे जर उद्दिष्ट, तर ज्याला ती जिथे लागेले तिथेच त्याने निजणे इष्ट. माझेच साधन तुला केले पाहिजे हा वाद कशाला?

कोणी हत्तीवर तर कोणी घोड्यावर तर कोणी पालखीत मोठ्या डौलात चालत आहेत; त्यांना त्यातच आनंद वाटत आहे. त्यांचा तोच स्वभाव. पण हा साधु पाहा. त्याला हत्तीवर चढणे फाशीवर चढण्याइतकेच दुःखद. पालखीत आपण बसून ती दुसऱ्यांनी वाहावी, ह्या अरेरावीची त्याला इतकी लाज वाटते की, पालखीचा स्पर्श होताच त्याच्या मनाला विस्तवाचा चटका बसल्यासारखे दुःख होते. म्हणून तो साधू पायी चालतो आणि पायी चालतो तेव्हा देखील कीडमुंगीसुद्धा आपल्या पायाखाली मरेल की काय, ह्या भीतीने त्यांची कीव येऊन कीड मुंगी वाचवण्यासाठी पाहून पाहून पाय टाकीत चालतो. त्याला त्यांतच खरा आनंद.

कोई चढे हाथीं घोडा पालखी सजाके ।।
साधु चले पैया पैया चिटिया बचाके ।।
पैया पैया । चिटिया बचाके ।
पैया पैया । चिटिया बचाके ।।

हे चरण अगदी मंद, शांत सूरामध्ये घोळीत घोळीत योगानंदस्वामी आपली पावलेही एकेकी मोजून संथपणे टाकीत वीणेच्या सुरावर पुनःपुन्हा गाऊ लागले,

“पैया पैया चिटिया बचाके ।। साधु चले पैया पैया चिटिया बचाके ।।”

त्या वेळी तुलसीदासजींच्या पदात उल्लेखिलेला साधु तो हाच की काय, असेच ज्याला त्याला भासले. कारण की, योगानंदांची ही एक विशेष सवय असे की, वाटेने, घाटाने, हाटात कोठेही ते चालत असले तरी पाहून पाहून एकेक पाऊल किंचित उचलून टाकीत जाते.

त्यांच्या स्वतःचेच साधुत्व ह्या तुलसीदासजींच्या पदातील चरणांमुळे लोकांच्या मनावर बिंबवायच्या कामी उपयोगी पडावे म्हणूनच जरी ते भजन इतके रसाळ तन्मयतेने ते गात नसले तरीही त्याचा परिणाम मात्र तोच झाला. तुलसीदासजींच्या कसोटीलाही योगानंदजींचे साधुत्व पुरेपूर उतरते, हे ज्याला ज्याला न सांगता समजून आले.

अशा भजनोत्सवात मध्यरात्र उलटून गेली. आरतीच्या वेळी स्वामींचे चरण शिवण्यासाठी लोकांची मोठी दाटी उडाली आणि त्या गडबडीतच जेव्हा तो समुदाय परत घरी जाण्यासाठी बाहेर पडू लागला, तेव्हा एकच रेटारेटी चालू झाली. इतक्यात नायडूबाई, रमाबाई आणि मालती जेथून बाहेर पडते होत्या तेथे कोणा तरी दहा-पाच जणांची अकस्मात् भांडाभांडी जुंपून मोठा गोंधळ माजला. तो मोडण्यासाठी म्हणून स्वामीजींचे दहा- पाच शिष्य छड्या घेऊन आत घुसले. जो जिकडे फुटला तो माणूस तिकडेच रेटीत नेला गेला. मध्ये तुंबळ दाटी घुसत चालली. त्या फाटाफुटीत रमाबाई कोठे, नायडूबाई कोठे, तर मालती कोठे पांगली, त्याचा एकमेकींना पत्ता नाहीसा झाला. पण इतक्यात अगदी गोंधळून चेंगरत आलेल्या रमाबाईंचा हात स्वामींच्या एका

शिष्याने धरून त्यांना दाटीबाहेर काढले आणि सांगितले की, “स्वामीजींच्या आज्ञेने स्त्रियांना विशेष तत्परतेने पोचण्यासाठी आम्हाला धाडले आहे. आपण आपल्या घरी चला.”

“पण माझी मालती कुठे आहे?” गांगरून, घाबरून रमाबाई विचारते तोच त्याने झटपट त्यांना पुढे पुढे नेतच सांगितले, “सगळ्यांना घरोघर पोचवले आहे, तुम्ही चला पुढे. बस्स्!”

अर्धी वाट दाटीने खेचाखेचलेली. तीतून शिष्याने रमाबाईंना जवळजवळ ओढीतच आणले. “जा, आता तडक घरी जा. तिथे उरलेल्या दोन्ही माताजींना आधीच नेऊन पोचवले आहे.” असे आश्वासून उत्तरे ऐकण्यात वेळ न दवडता तो शिष्य इतर कोणी स्त्री माणूस दाटीत सापडले असल्यास त्याला बचावून घरी पोचवण्यासाठी निघून गेला. दाटीत मिसळला.

रमाबाई धडधडत्या हृदयाने आणि झपाझप पावलांनी घरी चालल्या. स्वामीजीनीं एवढ्या दंगलीत आपणा सर्वांची इतकी विशेष काळजी घेऊन घरोघरी पोचवावे, हे उपकार एकीकडे आठवीत आणि दुसरीकडे मालती दाराशीच आपली वाट पाहात किती घाबरलेली असेल ते चिंतीत त्या घराशी आल्या. अंधारातून त्यांनी ओटीकडे पाहिले, पण मालतीची वा कोणाचीच चाहूल लागेना. कंदील लावून पाहिले, दाराला कुलूप जसेच्या तसेच! मालती पुढे आल्याचा काहीच सुगावा नाही. भजनाच्या शेवटी जी रेटारेटी झाली, त्यात चेंगरलेली मालती ओक्साबोक्शी रडते आहे, असा भास त्यांना होऊ लागला.

“मालती,ए मालती!”

रमाबाईंनी दोन हाका कशाबशा आणि कशासाठी काय की त्या ओसाड अंधारालाच मारल्या आणि तिसरी हाक तशी उगीचच्या उगीच देऊ जातात तोच त्यांचा कंठ भरून येऊन, रडे कोसळून, त्या मटकन् खाली बसल्या. तेथे नसलेल्या कोणाला आपण विचारीत आहोत हे ध्यानात असताही त्या स्फुंदत स्फुंदत मोठ्याने पुसून गेल्या, “माझी मालती कुठे आहे हो? माझी मालती आली का हो?”

वास्तविक त्या वेळी तसे घाबरण्याचे फारसे कारण नव्हते. स्वामीजींच्या शिष्याने ‘त्या साऱ्यांना पुढे पोचवून दिल्या आहेत,’ हे घाईघाईत पण स्पष्टपणे सांगितले होते. ‘इकडे नसेल तर नायडूबाईंच्या घरींच त्या दोघींना पोचवले असावे. आपण दाटीत एकट्या कोंडल्या गेलो पण त्या दोघी एकत्रच असतील, नव्हे असल्याचे पाहिजेत. तेव्हा आपल्याला शोधीत इतक्या लांबवर ह्या दंगलीतून येण्यापेक्षा त्या दोघी, तिथून त्यातल्या त्यात ह्या घरापेक्षा जवळ असलेल्या नायडूबाईंच्या घरीच आपल्याला पोचवावे, असे नायडूबाईंनीच विनवले असावे.

असा उलट विचार हळूहळू रमाबाईंना पटू लागला. आपणही तिकडेच जाऊन मालतीला स्वतः पाहावी म्हणून त्या दोनदा वाटेवरही आल्या. ‘पण आपण तिकडे गेलो नि मालती इकडे आली तर? पुन्ही ती एकटी राहणार! आपली चुकामूक पडल्याने आपल्याला शोधायला तीही परतेल कदाचित्! वाट लांब, रात्र, तिसरा प्रहर, अंधार गुडुप. जाऊ की नको? अशी विवंचना उलटसुलट चाळवीत असता केव्हा काय की, त्यांना झोपेचा चुटका लागला.

दचकून जो उठतात तो मालतीचे अंथरूण शेजारीच रिकामे दिसले. कधीही तसे न दिसलेले ते अंथरूण! प्रत्यही सकाळी उठवताच त्या अंथरूणावर गाढ झोपलेल्या मालतीच्या केसांच्या अस्ताव्यस्त बटा हाताने सारून, तिचे तोंड कुरवाळून, पांघरूण नीट घालून मग हसतमुखाने सडासंमार्जनाला लागायची या आईला नित्याची निश्चिंत सवय! त्या अंथरूणावरील ते लाडके मुखमंडळ आज तेथे दिसेना. हृदयात धडकी भरली. वाईट तेच विचार मनात उसळून आले. पण ते मनात देखील न उच्चारता रमाबाई ज्या उठत्या त्या तडक नायडूबाईंच्या घराकडे मालतीच्या शोधाला निघाल्या.

पण वाट चालून थोड्या पुढे जातात तोच रमाबाईंना नायडूबाईच आपल्याकडे येताना दिसल्या आणि एकट्या!

घाबऱ्या घाबऱ्या रमाबाईंनी विचारले, “म्हणजे! मालती कुठे आहे?”

आश्चर्याने नायडूबाई उत्तरल्या, “म्हणजे! मालती तुमच्याबरोबर गेली म्हणून मला स्वामीजींच्या एका शिष्यानेच सांगितले!”

“अग बाई! माझी मालती! कुठे हो असेल ती?”

सद्गदीत कंठांत अडखळलेले असे काही शब्द उद्गारीत रमाबाई एखाद्या मुलासारख्या हुंदके देत रडू लागल्या.

नायडूबाई त्यांच्याहून धीराच्या बाई होत्या किंवा त्यांच्या पोटची एकुलती उपवर लेक काही हरवलेली नव्हती म्हणूनही त्यांचा धीर टिकून राहिला असावा. रमाबाईंना हात देत त्या म्हणाल्या,

“असे काय घाबरता अगदी! तुम्हा आम्हा साऱ्याच स्त्रियांना जसे स्वामीजींनी बुद्ध्या माणस धाडून दंगलीतून सोडवले तसेच मालतीला पण बचावून सांभाळून ठेवले असलेच पाहिजे. चला, स्वामीजींकडे जाऊ या प्रथम. मालती होय न होय तिथेच अगदी सुरक्षित आहे. चला.”

रमाबाईंना असा धीर देऊन नायडूबाई स्वामीजींच्या मंदिराकडे चालल्या खऱ्या, पण त्यांच्याही हृदयाला काय होईल, काय नाही अशी सारखी धुगधूग लागल्यावाचून राहिली नाही.

***

**तीन**

योगानंद ज्या मंदिरात उतरले होते, त्याच्या प्रांगणात त्या सकाळी काही दर्शनेच्छु आणि प्रश्नेच्छु लोक त्या स्वामीजींचे बोलावणे येईतो इकडे तिकडे हिडत होते. ओळखीचे दोन-दोन, चार-चार लोक एकत्र उभे राहून योगानंदजी भूतभविष्यवर्तमान किती अचूक सांगतात ते वाखाणीत होते. कोणी शंका काढी, तशी शंका काढणाराचे समाधान करण्याच्या इरेला पेटून इतर कोणी भाविक मंडळी अचूक भविष्य वर्तविल्याची उदाहरणे अधिकच तिखटमीठ लावून वर्णीत. स्वतः योगानंद केव्हांही किर्तनातून किंवा व्यक्तिशः संवादात धार्मिक उपदेश असा काही देत नसते. ते बहुतेक कशाविषयीच कोणाशी फारसे बोलत नसते. केवळ ज्यांची भूतभविष्य पाहायचे, त्यांच्या मनात येई त्यांनाच शिष्यांकरवी त्यांच्या एकान्त खोलीत बोलावले जाई. तेथे महंत अगदी मोजके प्रश्न विचारून आणि ऐकून घेत. मग जलादर्श नावाचे एक तांत्रिक यंत्र पुढे घेत आणि प्रत्यक्षपणे त्या यंत्रात जे त्यांच्या दैविक दृष्टिला दिसे, तेवढे सांगत. कोणी खरे-खोटे म्हंटल्यास वाद असा घालीत नसते. 'प्रभुने बतलाया, मैंने कहा! सच-झूट प्रभुका अधिकार! मै एक उसके शब्दका ध्वनी हूँ!' हे ठाम उत्तरे काय ते योगानंद देत आणि त्या शिष्याकडून त्या प्रश्नेच्छु माणसाला परत बाहेर पोचविण्यात येई. कोणापासूनही त्या जलदर्शातील भूतभविष्यकथनाविषयी महंत जी दमडीही घेत नसते, त्या अपरिग्रही निलोर्भतेमुळे त्यांनी सांगितलेल्या माहितीवर विश्वासू जनांचीच नव्हे, तर अर्धसंशयी माणसांचीही अधिकच श्रद्धा बसे. महंत जो वाकसंयम पाळीत त्यामुळे त्यांचा एखादा-दुसरा जो गूढ शब्द निघे त्याचे स्पष्टीकरण जो तो आपल्या मताप्रमाणे करायला स्वतंत्र असे. कीर्तनात भजन तेवढे स्वतः त्यात रंगून जाऊन ते मनमोकळेपणे आणि सुरेलपणे घोळून घोळून म्हणत. त्या वेळच्या त्यांच्या भक्तितल्लीन अभिनयाने मात्र त्यांच्या देवलसी सिद्धाईची थोरवी श्रोत्यांना कळून चुके. पण त्या कीर्तनातून देखील स्वतःचे भजनावेगळे असे प्रवचन ते लवलेशही देत नसते. 'भजन संतोंका! संतोंसे जादा मै क्या कहूं?' हे एक वाक्य तेवढे वेळप्रसंगी उच्चारून ते चूप बसत.

पण योगानंदजींच्या ह्या मौनवृत्तीमुळेच, इतर कोणत्याही प्रवचनकारांच्या कोणत्याही वक्तृत्वापेक्षा त्यांच्या वेदान्तज्ञानाच्या गृढतेविषयी लोकांवर असामान्य छाप पडे. त्यांचे ज्ञान इतके गूढ आहे, सखोल आहे की, शब्द उणे पडणारच! 'गुरोस्तु मौने व्याख्यानम्' हीच परमसिद्धीची खूण, असे भाविक लोक आपासात म्हणत. अगदी उघड्या विहिरीची खोली काही तरी तर्किता येते, पण जिचे तोंड बंद केलेले असते आणि उघडलेले कोणीच पाहिलेले नसते, तिच्या खोलीचा अथांगपणा आश्चर्य वाढवील तितका वाढवू शकेल. असे किंवा व्याख्यान न देता येणाऱ्या गुरूचेही 'गुरोस्तु मौने व्याख्यानम्' हे लक्षण होऊ शकेल, असे कोणी म्हणताच 'त्या टवाळाच्या तोंडी काय लागता?' असा जिकडून तिकडून भाविकांचा गोंगाट होई.

रमाबाईंची ह्या स्वामींवरले निष्ठाच त्यांना आज त्या वाटेने जातांना चालण्याइतकी तरी शक्ती देत होती. 'मालती योगानंदांच्या मठात जरी सुरक्षित नसली आणि कालच्या दंगलीत

हरवली असली, तरी ती कुठे आणि कशी आहे हे तरी योगानंदजी आपल्या 'जलदर्श' यंत्रात पाहून आपल्याला नक्की सांगतील,' हा विचार त्या भाविक आईच्या घाबरलेल्या मनाला थोडा तरी आधार देत होता. तो स्वामी आपल्याला ह्या संकटातून काही तरी उपायाने सोडवतीलच सोडवतील, असे त्याचे समाधान त्याच करीत होत्या आणि त्या निलार्भी स्वामीवरील श्रद्धेची ती काठी टेकीत त्या लटपटत असताही मंदिराकडे झपाझप चालल्या होत्या.

नायडूबाई ह्या भाविक असल्या तरी भाबड्या नव्हत्या, लुच्चे साधु त्यांनी पाहिले होते, पण म्हणून सगळेच लुच्चे असतात, असा अद्वातद्वा वाद कोणी घातला तर त्याला त्या हाणून पाडीत. योगानंदजींची, कोणापासूनही काही न मागता समजेल ते सांगण्याची प्रवृत्ती आणि त्यांनी सांगितलेले भूतभविष्य अगदी लबाडीचे तर काय, पण अगदी खोटे असल्याचाही लोकांत नसलेला बोभाटा, ह्या दोन पुराव्यांवरून योगानंदांविषयी त्यांचा चांगला ग्रह झालेला होता. ते सच्छील, परोपकारी साधुपुरुष आहेत हे तर उघडच होते, पण त्यांच्या अंगी भूतभविष्य वर्तविण्याची एक दैवी दृष्टि, काही अंतर्ज्ञान आहे, ह्याविषयीही नायडूबाईंचा विश्वास वाढत चालला होता. थोडीशी शंका वाटे, पण ती त्यांच्या प्रामाणिकपणाविषई नसून भूतभविष्य-वर्तमानज्ञानाची सिद्धीच मुळी किती अचूक असते, ह्याविषयी होय. त्याची परीक्षा घेण्याची ही बरी संधि आली असा विचार त्या नायडूबाईंच्या मनात, मालतीवरील ह्या संकटाने त्यांच्या हृदयांत झालेल्या कालवाकालवीतही आल्यावाचून राहिला नाही.

मंदिराच्या त्या प्रांगणात ह्या दोन्ही महिला पाय ठेवतात न ठेवतात तोच महंतांच्या एका शिष्याने त्यांना सामोरे जाऊन राखीव वाटेनें महंत राहात त्या मठापाशीं नेले. उभ्या राहतात न राहतात तोच इतका वेळ कसाबसा दाबलेला उसासा टाकीत टाकीत रमाबाईंनी शिष्याला विचारले, "पण आमची मालती कुठे आहे? मालती?"

त्यांच्या त्या उतावळ्या प्रश्नाची जणू वाटच पाहात असलेल्या त्या शिष्याने, त्याच्या मुखावेरील आश्वासक स्मिताने आणि दोन्ही पंजे वरदहस्तारखे हालवीत होकारार्थी नमविलेल्या ग्रीवेने सगळ काही ठीक आहे!' असे सुचविले. त्यायोगे रमाबाईंच्या जिवात जीव आला. चिंता ज्या वेगाने झटपट उणावली तितक्याच वेगाने उत्सुकता दुणावून रमाबाई "बोलावा ना मग तिला! अं? इथे कुठे दिसते नाही ती? आणा ना माझ्यासमोर!" असे काकुळतीने विनवू लागल्या. तेव्हा आता शब्द उच्चारलाच पाहिजे म्हणून उच्चारतो अशा निरूपायाच्या आविर्भावाने शिष्य उत्तरला,

"माताजी, गुरुमहाराज अभी बुलातेही है आपको! घबराअये मत! गडबड भी मत मचाना!"

योगानंदांप्रमाणे त्यांच्या शिष्यांनाही शक्यतो थोडे बोलण्याची शिस्त पाळावी लागते आणि योगानंद गुरुजींच्या अनुज्ञेवाचून कोणत्याही प्रश्नाला कोणतेही वाचिक उत्तरे सहसा देता येत नसे, भेटायला आलेल्यांना देखील महंत विचारू देतील तितकेच प्रश्न विचारता येत, ही तेथील सक्त प्रथा नायडूबाईंना माहीत होती. त्यांनी खुणेने रमाबाईंना दटावले, "थोड्या चूप रहा!"

इतक्यात महंतांच्या खोलीचे दार उघडले. दोन-चार प्रश्नेच्छु गृहस्थ बाहेर पडले. दोघीजणींना शिष्याने आत नेले, पण तेथेही मालती दिसली नाही. रमाबाईंना 'बोला' अशी खूण होताच त्यांनी हात जोडून विचारले,

"माझी मुलगी मालती, आपण कालच्या दंगलीतून सोडवून इथे सुरक्षित ठेवलीत हे उपकार मी जन्मोजन्मी विसरणार नाही. मी तिला न्यायला आले आहे. कुठे आहे माझी मालती?"

महंतांच्या खुणेवरून शिष्य म्हणाला,

"माताजी, तुमच्या मुलीला दंगलीतून मी सोडवली नि तुमच्या घरी पोचवायसाठी नेतही होतो, पण तिच्या ओळखीच्या एका गृहस्थाबरोबर ती स्वसंतोषाने घरी जाते म्हणून म्हणाली. ती म्हणाली, 'तो माझा जवळचा आप्त आहे."

"म्हणजे? कोण तो?" विझते घर पुन्हा भडकावे, तसा विझलेल्या चिंतेचा डोंब त्यांच्या हृदयांत पुन्हा पेटून रमाबाई कासावीसपणे विचारू लागल्या, "महाराज, इथे कुणी आमचा आप्तइष्ट नाही. महाराज, काही तरी घात झाला आहे! महाराज..."

निश्चयी मुद्रेने आपल्या हाताची तर्जनी उचलून त्या बाईंना "थांबा" असे महंतांनी खुणावले. रमाबाईचा तो न आवरता आवेगही त्या दटावणाऱ्या पण सहानुभूतीच्या खुणेने खाडकन् दबला. वाक्यांमागून वाक्ये त्यांच्या तोंडातून बाहेर घुसण्यासाठी ओठापाशी दाटली होती, ती तेथेच थबकली.

महंत डोळे किलकिले करून थोडे अंतर्मुख झाले. मग अत्यंत दयार्द्र स्वराने म्हणाले, "मैय्या, तुझी मुलगी हरविली नाही, माझी हरवली! देवाची इच्छा असेल तर मी हा पाहा तिला शोधून काढतो. पण विचारीन तेवढेच बोल. दिसेल तेवढेच पाहा. सांगेन तेच ऐक. मन माझ्या हाती सोपीव पाहू पहिल्याने. तुझा असा एकही विचार मनात येऊ देऊ नको. दिलेस मला तुझे मन रिकामे करून?

"दिले महाराज." असे सांगताच रमाबाई खरोखरच मन सुन्न झाल्यासारखा झाल्या. महंतांच्या हालचालीकडे नुसत्या टकमक बघत राहिल्या.

शिष्याने गुरुजींच्या खुणेवरून एक स्वच्छ परात त्यांच्यासमोर ठेवली. तीत स्वच्छ पाणी काठोकाठ ओतले. त्या परातीच्या किंचित वर असा एक स्वच्छ आरसा भिंतीला लावला. एक समई पेटवून जवळ ठेवली. महंत योगानंदजींनी पळीतील जल मंत्रून आपल्या डोळ्यावर शिंपडले आणि एकाग्रचित्त मंत्र जपत ते त्या परातीतील पाण्यात टक लावून पाहात बसले. श्वाससुद्धा भीत भीत सोडीत सारे जण निःस्तब्ध झाले.

थोड्याच वेळात महंतांनी मान वर उचलून नायडूबाईंना विचारले,

"ह्यांना एक मोठा मुलगा आहे ना?"

रमाबाई चमकल्या! 'ह्यांना कसे कळले ते? अंतर्ज्ञानी खराच बरे हा पुरुष!'

पण नायडूबाई काही विशेष चमकल्या नाहीत, त्या उत्तरल्या,

“हो, मी स्वतःच पूर्वी तुम्हास सांगितले होते की, रमाबाईंना एक मोठा मुलगा होता. तो लढाईवर गेला. तिकडे मारला गेला. त्याला आता पाच-सहा वर्षं उलटून गेली.”

“पण तो मारला गेलेला नाही. मी तेच सांगत होतो की, ह्यांचा तो वडील मुलगा जिवंत आहे. चांगला धट्टाकट्टा आहे. हा पाहा, माझ्यासमोर जशा तुम्ही तसा प्रत्यक्षपणे बसलेला आहे. बोलतो आहे.”

महंतांच्या प्रत्येक वाक्यागणिक रमाबाईंच्याच नव्हे तर नायडूबाईंच्या अंगात देखील आश्चर्याच्या चमका सणसणत गेल्या. रमाबाई थरथरत्या स्वराने उद्गारून गेल्या,

“माझा पुत्र! जिवंत! देवा, तुमच्या तोंडात साखर पडो!”

नायडूबाईंनी आश्चर्याच्या पेचातून स्वतःला थोडेसे सोडवून विचारले,

“पण तो ह्यांचाच पुत्र कशावरून? क्षमा व्हावी, पण मिथ्याभास...”

“उगीच तर्क नको. ऐक, ह्यांचाच पुत्र कशावरून ते. त्याच्या भालावर एका घावाचे खोल चिन्ह आहे. काय? होते ना तसे?”

नायडूबाईंना ते काहीच ठाऊक नव्हते म्हणून त्यांनी रमाबाईंकडे पाहिले. रमाबाई चाचरल्या. कारण त्यांच्या पुत्राच्या कपाळावर कोणच्याही घावाचे चिन्ह नव्हते. पण ते नव्हते असे धरले तर महंत खोटे ठरणार आणि महंतांचे अंतर्ज्ञान लटके पडताच मेलेला पुत्र पुन्हा जिवंत होण्याची आणि हरवलेली कन्या सापडण्याची अगदी हाताशी आलेली सुखद शक्यताही पुन्हा घोर संशयात पडणार!

“नसेल तर साफ नाही म्हणून सांग, चाचरू नकोस.” महंतांनी हटकले.

“तसा कोणचाही वण त्याच्या डोक्यावर नव्हता.” रमाबाई बोलू की नको असे दबता दबता झटकन् बोलून गेल्या.

“नीट आठव. सैन्यात गेल्यावर तुझा पुत्र लढाईवर गेला होता ना? ठीक तर, तिथे हा घाव लागला.”

“हो रे हो! महाराज, आठवले मला. अगदी खरे. त्याच्या शेवटच्या पत्रात डोक्यावर दुखापत झाल्याचे त्याने लिहिले होते खरेच. आपले अंतर्ज्ञान त्रिकाळसत्य आहे.”

स्वतः रमाबाईंनाही जे आठवत नव्हते ते आजवर त्यांच्यात कोणालाही माहीत नसलेले असे वृत्त इतके तंतोतंत महंतांना कळावे! खरे ठरावे! आणि असे अगदी सहज ओघाने! नायडूबाई अगदी चकीत झाल्या, महंतांच्या शब्दावर रमाबाई इतकाच भाविक विश्वास नायडूबाईंचा देखील न बसणे आता केवळ अशक्य होते. त्या अगदी परस्थ आणि अनोळखी. महंतांनीं इतक्या पटापट त्या पुत्राच्या इतक्या खाणाखुणा आणि घरची माहिती सांगितली की, तो पुत्र त्यांच्या डोळ्यांसमोर तेथे त्यांच्या अंतर्दृष्टीला दिसते होता, हे पाखंडातील पाखंडालाही नाकारता येणे दुरापास्त व्हावे.

रमाबाईंच्या आश्चर्याला तर पारावर उरला नाही. ‘तुमचा पुत्र जिवंत आहे, खुशाल आहे!’ ही त्या महंतांची वाक्ये ऐकतांना त्यांचे हृदय आनंदाच्या लाटांनी इतके हेलावले की, त्यात

मालतीच्या हरवण्याची आठवणही क्षणभर बुडून गेली. हरवलेली मुलगी शोधीत असणाऱ्या त्या आईला तिचा मेलेला एकुलता एक पुत्र जिवंत सापडला.

"पण सांगणे ते पुढेच आहे." महंत झटपट पुढे सांगू लागले, "त्या तुमच्या पुत्राचा हा एक स्नेही पाहा. तो नि...हं, ही पाहा मालती आली. ठीक. नागपूरकडे तुमचे घर ना? हं, बघा तर, त्या स्थली मालती त्यांच्याशी प्रेमाचे संगनमत करीत आहे. हाच तो गृहस्थ. काल ह्याच्याबरोबर मालती गेली. हो, अगदी संतोषाने चालली आहे पाहा. अगदी तुम्ही जशा मला दिसता नि म्हणूनच इथे आहा हे खरे, अगदी तसेच हे मला दिसते आहे नि म्हणून खरेही तितकेच आहे. निघाले, आगगाडी सुटली! काय? अक्षर पुसट? पण नागपूरकडे. मालती तिच्या प्रियकराबरोबर नागपूरला निघून गेली आहे! ऱ्होम् ऱ्होम् ऱ्हूम् वषट्! नेत्रत्रयाय फट्!"

एकाग्र चित्ताच्या अवधानाने झालेला तो महंत हा मंत्र उच्चारताच हलकेच हरिणजिनावर डोळे मिटून पडला. शिष्याने त्या अनेक प्रश्नशंकाजिज्ञासादिकांनीं व्याकूळ झालेल्या दोघी बायांना बोटाने चूप राहण्यास दटावून ते यंत्र मोडले. त्यासरशी कोठून काय की आवाज घुमत घुमत गेला आणि घंटांचा घड कोठून तरी खण खणाणून मंदावला. परात, समई, आरसा प्रभृती पदार्थ झटपट ठिकच्या ठिकाणी त्या शिष्याने ठेवले. वारा घालीत गुरुजींपाशी थोडा वेळ तो बसला आणि गुरुजींनी किंचित हात उचलून खुणावताच त्या बायांना तो अगदी खोल आवाजात बजावता झाला की, "आता काही एक अधिक सांगता येणार नाही. स्फूर्ति उतरली. केवळ 'पुढे काय करायचे?' इतका एक प्रश्न हवा तर विचारा. योगाची तंद्री उतरण्याच्या आत जर काही गुरुजींनी सांगितले तर तितकेच काय ते ऐकाव नि कोणतीही अधिक चर्चा न करता आज परतावे. उद्याच उद्या."

एक शंभर प्रश्न रमाबाईंना एका श्वासात विचारून टाकायचे होते; इतका त्यांच्या मनात त्या महंताने वर्तविलेल्या मालतीविषयीच्या वृत्ताने चिंतातुर विचारांचा गोंधळ उडवून दिला होता. पण निरुपाय! एका उत्तराने त्यांचे शंभर प्रश्न ठिकच्या ठिकाणी थिजून टाकले. ते उत्तरे म्हणजे त्या उग्रट शिष्याचे 'चूप' म्हणून दटावणारे बोट. अर्थात् जो एक प्रश्न विचारायची अनुज्ञा मिळाली होती तेवढाच रमाबाईंनी व्याकुळपणे विचारला,

"आता आम्ही पुढे काय करावे म्हणजे हे संकट टळेल? महाराज, कृपा करून..."

शिष्याने 'हा!' म्हणून बोट पुन्हा दटावले, रमाबाईंच्या वाक्याची लांबी ठरलेल्या मापाच्या बाहेर वाढलेली होती!

महंतांनी गुंगीतल्या गुंगीत आळेपिळे दिले आणि तुटक, विसंगत शब्दात ते पुटपुटू लागले.

"हां! - आगे? इच्छा! किसकोभी इधर उधर मत बोलो! बोलाल लोकात तर मालती उरलेली लाज सोडून तुमची वैरीण बनेल! इथे कुणापाशी चकार शब्द मालती हरवल्याचा काढणे नाही! अबीके अबी- थेट नागपूरला जावे. लडकी मैदानमे भेटेल! पण उशीर कराल इथे -एक रात्र काढाल - मिळणार नाही! नागपूरहून- मुलगी-बस्स्, चल देगी दूर दूर दूर! जावे लवकर- नागपूर- मैदानमे! देख, देख, देख!! ही पाहा मालती! आऽ आऽ आऽ! बेटा, आ! माके पास जा!"

महंत निश्चेष्ट पडले, शिष्य म्हणाला, “माताजी, टळल तुमचे संकट! ऐकलात आता गुरुजींचा अभिप्राय? साक्षात्काराचे ते शब्द? ते शब्द पाळाल तर मुलगी परत येईल. चालत येईल. ह्या प्रांती, इथे, कुणाशी काही एक न बोलता, गाजावाजा न करता, आजच्या आज निघा नि नागपूर गाठा! लोकात दुलौकिक होईल. ती मालती आणखीन निलज्र्ज बनन दूर पळून जाऊ नये असे वाटत असेल तर चकार शब्द न बोलता नागपूरला ती आहे तों तीन चार दिवसात तिला गाठा. बस्स्, यावे आता. छे! छे! छे! हे काय? फळ? दक्षिणा? छे! छे! माता, फुलसुद्धा दुसऱ्याच ह्या दैवताला चालत नाही! यह महंत एक अलौकिक साधु है! वैसे तो लाखो तुम देखते है! परंतु माताजी, यह तो साक्षात्कारी पुरुष! अच्छा, चलिये! अं हं, आता एक शब्द अधिक बोलणे नाही! बाहेर!”

शिष्याचा तो शेवटचा शब्द इतक्या निर्धाराचा होता की, आता पाऊल बाहेर न टाकले तर हा धक्का मारतो की काय, असे वाटावे. त्या दोघी नमस्कार करून फळे, दक्षिणा, परत घेऊन, गुपचूप त्याच पावली बाहेर पडल्या; गुपचूप मंदिराबाहेर आल्या. वाटेला लागताच रमाबाई काही बोलू लागल्या तोच नायडूबाईंनी चेतावणी दिली,

“अं हं! वाटेने नाही. जे काय बोलणे ते घरी!”

नायडूबाईंच्या घरी त्या प्रथम गेल्या. जाताच नायडूबाईंनी विचारले,

“आहे का हो तो गृहस्थ तुमच्या ओळखीचा? तुमच्या मुलाचा कुणी मित्र मालतीशी इतकी लगट करील असा? मालती अशी थोडी अडकली होती का कुणाच्या लोभात? तुमचा तिला नकार होता की काय?”

बिचाऱ्या रमाबाई! सकाळपासून इतका वेळ इतक्या चमत्कारिक धक्क्यांनी त्यांचे हृदय हादरत आले होते की, आता त्यांच्या मेंदूची विचारशक्तीची क्रियाच अगदी मंदावत आली होती. त्यातल्या त्यातही शेवटच्या प्रश्नाने चमकून त्या म्हणाल्या,

“नाही हो बाई! माझ्या मालतीला मी कधीही असे भलते सलते बोलताना ऐकलेच नाही, मग तिला नकार कसला नि होकार कसला? आता, ती हिंडाफिरायला जाई तिच्या मैत्रिणीबरोबर, देवळात जाई, नाटकाला गेली असेल, पण असे काही कुणी पुरुषमनुष्य तिच्या परिचयाचा नव्हता. आता माझ्या मुलाचा मित्र कुठला, मी तरी काय सांगणार? जग भटकलेला माझा मुलगा! पण मालती अशी निघावी अं! हाय रे दैवा!”

“अं हं! दैवाचे तर आज देवासारखे उपकार झाले आहेत तुमच्यावर. पुराणातील कथा ह्या युगी घडल्या! तुमच्या मेलेल्या पुत्राचा आज पुनर्जन्मच झाला नाही का? मग हरवलेली मुलगी भेटायची ती चिंता कशाला? मी सांगते, तुम्ही आता सारे तर्क- वितर्क सोडा; त्या महंतांच्या अगदी तंतोतंत सत्य ठरलेल्या अद्भुत अंतर्ज्ञानावर विश्वसून त्यांनी सांगितलेल्या मार्गेच जा.”

“छे! तुम्ही याल तरच नागपूरला मी जाते.” रमाबाई हटून बसल्या. स्वतःच्या पायावर त्यांना उठवेचना.

मालती त्या कीर्तनाच्या दंगलीत हरवली, ही बातमी त्या प्रांती कोणाच्याही कानावर न घालता रमाबाई आणि नायडूबाई अशा दोघीही शेवटी नागपूरला त्या दिवशीच निघून गेल्या.

***

चार

रमाबाई नायडूबाईंसह नागपूरला ताबडतोब निघून गेल्यामुळे आणि त्यांनी मालती हरवल्याचा चकार शब्द कोठेही न काढल्यामुळे त्यांच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनासुद्धा त्याची वार्ता नव्हती, मग लोकांना वा पोलिसांना कोठली असणार?

त्याच दिवशी रात्री योगानंदस्वामींचे मथुरेच्या लोकांना शेवटचे दर्शन होणार होते, शेवटचे भजन ऐकायला मिळणार होते. कारण की, स्वामींचा तळ भजन संपताच मथुरेहून हलण्याचे नक्की झाले होते. अर्थातच मंदिराच्या प्रांगणात लोकांची दाटी नेहमीपेक्षासुद्धा जास्त झाली होती. त्यांच्या चार मुख्य शिष्यांच्या चौकडीत योगानंदमहाराज मध्यभागी उभे राहून वीणा घेऊन भजन गाऊ लागले. रंग चढत चालला. थोड्या वेळाने स्वामीजींच्या आज्ञेप्रमाणे ते हजारो लोकही उभे राहून एकमुखाने जेव्हा नामघोष करू लागले, मोठमोठे पखवाज, मृदुंग, झांजा, सारंग्या, सहस्त्रावधि तालिका, एकसहा झंकारत त्या शतकंठनिनादी नामघोषाला जेव्हा साथ देऊ लागल्या आणि महंत भक्तीच्या आवेशात येऊन उंच हाताने तालाची गती धृततर करण्यासाठी सारखे खुणावीत जेव्हा त्या धृततर तालावर नामघोषाची नुसती रणघाई उडवू लागले, तेव्हा त्या ध्वनिसिंधूच्या लाटांसरशी हृदये थरथरून ज्याचे त्याचे देहभान क्षणभर सुटल्यासारखे झाले. भक्तीच्या आनंदात तल्लीन होऊन कित्येक नाचू लागले, कित्येकांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु गळू लागले, नामघोषाच्या गजराने सारे वातावरण दुमदूमून गेले.

पण शेवटी जेव्हा लय साधून महंतांनी दोन्ही हात वर केले आणि 'शांत व्हा' अशी सूचना दिली, तेव्हा एखाद्या मोठ्या पेटीचा संगीताच्या भरात भाताच फुटून गेल्यामुळे ती जशी अकस्मात् मुकी होऊन जाते, तशी ती विशाल सभा एकदम निःशब्द होऊन गेली. हूं का चू कोठे होईना. जो तो साधुशील भक्ताच्या मुखांतून आता पुन्हा कोणते भावरसाळ भजनी पद निघते ते उत्सुकतेने टकमक पहात राहिला.

गाढ झोपलेल्या पक्ष्यांच्या घरट्यांतून पहाटे जशी त्याची जागती पहिली लकेर ऐकू यावी आणि ती गोड लागावी, तसाच त्या निःस्तब्ध सभेच्या त्या शांततेतून काही वेळाने हळूहळू एका सारंगीचा मंजूळ सूर पुन्हा उठू लागला. स्वामींच्या भजनाला साथ देणाऱ्या शिष्याने त्यांच्या आवडीचे मीराबाईंचे खालील पद सारंगीवर धरले--

बता दे सखि कौन गली गये शाम? ।।
कौन गली गये शाम? ।। धृ. ।।
गोकुल धूंडी । वृंदावन धूंडी ।
धूंडी आयो व्रजधाम ।। बता दे सखि. ।। १ ।।

"कौन गली गये शाम?" हे रसाळ चरण इतक्या आर्ततेने तो भक्त गाऊ लागला, शब्दाशब्दाला आळीपाळीने उंचवीत निंचवीत मधुर आलापात आळवू लागला की, ज्याच्या त्याच्या हृदयात ज्याच्या त्याच्या प्रियकराची मूर्ति दिसू लागली. आपणच आपल्या प्रियाला शोधीत आहोत, असा

भास होऊ लागला. “कौन गली गये शाम?’ ‘सांग ना सखे कोणच्या आळीत माझा प्रियकर लपला आहे? मी गोकुळ धुंडून आले, वृंदावन धुंडून आले, व्रजांत पाहून आले, पण माझा प्रियकर सापडते नाही. सांग ना सखे, तो मनमोहन कुठे आहे? कौन गली गये शाम?’

संसारप्रवण तरुणतरुणींच्या हृदयात त्यांच्या ऐहिक प्रियकराच्या स्मृति जागून भेटीची गोड व्याकुलता थरथरू लागली, पुसू लागली, “कौन गली गये शाम?’

आध्यात्मप्रवण साधुसंत भक्तांच्या हृदयांना त्यांच्या प्रियकराची ओढ व्याकुळवू लागली. हा जीव जन्मजन्मांच्या गोकुळवृंदावनांतून ज्या कशाचा शोध करीत, ज्या कशाची ओढ लागून, रसरूपरंगस्पर्शाच्या फुलोरी कुंजाकुंजातून त्या आनंदकंद देवाच्या शोधासाठी सारखा धावत आहे, त्याच्या भेटीची उत्सुकता आर्ततेने तेच विचारू लागली, ‘कौन गली गये शाम? सांग ना सखे, तो देव कुठे आहे की ज्याच्या आकर्षणाने हा जीव असा कासावीस होऊन युगोयुग सारखा धावत चालला आहे? ज्याच्या मुरलीनादे जगावस वाटते, तो मुरलीधर कुठे आहे? कौन गली गये शाम?’

ते रसाळ पद चालू असताच मध्यंतरी, फुलशेजेवर निजले असता सहसाच जसे काही काडकन् डसावे तसे, त्या सात्विक मंजुळतेत रमलेल्या सभेच्या कानाला वाटेने एकामागून एक येणाऱ्या दहा-बारा मोटारींच्या भोंग्याची कर्कश फों फों अकस्मात् ऐकू आली. मंदिराच्या ज्या प्रांगणात भजन थाटत असे त्याच्या तीन दिशांना असणाऱ्या तिन्ही दाराशी त्या मोटरींपैकी दोन-दोन मोटारी फों फों करीत वळून थांबल्या. योगानंदस्वामींचा लौकिक मथुरेत दूरवर फैलावला असल्यामुळे त्यांच्या भजनाला कित्येक मोठेमोठे लोक मोटारी घेऊन नेहमीच येत, त्यांच्यापैकीच कोणाच्या तरी ह्या मोटारी असाव्यात. पण तरी देखील भजनाच्या भर रंगात हा असा रसभंग करणारा आडदांडपणा करायचा काही तरी संकोच ह्या मोटारवाल्यांना वाटायला नको होता का? लोक थोडेसे त्रासून आपसात असे कुजबुजले, पण महंत योगानंदजी भजन जसे गात होते, तसेच तल्लीनपणे गात होते, इतक्यात एक दांडगा, उग्रट आणि उंच गृहस्थ प्रांगणाच्या समोरच्या द्वारातून आत घुसून धिटाईने वाट काढीत वाक्पीठावर महंत आपल्या भजनी ताफ्यासह जेथे बसले होते, तिकडे सरळ जाऊ लागला, आजूबाजूचे लोक त्याला ओरडून सांगू लागले, ‘खाली बसा’, ‘अहो शहाणे!’, ‘ओढा खाली! हात धरून बसवा!’ पण ओरडण्याकडे वा उपहासाकडे किंचित्ही लक्ष न देता तो व्याक्पीठावर गेला आणि न विचारताच वर चढला. भजनाच्या रंगांत मनःपूर्वक रंगलेल्या एखाद्या भक्ताच्या अंगात दैवी आवेश संचारतो. किंवा अर्धवेडा एखादा मनुष्य मोठमोठ्या सभांतील नुसत्या जनसंमर्दाच्या देखाव्यानेच वारा प्यालासारखा होतो, पण हा गृहस्थ अर्धवेडाही दिसते नव्हता, भाबडाही दिसते नव्हता. नीटनेटका वेष, ऐटबाज, समंजस मुद्रा होती त्याची. म्हणून तो वाक्पीठावर चढताच महंतांच्या त्या चौकडीतील शिष्याने त्याला नम्रपणे विचारले,

“काय हवे आपणाला? असे एकदम वाक्पीठावर चढणे सभाविनयाला धरून नाही.”

परंतु तो गृहस्थ ते ऐकले न ऐकेलेसे करून थेट महंतांच्या जवळ गेला आणि त्यांना म्हणाला,

“तुम्हांला बाहेर कुणी मोठे गृहस्थ भेटायला बोलवीत आहेत, चला.”

महंतांनी त्या गृहस्थाला स्वतः उत्तरे न देता शिष्याकडे बोट दाखविले. शिष्य म्हणाला,

“त्या थोर गृहस्थांना स्वतः आत येऊ द्या. महंत एका देवालाच काय ते सामोरे जातात; माणसाला नाही.”

त्या शिष्याकडे दुलर्क्ष करून तो गृहस्थ योगानंदांना दटावून म्हणाला,

“तुम्हालाच आले पाहिजे बाहेर.”

त्या दटावण्यासरशी महंतही चमकल्यासारखे झाल्यावाचून राहिले नाहीत.

“भजन संपेतो आम्हांला येता येत नाही.” ते कांही तरी शंकेने अडखळत उत्तरले.

“तुम्ही होऊन येत नसाल तर मी तुम्हाला न्यायला आलो आहे. बोला, येता की नाही?”

“हा, उद्धटपणा कामाचा नाही.” शिष्याने रागावून या गृहस्थाला फटकारले. “असे आहेत तरी कोण ते एवढे थोर गृहस्थ? नांव सांगा.”

“पोलिस सुपरिंटेंडंटसाहेब!”

ह्या शब्दांसरशी योगानंदस्वामींची ती प्रशान्त मुद्राच नव्हे, तर त्यांचा तो भक्तिशील नखशिखान्त आविर्भावही झटक्यासरसा पालटून तो कोणी दुसराच तल्लख, तापट आणि भांडखोर पुरुष दिसू लागला. त्या बोलवू आलेल्या गृहस्थाने ते पोलिस सुपरिंटेंडंटचे नाव पुरते उच्चारले नाही तोच एखादा वज्रमुष्टीसारखा बळकट ठोसा त्याच्या नाकावरचे लगावून योगानंदस्वामींनी जी उडी घेतली ती इतक्या लांब पल्ल्यावर होती की, नाकावरील ठोशासरशी चक्कर आलेला तो पाचारक गृहस्थ चांगला दांडगा असताही स्वतःला सावरून त्याने योगानंदामागे जी उडी घेतली, ती योगानंदांच्या उडीच्या अर्धी लांब देखील पडली नाही. त्या चारी शिष्यांनीही योगानंदांच्या पाठोपाठ आपले धारदार चिमटे उपसून वाक्पीठावरून खाली उड्या झोकल्या होत्या. दाटलेल्या मंडळीत त्या गोसाव्यांच्या तशा धडाधड उड्या पडताच तेथे मोठा गोंधळ माजला. ओरडत ओरडत तिकडचे लोक उठून उभे राहिले, रेटारेटी सुरू झाली.

पण तो सर्व प्रकार इतक्या झटपट चालू होता की, उड्या पडलेल्या बाजूची लोकांची दाटी आरडाओरड करून उठेतो सभेच्या इतर बाजूंना काय झाले ह्याची म्हणण्यासारखी वार्ताही नव्हती आणि ज्यांना काहीतरी धक्काबुक्की चालू होऊन महंत उडी टाकून परतत आहेत इतके दिसले, त्या लोकांनाही तसे का घडत आहे, ह्याची तर मुळीच कल्पना नव्हती. ‘अहो, काय? झाले काय?’

इतकेच जो तो मोठमोठ्याने विचारीत होता. ते काय म्हणून घडत आहे, का घडत आहे, हे प्रश्न मनांत येण्याइतकासुद्धा वेळ मिळाला नाही. धाडधाड उड्या टाकून ती गोसावी मंडळी दाटीत जी घुसली, ती नीट धीटपणे वाट कापीत जवळजवळ दिसेनाशी झाली. कारण, शेकडो लोकांनी त्या आकस्मिक आरडाओरडीसरशी रेटारेटी करीत पुढे घुसून त्या प्रांगणात एकच गोंधळ उडवून दिला होता. तो त्या गोसाव्यांच्या पथ्यावरचे पडल्यासारखा झाला. कोणी म्हणाले, “महंतांच्या अंगात ‘महावीरजी का संचार हुवा!’ हनुमानजींचा संचार झाला! म्हणून ते उड्डाण घेत रामचंद्राच्या देवालयाकडे धावत आहेत.” कोणी म्हणाले, “कुण्या वेडपटाने महंतजींना त्रास दिला म्हणून ते वैतागले!” आणि कोणी कोणी तर त्या प्रशान्त भक्तिरसाच्या शांततेत गुंग असता ही एकदम झालेली आरडाओरड ऐकून क्षणभर भान सुटल्यासारखेच झाले. त्या स्वामींचे सुरेल भजन चाललेल्या प्रशांत प्रांगणातून उचलले जाऊन आपण सहसाच दुसऱ्या कोण्या स्थळी, कोणच्याशा दंगलीत फेकलो गेलो आहोत की काय, असे तो आकस्मिक दृश्यपालट (तो ट्रॅन्स्फर सीन) होताच त्यांना भासू लागले.

इकडे ज्या समोरच्या द्वाराकडून पोलिस सुपरिंटेंडंटचा म्हणून निरोप आणणारा तो मनुष्य घुसला होता, त्या द्वाराच्या बाजूला उडी न घालता दुसऱ्या दाराच्याच बाजूला त्या गोसावी मंडळींनी ज्या उड्या घातल्या आणि तिकडल्या दाटीत मिसळून जाण्याचा यत्न केला, तो बुद्ध्याचा केलेला होता. त्या द्वाराकडे बहुतेक असेच लोक बसविलेले होते की, ते भजनाला प्रत्यही येत होते, फार भाविक दिसते आणि सगळ्यांच्या आधी येऊन मोठ्या आस्थेने आपापल्या जागा धरून बसत. तसा आस्थेवाईक भजनलोलुप समाज ज्या द्वारापाशी होता, त्या द्वारानेच आपल्याला सुखरूपपणे बाहेर पडता येईल, अशी महंतांनी तात्काळ अटकळ बांधली. पोलिस सुपरिंटेंडंटचा निरोप ज्या समोरच्या द्वाराने आला, त्याच बाजूला ते असल्यास पोलिस येऊन उभे राहिले असण्याचा संभव फार, ह्यासाठी त्या चतुर महंताने आणि त्यांच्या शिष्यांनी त्या समोरच्या द्वाराला टाळून त्या भाविक लोकांनी दाटलेल्या द्वाराकडे मुसंडी मारली. त्यांच्या मागोमाग त्या पोलिस सुपरींटेंडंटच्या निरोप्याच्या हातून निसटून ते गोसावी त्या भाविक जनांना बसविलेल्या द्वारापाशी आले देखील. आता आणखी एक मुसंडी घेतली की द्वारात, की लगेच द्वाराबाहेर.

अशा कृतनिश्चयाने ते पाची गोसावी त्या द्वाराशी भिडले आणि तेथे दाटी करून उभे राहिलेल्या त्या त्यांच्या भाविक श्रोत्यांना ‘वाट द्या’ म्हणून घाईघाईने म्हणाले.

तो सहसाच त्या भाविक भक्तांची त्या द्वारापुढची ती दाटीच एकेरी ओळीने खांद्याशी खांदा भिडवून पसरत पसरत त्या पाची गोसाव्यांना मधोमध घेणारे एक वर्तुळ घालून उभी ठाकली. त्यातील प्रत्येकाने आपापले पिस्तुल देखता देखता उपसले आणि त्या गोसाव्यावर रोखून त्यांच्या पुढाऱ्याने योगानंदाला आज्ञा सोडली,

“थांब, एक पाऊल पुढे टाकशील तर मारलाच जाशील.”

वैष्णवी गंधे, वैष्णवी मुद्रा, माळा, भगवी वस्त्रे, प्रभृति धारण केलेले, भजनात तल्लीन दिसणारे, नित्य नेमाने अगदी आरंभापासून येऊन भाबड्या मुद्रा करून बसणारे आणि साध्यासिध्या माणसांसारखे दिसणारे हे नेहमीचे श्रोते एकदम एकजात पिस्तुले रोखून त्या बिचाऱ्या साधुशील सत्पुरुषाच्याच अंगावर उलटले! देवावतारी भगवद्भक्त म्हणून प्रत्यही ज्याच्या पाया पडले, त्याच्याच जिवावर अकस्मात् एकजुटीने उठले!! ‘हे आहे तरी काय?’ असे दिङ्मूढ झालेले शेकडो लोक कुजबुजू लागले, शेकडो भयभीत होऊन प्रांगणाच्या बाहेर निसटून जाऊ लागले. काहींच्या मनात सहानुभूतीही जागून त्या धर्मपरायणभक्ताला सोडविण्यासाठी दंगल करावी, असेही येऊ लागले.

पण त्या महंताच्या पक्के ध्यानात आले की, ‘ह्या नाना ढेगाखाली आणि ढोंगाखाली छपून वेषांतर केलेले हे तीस- चाळीस गुप्त पोलिसांतील लोकच ह्या तिन्ही द्वाराशी प्रत्यही भजनाला येऊन बसत असले पाहिजेत! त्यांचे कपट आपणाला उमगल नाही खरे! आपण त्यांच्या पंज्यांत पुरतेपणी गवसलो खरे!!’ तरीही एक शेवटचा उपाय म्हणून त्यांनी अत्यंत कर्कश आणि उंच स्वराने त्या खळबळलेल्या समाजाला होकारले,

“अहो, इथे धर्माचा अभिमानी कुणीच नाही का? भगवाना, आता तूच तुझ्या भक्तासाठी धाव!”

त्यासरशी समाजातील कित्येक प्रामाणिक सज्जन चिडले. त्या महंताविषयी जी काय प्रत्यक्ष माहिती होती, ती त्यांच्या मनात अढळ श्रद्धा जागविणारी होती. त्या अपरिग्रही, निलार्भी, स्वधर्मप्रचारक भक्तावर न जाणो, मिशनरी प्रभृति परधर्मीयांनीच काही कुभांड रचले नसेल कशावरून? अशा भावनेने काही धाडसी स्वधर्माभिमानी लोक खवळले. पोलिसांवर दोन-तीन दगडही पडले, शिव्यागाळीचा तर नुसता मारा चालला.

इतक्यात मुख्य द्‌वाराने लाठीबंद पोलिसांच्या तुकडीसह स्वतः पोलिस सुपरिंटेंडंट आत आले, वाक्पीठावर चढले आणि खणखणीत आवाजात सर्व लोकांना उद्देशून आज्ञापिते झाले,

“लोकहो, योगानंद हे नाव घेतलेल्या ह्या मनुष्याने इथे जे अवडंबर आजपर्यंत रचले त्यावरून हा कुणी महान् भगवद्भक्त आहे, असे आपणासारख्या निर्बंधशील नागरिकांना वाटणे साहजिक होते. पण आम्हाला ह्याची जी माहिती आहे, ती ऐकताच ती आपली सहानुभूती साहजिक असली तरी सर्वस्वी अनाठाई होती, हे आपणा सर्वांना कळूनच येईल. ह्या स्वामीचे सोंग घेऊन वावरणाऱ्या योगानंदाच खरे नाव जरी आपण ऐकाल तरी आपण आश्चर्याने थक्क व्हाल. या योगानंदस्वामींच खरे नाव रफिउद्दिन अहमद असे आहे. हा पंजाबी मुसलमान. ह्याच्यावर पूर्वी अत्यंत क्रूरतेने घातलेल्या दोन दरोड्यांचा आरोप सिद्ध होऊन ह्याला पूर्वी पंजाबमध्ये सात वर्षं काळ्या पाण्याची शिक्षा झाली होती. त्याप्रमाणे ह्याला काळ्या पाण्यावर धाडण्यांत आले असता हा चार वर्षांनी तिथून पळाला. गेली दोन वर्षं ह्याने ह्याच्या ह्या चार शिष्यांप्रमाणेच अनेक दुष्ट लोकांना भोवती जमवून पुन्हा अनेक चोऱ्या, दरोडे, अपहरण प्रभृति भयंकर उपद्रव द्‌यायला आरंभले आहे. गेल्या वर्षी पोलिसांनी ह्याच्या टोळीला अरण्यात वेढले असता तिने पोलीसांवर अचानक गोळ्या झाडल्या नि अधिकाऱ्याला घायाळ करून नि त्याच्याच घोड्यावर स्वार होऊन हा धाडसी दुष्ट पसार झाला. त्यानंतर तो बेपत्ताच होता; पण हाच तो, असा संशय आल्यावरून ह्याच्या भजनांत आम्ही, हा मथुरेला आल्यापासून गुप्त पोलिसांना नाना वेषांनी दारादारावर ठेवून सक्त पहारा करीत आलो. अशासाठी की, पूर्ण शोध होऊन वॉरंट सुटताच ह्याच्यासारख्या धाडसी अपराध्याला साथीदारांसह अचानक पकडता यावे. सर्व पुरावा जुळून, खाणाखुणा पटून, ह्याच्या एका साथीदाराच्याच बित्तंबातमीवरून अलाहाबादेहून सुटलेले वॉरंट हे पाहा. हे आजच संध्याकाळी आमच्या हाती आले. ही टोळी तर आता भजन संपताच गुप्त होऊन निसटणार, असा ह्यांचा बेत कळल्यावरूनच भर भजनामध्येच ह्यांना पकडायच ठरले. एका दोघांना हे बेरड दाद देणार नाहीत, ही अटकळ आम्हांला आधीच असल्यामुळे ह्यांच्यावर असा सशस्त्र छापा घालावा लागला. आपल्यातील काही जणांकडून एका साधूचा हा छळ होतो आहे अशा भलत्याच समजुतीने दांडगाई, दंडेली होऊ नये म्हणून आम्ही इतका उलगडा केला आहे. आता आपण सर्वांनी दहा मिनिटांच्या आत हे पटांगण मोकळे केले पाहिजे. तसेच रस्त्याला उद्‌या सकाळपर्यंत कोणत्याही प्रकारचा जमाव होता कामा नये. नाही तर लाठी चालवून पोलिसांना तो मोडावा लागेल. वॉरंटाप्रमाणे आमचे कर्तव्य आम्हाला बजावलेच पाहिजे. त्यातील तथ्यातथ्थ निवडायच कर्तव्य न्यायालयाचे.

पोलिस, दहा मिनिटांच्या आत ह्या पाची अपराध्यांना बेड्या ठोकून तुरुंगाकडे घेऊन चला नि हे पटांगण मोकळे करा.”

दहा मिनिटांच्या आत त्या पाची गोसाव्यांच्या हातापायांत बेड्या ठोकून त्यांना तुरुंगाकडे नेण्यात आले आणि त्या साऱ्या जमावाची आपोआपच पांगापांग होऊन त्या पटांगणात चिटपाखरूसुद्धा दिसेनासे झाले!

परंतु तो पकडलेला गोसावी खरोखरी कोण होता? स्वामी योगानंद की रफिउद्दीन अहमद? आणि मालती? तिचे काय झाले?

***

## पाच

अलाहाबादच्या बंदिशाळेतील बंदिवानावरील मुख्य जमादाराला सक्त आज्ञा सुटली होती की, आज काळ्या पाण्यावरून पळून आलेला कट्टर दरोडेखोर रफिउद्दिन त्याच्या साथीदारांसह तुरूंगात आणला जाणार आहे; तेव्हा कोणाही बंदिवानाला ह्यातील ब्रही आगाऊ कळू नये आणि त्याचा कडेकोट बंदोबस्त ठेवला जावा. "जर त्यात काही हयगय झाली, तर जमादार, तुमच्याच पायात बेड्या ठोकल्या जातील!" बंदिपालसाहेबाने बजावले.

बंदिपालाच्या (जेलरसाहेबांच्या) पुढे ताठ उभ्या राहिलेल्या त्या मुसलमीन जमादाराने इंग्रजी पद्धतीचा सैनिक 'सॅल्यूट' करून म्हंटले,

"जी हुजूर. तो मोठा दरोडेखोर असेल, पण मी अशा छप्पन्न दरोडेखोरांना ह्या तुरुंगात माझ्यापुढे दाती तृण धरायला लावले आहे. तो काळ्या पाण्याहून पळाला असेल, पण म्हणावे हे लाल पाणी आहे. ह्या दंड्याच्या एका फटकाऱ्यासरशी रक्त ओकायला लावीन. कंबरडेच मोडून टाकीन कंबरडे!" जमादाराने कंबरेचा लटकता दंडा हाती घेऊन वाऱ्यावर एक तडाखा देखील हाणला.

"अं हं! मारहाण बिरहाण करायची नाही हं! ते जिवावर उदार झालेले गुंड आहेत. चुचकारून काम साधले पाहिजे तर तुमची करामत. मारहाण करता तुम्ही, पण निस्तरावे लागते आम्हांला!"

"इच्छा हुजूर! लटकावला हा दंडा पुन्हा कमरेला नि उपसली माझी ही लवचीक जीभ. ह्या दंड्याहून अधिक करामतीची आहे ती हुजूर! ह्या दंड्याने माणूस घायाळ होतो, पण ह्या जिभेने जिवेच मारला जातो. तरवारीने मान तोडून टाकून जीव घेता येतो, पण रक्त गळते; जिभेने मान जशीची तशी ठेवून जीव घेता येतो नि पुन्हा पुराव्याला रक्ताचा बिंदूसुद्धा पडलेला मिळत नाही. म्हणूनच तरवारीने केलेली हत्या पकडली जाते, पण जिभेने ज्याला प्राण घेता येतो त्याला शंभर हत्यांची सूट.."

"चूप! लगा बकनेको! जावे. तुझ्या दंड्यासारखीच तुझी जीभ देखील संभाळता संभाळता मला पुरेसे होते."

"इच्छा साब! दंडा कंबरेला परत लटकावला तशी जीभ पण लटकावून टाकली बघा टाळ्याला." पुन्हा एक मुजरा ठोकून जमादार बाहेर पडला.

“ए जमादार अंदर आव. हमारा बूट किधर है आज? Damn fool! भूल गया तुम? जावे, लाव.”

बंदिपालाची ती शिवी म्हणजे आपल्या विसराळूपणाचे कौतुक करणाराच एक इंग्रजी शब्द आहे, अशा समाधानाने जमादाराने ती ऐकताच लाजून जीभ बाहेर दाखवली, चावली. लगेच त्या अभिनयालाही लाजून तोंडावर हात ठेवून तो हसला आणि लगोलग चोरट्यासारखा बाहेर जाऊन बूट घेऊन आत आला. आपल्या तोंड पुसण्यापासून शिंकरण्यापर्यंतच्या हरकामी हातरूमालाने बूट झाडून त्याने तो बंदिपालापुढे हळूच ठेवला आणि रुमाल साफ करण्यासाठी थोडा झटकू लागला, तोच तोंडची सिगारेट काढून बंदिपाल म्हणाला,

“झटकता काय रुमाल? माझ्या बुटाने तुमचा रुमाल मळला नाही, त्या गदळ रुमालाने माझा बूटच मळला असेल!”

“सच बात है हुजूर. आपला बूटच माझा अन्नदाता आहे साब. आपल्या पायतानांची सेवा बारा वर्षे करतो आहे म्हणून तर आज शिपायाचा जमादार झाला आहे हा बंदा.”

हा पुन्हा बकत बसतो की काय, अशा भीतीने त्याला नवा कोणचाही विषय मिळू नये म्हणून शेजारी कागद टंक करीत (टाइप करीत) बसलेल्या कारकुनाला बंदिपालसाहेब म्हणाले,

“अच्छा, दादा, लाव तुम अपने कागद. सह्याबिह्या काय त्या बोला पाहू कशावर हव्यात त्या?”

जमादार गेलासे बघताच तो निमगोरा जेलर त्या कारकुनाकडे पाहून, पण काहीसे मनाशीच म्हणाला,

“काय गोडबोल्या आहे हा गळेकापू! एक वेळ ते बंदिवानांतले बेरड पुरवले, पण हे शिपायांतील साव बेरड नकोत.”

कारकुनाला ठाऊक होतेच की, नाव न घेता आपलीही गणना त्या दुसऱ्या वर्गातच आहे हेही जेलरसाहेब त्याच वाक्यात सांगत आहेत. बंदिपाल कारकुनापाशी त्या शिपायासंबंधी जो हा अभिप्राय देत होता तोच अभिप्राय ते कारकूनदादा आणि ते शिपाई एकटे बसले म्हणजे त्या जेलरसाहेबांविषयीही देत असते. त्यामुळे नेहमी फिटंफाट होते असल्याने कोणीच कोणाच्या पाठीमागे बोललेले शब्द मनाला लावून घेत नसे. प्रत्येकाची आतली बिंगे प्रत्येकाला माहीत असल्याने आणि प्रत्येकाच्या झाकल्या मुठीत प्रत्येकाचा थोडाफार वाटा असल्याने गेली बारा वर्षे

तो दादा आणि तो बंदिपालसाहेब हे त्या तुरूंगाच्या संस्थानचा कारभार एखाद्या समाईक कुटुंबाप्रमाणे एकमेकांना संभाळून गुण्यागोविदाने हाकीत होते. नवनवे पर्यवेक्षक (सुपरिटेंडंट) येत आणि जाते. जसे ते बंदिगृह अढळचे अढळ होते, तसेच हे जमादार, दादा आणि जेलर, ह्याचे समाईक कुटुंबही गेली बारा वर्षे तेथे अढळ राहिलेले होते.

बंदिपालाची आज्ञा ऐकून जमादार तुरूंगाच्या आत जाताजाताच मनाशी विचार करीत होता. त्याने दोन लोखंडी फाटके उघडवून आतल्या एका मध्यभागीच्या पटांगणात पाय टाकताच हाक मारली,

“शिवराम, शिवराम हवालदार किधर है? बुलाव उनको.”

थोड्याच वेळात शिवराम हवालदार धापा टाकीत, टाचेला टाच हाणून, ताठ उभा राहून आणि मुजरा ठोकून जमादारापुढे ठाकला. सगळ्यांना ‘चले जावे’ करून जमादार एकट्या उरलेल्या शिवरामला म्हणाला,

“शिवराम, आज काळ्या पाण्याहून पळून आलेल्या कुणा दरोडेखोर बंदिवानाला त्याच्या साथीदारांसह ह्या बंदिगृहात धाडण्यात येणार आहे. जेलरसाहेबांनीं सक्त बजावले आहे की, ही बातमी कुणाला कळता कामा नये.”

“इच्छा जमादारजी!”

“ऐकून घे. त्या भयंकर दरोडेखोराला त्या पलीकडच्या फाशीच्या चौकात एका एकलकोडीत बंद करायचे. तू किंवा मी ह्यांच्यावाचून आत कुणाला सोडायच नाही.”

“जेलरसाहेबांना किंवा सुपरिटेंडंटसाहेबांनासुद्धा?”

“गवारपणा करू नकोस. थट्टेने दात दिसतात तसेच पडतात. पण एखाद्या वेळी कुणी झाडूवाला, सैंपाकी, पाणक्या, आत नेणे तर तू किंवा मी बरोबर असलो तरच नेणे. कुणाला त्या दरोडेखोराशी बोलतांना पाहिले तर नरडेच दाबून टाकीन तुझे!” असे कडकपणे सांगू जाता त्या अभिनयपटु जमादाराने त्याच्या त्या सलगीच्या हवालदाराच्या नरड्याला हात घातला.

“कुणालासुद्धा बोलू द्यायचा नाही.”

“हां हां, आताच कशापायी नरडे दाबता माझे? कुणाला त्याच्याशी मी बोलू देईन तर ना! कोणचा हलकट बापाचा लेक त्या दरवडेखोराशी बोलायला येतो तो येऊ तर दे! मग तो मोठा जमादार का असेना ह्या तुरुंगाचा? नही नही जमादारसाहेब. क्षमा मागतो, आपली आज्ञा किती तंतोतंतपणे मी पाळीन ते सांगायच्या झोकात बोलून गेलो तसे.”

“अरे, पण मला हवे तेच तू एका अर्थी बोललास बाबा. हे बघ, शिवराम जे अशा घबाडाच्या प्रकरणी विशेष बोलायचे ना ते तूच त्या दरोडेखोराशी बोलायचे. मी चकार शब्द काढणार नाही. प्रथम तू सारे जुळवून आणीतो. ह्या कामी तू आहेसच तसा पक्का पाताळयंत्री! म्हणून तर तुलाच मी अशा विश्वासाच्या जागी नेहमी नेमतो. हे बघ, असा एखादा अट्टल दरोडेखोर जेव्हा येतो कधी काळी, तेव्हाच काय ती तुमची आमची पिकायची तर पिकणार पोळी! अशी कुळे शे-सवाशाखाली जाते नाहीत बहुधा. त्यांच्याच गाठीला असल्या तर गिन्या असणार. नाहीतर हे भुरटे शेकडो चोर जे ह्या तुरुंगांतून येतात त्यांच्या कनवटीला असणार काय नि आमची मूठ ते दाबणार काय? तो तुरुंगांतून पळू शकणार नाही ह्याविषयी काय तो कडेकोट बंदोबस्त ठेवला की झाले आपले सरकारी कर्तव्य! बाकी त्याला काय लागेले ती चैन करू दे आतल्या आत- जर तो आपल्याला काय लागेले ते ओकून आपली रिकामी मूठ भरू शकत असेल तर! पण सावधानपणे अं! प्रथम बघ कूळ कसे काय ते नीटपणे चाचपून, नाही तर फट् म्हणता ब्रह्महत्या! आले ध्यानात? हं, जा आता. तो चौक, ते आवार, ती एकलकोंडी, खाली करून झाडून ताळाबंद करून ठेव जा. ती टोळी येईलच संध्याकाळपर्यंत, पण कुणापाशी त्यांच्या येण्याविषयी बोलता कामा नये हं चकार शब्द!”

“छट्, ती चिंता सोडा!” असे आश्वासून शिवराम हवालदार तो फाशीवाला चौक साफसूफ करण्यास निघून गेला. त्याने पहिल्या धडाक्याला त्याचा जो एक विश्वासातला बंदिवान होता त्याला बोलावले. आठ-दहा वर्षांची लांब शिक्षा झालेला तो बंदिवान त्याच्या कामाच्या तडफेमुळे मुकादम झालेला होता. त्या बंदिवानांच्या मुकादमाला शिवराम हवालदाराने तो फाशीवाल्या अपराध्यांसाठी म्हणून अगदी अलग राखलेला पण घातपात करणाऱ्या इतर भयंकर बंदिवानांनाही निराळे कोंडण्यासाठी मधून मधून उपयोगात आणल्या जाणाऱ्या खोल्यांच्या गाळ्यांचा चौक, ते आवार, त्या एकलकोंड्या, झाडूनझुडून ठेवण्याचे ताबडतोबीचे काम सांगितले आणि कडकपणे बजावले की,

“आज हा चौक असा मोकळा करून ठेवण्यात येत आहे हे कुणालासुद्धा सांगता कामा नये. कधी नव्हता असा बंदोबस्त ठेवला पाहिजे. मोठे भयंकर बेरड आहेत ते!”

मुकादमाची जिज्ञासा नुसती उताला चालली. पण हे भयंकर बेरड कोण ते सरळपणे विचारता हवालदार गौप्य राखण्याच्या ऐटीने आणखीच ताठरायचे हे ओळखून तो आडवळण घेऊन म्हणाला,

“हात्तेच्या! हवालदारजी, गेल्या वर्षी मोठमोठी काळ्या पाण्याची शिक्षा झालेल्या दरोडेखोरांची टोळी आली तेव्हा ती काळ्या पाण्यावर जाईतो आपल्या आशीर्वादे मीच सांभाळली ना? तुम्ही त्यांच्या चिठ्या दिल्या, त्या बाजारात तुरुंगाचे सामान विकायला नेताना कुणी पोचवल्या त्यांच्या घरी? ‘हळकुंड’ कुणी आणली मुठी भरून? ह्या पठ्ठ्याने जिवावरची कसरत केली ती हवालदारजी!”

“अरे, काळ्या पाण्यावर जाणाऱ्या बेरडांपेक्षा काळ्या पाण्यावरून पळून आलेला बेरड किती भयंकर असला पाहिजे बाबा!”

“हा काळ्या पाण्यावरून पळून आलेला कुणी दरोडेखोर असला ना तरी...”

“हां! चूप! ते मी सांगणार नाही. पण काय रे मुकादम, हे कूळ जर बरे दिसल तर त्याच्या चिठ्ठ्या पण नेशील का तशा? का काळ्या पाण्यावरून आलेल्याला पाहताच शेपूट घालशील? जी ‘हळकुंडं’ मिळतील त्यात तुला पण एखाद्या नवऱ्या मुलासारखा हळदीहून पिवळा करीन!”

मुकादमाला हवे होते ते सारे कळले. “तसे ‘हळकुंडा’च कोणतेहि काम माझे राव! काळ्या पाण्यावरून पळून आला तर काय माणसाचा लांडगा होतो थोडाच?” (त्या तुरुंगातल्या शब्दकोशात हळकुंडाचा अर्थ सोन्याची नाणी असा असे, हे सांगणे नकोच.)

मुकादमाला घेऊन हवालदारजी फाशीच्या आवारात गेले. मुकादमाच्या हाताखालील मोठ्या बंदिवानांकरवी मुकादम चौक, खोल्या भराभर साफ करू लागला आहे आणि त्यांना अवश्य ते उत्तेजन देण्यासाठी शेलक्या शिव्यांचा आणि नेमक्या दंडुक्यांचा यथायोग्य वर्षाव करीत आहे असे पाहून हवालदार त्या एकलकोंड्या खोल्यांपैकी एकीत पट्टा सोडून, पाय पसरून, फेटा काढून, विसावा घेत पडले. मुकादमाने एका बंदिमुलाला त्यांचे अंग रगडायलाही लावून दिला. त्या समाधानाच्या गुंगीत आवाराच्या थोरल्या दाराला आतून ताळाबंद करण्याची आवश्यकताही हवालदारांना तितकीशी वाटली नाही.

इतक्यात कोणाच्या अंगात यावे तशा आवेगाने जवळ जवळ धावतच बंदिपाल पुढे, त्याच्या मागे पुरतेपणी धावत जमादार आणि दोन-तीन शिपाई त्या उघड्या फाटकातून आवारात घुसले.

“हवालदार, ए, किदर है हवालदार!” बंदिपाल गरजला.

“इधर-उधर-ते तिथे!” गडबडून मुकादम काहीतरी बावचळला आणि हवालदाराला त्याच्या दैवावर सोपवून आपल्या कामात आपण दंग आहोत असे दाखविण्यासाठी बंदिवानांना हे कर, ते कर सांगू लागला आणि जमादाराला म्हणाला,

“सगळे साफसूफ, ठाकठीक झाले आहे.”

तोच बंदिपाल “किधर है वो साला! हवालदार, ए हवालदार?” असे बेछूट डुरकाळत त्याच खोलीच्या ओट्यावर टापटाप बूट उडवीत चढला. तो तो हवालदार धडपडते उठत असलेला त्या खोलीसमोरच दिसला. बंदिपालाचा पहिला गर्ज अकस्मात् ऐकू येताच हवालदाराची आधीच गाळण उडाली होती. सावरून उठण्याची त्याने शक्य ती चपळाई केली, पण अर्धे देखील सावरले जाण्याच्या आत बंदिपाल असा नेमका येऊन समोर ठाकला. मुलगा रगडीत असलेल्या एका पायाची गणवेषाची पट्टी सोडून टाकलेली, बूट काढलेला, दुसऱ्या पायातील पट्टी नीट गुंडाळलेली आणि बूट बांधलेला, घाईघाईने तो बांधीत टोपवजा फेटा डोक्यावर चढवताना तिरपाच कललेला आहे आणि त्याचा सोगा सुटून एखाद्या पहिलवानासारखा खांद्यावरून छातीवर रूळत आहे. कंबरेचा पट्टा लांब कोपऱ्यात पडलेला आहे आणि फाटकाच्या किल्ल्यांचा जुडगा त्या बंदिवान पोऱ्याच्याच हातात विसराळूपणे तसाच लांबकळत आहे, असे त्या हवालदारजीचे अस्ताव्यस्त ध्यान बूट असलेल्या एका पायावरचे काय ते उभे ठाकलेले पाहताच तशा संतापातही मूळच्या गमती स्वभावाच्या बंदिपालाला हसू लोटल्यावाचून राहिले नाही.

“क्यौं जमादार, तुम्ही जे नेहमी म्हणता की, आणीबाणीच्या कामी शिवराम हवालदार म्हणजे एका पायावर सिद्ध, ते अगदी खरे! पाहा, तो एकाच पायात पोलिसी पोषाख चढवून खरोखरच एका पायावर उभा आहे. दुसऱ्या पायात त्याने बूटदेखील घातला नाही! काय रे, तो तुझा दुसरा बिनबुटी पाय असा नुसता अलगत उचलून धरायसाठी ठेवतोस तरी कशाला अडगळीसारखा? तोडूनच टाकतो थांब, चोरा!” बंदिपालाने रागाने लाल होऊन हातच्या काठीचा एक तडाखा शिवरामाच्या पायावर मारला.

“अयायायी! जेलरसाब! पाया पडतो, पण प्रथम माझी बाजू तर ऐकावी. चालता चालता फटकन् माझ्या ह्या पायाच्या पोटरीचा गोळा असा चढला की, मी बोंब मारीत खालीच पडलो बघा.

म्हणून ह्या खोलीत तो पायाचा गोळा दाबवून उतरवीत होतो. सरकार, कृपावंत, ह्यात जी काही कसूर असेल ती माफ कीजिये." हवालदाराने झटकन् बतावणी पण बतावणी केली.

"माफ? कामावर असताना पट्टा फेकून तू पसरून पडलेला इथे! तुला क्षमा केली तर उद्या साऱ्या शिपायांच्या पोटऱ्यांचे गोळे वाटेल तेव्हा असेच ताठरून चढू लागतील. आण तो पट्टा इकडे. जमादार, शिपायाच्या कंबरेचा हा पट्टा ह्याच्या गळ्यात कुत्र्याच्या पट्ट्यासारखा असा गुंडाळा. अं हं, असा! हं, ठीक. आणि ह्याला असाचा असा, एका पायांतच बूट घातलेला, तिरप्या फेट्याचा सोगा सुटलेला, कुत्र्यासारखा पट्टा गळ्यात गुंडाळलेला, साऱ्या बंदिवानांच्या रांगेतून तिकडे कार्यालयात मोठ्या फाटकापुढे घेऊन या. चलाव! तुझ्या बापाचा - त्या सुपरिंटेंडंटसाहेबाचा - तिकडे मला टेलिफोन आलेला की दरोडेखोरांची एक पकडलेली टोळी आताच येणार म्हणून. नि तू इथे पाय रगडून घेत पडलास काय? चलाव!"

सगळ्यांच्या पुढे त्या हवालदारजीचे ते विचित्र सोंग, त्याच्यामागे तोंडाला रुमाल लावून हसणारा तो जमादार, त्याच्यामागून तो मुकादम, ते बंदिवान अशी ती मिरवणूक पुढे; वाटेने जेथे जेथे बंदिवानांच्या रांगांमधून जावे लागले, तेथे तेथे त्या खो खो हसत आहेत आजूबाजूला आणि ती गंमत पाहात मनातून हसणारा पण वरवर संतापाने ताठरलेला तो निमगोरा बंदिपाल सगळ्यांच्या मागून अशी ती स्वारी बंदिगृहाच्या मोठ्या फाटकातील मुख्य कार्यालयापाशी आली.

तो त्या भयाण तुरुंगाच्या त्या मुख्य लोखंडी द्वाराच्या जाड गजांना धरून बाहेरच्या बाजूला उभा असलेला एक गोरा सार्जंट बंदुकांना संगिनी रोखलेल्या दहापाच शिपायांसह उभा असलेला बंदिपालाला दिसला. त्याच्यामागे बाहेरूनच ऐकू येणारा पायबेड्यांचा खळखळाटही ऐकू आला. येणार ही ती दरोडेखोरांची टोळी आली देखील, हे बंदिपालाच्या ध्यानात आले. ह्या बाह्य संकटाला तोंड देण्यासाठी गृहकलह मिटवून कामाळू आणि विश्वासू जमादार-हवालदारांची अंतर्गत जूट करणे प्रथम अवश्य, असा त्या तुरुंगांतील टीचभर राजकारणातला बखेडा मिटवायचा विचार झटक्यासरशी करून बंदिपालाने जमादाराला सांगितले,

"शिवरामला सोडून द्या. झाली तेवढी विटंबना पुरे. पुन्हा असे करू नकोस म्हणावे!"

जमादारही तेच विनविणार होता. शिवराम कामाचा माणूस. आतली कुलंगडी त्याच्याच हस्ते चालणार. त्या कुलंगड्यात बंदिपाल महाशयांचीही भागीदारी होतीच. जमादाराच्या आणि

बंदिपालाच्या डोळ्याडोळ्यांतून हे संभाषण न बोलता झाल्यासारखेच होते, मतैक्य जुळल्यासारखेच होते. तत्काळ शिवराम हवालदाराचे दोन्ही बूट, पटका, पट्टा, किल्ल्यांचा जुडगा त्याच्या अंगावर ठिकच्या ठिकाणी शोभू लागून तो “ए गद्धा, इधर आव. ए चोर, उपर जावे.” अशा शिस्तवार भाषेतील आज्ञा सोडीत आपल्या हाताखालील मुकादम बंदिवानांमध्ये, गल्लीमध्ये झुंजीचा कोंबडा आरवत हिंडावा, तसा हिंडू लागला.

तुरुंगाचा तो अजस्त्र दरवाजा करर् करून उघडला. सार्जंट त्या पायबेडी खळखळवीत येणाऱ्या दरोडेखोरांच्या टोळीसह आत आला. बंदिपालाने त्याच्या पुढचे आतील दुसरे लोखंडी दार उघडवून मुख्य बंदिगृहाच्या भयाण पण भव्य पटांगणात ते दहा-बारा दरोडेखोर ओळीने उभे करविले. त्यांच्यावर शिवराम हवालदाराला देखरेख करायला सांगितले आणि कार्यालयात जाऊन सार्जंटकडून सारे कागद समजावून घेऊ लागला.

इकडे तो मुकादम केव्हाच तुरुंगात जाऊन त्याच्या विश्वासातील बंद्यांना सांगता झाला होता की, “आज काळ्या पाण्याहून पळून आलेला कुणी अट्टल अपराधी येणार. पण कुणालाही हे कळता कामा नये.”

त्या बंद्यांनी दुसऱ्या बंदिवानांना, त्यांनी तिसऱ्यांना तीच गुप्त बातमी त्याच अटीवर कुजबुजून सांगता सांगता त्या बंदिगृहातील प्रत्येक बंदिवानाला कळून चुकले होते की, “आज कुणी काळ्या पाण्यावरून पळून आलेला बेरड येणार आहे, पण हे कुणालाही कळता कामा नये!” त्यामुळे ज्याला निमित्त सापडले तो तो बंदी, वॉर्डर, मुकादम, शिपाई त्या टोळीला पाहण्यासाठी त्या पटांगणाच्या जवळपास कोठे तरी येऊन रेंगाळत होता. शिपायांचा घोळकाही तेथे उभाच होता.

ह्या एवढ्या जणांच्या समक्ष असल्या अट्टल दरोडेखोरावर आपण सत्ता गाजवीत आहोत, ह्याची गर्विष्ठ जाणीव शिवराम हवालदाराच्या फुगलेल्या छातीतसुद्धा मावेनाशी झाली. आपल्या करड्या शिस्तीचे प्रदर्शन करून सर्वांवर आपली छाप पाडायची अनावर इच्छा होऊन त्या दरोडेखोरांतील त्यातल्या त्यात भ्यालेल्या आणि सौम्यशा दिसणाऱ्या एकाला हवालदाराने उगीचच दंडुक्याने डिवचून म्हंटले,

“ए, सीधा खडा हो. हे घर नाही तुझे, अलाहाबादचा तुरुंग आहे हा. इथे प्रत्येकाला शिस्तवार उभे राहिले पाहिजे.”

शिवराम हवालदाराची ही ताठ आज्ञा त्या सौम्य दरोडेखाराने ऐकली; परंतु त्यांच्यातील जो एक उंच, निर्ढावलेला, देखणा, दुष्ट हसू ओठावर सारखे खेळत असलेला दरोडेखोर होता, त्याला हवालदाराच्या ऐटीची गंमत वाटल्यासारखे दिसले. हवालदार पाठ फिरवतात तोच त्याने हवालदारासारखे ताठल्याचे सोंग आणून मोठ्याने म्हंटले,

“ए, सीधा चलो. हे घर नाही तुझे. अलाहाबादचा तुरुंग आहे हा.”

आपल्याला कोणीतरी वेडावले, हे शिवरामच्या ध्यानात आले. आजूबाजूचे लोक हसले, पण काळ्या पाण्याचा अट्टल दरोडेखोर तो हाच असावा अशी शंका मनात येऊन शिवराम हवालदाराने त्याच्या वाटेला एकदम जाण्यात आपण चूक केली असे तर्कले आणि त्याचे वेंगाडणे जसे ध्यानीच आले नाही असे दाखवून दुसऱ्या बाजूला हिंडू लागले.

इतक्यात सार्जंटचा टॉम कुत्रा त्या पटांगणात घुसला. त्याला त्या कडक शिस्तीच्या तुरुंगातही कोणी आडकाठी केली नाही. माणसापेक्षा काही प्रदेशांत कुत्र्यांना अधिक स्वतंत्रता असते! त्यातही सार्जंटचा कुत्रा तो! शिवराम हवालदार त्याला कुरवाळू लागले. टॉमने आपले दोन पाय उचलून हवालदाराच्या कंबरपट्ट्यावर ठेवले, इतक्यात त्या निर्ढावलेल्या दरोडेखोराने मोठ्या अजीजीने हाक मारली,

“थोडे इकडे याल का, रावसाहेब? एक अर्ज आहे दासाचा.”

“ह्या उद्धट, दुष्ट माणसावर देखील आपली छाप पडलीच तर!” असे ‘रावसाहेब’ अशा त्या दरोडेखोराच्या नम्र संबोधनाने हवालदाराने ताडले आणि त्याच्याकडे दयाळू थोरवीने जाऊन तो म्हणाला,

“काय हवे? बोल, भिऊ नकोस.”

तो तो लुच्चा दरोडेखोर गालात हसून मोठ्याने म्हणाला,

“मी तुम्हांला कुठे बोलावले? मी त्या टॉम कुत्र्याला बोलावले. त्याला सांगणार होतो की, असा बेशिस्त उभा राहू नकोस. हा अलाहाबादचा तुरुंग आहे. प्रत्येकाने इथे शिस्तवार उभे राहिले पाहिजे.”

पुन्हा सारे बंदिवान आणि शिपाई पण हसले. हवालदार संतापले,

“शुद्ध गाढव आहात तुम्ही लोक!”

नम्रपणे हसत दरोडेखोर उत्तरला, “आणि आपण आमचे सरदार! बोलाल तेच खरे!”

तोच बंदिपाल त्या पटांगणात सार्जंटासह त्या बंदिवानांची ओळख सार्जंटकडून रीतसर करून घेण्यासाठी आला. पहिल्या धडाक्याला सार्जंटने बंदिपालाला दाखवला तो निर्ढावलेला, उंच, छद्मी हसू ओठावर सदान् कदा असणारा अपराधी.

“हाच तो योगानंद- अर्थात् रफिउद्दिन- काळ्या पाण्यावरून पळालेला बंदी. ह्या दरवडेखोरांच्या टोळक्यातील पहिल्या क्रमांकाचा आरोपी.”

एखाद्या राजाची प्रशस्ति भाट गात असता जसा तो राजा अधिक ऐटीने फुगत जातो, तसा तो आरोपी योगानंद अर्थात् (उर्फ) रफिउद्दिन ती आपली प्रशस्ति त्या सार्जंटकडून मोठ्या ताठ्याने ऐकत होता. लाजेची वा भयाची तर काय पण चिंतेची देखील एखादी छटा त्याच्या मुद्रेवर नव्हती. त्याचे भरदार गाल आणि जिवणी डावीकडे मुरडून, डावी भुवई उडवून आणि उजवा डोळा मिचकावून आतल्या आत छद्मीपणे हसण्याची जी त्याची एक धाटणी असे, तसे हसत तो बोलून थांबलेल्या सार्जंटला म्हणाला,

“साब, असा अन्याय का बरे करता? मला चार वेळा फटके मारलेले आहेत नि कमीत कमी चौदा बंदिगृहं तरी मी पाहून आलो आहे, इतके तरी माझ्याविषयी ह्या प्रिझनरसाहेबांना अधिक सांगावे आपण! म्हणजे माझी खरी योग्यता त्यांना पटून हे प्रिझनरसाहेब माझे यथोचित आतिथ्य नि मानमर्यादा राखतील.”

सार्जंटची त्या दरोडेखोराशी गेल्या महिन्याभर, तो त्याच्या हातात होता तेवढ्यात, खूप घसट झाली होती आणि त्या आरोपीच्या अशा निरूपद्रवी बकण्यातही जी एक खोच असे ती सार्जंटलाही आवडू लागली होती. बंदिपालाला जेलरसाहेब म्हणायचे सोडून रफिउद्दिन ‘प्रिझनरसाहेब’ म्हणून म्हणताच त्याच्या इंग्रजी भाषेच्या अज्ञानाची टर उडविण्यासाठी सार्जंट मोठ्याने हसला.

“छान, छान! तुरुंगावरचा हा जो अधिकारी तो जर ‘प्रिझनरसाहेब’, तर तुझ्यासारखे जे दरोडेखोर तुरुंगातील कैदी ते ‘जेलरसाब’ म्हंटले पाहिजेत, नव्हे का?”

“ऑफ कोर्स मि. सार्जंटसाहेब! यस्! तुमच्या बबर्जी इंग्लिशला ते मानवत नसेल पण करेक्ट ग्रॅमॅटिकल इंग्लिश म्हणजे मी म्हणतो तेच. जर प्रिझन म्हणजे तुरुंग नि जेल म्हणजेही तुरुंगच, तर प्रिझनर नि जेलर हा दोन्ही शब्दांचा कोणचा तरी एकच अर्थ होते नाही का? व्याकरणाप्रमाणे तरी जो जेलर तोच प्रिझनर. प्रिझनर नि जेलर एकाच माळेचे मणी. इंग्लिश कशाशी खावे ते मलाही कळत बरे का मि. सार्जंटसाहेब!”

“योगानंदच आहेस तू! बरे, काय रे रफिउद्दिन, तुला चारदा फटके मारले ते काय म्हणून रे? ते नाही सांगितलेस?” सार्जंट जिज्ञासला.

“ते कारण अगदी सरळ आहे बघा. पण ह्या जेलरसाहेबांना राग येणार नाही तर सांगतो. दोन जेलरनी माझ्या म्हणण्याप्रमाणे मला चोरून अफू खाऊ दिली नाही ह्यासाठी मी त्यांच्या डोक्यात थाळीपाट मारला म्हणून दोनदा फटके खावे लागले नि दोनदा आणखी दोघां जेलरसाहेबांच्या म्हणण्याप्रमाणे मी त्यांना चोरून हव्या तितक्या पैशांची लाच चारली नाही म्हणून मला फटके खावे लागले.”

लाच खाण्याची गोष्ट गोष्टी चालता चालता निघताच सार्जंटाच्या पोटात गोळा उठला. न जाणो, हा बाष्कळ आरोपी आपल्याविषयीही काही बकून जातो की काय, असे त्याला झाले. कारण गेल्या पंधरा दिवसांत सार्जंटलाही चाळीस-पन्नास रुपये त्या आरोपीने चारलेले होतेच. हातघडी (रिस्टवॉच) पाहण्यात गुंतलोसे दाखवून सार्जंटने रफिउद्दिनच्या त्या वाक्याकडे दुलर्क्ष केले, बेल झाली असे बंदिपालाला सुचविले आणि ती सारी टोळी त्या बंदिपालाच्या हाती रीतसर सोपवून सार्जंट तुरुंगाच्या फाटकाबाहेर निघून गेला.

लगेच त्या दरोडेखोरांच्या टोळीला फोडून निरनिराळ्या खोल्यांतून त्या राखीव फाशीच्या चौकांत कोंडण्यात आले. त्यांच्यात दोघा-तिघांच्या तोंडावर भयंकर चिंतेची छाया पसरली होती. एकजण- त्याचे नाव किशन- हा तर पूर्ण पश्चात्तप्त दिसते होता. बाकीचे बंदिशाळेतही नृत्यशाळेत असावे तसे निश्चिंत, निडर आणि निर्ढावलेल्या ऐटीत वावरतांना आढळत. सगळ्यात निडर आणि निर्ढावलेला होता तो योगानंद- अर्थात् रफिउद्दिन अहमद.

त्याला फाशीच्या एकलकोंडीत विशेष बंदोबस्तात ठेवले होते. म्हणजे त्याच्या खोलीपाशी जमादार आणि शिवराम हवालदार ह्यांच्यावाचून कोणालाही जाता येत नव्हते. पण त्यामुळेच तो सर्वांपेक्षा

अधिक चैनीत होता. अपेक्षेप्रमाणेच शिवरामच्या हस्तकांनी त्या दरोडेखोराचे जे काही साथीदार अलाहाबादला अजून लपूनछपून मोकळे राहात होते, त्यांना बंदिगृहांतील त्या रफिउद्दिनच्या चिठ्ठ्या पोचवल्या आणि यथेच्छ 'हळकुंडे' कारागृहात जाऊ-येऊ लागली. थोडी अफू, बरीच तंबाखू आणि अधूनमधून मिठाई रफिउद्दिनच्या एकलकोंडीत गुप्तपणे पोचू लागली आणि अप्रत्यक्षपणे त्याच्या नगद, पिवळ्याधमक सोन्याच्या गिन्या जमादार, दादा आणि जेलर ह्यांच्या खिशांत पडू लागल्या.

रफिउद्दिनच्या योगानंदस्वरूपातील जटा, दाढीमिश्या सगळ्या उतरून गळून गेल्या असून आता तो एक छटेल मुसलमान बनलेला होता. त्याला योगानंदाच्या वेषात, भेषात, आणि भजनात ज्यांनी तल्लीन झालेले पाहिले, त्यांना तो एक मुसलमान दरोडेखोर आहे हे जसे स्वप्नातसुद्धा खरे वाटले नसते तसेच त्याला ह्या फाशीच्या एकलकोंडीत एका अट्टल मुसलमीन दरोडेखोराच्या स्वरूपात पाहणाऱ्यांना त्याने एकदा हिंदु साधूच्या वेषात हजारो लोकांना झुलवले-भुलवले होते, हे सांगूनसुद्धा शक्य वाटले नसते. तरीही योगानंदपणाचे एक चिन्ह एका अर्थी त्याच्यात होते असे म्हणता आले असते. ते म्हणजे, समदुःखसुखे कृत्वा तुल्यनिंदास्तुतित्वाचे! त्याला जेव्हा कोणी विचारी की, तुला आता भयंकर शिक्षा होण्याचे भय किंवा चिंता कशी वाटत नाही? तेव्हा तो जिवणी मुरडून आणि भुवई उडवून नेहमीप्रमाणे गालातल्या गालात हसे.

"त्यात ती कसली चिंता? फाशी मला होत नाही- जन्मठेप काळे पाणी झाल्यावाचून राहात नाही! और हमको काला पानीमे तो जो पुण्य और मजा आती है वह तुम्हारे काशीजीमे भी नही मिल सकती- मक्काजीमे भी नही मिल सकती! हम लोगोंकी काला पानीही काशीजी है!"

"पण तुला फाशी होणारच नाही कशावरून? भयंकर क्रूरपणाने कित्येकांना तू ठार मारलेस, मुलामुलींचे गळे कापलेस, असे राक्षसी आरोप तुझ्यावर! तू फाशी जाणार, असे स्वतः जेलरसाहेब म्हणतात." असे शिवरामाने कधी हटकले की तो हसे.

"अरे जेलर क्या जानता है? छप्पन भाषा, छप्पन वेष, छप्पन बंदिगृहाचे पाणी प्यालेल्या माझ्यासारख्या दरोडेखोराला पुराव्यांचे, शिक्षेचे, अपराधांचे, निर्बंधनियमांचे जे आनुभविक ज्ञान असते ते असल्या जेलरना तर काय, पण मोठमोठ्या जज्जांना नसते! त्या ज्ञानाच्या जोरावर आम्ही दरोडे मारतांनासुद्धा कायदेशीरपणाने मारतो. फाशी होईल अशा गाढवपणाने, ठार मारतो

त्यांना देखील ठार मारीत नाही! बाबा, तुमच्या हिंदु लोकांची गीता भी मैंने पढी है! 'हत्वाऽपि स इमाँल्लोकान् न हन्ति न निबध्यते!' ह्यालात म्हणतात 'योगः कर्मसु कौशलम्!"

हिंदु अधिकाऱ्याच्या पहाऱ्यात तो असे संस्कृत श्लोक म्हणे, भजने गाई की, त्या भाबड्यांना तो अंतर्यामीचा खराच कोणी अवधूत आहे अशी भुरळ पडावी आणि कारागारातही त्या हिंदु शिपायादिकांची त्याला सहानुभूति मिळावी.

मुसलमान अधिकाऱ्यांच्या पहाऱ्यात गप्पा छाटतांना त्याने कुराणातील खरी खोटी दहापाच आयते (मंत्र) म्हंटल्यासारखे करावे, निमाज तर, उरलेल्या एवढ्याशा दाढीला दहादा गंभीरपणे कुरवाळीत मोठ्या तल्लीनपणे दिवसभर पढतच राहावे आणि सांगावे की, "देखो. मी दरोडे जे जे मारले, ज्या ज्या मुली पळवल्या, ज्यांचे ज्यांचे हातपाय तोडले, तोडवले, प्राण घेतले, लूटमार केली, ते सारे काफर हिंदु होते बरे! ईमानदारोंके (मुस्लिमके) बालको भी कभी धक्का नही लगाया! अल्ला रहीम है. काफरांना शिक्षा दिल्याविषयी खुदाताला माझ्यावर केली तर दयाच करील. नव्हे का?"

"अर्थात्!" त्या मुस्लिम जमादाराने म्हणावे आणि ठाव न लागणाऱ्या कोण्या जुनाट अंधाऱ्या विहिरीत आपण डोकावतो, तसे त्याच्या डोळ्यात डोकावत स्वतःच्या मनात पुटपुटावे,

"हा कुणी तरी अवलिया, कुणी तरी खुदाई खिदमतगार दिसतो खराच!"

कारागारात अट्टल चोर, दरोडेखोर जे जे मुस्लिम असतात त्यांच्यापैकी सिंधी, बलुची, पठाण, पंजाबी, अपराधी तरी बहुधा आपल्या खून, चोऱ्या, दरोड्यांचे समर्थन अशाच कोटिक्रमाने करतात की, "हम तो केवले काफर हिंदुकोही मारते है, लूटते है."

आणि त्या समर्थनासरशी त्याची ती पाफत्येही पुण्यकृत्यासारखी भासून कित्येक धर्मवेड्या मुस्लिम शिपाई-जमादारांना त्याच्याविषयी सहानुभूति वाटू लागते, अशी शेकडो उदाहरणे स्वतः पाहण्या-ऐकण्याचा अनुभव आम्हांलाही आलेला आहे. ह्या प्रकरणी अपवाद काढता बंगाली, मराठी मुसलमान मात्र तितकेसे धर्मवेडे नसतात, एवढी गोष्ट त्यातल्या त्यात बरी आहे. दरोडेखोरांच्या उत्तरेकडच्या मुसलमानांचा ह्यासाठीच दाक्षिणात्य मुस्लिमांवर फारसा विश्वासही नसतो.

ह्या योगानंद अर्थात् रफिउद्दिनच्या टोळीतही शेवटी तोच अनुभव आला. त्यांच्यातील जे आरोपी कारागारात पाय टाकताच गांगरून भिऊन गेले म्हणून वर सांगितले आहे, त्यातील एक हसनभाई नावाचा महाराष्ट्रीय मुसलमान आणि पश्चात्तापलेला तो किशन, ह्या दोघांनी पोलिसांना त्या

टोळीची पुष्कळ माहिती दिली आणि आपले अपराध स्वीकारले. त्यांच्या त्या स्वीकारोक्तीची (कबुलीजबाबांची) महत्वाची भर पोलिसांपाशी असलेल्या स्वतंत्र पुराव्यात टाकून सरकारने त्यांच्यावर खटला भरला आणि खटल्याची नेमलेली तारीख रफिउद्दिनप्रभृति सर्व आरोपींना कळवली.

खटल्याच्या दिवशी, लग्नाच्या दिवशी नवरा मुलगा जसा सजतो तशा उत्सुकतेने आणि ऐटीने आपल्या केसांची, देहाची, वेषाची, कारागारात करता आली तितकी सजावट करून पायातील बेड्या ताठरपणे खळखळवीत तो रफिउद्दिन दरोडेखोर शिपायांच्या संगीन पहाऱ्यात कारागृहाच्या दाराबाहेर मोठ्या तोऱ्याने हसत खिदळत पडला. “काळ्या पाण्यावरून पळून आलेला पराक्रमी पुरुष तो हाच!” असे भासवीत सारे त्रिभुवन आपल्याकडेच पाहात चालले आहे असे त्याचे त्याला वाटत होते आणि आता कोर्टात काय काय चेष्टाकुचेष्टांनी जज्जाला देखील हसवून गारीगार करून सोडावे ह्याचेच काय ते विचार त्याच्या मनात घाटत होते. आपल्या भयंकर अपराधाची क्रूर कथा ऐकताच कोणा लोकांच्या अंगावर शहारे येतील, आपणाला कोणी लोक राक्षस म्हणून छी थूः करतील, आपणाला कठोर दंड भोगावे लागतील, ह्याची त्याच्या मनातसुद्धा धुगधुग वाटत नव्हती. प्रेते, रडारड, चिता ह्यांना सरावलेल्या स्मशानातील धर्मशाळेवरील चौकीदाराला जशी स्मशानाची भीति वाटत नाही, तो कार्यक्रम जसे त्याचे नित्याचे आन्हिक, त्याचा स्वाभाविक कार्यक्रम बनलेला असतो, तसेच त्या निर्ढावलेल्या दरोडेखोराला न्यायालय, पुरावा, शिक्षा, बेड्या, बंदिशाळा, जन्मठेप- काळे पाणी ह्या साऱ्या वस्तूंचा परिपाठ इतका सरावाचा झालेला होती की, त्याचा त्याला काहीच बाऊ वाटेनासा झाला होता. सैतानासारखेच त्याच्या मनाने ‘Oh Evil! Thou be My God!’ असेच घेतलेले होते.

त्याचे मन म्हणजे राक्षसकी आणि माणुसकी ह्यांचे एक समाईक अविभक्त कुटुंब होते. जसा तो राजवाड्यातील नीरो तसाच हा काळ्या पाण्यातील रफिउद्दिन!

त्याला जर कशाचे भय उरलेले असेल तर ते, नीरोला जसे मरणाचे तसे एका फाशीचे काय ते होते आणि कशाची चाड असेल, मायाममता असेल तर ती अफूची आणि स्त्रीची.

न्यायालयात जाता जाता देखील त्याच्या मनात एकदा दोनदा धडकी भरली. न जाणो, फाशीच झाली तर? आणि एकदा दोनदा तो क्रूरही, केविलवाणा होऊन मनात गहिवरला.

“मालती! हाय! हाय! आता पुन्हा कुठली सापडणार ती पोर माझ्या घट्ट मिठीत!!”

***

सहा

कोर्टात त्या भयंकर दरोडेखोरांचा खटला भरात आला होता. वकील, त्यांचे कारकून, शिपायांचा सशस्त्र तांडा, पंखेवाले, अशा दरोडेखोरांच्या खटल्यांची विशेष चटक असलेले बरेच सभ्य गृहस्थ आणि कांही गावगुंड, ह्यांची न्यायालयात दाटी झालेली असे. त्या क्रूर नरपशूंची नृशंस कृत्ये ऐकतांना कित्येकदा स्वतः न्यायमूर्तींच्या, सवयीने निर्ढावलेल्या मनालाही धक्का बसे. निःपक्षपातीपणालाही क्रोध आवरेनासा होई, गावगुंडांच्या अंगावरही शहारे येत. नृशंस आणि क्रूर श्वापदांना मनुष्यवस्तींतून मनुष्य रानावनांत हाकलून देऊ शकला, पण मनुष्यांच्या मनातल्या मनातच नृशंस श्वापदे अजूनही कशी दबा धरून घर करून वावरत आहेत ते भयानक सत्य, मनातील भुयारांची कुलपे जेव्हा केव्हा अशी उघडी राहून ती नृशंस श्वापदे सैरावैरा धावू लागतात तेव्हाच काय ते नाकारता येणे अशक्य होऊन जाते. माणुसकी म्हणून ज्याला आपण म्हणतो ती सुशोभित नगरी एक क्वेट्टा नगरी आहे. तिच्याखाली कढत असलेल्या भूकंपीय राक्षसकीचे थरचे थर पसरलेले असतात. केवळ दयादाक्षिण्य, मायाममता, न्यायान्याय ह्यांच्या पायावरचे ती माणुसकीची क्वेट्टा नगरी उभारलेले असल्यामुळे अढळ असलीच पाहिजे अशा भ्रमात जो असावध निजतो, तो सहसाच नाश पावतो. राष्ट्रचे राष्ट्र उलथून पडते.

रफिउद्दिन अहमद हाही मनुष्यच होता, कारण तो हसत असे. कित्येक प्राणिशास्त्रज्ञांचे म्हणणे आहे की, इतर प्राण्यांपासून मनुष्य हा निराळा आहे, हे दाखविणारा त्याचा मुख्य विशेष म्हणजे हसणे. मनुष्यच काय तो हसतो. खटला ज्यांच्यासमोर चालला होता ते न्यायमूर्ति ऑक्लंडसाहेब हे अशा अघोर आरोपितांकडे केवळ अपराधी ह्याचे नात्याने पाहात नसते, तर रोग्यांची परीक्षा वैद्याने करावी किंवा सापांच्या विषपरीक्षा मांत्रिकाने कराव्या- तशा चिकित्सक दृष्टीने ते अशा अघोरी पाप्यांच्या स्वभावविशेषांची चिकित्सा करीत. अपराधविज्ञान हा मनोविज्ञानाचाच एक भाग आहे, अशी त्यांची धारणा असे. म्हणूनच ते पुराव्याप्रमाणेच अघोर वा विक्षिप्त अपराध्यांच्या मनोविकारांची, मुद्रेची, भाषणाची आणि हालचालींची मनोमन छाननी करण्यात गुंतलेले असते आणि ती छाननी करता यावी म्हणून अपराध्यांना आरोपीच्या पिंजऱ्यात असतानाही योग्य मर्यादेत स्वाभाविकपणे बोलूचालू वा हसू-रडूही देत, त्यांशी स्वतः बोलून केव्हा बोलायलाही लावीत. ज्या संकटाच्या तडाक्यात सापडताच मोठमोठे दुष्टही चळचळ कापतात, लाजतात, त्या संकटांतही तो रफिउद्दिन निश्चिंत, निलर्ज्जपणे न लाजता हसताना पाहून न्या. ऑक्लंडसाहेबांना वाटे की, ह्याला शेक्सपिअरने एकदा पाहिला असता तर बरे झाले असते. कारण एका दुष्ट, घातकी आणि पाताळयंत्री मनुष्याचे शेक्सपिअरने एका भूमिकेकडून जे असे एक लक्षण सांगितले आहे की, ‘He seldom laughs त्याला हसू असे क्वचितच येते!’ ते लक्षण केव्हा केव्हा कसे खोटे पडते तेही त्याने कोठे तरी दुसऱ्या भूमिकेकडून वदवले असते. क्रूर असताही रफिउद्दिन जसा गमत्या तसाच तो दुर्वृत्त असताही देखणा असे. न्या. ऑक्लंड मनात म्हणत, ‘ह्याने एका महाकवीच्या वरील सूक्तालाच नव्हे तर दुसऱ्या महाकवीच्या ‘न ह्याकृतिस्सुसदृशं विजहाति

वृत्तम्' ह्या कालिदासीय सूक्तालाही खोटे पाडल आहे!' सुंदर माणूस सद्‌वृत्त असतोच असे नाही, इतकेच नव्हे, तर त्याच्या दुर्वृत्ताहूनही ती त्याची सुंदरता केव्हा केव्हा अधिक विषारी असते. गुलाबांच्या दाट फुलोरी ताटव्याच्या आड कपटाचा कडेलोट तेथेच आहे ते ती कळूही देत नाही.

त्या दरोडेखोरांच्या टोळीने केलेल्या नृशंस क्रौर्याचे अत्याचार पोलिसांनी भरभक्कम पुराव्याने त्यांच्या पदरात घातले. त्यात ज्या एका अप्रत्यक्ष पण महत्वाच्या पुराव्याची भर त्या रफिउद्दिनच्या टोळीतील सरकारी क्षमेचा साक्षीदार झालेल्या हसनभाई नांवाच्या आरोपीने घातली, त्याच्या त्या स्वीकारोक्तीतील निवडक आशय तेवढा जरी येथे दिला तरी तो रफिउद्दिनच्या राक्षसी कृत्यांची रूपरेषा वाचकांच्या लक्षात यायला पुरेसा होणार आहे. पोलिसांच्या स्वतंत्र पुराव्याने समर्थिलेला त्या स्वीकारोक्तीतील (कबुलीजबाबातील) तो आशय असा -

“माझे नाव हसनभाई. मी हायस्कूलपर्यंत शिकलो. कारकूनही होतो. पुढे जुगाराच्या नादाने पैशाची चोरी करू लागलो. माझे मूळ गाव खानदेशात. रफिउद्दिनची काळ्या पाण्यावर जाण्याच्या पूर्वीची माझी ओळख. त्याने पंजाब-लखनौकडे लूटमार करून आणलेली काही संपत्ति तो माझ्या घरी लपवून ठेवी. पण म्हणूनच मला तो त्याच्या टोळीत प्रत्यक्ष दरोडे घालायला कधी नेत नसे नि माझ्याकडे पोलिसांचे लक्ष वेधू नये म्हणून माझ्याकडे उघडपणाने फारसा येत नसे. पुढे तो शिक्षा होऊन काळ्या पाण्यावर गेला नि त्याचा संबंध अगदीच तुटला. कांही वर्षांनी एके दिवशी तो माझ्या दारात जेव्हा अचानक उभा राहिलेला मी पाहिला, तेव्हा मेलेले माणूस जिवंत झालेले दिसावे तसेच मला झाले. काळ्या पाण्यावर गेलेला मनुष्य नि जिवंत येऊ शकतो, ही कल्पनासुद्धा मला नव्हती. त्याने सांगितले की, तो मंत्रबळाने अदृश्य होऊन समुद्रावरून चालत परत आला. त्याने मंत्राने भारलेला एक ताईतही मला दाखवला. माझ्याकडे त्याची असलेली मागची तीन-चार हजारांची ठेव मला त्याने बक्षीस म्हणून देऊन टाकली असेही आश्वासिले. त्या त्याच्या साखर पेरणाऱ्या साऱ्या बोलण्याचा माझ्यावर विलक्षण परिणाम झाला. मला तो एक अद्भुत मांत्रिक नि अचाट साहसाचा पुरुष वाटू लागला नि तो म्हणेल ते करायला मी पुन्हा सिद्ध झालो. सिंध नि पंजाबकडे मुसलमानी धर्मप्रचाराच्या कामी आपण एक मोठी संस्था काढलेली आहे, ते एक प्रकारचे धर्मयुद्ध-जिहाद-असून त्याला साहाय्य देणे प्रत्येक मुसलमानाचे कर्तव्य आहे, असे त्याचे म्हणणेही मला त्या वेळी खरे वाटले. मुसलमान करण्यासाठी खानदेशातील हिंदु मुलेमुली सापडतील तशी फूस लावून त्याच्या हाती सोपवावी, त्याला ज्या वस्तु नि द्रव्य लपवायच ते पूर्वीप्रमाणे लपवून ठेवावे, तो बोलावील तेव्हा तेव्हा मी त्याच्याकडे जावे नि ह्या कामासाठी त्याने मला लागेले तो खर्च नि शंभर रुपये महिना रोख देत जावे, असा त्याचा माझा करार झाला.

त्याच हे पुढच काम न ऐकले तर मागच्या ठेवीसाठी हा क्रूरकर्मा मलाही ठार मारायला चुकणार नाही, असाही धाक मला वाटेच. प्रथम प्रथम मी भीतभीतच ह्या टोळीला साहाय्य करी. पण ह्यांच्या दरोड्यांची वर्णने ऐकून ऐकून पुढे मीही माणस जमवून लहानसहान दरोडे घालू लागलो. यात्रांतून, धर्मशाळांतून नि स्टेशनावरून चांगल्या चांगल्या हिंदु मुली पळवण्यात तर

माझी टोळी इतकी निर्ढावली नि पटाईत झाली की, ज्यांची पोटची लेकरे आम्ही पळवावी, त्यांच्या केविलवाण्या रडारडीची आम्हांला एक करमणूक वाटावी! त्यामुळे रफिउद्दिन मजवर अगदी प्रसन्न होऊन गेला. त्या मुलांमुलींना दूरवर सिंध-बलुचिस्थानपर्यंत नेऊन त्याच्या टोळीने मुसलमानांना विकावे किंवा आवडल्यास आपसांतच वाटून घ्यावे. मोठे मोठे मौलवीही आमच्या ह्या दुष्ट कृत्यांना धर्मप्रसार म्हणून आडपडद्याने वाखाणीत. त्यामुळे तर आमच्या नीच विषयवासनेला नि धनलोभाला एका धर्मोन्मादाचाच चेव नि शिष्टपणा येऊन मनाची लाजही सुटली आणि जनाचीही सुटली. भय काय ते सरकारी शिक्षेच उरले; तेही इंग्रजी नि काही करड्या हिंदु पोलिस अधिकाऱ्यांचच काय ते विशेष.

आम्हां दक्षिणी मुसलमानांना उत्तरेकडचे हे पठाण बलुची दरोडेखोर अविश्वासू समजत. आमचा वेष, भाषा, चालीरीती हिंदूंसारख्या, आमच्या हातून क्रूरपणा तितका झटपट घडत नाही, म्हणून आम्हांला ते भ्याड नि 'अर्धे काफर' मानीत. त्यांच्या दरोड्यात प्रत्यक्ष भाग आम्हाला घेऊ देत नसते. पण बिहारमध्ये ह्या टोळीची एका दरोड्यांत पकडापकड झाली. तेव्हा रफिउद्दिन काही जणांसह निसटून खानदेशात आला नि माझ्या टोळीत मिसळणेच त्याला भाग पडले. तो तेव्हापासून हिंदु गोसाव्याच्या वेषात हिंडू लागला. तो अट्टल बहुरूप्या आहे. इंग्रजी, संस्कृत, बंगाली, मराठी काय हवे ते थोडे थोडे पाठांतर करून ठेवतो. गातो, नाचतो, लावण्या तर लावण्या, भजन तर भजन, असे रंगवून म्हणतो की, यंव. योगानंदाच्या सोंगात तर त्याने हजारो हिंदु लोकांना नुसती भुरळ पाडली. त्याला दहा-पाच भजनेच येतात, शास्त्रबिस्त्र काही येत नाही, म्हणून तो मौनाच ढोंग करी नि नुसती भजने गाई. पाच-पन्नास संस्कृत श्लोक त्याला पाठ, पण ते अशा ढंगाने मध्येच म्हणे, मध्येच गप्प बसे की, तो एक अचाट विद्वान् असताही अत्यंत विनयी आहे, असे ज्याला त्याला वाटे. त्याच्या योगानंदबाण्याचा आम्हांला मोठाच उपयोग झाला. हजारो रुपये न मागता हिंदु लोक आम्हांला देऊन जाते. हा स्वतः कशालाही शिवत नसे. पण जे बळेच ठेवून जाते त्यांच्या त्या भेटी आम्ही गोळा कराव्या नि ह्याच्यासुद्धा सगळ्यांनी वाटून घ्याव्या. भजनाच्या वेळी होणाऱ्या दाटीत हिंदु मुली काही नाही तरी शेसवाशे आम्ही गेल्या एका वर्ष दीड वर्षात पळवून गुलाम हुसेन नावाच्या बलुच्याच्या हस्ते उत्तरेकडे धाडून दिल्या. त्या प्रत्येक सावजामागे आम्हांला स्वतंत्र 'बक्षीस' मिळे. हा मुसलमानांना न लुटण्याचा जो बहाणा करीत असे तोही, ह्याचा प्रत्यक्ष संबंध जेव्हा आमच्या टोळीशी आला तेव्हा किती खोटा होता, ते आम्हांला कळले. कोण्या मुसलमानाला लुटायचे म्हणजे तो त्याला 'काफरांचा दोस्त' इतकी शिवी काय ती देई नि शपथेतून मोकळा होई. आम्हांलाही ते सोयीचे शास्त्र मनापासून आवडे. हा जितका क्रूर तितकाच विनोदी आहे. पण बहुरूपीपणांत इतका पटाईत आहे की, ह्याचा मूळ स्वभाव विनोदी की क्रूर ते मलाही सांगता येत नाही. वेडसरपणाच्या सोंगालाही ह्याचा हा गमत्या ढंग फार उपयोगी पडतो. ते काहीही असले तरी तो अत्यंत क्रूर कृत्य करतो तेव्हाच तो अत्यंत गमतीत येतो इतके मात्र खरे.

ह्याच्या क्रौर्याची मलाही अगदी शिसारी येण्याचे दोन प्रसंग, मी पाहिलेला प्रत्यक्ष पुरावा म्हणून सांगतो. खानदेशातील ज्या मुसलमान डॉक्टरच्या घरावरील दरोड्याचा एक आरोप ह्या खटल्यात आमच्यावर केलेला आहे, त्या दरोड्यात मी होतो. आम्ही दार मोडून आत शिरताच ह्याने माडीवरून निसटून चाललेल्या डॉ. रहमान ह्यांच्या पायावर कुऱ्हाड घातली. पायाचा तुकडा पडला. डॉक्टर तिथेच मरून पडला, पण तरीही केवळ कुऱ्हाड चालवायच्या त्वेषानंदात मोठ्याने हसत ह्याने, मी नको नको म्हणत असता, त्या डॉक्टरची खांडे खांडे उडवली. इतक्यात पलंगाखाली दबलेली त्यांची दोन मुले दिसली. ती गप्प होती. मी कळवळून म्हणालो, 'राहू दे त्यांना. भयाने ती गप्प, अर्धमेली, बेशुद्धच पडली आहेत.'

तो म्हणाला, 'बेशुद्धीत सारेच डोळे मिटून गप्प असतात. शुद्धीवर येताच वाचा फुटते, डोळे उघडतात नि मग कोर्टात दरोडेखोर कोणचे ते हेच उघडलेले डोळे नि हीच फुटलेली वाचा ओळखील नि तुझ्यामाझ्या गळ्यांना तात देईल.' असे म्हणून ह्याने त्याच कुऱ्हाडीच्या एकाका घावासरशी त्या लेकरांचे प्रत्येकी दोन-दोन तुकडे उडवले. ते अघोर कृत्य पाहताच मलादेखील घेरी आली. पण त्या दरोड्यात दहा हजारांची लूट आमच्या हाती पडली, त्यामुळेच काय ती त्या घेरीची बाधा माझ्या मनाला फारशी झाली नसावी नि ते त्याच उन्मार्गावर पूर्ववत् चालत असावे.

दुसरी दुष्ट घटना जी मी डोळ्यांनी पाहिली ती तर वरील क्रौर्यालाही फिकेच पाडील. रफिउद्दिन हा नेहमी ऐटीत आम्हांला सांगे की, आताशी तो एका वर्षाला एक सुरेख स्त्री ठेवतो. वर्ष झाले की तिला ठार मारतो नि दुसरी ठेवतो. इतर लोक आपली सत्कृत्य जशी बहुधा ऐटीने फुगवून सांगतात, तशी हा विक्षिप्त मनुष्य आपली दुष्कृत्यंही ऐटीने फुगवून सांगत असतो. तेव्हा त्याच्या ह्या राक्षसी प्रतिज्ञेत खरा अर्थ किती ते मला सांगता येत नाही. पण हा खानदेशात पळून आला तेव्हा मात्र त्याच्याबरोबर बिहारमधून बळाने पळवून आणलेली एक हिंदु कायस्थाची तरुण कन्यका होती खरी. ती त्याच्या कडक पहाऱ्यात असे. तिच्यावरचे ह्याचे प्रेम इतके बाइलवेडे होते की, ह्या मनुष्यासारखे कुणीही मायाळू स्वभावाच माणूस सापडणार नाही असे वाटे. तसेच पाहिले असता हा आमच्या टोळीतल्या सवंगड्यांशीही राखी तोवर चांगली मैत्री राखी. त्या तरुण रमणीवर हा जरी लुब्ध होता तरी ती मात्र दुःखाने झुरणीला लागलेली दिसे. केव्हा केव्हा जिवावर उदार झाल्यासारखी भासे. ती एकदा देवाला हिंदुधर्मपद्धतीने हात जोडून प्रार्थीत असताना रफिउद्दिनने पाहिले. त्याने लाडात येऊन तिला कुरवाळीत विचारल,

"काय व्हावे म्हणून तुझ्या त्या दगडी देवाला प्रार्थीत आहेस?"

त्यासरशी ती चिडून फणकारली, "तुला फाशी व्हावी म्हणून!"

फाशी हा शब्द ऐकताच रफिउद्दिन सापासारखा खवळला. त्वेषाचा झटका येताच तो तसा हसला नि म्हणाला,

"खरेच हिचे वर्ष भरते आले, नव्हे का?"

"त्या दिवशी 'संध्याकाळी तुला एक गंमत दाखवीन हं आज नदीवर. रानघाटाच्या उंच बुरुजावर जाऊन बैस' असे त्याने मला सांगितले.

"संध्याकाळच्या वेळी मी त्या रानातील घाटाच्या त्या उंच बुरुजावर जाऊन बसलो. पावसाच्या सरीमागून सरी येत होत्या. नदी महापुराने दुथडी भरून चालली होती. त्या सध्या ओसाड रान वाढलेल्या घाटाच्या बुरुजांपर्यंत नदीचे पाणी चढल की तो महापूर समजत. तसा महापूर तिला आला होता.

"थोड्याच वेळांत रफिउद्दिन आपल्या त्या सुस्वरूप तरुणीला घेऊन तिथे आला. तिचा बुरखा देखील काढून हिंदु तरुणीप्रमाणे खांद्यावर पदर टाकून महापुराची मजा दाखवायसाठी म्हणून अगदी मोकळेपणी तिला त्याने आज आणलेली होती. फार दिवसांनी मुखावरच आच्छादन निघून तो शुद्ध, मुक्त वायू तिला श्वासोच्छवासिता आल्यामुळे ती किंचित समाधानलेली दिसते होती. रफिउद्दिन लाडीगोडीची नि लघळपणाची पराकाष्ठा करून तिला आराधीत होता. माझ्यासमोर तिला अशी बुरख्याबाहेर मोकळेपणी एकान्तात त्याने आणावी, ह्याचे मलाही कौतुक वाटले. त्यातही तो विषयांध झाल्यासारखा होऊन जेव्हा तिला एकदम कवळून घेऊ लागला तेव्हा तर मला काय म्हणावे नि काय करावे तेच कळेना. खरोखर, त्या सुंदर तरुणीला तसेच आलिंगनाची मलाही मनातल्या मनात अनिवार इच्छा झाली.

रफिउद्दिनने ती सुटू पाहात असताही तिला कवळून वर उचलली, दोन्ही हातात मुलासारखी आडवी घेऊन 'माझी- माझी छबुकडी ती' म्हणून तिला झुलवली, झटकन् हिसडून तिची साडीही अर्धीमुर्धी फेडून टाकली नि तो कामोन्मत्त मला निलर्ज्जतेने म्हणाला, "बघ बघ ही परी. घे, पोटभर बघून घे."

हा विषयांध ह्या विकृत लहरीत आता तिला करतो तरी काय म्हणून कामावेशाने थरथरणारा मीही जो डोळे भरून तिच्याकडे पाहतो. तोच- आपण दगड उचलून भिरकावतो तशा सावेश बळाने त्याने त्या सुंदर मुलीला त्या बुरुजावरून त्या नदीच्या महापुरात दूरवर फेकून दिली. 'वर्ष भरले तिचे' असे म्हणून तो मोठ्याने हसला.

"राक्षसा!" मी एकदम ओरडलो.

"आधी ती गंमत बघ. हीच गंमत दाखवायला तर मी तुला इथे बोलावले!"

दोनदा ती निरपराधी सुंदर रमणी लाटांवर आली. दोनदा लगोलग खाली गेली. त्या महापुराच्या मध्येच एक उंच खडक वर डोके काढून उभा होता. एक प्रचंड लाट खळखळत तिकडे वळली, तीत गुरफटलेली ती तरुणी नि तिची ती गुलाबी साडी स्पष्टपणे दिसली.

उंच टांगलेल काचेचे सुंदर झुंबर अकस्मात् तुटून खाली कोसळताच जशा त्याच्या काचेच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतात नि त्याच्या ज्योतीच्या ठिणग्या पांगून त्या ज्योति अचानक विझतात, तशी ती प्रचंड लाट त्या खडकावर आपटताच त्या जलौघाच्या पांढऱ्या शुभ्र ठिकऱ्या ठिकऱ्या

उडाल्या नि त्या अत्यंत अनागस कांचनगौर तरुणीच्या मस्तकाच्या चिधड्या होऊन तिच्या पाची प्राणज्योति एकदम मावळल्या! ती पुन्हा काही पाण्यावर आली नाही.

"राक्षसा, काय केलेस हे? मरणाच्या डोहांत तिला का ढकललेस?" मी शोकत्वेषात स्फुंदस्फुंदून हडसले.

"मरणाच्या नव्हे. वेड्या, तिच्याविषयी बोलायचे तर तिच्या भाषेत बोल. तिच्या संस्कृत भाषेत पाण्याला मरण नाही म्हणत. पाण्याला जीवन म्हणतात. मी तिला जीवनाच्या महापुरात फेकले!" तो हसला.

"ती आज मेली नसती तर उद्या गुप्त पोलिसांना माझा पत्ता देती. आहेस कुठे?"

महाराज, मी ह्याच्याइतक्या उलट्या काळजाचा नसलो तरी पापकृत्यांना चटावलेला होतो. त्यातही अलौकिक सत्कृत्यांप्रमाणेच अलौकिक दुष्कृत्यांतही लोकांच्या मनावर छाप पाडण्याची एक दुःशक्ति असतेच. ती छाप पडून ह्याच्या भयंकर दुष्कृत्यांमुळे आमच्यावरील ह्याचा प्रभाव वाढत गेला नि ह्याच्या योगानंदपणाच्या ढोंगांतही आमचा यथेच्छ स्वार्थ साधत असल्याने आम्ही ह्याची साथ करीतच राहिलो.

... नंतर आम्ही मथुरेला आलो. ह्याने कर्णपुतळीसारख्या एका जलादर्श यंत्राचे ढोंग काढले होते नि भूतभविष्यवर्तमान त्या यांत्रिक यंत्रबळे हा अचूक सांगतो असा बोभाटा आम्ही सर्वत्र करीत चाललो होतो. कुठेही गेलो की आम्ही परस्थ, व्यापारी, वकील, डॉक्टर अशा निरनिराळ्या सोंगांनी पृथकपणे गावांत हिंडावे नि योगानंदजींनी अमुक चमत्कार आमच्या समक्ष केले, अमुक भविष्य अचूक सांगितले, अशा थापा गावात पृथक पृथक स्थळी स्वतंत्र बाण्याने मारू लागाव. कुणी मंडळी ह्याच्याकडे भूतभविष्य विचारायला येताहेत असे कळले की, आमच्यापैकी कुणी तरी एकाने एक परका श्रीमंत गृहस्थ म्हणून ह्याच्यापुढे बसून ह्याला काहीतरी विचारावे नि ह्याने काहीही उत्तरे दिले की,

"अहो आश्चर्य! कोण ही अद्भुत दैवी दृष्टि! आपण म्हणता ते तंतोतंत सत्य ठरले! अगदी बिनचूक ठरले! अशी ह्याची वाहवा करून, बळेबळे एखादी मोठी रक्कम ह्याच्या देवस्थानाला देऊन परत जावे. म्हणजे ज्यांच्या समक्ष आम्ही हे ढोंग करू त्या मंडळींतील बहुतेक स्त्रीपुरुष विश्वासभोळेपणाच्या मानसिक साथीला हटकून बळी पडते. ज्या प्रकरणी योगानंदाची उत्तरे खोटीच पडते ती तशीच सोडून जी योगायोगाने वा गोलार्थाने खरी ठरते त्यांचाच आम्ही जिकडे तिकडे पृथकपणे गाजावाजा करीत हिंडावे. मथुरेतही हे आमचे ढोंग असेच भरभराटीत आले असता डॉ. नायडू नावाच्या बाई आमच्या नादी लागल्या. त्यांनी बोलता बोलता त्यांच्या घरोब्याच्या एका नागपूरकडील बाईंची नि त्यांच्या एकुलत्या एक मुलीची हकीकत सांगितली नि त्यांना मथुरेला आणले आहे असे त्या म्हणाल्या.

ती माहिती ऐकताच हा योगानंद बेरड एकान्तात नेऊन मला म्हणाला, "मी काळ्या पाण्यावर असता माझ्या जोडीला सैन्यातून शिक्षा झालेला एक बंदिवान असे. दुसरे कुणीही माणूस माझ्या

शेजारी ठेवण्यात येत नसल्यामुळे त्याचा माझा पुष्कळ स्नेह जमला. त्याच्या घरची सारी माहिती मला त्याने वेळोवेळी सांगितली. डॉ. नायडूबाई नागपूरच्या ज्या बाईला नि तिच्या मुलीला आणणार म्हणाल्या, तीच त्या बंदिवानाची आई नि त्याची ती नवजवान बहीण असली पाहिजेत! डॉ. नायडूबाईंनी सांगितले ते ते नावगाववृत्त तंतोतंत जुळते. तीच ही मुलगी. आली, माझ्या हातात आली. माल.. माल.. मालती, हो रे हो, मालतीच! हाय रे मालती! तिला मी दहादा शेजेला घेतली आहे! मालती! मेरी मालती!"

"अरे, पण काळ्या पाण्यावर ना तू होतास? मग तिला शेजेला घेतले म्हणतोस, ते काय स्वप्नांत? तिच्या नुसत्या नावावरचे इतका लंपट?" मी उपहसू लागलो. तो म्हणाला,

"हसन, हिंस्त्र पशूला उपाशी कोंड नि मांस देऊच नकोस, मग एक रक्ताळ हाडूक काय ते त्याच्यासमोर टाक नि बघ तो हिंस्त्र पशू ते हाडूकच किती मिटक्या मारून चघळतो ते. तसेच कामविकार मनाच्या पिंजऱ्यात जिथे वर्षानुवर्ष उपाशी कोंडला जातो त्या काळ्या पाण्यावर स्त्रीचे जे नाव कानावर पडते ते नावच इतके मनात भरते की, त्या स्त्रीची एक मूर्ति होऊन उठते, त्या काल्पनिक मूर्तीवरचे मन लंपट होऊन जाते, वास्तवात नाही तर स्वप्नात तिच्याशी रमते. हिंदु लोकांतील उषेच सुंदर आख्यान तू ऐकले आहेस? स्वप्नांतला प्रिय पुरुष तिला प्रत्यक्ष दिसणाऱ्या पुरुषापेक्षांही विव्हळविता झाला. तसेच माझे झाले. वारंवार त्या तेवढ्या एकट्या जोड बंदिवानाशीच बोलणे भाग पडल्यामुळे नि त्या बोलण्यात उपवर मुलीची अशी हिचीच गोष्ट वारंवार निघाल्यामुळे माझ्या उपाशी कामेच्छेवर त्या कल्पनेची, त्या नावाची जी एक छाप बसली ती आता दुसऱ्या कोणत्याही प्रत्यक्ष स्त्रीची बसत नाही. नि काय गंमत पाहा, त्या नावाच्या स्त्रीची ती कामातुर कल्पनाच आता प्रत्यक्षपणे भोगता येणार! बस्स, तिला पळवायची!'

तिला पळवायचे ठरताच आम्ही नेहमीची युक्ति योजली. भजन संपून जनसंमर्द परतताना जिथे मालती तिच्या आईबरोबर दाटीत चालली होती तिथे आमच्यापैकीच दोघांतिघांनी खोटीच मारामारी मांडली. त्यासरशी दाटीत दंगल उडाली. त्यात तिला आईपासून वेगळी पाडली. मग आमच्या ह्या योगानंदस्वामीच्या एका शिष्याने साळसूदपणे घरी पोचवायसाठी म्हणून तिला जी हाती घेतली ती थेट गुलाम हुसेनच्या अड्ड्यावरचे नेऊन सोडली. ती रात्र तिथे ह्या दुष्टाने मालतीच्या शेजेवर काढली.

दुसऱ्या दिवशी त्या अपहरणाचा काहीएक बोभाटा होऊ नये म्हणून मालतीच्या आप्तेष्टांना आम्ही मायाममतेच्या जाळ्यात पकडून दूरवरच्या भलत्याच वाटेला लावून दिले. ह्या लुच्च्याला काळ्या पाण्यावर ह्या मालतीच्या भावाचे रंगरूपवृत्त सारे माहीत पडलेले होते, ती ती माहिती अंतर्दृष्टीची म्हणून ह्याने त्यांना सांगितली. तिच्या त्या आईला देखील याच्या मस्तकावर झालेला जो घाव नि वण आठवण नव्हता तो देखील ह्याने जेव्हा त्या जलादर्श यंत्रमंत्राचे स्तोम माजवून अंतर्ज्ञानाने आपल्याला दिसतो म्हणून सांगितले, तेव्हा तर ह्या बायाबापड्या ह्याच्या दैवी अंतर्दृष्टीवर नुसत्या भाळून गेल्या. त्यासरशी मालती नागपूरकडे तिच्या एका गुप्त प्रियकरासह

पळून गेली आहे, तुम्ही इथे बोभाटा न करता गुपचूप जाल तर तिला आणू शकाल, असे भूतभविष्यवर्तमान ह्याने वर्तवले. त्यावर विश्वासून मथुरेच्या पोलिसांबिलिसांना कोणालाही काही न सांगता त्या बाया नागपूरकडे निघून गेल्या. आम्हीही मथुरेहून पोबारा करण्याच्या बेतात होतो, तो अकस्मात् दुसऱ्याच पापकर्माचा परिपाक होऊन त्याचे हे फळ आम्हाला भोगावे लागले. हे अलाहाबादचे वॉरंट सुटून आम्ही लगोलग पकडलो गेलो. त्या गडबडीत त्या बिचाऱ्या उपवर मालतीला घेऊन तो राक्षस गुलाम हुसेन कुठे चंपत झाला त्याचा सुगावा मात्र अजून कुणालाच लागलेला नाही. त्या अत्यंत निष्पाप, निरपराध, असहाय कोमल कन्यकेची काय काय विटंबना त्याने केली असेल, धिंडवडे काढले असतील देव जाणे!"

न्यायसंमत असताही त्या न्यायाधीशाचे ओठ रागाने एकीकडे फुरफुरू लागले तर दुसरीकडे डोळ्यातून करुणेची टिपे घळघळ गळू लागली! श्रोत्यांतही अनेकांच्या डोळ्यांना पाणी आले.

आणखी एकाद्या डोळ्यांतून दयेची टिपे सारखी घळघळत होती; पण तो न्यायाधीशही नव्हता, न्यायालयातील श्रोताही नव्हता, तर होता त्या आरोपी दरोडेखोरांतीलच एक आरोपी- तो पश्चातप्त किशन.

तो दिसण्यात कुरूप, वाचेचा संयत, वयाने तरुण, मनाचा कोवळा, वर्तनाचा बाणेदार भासत होता. साऱ्या खटल्यात तो मान खाली घालून बसलेला असे. तो आता त्याचे वक्तव्य (statement) देण्यासाठी जेव्हा उठला तेव्हा मान ताठ वर करून, शांतपणे अनेक शब्द निवडून योजीत आणि त्याच्या डोळ्यांत मालतीच्या विटंबनेच्या वरील उल्लेखासरशी आलेली आसवे पुशीत तो म्हणाला,

"मी काशीला वेदान्तविद्येचा एक अनाथ विद्यार्थी होतो. माझ्या चित्तात विरक्ति उत्पन्न होऊन कुणा तरी गुरूच्या सान्निध्यात भक्ति नि योग ह्यांची काही साधना घडावी असे आले. मी पुढे मथुरेला आलो. तिथे त्याच वेळी ह्या योगानंद गोसाव्याच्या भजनाचा नि अंतर्ज्ञानाचा मोठा गाजावाजा झाला होता. त्याला भाळून मी ह्याचा शिष्य झालो. मला सारंगी चांगली येते. भजनही येत. ह्यासाठी भजनात मी ह्याची साथ धरू लागलो. एक आठवडाही उलटला नसेल तोच ह्या टोळक्यातील कांही जण 'हा हिंदु, नवखा, ह्यासाठी ह्याला दूर ठेवावे' असे काहीसे कुजबुजत असल्याचे माझ्या कानावर आले. ह्यांच्या काही तरी गुप्त घालमेली चाललेल्या आहेत अशीही शंका वाटली. पण ह्या योगानंद म्हणवणाऱ्या मनुष्याकडे मी त्यावेळी गुरुदेवाच्या भावनेने पाहात असल्यामुळे नि त्याच कोणतेही वाकडे पाऊल मला न दिसल्यामुळे इतर शिष्यांच्या अपराधांचा दोष ह्याच्या माथी मी मारला नाही. बोलावल्यावाचून ह्याच्या मठीत वा बैठकीत शिरलो नाही. त्यापुढे दोन-तीन दिवसांनंतरच रात्री भजनानंतर लोक परतताना दंगल झाली. त्या रात्री मला योगानंदाने बोलावून सांगितले की,

"मालती दंगलीत तिच्या आईपासून ताटातुटली आहे. तिला तिच्या किंवा नायडूबाईंच्या घरी सुरक्षित पोचव. नायडूबाईंबरोबर ती इथे जेव्हा जेव्हा आली तेव्हा तेव्हा तुलाच त्यांच्याबरोबर

त्यांच्या घरी मी धाडी. त्यामुळे तिचा तुझ्यावर विश्वास असल्याचे ती म्हणते नि तू बरोबर असशील तर ती ह्याचे रात्री माझ्या मोटरहाक्यासह माझ्या मोटरीत परत जाऊ इच्छिते. तर तिला घेऊन जा."

"मी ते आनंदाने मानले. मालतीला मोटरीत घेऊन बसलो. सांत्वनाचे शब्द मी तिच्याशी बोलण्यात थोडा गुंगलो. तेवढ्यात मोटर मथुरेच्या कुण्या अनोळखी भागात घुसून कुण्या अनोळखी घराशी उभी राहिली. मी विचारता मोटरवाला म्हणाला,

"नायडूबाईंनी इथे उतरायला सांगितले आहे. त्या आतच आहेत." असे म्हणून मालतीला त्याने त्या घरात नेले. लगेच बाहेर येऊन मला म्हणाला 'परतु या' अशा कुणाच्याही विश्वासघातकी आणि पाताळयंत्री कटाचा लवलेशही परिचय वा शंका नसल्यामुळे मोटरीतून उतरताना मालती आत बोलावीत असताही तिच्याबरोबर मी आत न जाता मोटरवाल्याच्या शब्दासरशी लगोलग परतलो. पण मला त्यानंतर मठात न बोलावता दुसऱ्याच एका देवळात जे ठेवण्यात आले ते दुसऱ्या दिवशीच्या रात्री भजनाच्या वेळी मात्र साथ धरायला काय ते त्या सभेत आणण्यात आले. त्या सभेच्या शेवटी ह्या टोळीतच मी असल्याने मलाही धरण्यात आले. मालतीच्या विश्वासाला अपात्र नि साहाय्याला अक्षम ठरलो ह्याचा मला अत्यंत खेद वाटतो. जर माझा काही अपराध असेल तर तो माझ्या मताने हाच. न्यायाधीशांच्या मताने कोणचा ठरेल तो ठरो!"

आरोपींपैकी सर्वांची वक्तव्ये, पोलिसांचा सर्व पुरावा, खटल्याचे सारे काम संपत आले. पण रफिउद्दिन अर्थात् योगानंद स्वतःच्या बचावाचे म्हणून काहीही बोललेला नव्हता; चेष्टा काय त्या करीत होता, हसत होता. ह्या साऱ्या आरोपींच्या वतीने मिळून सरकारने होऊनच एक वकील दिलेला होता, पण रफिउद्दिन त्याची देखील मधून मधून टिंगल करण्यापुरताच काय तो त्याच्याशी संबंध ठेवीत होता. त्याच्याविरूद्ध त्याच्या टोळीतील फुटलेल्या साक्षीदारांनी त्याच्या क्रूर कृत्यांचा जो पाढा वाचला, त्या वेळी तो त्यांच्यावर सुद्धा रागावलेला दिसते नव्हता. न्यायाधीशाशी मात्र त्याची बरीच घसट झाल्यासारखी दिसे. ह्या पैशाचिक मनुष्याच्या अघटित मनाला एखाद्या शास्त्रीय विषयाप्रमाणे खोल अभ्यासण्यासाठी न्यायाधीश त्याच्याशी खोदून खोदून बोलत, त्याला हसू देत, बोलू देत, निरखून पाहात. शेवटी खटल्याचे काम संपायच्या आधी पुन्हा एकदा त्यांनी रफिउद्दिनला विचारले,

"तुला स्वतः तुझ्यावरील आरोपांविषयी त्या बचावाविषयी अद्याप कांही सांगणे आहे काय?"

"सांगतो थोडेसे." रफिउद्दिन सभेचा अत्याग्रह झाल्यावरूनच काय ते बोलायला उठलेल्या कुण्या डुढ्ढाचार्य भाषकाच्या उदार ऐटीत हिंदू-उर्दूत बोलू लागला,

"माझ्यावर ह्या चाळीस-पन्नास साक्षीदारांनी इतके असंख्य आरोप केलेले आहेत की, मला आज त्यांची निरनिराळी आठवणसुद्धा राहिलेली नाही; तेव्हा त्यांची निरनिराळी उत्तरे तरी काय देऊ? त्या सगळ्यांमिळून जो एक सर्वसामान्य आरोप सांगता येऊ शकतो तो म्हणजे- मी एक भयंकर अपराधी असून मला कडकांतील कडक शिक्षा देणे हेच न्यायाचे होणार आहे!

ह्या सर्वसामान्य आरोपाला माझे सर्वसामान्य उत्तर असे आहे की, मी पूर्णपणे निर्दोषी असून मला कसलीही शिक्षा न देता, माझ्या निष्कारण झालेल्या दुर्लौकीकासाठी पुरेपूर भरपाईची एक मोठी रक्कम पोलिसांकडून मिळणे हेच न्यायाचे होणार आहे!

ह्या पोलिसांनी नि ह्या आरोपींनी, इतक्या माणसांना मी ठार मारले नि इतक्या कोमल कन्यकांना बलात्कारले म्हणून सांगितले आहे की, जणू काही मी कुणी कादंबरीकार, नाटककार किंवा न्यायाधीशच आहे! आपल्या कादंबरीच्या एका पानात वाटेल त्या कन्यकांची वाटेल ती नागवी विटंबना वाटेल त्यांच्याकडून करवीत आपण परस्परे ती ती मानसिक कामचेतना सभ्यपणे उपभोगिताना किंवा आपल्या नाटकाच्या एका प्रवेशात रंगभूमीवर मावणार नाहीत इतके मुडदे पटापट पाडताना किंवा आपल्या निर्णयपत्रकाच्या एका छेदकात 'फाशी' ह्या दोन अक्षरांच्या खड्ड्यात दोनदोनशे जीवांना जिवंत गाडून टाकताना गळलीच तर ज्यांच्या लेखणीतून शाईची टिपं गळतील पण डोळ्यांतून आसवांचा टिपूस गळणार नाही, अशा कुणा सभ्य कादंबरीकारांवाचून, कलावंत नाटककारावाचून वा सदय न्यायाधीशांवाचून दुसरा एखादा मनुष्य इतकी भीषण कृत्यं इतक्या सफाईने, इतक्या तडकाफडकी करू शकेल तरी कसा, हे तुमचे तुम्हीच पाहा!

तर काय, ह्या साऱ्या पोलिसांनी, साक्षीदारांनी, आरोपींनी जाणूनबुजून एका गटाने, एक कटाने हे सगळे खोटे आरोप माझ्यावर केले, असे माझे म्हणणे आहे? नाही महाराज! मी स्वतःला जितका पापभीरू सज्जन समजतो तितकाच ह्या पोलिसादिकांनाही समजतो. मी निर्दोषी. हेही निर्दोषी. मग हा सारा विक्षिप्त घोटाळा होण्याच कारण काय? ते कारण ज्या एका शब्दात सांगता येईल नि जो एक शब्द उच्चारताच माझ्याविरूद्धचा हा सारा बळकट पुरावा खोटा न पाडताही मला निर्दोषी ठरवायची गुरुकिल्ली आपल्या विवेकबुद्धीच्या हाती सापडेल तो शब्द म्हणजे - गैरसमज! समजुतीचा घोटाळा!!

नि त्याला कारण माझ्या अंगी माझ्या सर्वथैव निरुपायामुळे असलेला एकच काय तो दोष! देवाने मला कुणा सभ्य, सदय नि साबणधुवट अशा न्यायाधीशासारखे तोंड नि अंगलट न देता एका अत्यंत भयंकर दरोडेखोरासारखी दिली! पण ह्या दोषापुरती जी काय शिक्षा मला देणे ती मला न देता देवाला द्यावी.

पंजाबात दरोडे घालून काळ्या पाण्यावर गेलेल्या, काळ्या पाण्यावरून पळून आलेल्या, नंतर बिहार, खानदेश प्रभृति प्रांतांत अक्षम्य अत्याचारांचा भीषण धुमाकूळ उडवणाऱ्या कुणा तरी रफिउद्दिन अहमद नावाच्या अधमाधम, हत्यारी नि नृशंस अशा दरोडेखोराच्या तोंडासारखेच माझे तोंड नि अंगलटीसारखीच माझी अंगलट दुर्दैवाने तंतोतंत केस न् केस घडलेली असावी नि त्यामुळेच ह्या साऱ्या सज्जनांना मीच तो पापी होय, असे सात्विक संतापाच्या भरात प्रामामिकपणाने वाटले असावे!

महाराज, माझ्या ह्या कथनाला भरभक्कम पुराव्याने मी सिद्ध करून देऊ इच्छितो. ह्यास्तव तो मूळचा खराखरा पापी दरोडेखोर रफिउद्दिन अहमद सापडेतो तरी मला निर्दोषी म्हणून सोडून

द्यावे, नाही तरी त्याला पकडून आणावे की त्याला पाहताक्षणीच माझे म्हणणे किती अक्षर न् अक्षर खरे आहे, हे आपल्या तत्काळ ध्यानात येईल. महाराज, आरोपीला स्वसंरक्षणार्थ अवश्य तो पुरावा पुरवायला शक्य ते साहाय्य देणे हे न्यायाधीशाच कर्तव्य आहे नि मला माझा एक जो पुरावा देणे आहे तो देता येण्यासाठी जे साहाय्य मी मागतो ते देणे आपल्याला अगदी शक्य आहे. मला निर्दोषी म्हणून सोडून द्या की मी त्या खऱ्या रफिउद्दिन अहमदला धरून आणतो. नाही तर मी त्याचीच साक्ष काढतो. आपण कोर्टाकडून त्याला धरून आणीतो मला जामिनावर सोडाव. बस्स्, हाच माझा बचाव- माझा Defence! (पोलिसांकडे पाहून) क्यो, दस सोनारकी और एक लोहारकी! है की नही?"

गालातल्या गालात हसत रफिउद्दिन अर्थात् योगानंद खाली बसला.

न्यायालयातील मंडळींचे शक्य तितके दाबलेले हसू ओसरतो न्यायाधीशही ओठांशी अखंड टाकाचे (फाउंटन-पेनचे) बूड लावून छताकडे विचारपूर्वक पाहात होते. मग पुन्हा विचारते झाले.

"रफिउद्दिन अर्थात् योगानंद, तुला काही किरकोळ माहितीचे शेवटचे प्रश्न मला अजूनही विचारायचे आहेत. खरी नि नीट उत्तरे देशील तर त्यात तुझेच हित आहे."

हात जोडून तो आरोपी नम्रपणे उभा राहात म्हणाला,

"विचाराव महाराज."

"तुझे खरे नाव काय?"

"योगानंद गोसावी."

"तुझा धंदा काय होता? तू काय करीत असस?"

"धंदा असा नव्हताच. देवाच भजन काय ते करीत असे."

"ह्या आरोपींपैकी हे काही दरोडेखोर तुझे शिष्य बनले होते हे खरे काय?"

"हे काही जण माझे शिष्य बनले होते हे खरे, पण ते दरोडेखोर आहेत की नाहीत ते मला काय माहीत?"

"बरे, तुझ्याविरूद्ध साक्ष देणारा हा हसनभाई तुझ्या ओळखीचा आहे का? ह्याची काय काय माहिती तुला आहे."

"ह्या मनुष्याला मी ओळखतो, पण त्याच्या ह्या नावाला मात्र ओळखीत नाही. ते ह्या तुरुंगात आल्यानंतर काय ते मला ऐकू येऊ लागले. ह्याच्याविषयी मला माहिती म्हणजे इतकीच की, हा 'रामलाल' असे आपले नाव सांगून माझा शिष्य बनला होता ही एक गोष्ट; नि दुसरी ही की, ह्याला भांग, गांजा नि चरस ही तिन्ही बळकट व्यसने आहेत. त्यांच्या नशेत ह्याला नाही नाही ते आभास होतात. त्या नशेत सगळ्यांनाच तसे होतात. पण ह्याचा विशेष असा की, नशेत झालेल्या त्या आभासांचा ठसा ह्याच्या चित्तावर, भुतांचा ठसा भ्यालेल्यावर पडतो तसा, इतका उत्कटपणे पडतो की, शुद्धीत आल्यावर देखील ह्याला ते आभास नसून घटनाच होत्या, 'Facts'च होत्या, असे ठामपणे वाटत राहत. माझ्याविषयी त्याने घटना म्हणून ज्या सांगितल्या त्या

त्याच्या गांजाच्या गुंगीतले नि भंगड नशेतले असेच आभास काय ते होते. तुरुंगांतही ह्याला भांग, गांजा, चरस जर न मिळता तर पोलिसांनी त्याला त्या गुंगीत सांगितलेल्या साऱ्या खोट्यानाट्या गोष्टी खऱ्याच वाटून त्याने हे साक्षीत सांगितलेल गप्पोड पुराण केव्हाही सांगितले नसते."

"बरे, तुला मालती माहीत आहे का?"

"आहे तर! वा महाराज! मालती मला माहीत आहे का हे काय विचारता? ती मला माहीत आहे, इतकेच नव्हे तर ती मला अतिशय आवडतेसुद्धा."

"मालतीला तू प्रथम कुठे पाहिलीस?"

"राणीच्या बागेत- मुंबईला. तिथे पहिल्यानेच माझ्या लहानपणी मी जेव्हा मालतीला पाहिली तेव्हाच ती माझ्या मनात इतकी भरली की, मी तिच एक कलम आणून माझ्या स्वतःच्या बागेत लावले. महाराज, मला जाईजुईपेक्षा देखील मालती फारच आवडते. भजनाच्या वेळी मी ह्या मालतीच्याच फुलांचा काय तो हार गळ्यात घाली. मोठे प्यार झाड आहे ते नाही?"

इच्छा नसतांही श्रोत्यांच्याच नव्हे तर न्यायाधीशाच्या मुखावरही ह्या निगरगट्ट आरोपीच्या ह्या अनपेक्षित कोटीमुळे हसू सहसाच उमटल्यावाचून राहिले नाही. ते लगोलग दाबून न्यायाधीश प्रश्निते झाले,

"तू स्वतःला भूतभविष्यवर्तमान वर्तवायची अंतर्दृष्टि आहे असे सांगून लोकांना फसवीत होतास हे खरे काय?"

"महाराज, मी देवाच्या भजनात तल्लीन होताच माझ्या अंतश्चक्षूंपुढे इच्छामात्रे भूतभविष्याचा चित्रपट उभा राहतो हे अगदी खरे; पण मी त्यांच स्तोम माजवून लोकांना फसवी हे अगदी खोटे. माझी भविष्ये खरी ठरते वा खोटी हे देखील मी कुणाला विचारत नसे. कुणाशी फारसा बोलतच नसे. कपर्दिकही कुणाची घेत नसे. मी लोकांना ठकवले नाही, उलट जर कुणी कुणाला फसवले असेल तर मला भाबड्याला ह्या लुच्च्या लोकांनीच ठकवले असे आता वाटते. कारण साधुशील शिष्य म्हणून माझ्याभोवती गोळा होऊन ह्या लुच्चांनी माझ्या नावाने मला न कळत गुरुबाजीचे स्तोम माजवून किती जणांना लुटले , छळले , ठकवले , ते एक देवच जाणे! माझे ध्यानच तिकडे नव्हत."

"तो तुझा अंतश्चक्षु आजही उघडा आहे काय? असल्यास माझ्याविषयी आत्ताच्या आत्ता एक-दोन भविष्ये तरी वर्तवून दाखवशील का?"

"होय सरकार. हा खांब जसा माझ्या बाह्य चक्षूंना सध्या स्पष्ट दिसते आहे, तसाच आपल्या भविष्यातील दोन गोष्टी तरी माझ्या अंतश्चक्षूंपुढे कालपासून अगदी स्पष्टपणे प्रकटल्या आहेत. सांगणारच होतो मी ती भविष्ये, पण..."

"जर ती दोन्ही भविष्ये खोटी ठरतील तर?"

"तर आपण मला तिसर भविष्य विचारू नये. संपले!"

“बरे, सांग पाहू ती माझ्याविषयीची दोन भविष्य तरी! गडबडगुंड्याच्या मोघम भाषेत नकोत हं, अगदी स्पष्टपणे अर्थ लागेले अशा शब्दात हवीत. सांग.”

“अगदी स्पष्टपणे सरळ अन्वय असलेल्या भाषेत, महाराज, मी आपल्याला शुभ्र असलेल एक भविष्य वर्तवतो की, आपला मृत्यु आपल्याचे डोळ्यांनी पाहण्याचा दुःखद प्रसंग आपणावर कधीही कोसळणार नाही! दुसरे तितकेच बिनचूक पण मला अशुभ असणार भविष्य हे की, ह्या खटल्याच्या निकालात आपण मला निर्दोषी ठरवून केव्हाही सोडणार नाही! छाती असेल तर हे माझे भविष्य आपण खोटे पाडून दाखवावे.”

ह्या वेळचा त्या निगरगट्ट आरोपीचा तो लटक्या वीररसाचा आणि त्या छद्मी गालातल्या गालात हसण्याचा आविर्भाव पाहतांना गांभीर्य सुटून खो खो हसल्याविना न्यायालयातही कोणालाच राहवले नाही. चिंतेने, भयाने थरथरणारे आरोपी देखील हसले. हसला नाही असा एकच- तो किशन.

हसण्याचा असा त्या खटल्यामधील त्या आरोपींना तो शेवटचाच प्रसंग होता. आता हसत हसत केलेल्या भयंकर पापांची भयंकर फळे भोगण्याची वेळ जवळ आली होती.

कारण न्यायाधीश न्यायाचे त्या दिवसाचे काम संपवून लगेच उठले आणि खटल्याचा उरलेला विधि उरकून “चौथ्या दिवशी निर्णय सांगण्यात येईल” असे उद्घोषिले गेले.

***

सात

अवघ्या पृथ्वीतलावर जी खाल्डियन, ग्रीक, पारशी, यहुदी, ख्रिस्ती, मुसलमानी प्रभृति धर्मक्षेत्रे आहेत, त्यात अत्यंत प्राचीन असताही अत्यंत आधुनिक कालापर्यंत आपले महत्व नि आकर्षण अबाधित राखणाऱ्या आणि जसे द्वापारी तसेच आजही कोटि कोटि हिंदूंचे ज्ञानतीर्थ असलेल्या श्रीकाशी क्षेत्राच्या आसमंतातील एका उपवनातून एकान्तपणे वाहात जाणाऱ्या गंगेच्या काठाला एक जुनाट घाट होता. सन्निध वसति अशी नव्हतीच. एक लहानसे महादेवाचे ओसाड देऊळ आणि त्याच्यालगत काही बेलाची नि साध्या चाफ्याची जुनाट झाडे इतकाच काय तो त्या स्थलाचा ठेवणीतला अलंकार होता.

एखादी महाराणी राजसभेतील सामंत-नृपतींच्या, सेनापतींच्या प्रधानमंडळाच्या मानसन्मानांना राजकीय थाटाने दिवसभर स्वीकारीत स्वीकारीत थकून गेल्यावर संध्याकाळी आपल्या अंतःपुरात येते, केस मोकळे सोडते, अलंकार, वेष तितका उतरून ठेवते आणि अगदी साधे, घरगुती पातळ-पोलके तेवढे घालून एकान्त उद्यानात मनमोकळेपणे फुलताटव्यातून फिरते तर फिरते, कोचावर पहुडते तर पहुडते, तशी भागीरथी काशीनगरातील जनिक घाटाघाटांवर लाखो भक्तगणांच्या, राजेमहाराजे, सैनिक, पुरोहित, पंड्यांच्या पूजापुरस्कारांना डामडौलात स्वीकारीत स्वीकारीत आल्यानंतर आता ह्या संध्याकाळच्या वेळी त्या एकान्त स्थळी मनमोकळेपणी लहरीलहरीने वाहात होती. समोर आकाशात संध्याकाळच्या सूर्याने लाल गुलाबी रंगारंगांनी काठोकाठ भरलेल्या पश्चिम क्षितिजाच्या हौदातून रंगच रंग वर्षत, फवारीत, खेळत पश्चिम दिशेची नुसती रंगपंचमी करून सोडली होती.

त्या एकान्त स्थळी, त्या जुनाट घाटावर, त्या भागीरथीच्या सलिलसंथ पात्रात एक ब्राह्मण तरुण स्नानविधीचे मंत्र उच्चारीत त्या संध्यासमयी आपले सायंस्नान करीत होता. स्नानाच्या आधीच आपली वस्त्रे धुऊन त्याने त्या शिवालयाच्या भोवताली असलेल्या चाफ्याच्या झाडावर वाळत घातली होती. स्नान होताच अंगावरील ओल्या पंचानेच त्याने सूर्यनारायणाला अर्घ्य दिले. मग ती अर्धीमुर्धी वाळलेली सुधूत वस्त्रे धारण करून त्याने काही बिल्वदले आणि चाफ्याची चार फुले तोडली, तो त्या महादेवाच्या देवळात गेला आणि शिवलिगाला ती सद्भावाने वाहून हात जोडून मनोमन प्रार्थिता झाला,

“देवा, माझ्या मूर्खपणापायी माझ्यावर आलेल किटाळ निरसून त्या राक्षसी योगानंदाच्या पंजांतून माझी सुटका केलीस. त्या पाप्यांच्या संसर्गदोषामुळे माझ्यावर दरोड्यांच्या नि मनुष्यवधांच्या झालेल्या भयंकर आरोपातून न्यायाधीशाने सर्वस्वी निर्दोष म्हणून मला जे सोडून दिले, ते तुझ्याच दयेचे फळ. त्या दुष्टांनी आणलेल्या गंडांतरातून निरपराधी असणाऱ्या माझा हा पुनर्जन्म झाला. तुझ्या न्यायीपणाचा लौकिक राखणारी तुझीच ही दया.

“पण देवा, न्यायी दयासुद्धा निःपक्षपातीच असली पाहिजे, नव्हे का?” तो घुटमळला, “मग-मग माझ्याहूनही अगदी निरपराध नि अनागस असलेल्या त्या कुमारीची दया आपणाला अजून कशी

आली नाही? न्यायाधीशाने मला ह्या भयंकर खटल्यातून निर्दोष सोडले असले तथापि माझे मन मला एका दोषाविषयी सारखे खात आहे. माझ्या हाताने न कळत का होईना, पण मी मालतीला तिच्या घरी पोचवायच सोडून त्या भलत्याच पत्त्यावर- तो पत्ता तिच्या घराचा नव्हे हे माहीत असता- तिला नेऊन सोडले , ती 'आत मजबरोबर चल,' असे म्हणत असताही अजागळ विश्वासाने तिच्याबरोबर त्या भलत्याच घरात गेलो नाही नि काही अंशी तरी त्या दुष्ट नरपशूच्या- त्या गुलाम हुसेनच्या हाती ती असहाय कुमारी सोपवून देण्याच्या दोषाचा मी वाटेकरी झालो. कळून झालो नाही, पण जे मला कळायला हवे होते जे कळवून घेणे हे त्या वेळी मी अंगीकारलेल्या कामगिरीत माझे कर्तव्य होते, ते करायला मी चुकलो. हा माझा निष्काळजीपणासुद्धा एक दंडनीय अपराध आहे. नैर्बंधिक अपराध नसला तथापि नैतिक अपराध तरी आहेच आहे.

"माझ्या नसत्या अपराधांच्या आरोपांतून माझ्या पहिल्या नवसाला पावून माझी सुटका करणाऱ्या देवा, माझा मलाच जो घडला असे वाटते आहे त्या ह्या असल्या अपराधाच्या दोषांतूनही माझी सुटका कराल का? ह्या माझ्या दुसऱ्या नवसालाही पावाल का? एक तर त्या बापड्या मालतीची त्या हिंस्त्र नरपशूंच्या हातून सुटका करण्याची संधि नि सामर्थ्य मला द्यावे. पण ते जवळ जवळ दुर्घटच. ती कुठे आहे हे देखील कुणाला ठाऊक नाही. त्यात मी किती दुर्बळ यःकश्चित्. त्या निर्ढावलेल्या पाप्यांच्या सशस्त्र कपटाचारात सर्वथैव अपरिचित. तेव्हा ती संधि नि ते सामर्थ्य येणे मला दुर्घटच असले, तर निदान देवा, तुझ्या न्यायी दयेच सुदर्शन तरी तिच्या पाठोपाठ धाडून त्या दुष्टांना संहाराव, तिला आपणच सोडवाव. देवा, तू सर्वसमर्थ आहेस. सज्जनांची संकटे तू निवारतोस म्हणूनच तुला दयासागरही म्हणतात."

भक्तिगद्गद् वाणीने तो तरुण देवाला असे प्रार्थीत असता त्याचे हृदय ह्या शेवटच्या वाक्याने भरून आले. "तू सर्वसमर्थ आहेस. तू सज्जनसंरक्षक नि परम दयाळूही आहेस." तन्मयपणे एकेक शब्द उच्चारीत तो हात जोडून जो उभा राहिला तो क्षणभर त्याचे मन अगदी निःस्तब्ध, निःशब्द होऊन गेले. पण त्या त्याच्या बहिर्मनाच्या सुन्नपणात, त्याच्या अंतर्मनात त्या वाक्यावर त्यालाही न कळती अशी काय चर्चा झाली कोण जाणे, पण त्याचा तो तल्लीन सुन्नपणा ओसरताच एक स्पष्ट शंका त्याच्या चित्तातून त्याला हटकीत पुसू लागली.

"देव जर सुजनांच संकट टाळण्याइतका परमदयाळू नि सर्वसमर्थही आहे, तर तो त्या निरपराध सुजनांना प्रथम तरी संकटात मुळी लोटतोच का? दुर्जनांना प्रबळ करतोच का त्या सुजनांचा अनन्वित छळ करण्याइतके? सुजनांची कसोटी पाहण्यासाठी? पण मग देवाच सर्वज्ञत्व ते काय उरले? भक्त खरा की खोटा ते, दुष्टाहाती त्या भक्ताचे अत्यंत हाल हाल केल्यावाचून देवाला कळत नाही असे म्हणणे म्हणजे देवाच्या सर्वज्ञपणालाच नव्हे तर परमदयाळूपणालाही बट्टा लावणेच नव्हे का? दरोडेखोरांपासून गावाच रक्षण करण्याच सामर्थ्य अंगी असताही नि दरोडा पडणार हे माहीत असताही जो अधिकारी प्रथम दरोडेखोरांना गावातील निरपराधी लोकांना यथेच्छ

लुटू देतो, हाणमार, जाळपोळ करू देतो नि मग त्यांच्या केविलवाण्या हाकांना नि नवसांना पावून त्यांच्या रक्तबंबाळ घावांवर फुकट औषध लावायची व्यवस्था करवतो, त्या अधिकाऱ्यांचे ते दयाळूपण वाखाणण्याजोगेच म्हणायचे काय? का…"

एकामागून एक उसळत येणाऱ्या ह्या शंकांच्या त्या अकस्मात् महापुरात तो तरुण अगदी गुदमरल्यासारखा झाला आणि त्याने त्यांचा तो लोट मोठ्या नेटाने बळे बळे थोपवून त्यात बुडता बुडता आपले चित्त त्यांतून वाचवले.

"पाखंड! पाखंड! " असे मोठमोठयाने स्वतःशीच म्हणत तो झपाझप येरझाऱ्या घालू लागला. त्याचे चित्त थोडेसे स्थिरस्थावर झाल्यावर त्याने जणू त्या शंकाविचारांनीं मळलेल्या चित्ताला अक्षरशः प्रक्षाळण्यासाठीच गंगेच्या त्या पवित्र आणि शीतले जलाची आचमने केली. विचारांचा ओघ दुसरीकडे नेण्यासाठी सूर्य पश्चिम दिशेला खेळत असलेल्या रंगपंचमीच्या उधळपट्टीची तो शोभा पाहात राहिला.

त्या लाल, गुलाबी, सोनकळी किरणांचे झोतचे झोत भागीरथीप्रवाहात खाली खोलवर प्रतिबिंबित होते होते. लहरीलहरीत ते रंग नाचत होते; त्या लहरी उंचावर फुटून त्यांचे सहस्त्रावधि तुषार उडताच चिमुकल्या इंद्रधनुष्याचा पाऊसचा पाऊस पात्रांतील पाण्यावर पडून तरंगत होता.

हळूहळू पश्चिमेच्या क्षितिजावरील त्या लाल, गुलाबी, सोनकळी छटा पुसट, फिकट, तुरळक होते चालल्या. तेजस्वी धुरंधर पुरुष नाहीसा होताच राष्ट्राचे जीवन जसे म्लान होते, तसेच तो सूर्य त्या सोनेरी किरणसमूहांना निःशेषपणे सावरून अस्ताचलामागे अगदी नाहीसा होताच तो गंगेचा प्रवाहही रंगहीन, निस्तेज आणि मलिन दिसू लागला. एखाद्या सुंदरीच्या शरीरातून चेतना निघून जाताच तिच्यावर लगोलग प्रेतकळा येते, तशी पश्चिमेच्या मुखमंडलावर लगोलग काळी छाया पसरली. जे प्रफुल्ल ढग गुलाबांच्या परडीसाखे शोभत होते ते झटपट आता कुजलेल्या पाचोळ्याच्या ओलसर ढिगासारखे दिसू लागले.

अंधःकाराच्या पकडीत गवसून सोनेरी पश्चिम अशी काळवंडलेली होताच, पूर्वी तिच्या रंगाच्या खुलावटीत रंगून गेलेल्या ह्या तरुणाच्या आनंदमग्न स्मृतीही मावळून त्याच्या चित्तातही दुःखद स्मृतींचा काळोख पसरू लागला. "एक, दोन, तीन, चार! हो; चार दिवसांपूर्वीच ह्या वेळी मी त्या अलाहाबादाच्या कारागृहातींल भयाण एकलकोंडीत, अंधःकारात नि काय होईल ह्याच्या भयंकर चिंतेत चाचपडते होतो. माझ्या पायातील त्या बेड्या तुटून, निर्दोष सुटून, आज मी त्या इथे मोकळेपणी ह्या ताज्या, मोकळ्या वायूला श्वासोच्छवासीत आहे. पण मालती? अरेरे! ही गुलाबी पश्चिम जशी त्या अंधाराच्या पकडीत सापडताच काळवंडून गेली, तशीच ती सुंदर किशोरी त्या हिंस्त्र राक्षसांच्या तावडीत आज काळवंडून गेलेली, केस अस्वाव्यस्त विखुरलेली, भीतीने जिचे सारे हसू ठार मारले आहे नि म्हणूनच चिंतेची प्रेतकळा जिच्या तोंडावर पसरली आहे, अशी कुठेतरी पडलेली असेल! काही तर्कसुद्धा करवत नाही ती त्यांनी पळवून कुठे नेली असेल ह्याचा!"

तो उठून घाटावर इकडून तिकडे फेऱ्या घालू लागला. त्याला प्रथम गेल्या कित्येक दिवसांच्या सवयीने भास झाला की, पायांत बेड्या आहेतच. बोलताना त्या आवरून धरण्यासाठी त्याचा हात कंबरेखाली चाचपडू लागला. मग आपण सुटलो, बेड्या तुटल्या आहेत, तुरुंगाच्या कोठडींत आपण नाही हे आठवून मनाशीच तो हसला. दूरवर कोठे तरी पाहात मालती कोठे असेल ह्याचे बेलगाम तर्कवितर्क करीत, तिच्याविषयीचे अनेक काल्पनिक प्रसंग जुळवीत, काही हिंडत, काही थांबत राहिला.

तो किशन होता. योगानंद अर्थात् रफिउद्दिन अहमद ह्याचा दरोड्याच्या खटल्यात सापडण्याच्या आधी न्यायवेदान्तशास्त्रे अभ्यासण्यासाठी तो काशीलाच जेव्हा राहात असे, तेव्हा याच महादेवाच्या देवालयात तो एकान्तपणे येऊन बसे. त्या देवतेलाच तो आपले आराध्य दैवत मानी. पुढे त्या योगानंदाच्या ढोंगधतुऱ्याला बळी पडल्यानंतर जेव्हा तो त्यांच्यासह पकडला गेला, तेव्हा बंदिशाळेत त्याने ह्याचे देवतेला आपली निर्दोष सुटका व्हावी म्हणून नवसले होते. त्या खटल्याचा निकाल अलाहाबादच्या न्यायालयांत चार-पाच दिवसांपूर्वीच लागला होता. रफिउद्दीन अहमदला जन्मठेप काळे पाणी आणि त्याच्या साथीदारांपैकी बहुतेकांना सात ते दहा वर्षांचे काळे पाणी, अशा कडक शिक्षा ठोठवण्यात आल्या. सुटले असे दोघे - एक हसनभाई, क्षमेचा सरकारी साक्षीदार झाला म्हणून आणि हा किशन, पूर्ण निर्दोषी म्हणून.

तेथून सुटताच तो थेट काशीला आला आणि त्याच्या त्या आवडत्या एकान्त देवळातच उतरला. त्याला घरदार, कुटुंब असे काही उरलेले नव्हतेच. तो अगदी निर्धन म्हणून त्याला कोणी कधी फारसे विचारीत नसे. तो काहीसा कुरूप म्हणून त्याला कधी कोणी भाळलेले नव्हते. मथुरेला असता, मालतीला आणताना नि पोचवताना, तो अट्टल सोदा रफिउद्दिन, योगानंदाच्या वेषात वावरत होता, तेव्हा त्याने ह्या किशनलाच तिच्याबरोबर सोबतीला द्यायला जे चार-पाच वेळा निवडले ते किशनच्या दुसऱ्या कोणच्या सद्गुणासाठी नसून त्याच्या त्या थोड्याश्या कुरुपपणाच्या अवगुणासाठीच होते. त्या अर्थी तरी त्याच्या कुरुपपणाचा त्याच्यावर एक उपकारच झाला होता खरा. कारण त्याच्या कुरूपतेमुळेच मालतीशी त्याचा परिचय झाला आणि त्या परिचयात त्याच्याशी दयाळू प्रेमळपणाने असे बोलणारे आणि त्याला बरा म्हणणारे पहिले माणूस त्याला भेटले. मालतीने आणि तिच्या आईने किशनच्या सुशील स्वभावाला किती तरी वाखाणावे. त्या दोन-चारदा घडलेल्या सहवासात किशनला वाटे, ह्या दोघींचा आपल्यावर खरोखरच दयालोभ आहे. क्वचित्, त्याची उभ्या जन्मात त्या वेळपर्यंत कोणी मुळीच विचारपूस केली नव्हती, त्यामुळेच मालतीने आणि तिच्या आईने त्याच्याशी बोलावे ते दोन साधे गोड शब्दही त्याला विशेष ममतेचे द्योतक वाटले असतील. त्याचा मात्र त्या दोघींवर लोभ जडला होता खराच आणि उभ्या जन्मात जडलेल्या त्या पहिल्याचे लोभालाही त्याला जेव्हा असे अंतरावे लागले आणि त्याच्याच चुकीमुळे त्याच्यावर दयालोभ करणाऱ्या त्याच व्यक्तीवर असे भयंकर संकट गुदरून त्यांचा सत्यानाश

झाला, तेव्हा ते शल्य त्याच्या मनात सारखे सलू लागले. अगदी सहजासहजी मालती जी त्याला हाक मारी तशी गोड हाक त्याच्या जन्मात त्याला कोणी मारली नव्हती.

"मालती, पुन्हा एकदा तशी गोड हाक दे ना मला!.. किशऽऽन!" त्याने मालतीसारखी गोड हाक आपली आपणच मारून पाहिली. पुन्हा थोड्या विसंगत विचारांच्या प्रवाहात देवळात आला, तेथेही येरझारा घालीत राहिला आणि शेवटी स्वतःला मोठ्याने म्हणाला,

"छट्! मोठमोठ्या पोलिसांना त्या नीच गुलाम हुसेनचा ठावठिकाणा मिळेना तिथे तो मला कसला मिळणार? नि मिळाला तरी मी असहाय पामर त्या चांडाळ-चौकडीच्या हातून तिची सुटका ती काय करणार? अशक्य, अशक्य! ते शक्य असेल तर ते देवा, तुला एकट्यालाच काय ते! सोडीव ना मालतीला, भेटीव ना तिला मला. तुझी इच्छा मला पामराला काय कळणार? मी ती विचारीतच नाही! पण माझी इच्छा मला कळते; सांगितल्यावाचून मला राहावत नाही! भेटीव ना मालतीला मला!!"

त्याने देवाला साष्टांग नमस्कार घातला. डोळ्यातून गळलेली टिपे त्याने पुसली. निष्फळ विचार करता करता थकलेला त्याचा मेंदू सुन्न झाला. आतले विचार काही कुठले तसा तो एका बेलाच्या झाडाच्या बुंध्याशी टेकून, दुरावलेले दोन-चार पक्षी घाईघाईने उडत त्या किर्र सांजेत अजून माणसाला माणूस दिसते आहे तोच घरटी गाठण्यासाठी लगबगीने येत होते, त्यांची गंमत पाहू लागला.

इतक्यात जवळच त्या घाटाच्या पायरीकडून हलकीशी शीळ कोणी घालीत आहे, असे त्याला वाटले. तो वळून बघतो तो पायरीवरून कोणी ओणवे होऊन पाण्यात डोकावते आहेसे पुसटपणे दिसले, तोच घागर भरण्यासाठी ती बुडवल्याचा डुबडुबकिनी आवाजही आला.

"कोण बरे घागर भरून पाणी न्यायला इतक्या किर्रर संध्याकाळी गंगेवर आले आहे? इथे माणसांची ये-जा अशी फार थोडी! हा पाणवठा असा नाहीच! अशा वेळी पाण्याची घागर भरून नेणार माणूस म्हणजे ते जवळपासच कुठे तरी उतरलेल असले पाहिजे! असेल बिचारा पांथस्थ कुणी तरी!"

असे मनात म्हणत किशन त्या घागर भरून उठणाऱ्या माणसाच्या पुसट आकृतीकडे साहजिक पाहात राहिला, पण घागर खांद्यावर घेऊन शीळ घालीत तो माणूस पलिकडच्या आल्या वाटेने न जाता देवळालगतच्या वाटेने जो जो जवळ येऊ लागला तो तो किशनही मनात अधिकाधिक चमकत चालला, निरखून पाहू लागला, बेलाच्या आड आड लपत गेला आणि करमणूक म्हणून तोंडाने शीळ घालीत खांद्यावर घागर घेऊन जाणारा तो मनुष्य देवळाजवळून पायवाट चालत आपल्या नादात थोडा पुढे जाताच किशन संतापाच्या, भयाच्या आणि काहीशा आनंदाच्या भरात पुटपुटला.

"हाच! अगदी निश्चित! हाच तो गुलाम हुसेन! खटल्यात हसनभाईने सांगितलेली कहाणी जर खरी असेल तरी मालतीला पळवायचे काम ह्यानेच केले! पण ह्याने ती बलुचिस्थानसारख्या

दूरच्या प्रांती धाडली? की विकली? की स्वतःपाशीच ठेवली? हा इथे कुठे? चोरट्यासारखा लपून राहतो आहे ह्या ओसाड बाजूला बहुधा! पण जर ती त्याच्यापाशीच असेल तर? दिसेल का मला? एकदा तरी मालती दिसेल का पुन्हा? अरे, पण हा चालला अंधारात! थांबतो काय मी मूर्खासारखा इथे? काय भ्याड आहे हे मन! म्हणे आपल्या हातात काही नाही नि हा तर अट्टल नृशंस, सशस्त्रही असणारच! अतिविचारीपणा हा कधी कधी नामर्दपणा होतो तो असा! जायचच ह्याच्यामागे! न जाणो, मालतीही त्याने इथेच कुठे तरी दडवलेली असली तर? काय योग! जीव घेईन, माझा देईन, पण तिला सोडवीन!"

ह्या शेवटच्या विचाराने त्याला हत्तीचे बळ आणि वाघाचे धैर्य आले. "किशन, सोडीव ना मला!" अशी मालतीची आर्त किंकाळीही त्याला ऐकू आल्यासारखी वाटली.

तो किशन प्रथमतः झपझप, पण त्या पाणी भरून नेणाऱ्या माणसाच्या पाठीमागून त्याचा मार्ग दिसू येईल इतक्या जवळ येताच दबत दबत चालला. पुढे चाललेला मनुष्य गुलाम हुसेनच ह्यात किसनला आता काही संशयच उरला नव्हता. गुलाम हुसेन काही पुढे जाताच पायवाट सोडून एका माळाकडे वळला; पुढे एक मोठा पडक्या दगडी पारासारखा किंवा चबुतऱ्यासारखा उंच आडोसा होता त्याला वळसा घालून तो रचलेल्या दगडांच्या एका गडग्यापाशी आला आणि मग त्या गडग्याच्या वर ती घागर ठेवून, गडग्यावरून आत उडी मारून पुन्हा ती घागर खांद्यावर घेऊन एका थोरल्या वडाच्या बुंध्याआड एक कौलाराचे बैठे घर होते त्याच्या दाराशी आला. त्याच्या मागे मागे सुरक्षित अंतरावरून मार्ग काढीत येणारा किशन ह्या वेळेपावेतो त्या दगडी गडग्यापाशी येऊन गुलाम हुसेनला त्या घरातील कोणी दार उघडून सामोरे येते की काय, ते डोळे ताणून ताणून पाहू लागला. घरातून उजेड हालतोसा दिसताच त्याच्या एकदम मनात आले की, आत कोणी तरी माणूस आहे. ती मालतीच नसेल ना? औत्सुक्याने त्याचे हृदय धडधडू लागले, पण गुलाम हुसेनने घागर खाली ठेवून, कंबरेचे काहीतरी सोडून त्या बंद दाराच्या वरच्या चौकटीच्या कडीपाशी हात नेताच किशनच्या ध्यानात आले की, दाराला बाहेरून कुलूप आहे. त्यावरून आत कोणी नाही असे आढळून त्याचा एकदम हिरमोड झाला. मालती जशी काही हाताशी येऊन पुन्हा नाहीशी व्हावी, अशीच तळमळ लागली. इतक्यात गुलाम हुसेनने कुलूप काढून दार सताड उघडले आणि थोड्या दरडावणीच्या आवाजात तो गुरगुरला.

"रोशन, रो ऽऽ शन, बत्ती बाहेर लाव! क्या? नही आती? घसेटके ले आवूं?"

ते शब्द ऐकताच किशनचे अंग थरारले. आत कोणी तरी स्त्री आहे. ती कडक पहाऱ्यात कोंडलेली असली पाहिजे. बाहेर जायचे तर हा राक्षस तिला आत कोंडून बाहेरून कुलूप लावूनच काय ते दूर जातो. ती ह्याचे सांगणे मनापासून मानीत नाही. हा तिला प्रसंगी फरफटत घसटून ओढीत आणण्यास कमी करीत नाही. इतकी विस्तृत माहिती त्या एका चारशब्दी वाक्यासरशी किशनच्या कानांवर पडली. त्याच्या अपेक्षेला ती इतकी तंतोतंत जुळली की, तो ओठांतल्या ओठांत पुटपुटला,

"होय ना, होय, मालतीच आत असली पाहिजे? रोशन म्हणजेच मालती! येईल का ती बाहेर बत्ती घेऊन?...तिला ओढूनच आणतो!..."

सचित उत्सुकतेने त्याचे हृदय धडधडू लागले. रागाने त्याचे ओठ फुरफुरू लागले. बत्ती दाराशी येतेसे दिसताच तो त्या दगडाच्या गडग्याआड अंधारात छपून निरखू लागला.

धुमसत असलेली आग जशी ठोसले म्हणजे तेवढ्यापुरतीच थोडी पेट घेते, तिची ज्योत किंचित लवलवते, तशी गुलाम हुसेनच्या 'आती कि नही? इधर! और आगे!' अशा दरडावणीच्या शब्दाशब्दापुरतीच हटवादी पावले पुढे टाकीत पुन्हा हटेलपणे थांबत, बत्ती घेऊन मुसलमानी वेषातली एक तरुण स्त्री शेवटी बाहेर आली. ती बत्ती गुलाम हुसेनने दाखविलेल्या आकड्याला तिने टांगली आणि पुन्हा घरात जाऊ लागली, तोच गुलाम हुसेनने तिला धरले. जवळच एक मोठा वृक्षाचा ओंडका पडलेला होता, त्यावर खुर्चीसारखा तो पाय सोडून बसला आणि तिला आपल्या मांडीवर बळाने ओढून घेत म्हणाला,

"आव! तू हस या रो पड पर मैं अभी तेरे साथ प्रेमकी मजा लुटूंगाही! देख तो देख तेरा वह सुंदर मूंह! नही उठाती मूंह ऊपर? तो ऐसा मैं जबरन उसे ऊपर उठावूंगा और मेरे आंखे भरभरके तेरी खुबसूरतीकी शराब पी लूंगा!"

असे लाडात येऊन बोलत त्याने त्या रमणीचे वदनमंडल बळे बळे वर उचलून दोन्ही हातांनी त्या दिव्याच्या उजेडात धरले, डोळे भरभरून तिच्या सुंदरतेचे मद्य तो पिऊ लागला, झिंगू लागला आणि त्या मुखाने मटामट मुके घेत म्हणाला, "वाह वाह! असे अंधेरे रातमे नया चांद! ऐ रोशन, क्या बोलती थी तुझे तेरी मा? मालती? ऐ मालती! मेरी जान!"

त्या अंधाऱ्या रात्रीत एखादा नवा चंद्र उगवावा तसेच ते मालतीचे मुखमंडल गुलाम हुसेनला सुंदर भासले. ते पाहताच ती अंधारी रात्र किशनला अधिकच काळोखी भासू लागली. त्या दिव्याच्या प्रकाशात उचलून धरलेले ते तिचे मुखमंडल स्पष्टपणे दिसताच, ती मालतीच हे किशनला निःशंकपणे कळून चुकले आणि ज्या मालतीला एखाद्या सोन्याच्या ताटात गुंफून ठेवलेल्या पूजेच्या शुभ्र आणि पवित्र फुलमाळेसारखी त्याने मथुरेला पाहिली होती, तिलाच त्या ओंगळ आणि आडदांड हलकटाच्या मांडीवर, घाण चिखलात पडलेल्या निर्माल्याप्रमाणे तशा किळसवाण्या दुर्दशेत पाहताच त्याच्या डोळ्यापुढे एकदम अंधेरी आली.

"मालती, तुझे मेरी बोली समझती नही? इच्छा? मैं तेरे तूटेफूटे मरेठीमे बोलतो. सुन! तू ऐसी दुखमे कां? तुझी मा तुला आठवते? असे लिये तू अबतक दांडगाई करते, असी रडते, मला झिडकारते? रोज तो मेरे बिछोनेमे तेरेको लेताही है! फेर बळसे हम तुझ्यापासून जे छिनावून घेतोच है ते सुख तू हमको हसते हसते क्यो नही देत मुझे? तुझी आई मी तुझ्यापास आणून ठेवू? बोल. तुझ्या आईला मी पळवून आणतो देख, फेर तो सुखमे हसत सोयेंगी का माझ्या बिछान्यावर? तुझ्या आई..."

“मेल्या! माझ्या आईचे नाव तरी पुन्हा काढू नकोस ह्या तुझ्या हलकट तोंडातून! आग लागो मेल्या तुझ्या तोंडाला!” संतापाने त्याच्या हातांनी वर उचललेले आणि आता रागाने रडकुंडीला आलेले आपले तोंड तिने एका हिसक्यासरशी सोडवीत मालती जो डोके खाडकन् फिरवायला गेली तो तिच्या डोक्याचा तडाखा गुलाम हुसेनच्या हनुवटीला बसून त्याच्या दातांच्या कवळ्या एकमेकांवर अशा कचकल्या की, त्याच्या डोक्यात झणझणून कळच उठली. त्याने संतापाने मालतीच्या गालात ताड्दिशीं एक चपराक हाणली आणि तिला जी ढकलून दिली ती ती भुईवर धाडकन् पडली.

“राक्षस! घोट घेतो ह्याच्या नरडीचा!” असे पुटपुटत दयेच्या आणि त्वेषाच्या लहरीत किशन एकदम गडग्यावर चढू लागला. “तुझा प्राण तरी घेतो नाही तर माझा तरी देतो!” अशा उर्मीसरशी तो जो गडग्यावर एक पाय रोवतो तो तो पाय, खालचा दगड निसटून दगडाच्या एका खोलगट भेगीत अडकला. त्यासरशीं त्याच्या त्वेषाची ऊर्मीही अडखळली. पाय सोडवीतो दुसरा विचार लगोलग त्याच्या मनाला म्हणाला, “तुझ्या प्रतिज्ञेपैकी गुलाम हुसेनचा प्राण तरी घेतो, ह्या विकल्पापेक्षा, नाही तर माझा प्राण तरी देतो, हाच विकल्प काय तो अशा सामन्यात सफळण्याचा अधिक संभव! हा अधम हुसेन सशस्त्र असणार! मी निःशस्त्र! ह्या झटपटीत माझा राग मालतीवर उगवून मालतीला हा ठार करणार नाही कशावरून? पुन्हा ह्या घरात त्याचा आणखी एखादा साथीदार नसेल असेही नाही! अशा निलर्ज्ज अधमाचा शृंगार अनेकदा समाईकसुद्धा असतो, हे त्याचा साथीदार जो हसनभाई त्यानेच त्या खटल्यात शपथेवर सांगितले आहे! छट्, आताच असे साहस करणे म्हणजे मालतीला संकटातून सोडवायची ही चालून आलेली अद्भुत योगायोगाची सुवर्णसंधि गमावणे होय!” वरचा पाय त्या दगडांच्या पकडीतून सोडवीतो किशनला अंधारात आपण पुन्हा कधी अलक्षितपणे लपतो, अशी घाई होऊन गेली. तो पुन्हा गडग्याआड दबून आणखी काय होते ते एकीकडे पाहात होता आणि दुसरीकडे त्याच्या मनात ‘आता मी करू तरी काय,’ ह्याविषयींच्या उलटसुलट पळत्या विचारांची नुसती ससेहोलपट चालली होती.

मालती भुईवर धाडकन् जी पडली, ती रडत, स्फुंदत, तशीच हात उशाला घेऊन पडली होती. गुलाम हुसेन ताठ उभा पाहून क्षणभर तिला तशी पडलेलीच डोळे भरून पाहून अधिकच आतुरतेने हसला.

“आहा रे खुबसुरती! छोकरी, ही चित्रासारखी ठाकठीक रेखलेली तुझी अंगलट कितनी प्यारी लगती है! उभी राहतेस त्याहूनही अशी हे हरणासारखे गोजरे सडक सुंदर पाय कुशीवर जोडीने सरळ लांबवून तू पडलेली असतेस ना, तेव्हा तुझी तनुलता एक्या नव्याच शोभेने मन मोहून टाकते! और शंभर औरता खिलखिलके हसनेसे जितना आनंद नही आता, उतना तुला अशी स्फुंदत रडत कुशीवर अंगभर निजलेली पाहून मला होता है! तेरी छाती स्फुंदनमे कैसी उंचावते, कसी निचावते, बिखरे कुरले कैसे पाखरांच्या थव्यासारखे तेरे भालके मंडपपर खिदळत उडते है! अब समझती है ना माझी मरेठी बोली तुला! ऊठ छोड दे नखरा! तू झिडकारतेस मला इसलिए

क्या मी छोड देंगा तुला? प्यारी, ऐक, गाय रहती है ना खूब दूधवाली? वह जब हटसे बैठ जाती, बिघडून लाथा मारू लागती, तेव्हा बहाला घालून, तिच्या तंगड्या बांधून, तिला बळाने उठवून, गवळी दूध काढतो. गाय लाथा झाडते असलिये जो गवळी तिची हांड्यासारखी भरलेली कासच दोहायच सोडतो, त्या मुर्दाडाने गाय बाळगावी कशाला? ऊठ, प्यारी ऊठ, तेरे जवानीकी खुबसूरत गाय मैं दोहूंगाही दोहूंगा!"

गुलाम हुसेनने तिला स्वतः खाली बसून, पुन्हा बळे बळे उठवले आणि जवळ घेऊन तिला तो कुरवाळू लागला.

"प्यारे मालती, कुलपात दिवसभर कोंडून ठेवतो असलिये तू घुस्सा करती, पण पोलिसांना तुझा पत्ता लागू नये, तुला धरून नेली तर तुमकोही वे पोलिस हाणमार करेंगें! दुसऱ्या कुणा तरी दुष्टाच्या पिंजऱ्यात हे पाखरू पडेल! तुझे हे नखऱ्याचे पंख उपटून टाकतील बरे का माझे मोहक मैने, ते चांडाळ! हे लाड, नखरे, मी म्हणून तुला चालू देतो बरे! तुझी कुण्या लांडग्याने दुर्दशा करू नये म्हणून तुला ह्या मेंढवाड्यात असे कोंडून ठेवावे लागते बरे कुलूप घालून, माझ्या लाडक्या कोकरा! पण आता दोन-चार दिवसांत मी तुला एकदम इतक्या दूर नि अशा एका वनात घेऊन जातों की, तिथे इकडच्या पोलिसांचा बाप देखील आपला छडा लावू शकणार नाही! तो हरामी रफिअद्दिन तर पडलाच त्या काळ्या पाण्याच्या नरकात जन्मभर जन्मठेप! तो सारा खटला निकालात निघाला! आता आपला विसर पोलिसांनाही आपोआपच पडेल. त्यातही अशी जागा आता मला ह्या रम्य वनात सापडली आहे की, जिथे उघडपणे तुला मनमोकळे नांदता येईल! हे दरोड्यात कमावलेले रत्नांचे दोन हार, हे सोने नि ही तू माझी सोनी! बस्स् भोगच भोग! विलासच विलास! जन्माला पुरून उराल माझ्या तुम्ही सारे! आजवर कमाई, आता रमाई! मिळकतीचा भोग! प्यारी, हस ना! हस, हस!" तो तिला गुदगुल्या करू लागला.

त्या गुदगुल्या मालतीला अस्वलाच्या प्राणघेत्या गुदगुदल्यांसारख्या लागल्या. ती हसली कासावीस होऊन, पण त्या गुदगुल्यांनी किशनला मात्र खऱ्या गुदगुल्या झाल्या आणि तो हसला अत्यंत संतोषाने. गुलाम हुसेनच्या तोंडून पोलिसाचे नाव निघताच त्याला एकदम गुरुमंत्र मिळाल्यासारखें झाले. अंधारात हातचमक (हँड-बॅटरी) अचानक सापडावी तसे होऊन तिचे त्याच्या चित्तातील बटन दाबताच त्याला पुढच्या उपायाची वाट लखकन् दिसली.

बस्स्! परस्परे नि पावणे बारा! आताच्या आता पोलिस चौकीवर जाऊन गुप्तपणे ही बातमी सांगायची! अठरा वर्षांच्या आतील कुमारिका पळवणे हा गुलाम हुसेनचा एक नैर्बंधिक घोर अपराध, मालतीचा नव्हे! त्यात गुलाम हुसनेवर दरोड्यातील वॉरंटेही असणारच! खटल्यातला तो एक फरारी. तेव्हा तो आता फांशीवर झोके घेणार आणि मालती पुन्हा त्या तिच्या मथुरेतील आनंदाच्या झोपाळ्यावर! तशीच त्या गोड गोड ओव्यांचा लकेऱ्या घेत उल्हासाच्या आकाशात कोण्या सुंदर पाखरासारखी उडू पाहात पुन्हा झोके घेणार! अहो आनंद! तिची ती प्यारी "किशऽऽऽन!" ही लाडिक हाक त्याला पुन्हा ऐकू आली.

आनंदाच्या भरात ती बातमी पोलिसांना देण्यासाठी किशन लपतछपत चाहूल लागू न देता गडग्याच्या आड आड होते वाटेकडे जाण्यासाठी वळला, तोच त्याने अकस्मात् एक भयंकर किंकाळी फोडली. “अय्याअयाया!” असे तो विव्हळला.

‘भो! भो! गुर्र गुर्रर!’ करीत किशनच्या पोटरीचा गोळा दातात धरून एक विक्राळ कुत्रा तिला सारखा हिसडीत तोडू लागला.

तो त्या घरापायी पाळलेला गुलाम हुसेनचा शिकारी कुत्रा होता.

गडग्यापाशी आत कोठेसा फिरत असता काही चाहूल लागून तो अंधारात गडग्यावर चढला होता आणि किशन हालताच त्याची दृष्टि किशनवर आणि त्याच्या चोरट्या चालीवर पडून त्या विक्राळ कुत्र्याने एका झेपेसरशी किशनच्या पोटरीचा कडकडून चावा घेतला. अंधारात नकळत घेतलेल्या त्या असह्य चाव्यासरशी हेतु नसताही किशन इतक्या मोठ्याने किकाळला तरी तो कुत्रा पोटरी सोडीना. उलट अधिकच त्वेषाने ती सारखी तोडीत, गुरगुरत, झुंजत राहिला.

कोणी तरी गडग्यापाशीं अशी मोठी किंकाळी फोडलेली ऐकून तो कामातुर गुलाम हुसेनही चमकला. होय ना होय, ह्या आपल्या भांडकुदळ कुत्र्यानेच कोणा वाटसरूला अंधारात लोळवले असले पाहिजे, असे ध्यानात येताच, आपल्या त्या चोरट्या वसतीपाशी कोणाचाही गोंगाट होऊन तिकडे लोकांचे लक्ष वेधावे हे संकट त्याला नको असल्यामुळे ते प्रकरण झटपट सामोपचाराने विझवून टाकण्यासाठी कंदील तेवढा घेऊन आणि मालतीला “घरात जा” म्हणून सांगून गुलाम हुसेन धावत धावत गडग्यापाशी आला, तोवर किशनने गडग्यातला एक दगड काढून त्या विक्राळ कुत्र्याच्या डोक्यावर घातल्यामुळे पोटरी सोडून विव्हळत तो थोडा हटला, पण पुन्हा थोडी चाल करून भुंकत, गुरगुरत, किशनचा दुसरा चावा घेण्यासाठी झुंजत राहिला.

किशनच्या फाडलेल्या पोटरीतून रक्ताची धार वाहत होती, असह्य वेदना होते होत्या, हालण्याची सोयच उरली नव्हती. गुलाम हुसेन जवळ येताच किशनने बतावणी केली,

“मी त्या अंधारात दिवा पाहून रात्रीपुरता आसरा मागायला आलो तो तुमच्या ह्या पिसाट कुत्र्याने जीव घेतला! अयाई! अयाई!”

“कण्हू नकोस, ओरडतोस कशाला असा?” गुलाम हुसेन प्रकरण विझवावे म्हणून समजून घालू लागला, “तो पिसाट कुत्रा जरी माझा असा पाळलेला नाही तरी मी तुझा घाव बांधतो. नीज इथे ह्या घरापाशीं रात्रभर नि पहाटेच मार्गाला लाग, नाही तर इस्पितळात जा.” गुलाम हुसेनला हे प्रकरण अधिक बोभाटा न होता मिटवायची त्यातल्या त्यात हीच तोड सुचली, बरी वाटली.

मोठ्या प्रयासाने गुलाम हुसेनने किशनला उचलून गडगा ओलांडून त्या एका मिणमिणत्या कंदिलाचा काय तो उजेड पुसट पुसट पडलेल्या त्या अंगणात आणून ठेवले. पाण्याने त्याचा घाव धुऊन पुसून, त्याच्या नेहमीच्या रामबाण औषधी त्या घावात भरून रक्त थांबवले, पट्टी बांधली, किशनला त्या ओंडक्यावर लोडासारखे टेकवले आणि कंदिल वर त्या आंकड्याला टांगला.

कंदील खाली होता तोवर त्या औषधपाण्याच्या गडबडीत गुलाम हुसेनचे, कोणच्याही कपटाची शंका न आलेले लक्ष त्या पांथस्थाच्या पायाकडेच बहुतेक होते. त्यातही त्याने मागे किशनला मथुरेला जे पाहिले होते, ते योगानंदी संप्रदायाच्या गोसावी वेषात. आज किशनचा वेष कोणा दरिद्री भटक्यासारखा होता, त्यामुळे तर त्याची ओळख पटणे गुलाम हुसेनला कठीणच झालें होते. कंदील वर टांगल्यानंतर ओंडक्याशी टेकून, थकून गप्प बसलेल्या किशनला तोंडावरचे स्वच्छ प्रकाश पडला.

इतका वेळ घरात असली तरी खिडकीतून त्या पांथस्थाच्या साऱ्या हालचाली पाहात असलेल्या मालतीच्या मनात तो पांथस्थ कोण, ह्याविषयी दहादा एक शंका येऊन गेली होतीच. त्या कंदिलाच्या प्रकाशात किशनचे तोंड आता नीट न्याहाळता येताच मालतीची जी शंका होती तो पक्का निश्चय झाला. "किशन!" मालतीच्या ओठांतल्या ओठात एक हाकसुद्धा थरथरून गेली. त्याला मथुरेला पाहिल्यानंतर त्याचे काय झाले ते तिला काहीच माहीत नव्हते. आपल्या आईची पुढची बातमी ह्याला असलीच पाहिजे, हा विचार तिच्या मनात, त्याला नक्की ओळखताच पहिल्या झटक्यासरशी आला. पण परपुरुषाशी आणि त्यातही योगानंद-गुलाम हुसेनदि ज्या चांडाळचौकडीने तिला पळविले त्यांच्या त्या अधम अपराधाची माहिती ज्याला असण्याचा उत्कट संभव, अशा ह्या तिच्या घरोब्याच्या पुरुषाशी उघड बोलताच त्यापायी तिचाच नव्हे तर त्या किशनचाही घातपात करायला हा हिंस्त्र गुलाम हुसेन सोडणार नाही, अशी भीतीही मालतीला तत्काळ पडली. ती घाबरली, बावरली. पण लगेच उत्सुकतेपायी उघड नसली तरी किशनची एकान्त गाठ हा राक्षस गुलाम हुसेन निजला म्हणजे तरी घेईनच घेईन, मग काय वाटेल ते होवो, असा तिचा कृतनिश्चय बोलता बोलता झाला. ती डोळ्यातून टिपे गाळीत किशनकडे टकमक पाहात राहिली. तोच, त्या खिडकीकडे रागाने ताठरलेल्या गुलाम हुसेनची दृष्टि पडताच मालती झटकन् मागे सरकली आणि स्वतःलाच विचारू लागली,

"अग बाई, हा राक्षस रागावला का अकस्मात्? काही शंका आली की काय मेल्याला?" घरात खिडकीपासून मागे हटून ती दाराच्या फटीतून डोकावण्यासाठी दाराशी जाते, तोच बाहेर गुलाम हुसेन कोणावर तरी खेकसल्याचे, त्या विक्राळ कुत्र्याहूनही अधिक पिसाट क्रूरपणाने गुरगुरल्याचे तिला ऐकू आले!

कारण त्या कंदिलाचा प्रकाश, थकव्याने डोळे मिटून ओंडक्यावर टेकलेल्या किशनच्या निश्चल तोंडावर पडताच मालतीला जी शंका आली तीच गुलाम हुसेनला आली होती. त्यातही खिडकीतून अत्यंत लोभाळू दृष्टिने किशनकडे टकमक बघणाऱ्या मालतीला त्याने पाहताच त्याची शंका शतपट बळावली. तोच पक्का निर्णय करण्याची युक्ति पण त्याला लगोलग सुचली. बेसावध, गुंगीत पडलेल्या त्या घायाळाला गुलाम हुसेनने हेतुतःच त्या संशयित नांवाने हाक मारली,

"किशन, किशन!"

किशन दचकून जागला आणि आपल्या नावाची ओळख पटवायची नाही, हें ध्यानात येण्याच्या आधीच उत्तरला,

“ओ! ओ!”

“अरे हरामखोरा! पकडला कीं नाही तुला? छद्मी वेषाने नाव चोरून इथे टेहाळणी करायला आला होतास काय? किशन, बोल,!” मूठ वळवून क्रोधाने कापणाऱ्या घोगऱ्या आवाजात गुलाम हुसेन फणफणला,- “बोल, तू मालतीच्या माग काढीत इथे आलास की नाही? तू नि तो पाजी हसनभाई तुम्हीच विश्वासघातकी सरकारी साक्षीदार नाही का कोर्टातले? माझ्या गळ्याला तात देऊ पाहता काय? काफर! बेइमान!”

“तुझा बाप बेइमान! तुझ्याशी इमान?” किशन त्वेषासरशी उठून उभा राहिला. “सुरा भोसकून तुझे पोटार उपसलेच समज मी! माझा सुरा! सुरा!” ओंडक्यावर गुलाम हुसेनने पाहिले. सुरा नव्हता तेथे. तो घरात खाटेवर उशागती आहे, असे त्याला आठवले.

आत दाराशी उभ्या असलेल्या मालतीलाही तेच तात्काळ आठवले. तिने झटपट खाटेवरचा सुरा काढून, अंगावरच्या कपड्यात तो आपल्या कंबरेला लपवून ती एका कोपऱ्यात जाऊन उभी राहिली. ह्याचे सुऱ्याने भोसकून मालतीच्या समक्ष गुलाम हुसेनने त्याच्या एका बिघडलेल्या साथीदाराला मथुरेहून पळून येताना एका रानात डोळ्याचे पाते लवते न लवते तो भोसकून ठार मारले होते, तसाच आता किशन मरणार, म्हणून ती भयाने थरकापत होती, रागाने बेछूट होते होती.

तोच सुरा घेण्यासाठी गुलाम हुसेन दार ताडदिशी उघडून आत घुसला. मागोमाग किशनही त्वेषाने आत घुसून गुलाम हुसेनच्या कंबरेला मगरमिठी मारीत भयंकर हिसकाहिसकीत त्याच्यासह खाटेवर पडला. शिर कापून ठाकलेले कबंधही रणत्वेषाने थोडा वेळ तरी रणांत झुंजतच चालते. किशनला त्याच्या दुखावेल्या पायाचे भानसुद्धा नव्हते.

मालतीलाही त्या जिवावरच्या संकटात विचार असा उरलाच नव्हता, भान असे नव्हतेच.

जी ऊर्मी उठे ती उठे. किशनच्या नरड्याला गुलाम आणि गुलामच्या नरड्याला किशन पकडीत, सोडवीत ते दोघेही खाटेवर पडताच,

“आण, आण!” गुलाम हुसेन ओरडला, “मालती, तो सुरा आण.” त्यासरशी मालती सुरा उपसून धावलीही. पण एवढ्याशा सुऱ्याने धिप्पाड माणूस मरेल तरी कसे, अशा त्या बेभान अवस्थेतही एका बळकट शंकेने ती थांबली.

“कसे म्हणजे काय? भ्याड पोरी, तुझ्या समक्ष त्या साथीदाराच पोतडे ह्याचे सुऱ्याने गुलाम हुसेनने एका भोसकीसरशीं बाहेर उपसल नाही का?” तिथेच मन तिला फटकारते झाले.

“आण, सुरा आण!” गुलाम हुसेन एक हात लगदालगदीतून पडल्या पडल्या सोडवीत आणि उंच करीत, मालतीवर पुन्हा ओरडला.

“घे, हा घे सुरा!” असे दात-ओठ खाऊन किचाळत ती पिसाळलेली मालती सुरा उपसून धावली आणि तिने किशनला दाबून धरणाऱ्या पण किशनच्या पकडीत खाटेच्या कोपऱ्यावर उताणा होऊन पडलेल्या गुलाम हुसेनच्या अघळपघळ पोटात तो लांब तीक्ष्ण सुरा भसकन बळाने खुपसला.

किती सहज तो आंत गेला. त्या बेभान त्वेषातही मालतीला हसू आले.

“उगीच मी इतक्या बळानें खुपसला तो खुळ्यासारखा! अर्ध्या बळानेही तो आरपार जाता!”

“आँ! आँ!” अशा दोन-तीन भयंकर डुरकाळ्या फोडीत गुलाम हुसेनचा धिप्पाड देह धप्पदिशीं खाली पडला, तो पुन्हा काही उठला नाही. आपल्याचे धो धो उसळणाऱ्या रक्ताच्या डबक्यात त्याचा प्राण बुडून गेला.

“मेला! ठार मेला!” किशनने टाळी पिटली.

“किशन, पण आता पुढे काय?” किशनच्या डोळ्यांकडे टक लावून मालती थरथर कापत उद्गारली.

“पुढे? मालती, पुढे...”

बेभान, रक्तपाताची नशा चढलेली, विचार खुंटलेली ती दोघे क्षणभर नुसती एकमेकांकडे दृष्टिला दृष्टि भिडवून परस्परांकडे पाहात राहिली. चहूं बाजूंना रात्रीचा काळोखच काळोख दाटला होता.

***

आठ

“पुढे काय” ह्या मालतीच्या प्रश्नाचे काहीही उत्तरे क्षणभर न सुचल्यामुळे किंवा तसे पाहता पाच-पन्नास उत्तरे एकदम सुचून त्यांच्या उलटसुलट आणि एकमेकांना खोडून काढणाऱ्या गोंधळात शेवटचे नक्की असे कोणचेच मत चित्तात टिकत नसल्यामुळे किशनही नुसता “पुढेऽऽ पुढे” असे पुटपुटत मालतीच्या मुद्रेकडे शून्यपणाने पाहात उभा राहिलेला; ते आक्राळ-विक्राळ प्रेत त्यांच्या पायाशी मधूनच एखादा आचका देत पडलेले; त्याच्या घावातून रक्ताची उसळी थांबून थांबून एकदम उसळत असलेली! असे दहा-पाच क्षण जातात न जातात तोच तो कुत्रा मोठमोठ्याने भोकाड पसरून दूर गडग्यावर कोकलत आहे, नंतर मोठमोठ्याने भुंकून भुंकून आकान्त मांडीत आहे, असे किशनला ऐकू आले.

वास्तविक त्यांची ती जीव घेती-देती झुंज चालली, तेव्हांपासूनच तो कुत्रा जवळ यायला भीत असला तरी पळून जायचे नाकारून गडग्यावरून सारखा इकडे तिकडे धावत, थांबत, तसाच मोठमोठ्याने मधूनच केकाटत होता; मधूनच बळाबळाने भुंकत होता; कोणाचे तरी आजूबाजूने सहाय्य मागावे, लोकांना जमवावे तशा ‘धावा हो!’ ‘धावा हो!’ अशा जणू आर्त हाका मारीत होता. पण इतका वेळ ह्या जिवावरच्या प्रसंगात त्याचा तो गोंगाट किशन-मालतीला ऐकूच आला नव्हता. त्याच्यावाचून त्यांना बाहेरचे जग असे आठवलेच नव्हते. पण आता कुत्र्याच्या गोंगाटाकडे लक्ष जाताच किशन जो तिकडे दचकून वळून पाहतो, तो त्याला बाहेरचे सारे जग जसे आपणा दोघांकडे, आपल्या दोघांच्या रक्ताने माखलेल्या हातांपायांकपड्यांकडे, आपल्या दोघांच्या मध्ये ठार मारून टाकलेल्या गुलाम हुसेनच्या विक्राळ धुडातून मध्येच उडणाऱ्या रक्ताच्या चिळकांड्यांकडे टवकारून पाहात आहे - ‘हेच ते हत्यारी! धरा! पकडा!!’ असा बोटे दाखवून दाखवून गोंगाट करीत आहे, असा अचानक भास झाला. त्याच्या मनाची गुंगी खाडकन् उतरली. आता इथे आपण एक क्षणभर रेंगाळलो, तर त्या दुष्टाच्या सुऱ्यात वाचलेला जीव फाशीच्या तावडीत अडकेल... आणि ही मालतीसुद्धा फासावर!! कल्पनादेखील भयंकर!!

त्या धक्क्यासरशी त्याने एक मोठा धोंडा उचलून प्रथम कुत्र्याला मारला, तोच त्याला त्या बाजूने एका उंचवट्यावरून शेजारच्या शेतातील दोन-तीन लोक कंदील घेऊन आपल्याकडेच पाहात आणि बोलत आहेतसे दिसले.

त्या कुत्र्याच्या केकाटण्याने आणि सारख्या भुंकण्याने ते त्यांच्या शेतातल्या माळ्यावर केव्हापासूनच दचकून उभे राहिले होते. नंतर त्या झोपडीपाशी गुलाम हुसेनची आणि किशनची झालेली झोंबाझोंबी, शिवीगाळ, आरडाओरड आणि शेवटी गुलाम हुसेन पोट भोकसले जाताच जेव्हा कोसळला, तेव्हा त्याने फोडलेल्या डुरकाळ्या, ह्यांच्या अस्पष्ट देखाव्यावरून आणि गोंगाटावरून तेथे काही तरी भयंकर प्रकार घडत आहे, हे त्या शेतकऱ्यांनी ताडलेच होते. पण भयाने त्यांची जिज्ञासा आवरली होती. आपण तेथे गेलो तर स्वतःच एखाद्या नसत्या बालंटात सापडू, असा पोक्त विचार त्यांनी केला होता आणि तेथूनच काय दिसेल आणि ऐकू येईल त्याची चर्चा करीत

आणि मधून मधून आढळणाऱ्या त्या तडफदार स्त्रीविषयीच ही काही तरी सुंदोपसुंदी चालली असावी असा तर्क लढवीत, ती माणसे तेथे तशीच केव्हाची उभी होती.

त्यांना पाहताच 'आपल्या हत्येला वाचा फुटली!' अशी धडकी किशनला भरली. त्याने म्हणण्यापेक्षा, त्याला न विचारता त्याच्या हातानेच कंदील फट्‌दिशी मालवला, अंधारात मालतीचा हात धरला आणि म्हणाला,

"प्रथम इथून निसटून जाऊ चल. आपल्याला पकडायला लोक जमत आहेत. बघ ते. गराडा पडतो आहे; चल."

"अरे, पण कुठे?"

"वाट फुटेल तिकडे. वाटेल तिथे, पण ह्या स्थळापासून दूर, दूर, दूर... शक्य तितके दूर. चल लवकर."

"पण तुला कसे चालवेल? तुझा पाय पांगुळलेला!"

"एक पाय पांगुळलेला, पण दुसरा आहे ना चालता? त्यावर चालवेल तसे चालेन. चल आधी."

"आणि हे प्रेत?..."

"मरू दे, सडू दे त्या दुष्टाला! नाही तर त्याच्या त्या कुत्र्यालाच खाऊ दे ते! निसट, चल आधी इथून. पण थांब, सुरा दे इकडे. त्याची ओळखसुद्धा कुणाला न पटली पाहिजे!"

असे म्हणून सुऱ्याने प्रेताच्या तोंडावर अंधारातच कचाकच वार करून किशनने ते विद्रूप केले. "हं, आता आण कुलूप कुठे आहे ते."

मालतीने अंधारातच चाचपडते खोलीतून कुलूप घेतले. बाहेर पडताना तिचा पाय डब्किनी त्या रक्ताच्या डबक्यात पडला. तिलाही धडकी भरल्यासारखे झाले. तिने तो सुरा आपल्या पोटगुळी खुपसून ठेवला. तशीच ती पुढे जाऊन, ते मोडकेतोडके दार कसेबसे लावून त्याला कुलूप घालू लागली. हात कापू लागला, पण एकदाचे कुलूप लागले आणि मनुष्याला जी एक उपजतशीच सवय लागलेली असते, तीप्रमाणे तिने कुलूप लागताच किल्ली कंबरेला खोवली. तो रक्तबंबाळ सुरा मघा कंबरेला खोवला होता तो तेथेच नीट आहे की नाही ते पुन्हा चाचपून पाहिले. त्या सुऱ्याच्या जवळिकेच्या जाणिवेसरशी तिला पुन्हा पुरते अवसान आणि बळ चढले. "हं चल, कापू नकोस किशन, ह्या माझ्या हातावर टाक भार. हं असा, नि चल त्याचा आधार घेऊन चालवेल तितके. ही वाट माझ्या पायवळणी पडलेली आहे अगदी. थांब, दगड घेऊ दे दोन-चार हाती. बघ त्या पिसाळ कुत्र्याला आगे-मागे. चावा घेईल ते मेल लपत छपत मागे येऊन!"

काळोखातून तो गडगा ओलांडून त्या चबुतऱ्याला वळसा घालून, ती दोघे कशीबशी त्या वाटेला लागली.

"आता कुठे वळतेस! नगराकडे?"

"छट्, वेड्या! ही सगळी रक्ताळलेली आपण, प्रथम गंगेवर जाऊन धुऊन, न्हाऊन स्वच्छ नि सभ्य बनू; चल आधी."

“खरेच. तिथल्या देवळातच प्रथम चल. रात्र तिथेच काढू. माझे बिऱ्हाडही तिथे आहे. तिथून तर मघा इकडे आलो! प्रथम तिथे थोडे झोपू ये ही रात्र. पहाटे स्नानबिन नि दैवी आणखी काय असेल ते! अयायायी! पायाच्या कळा सोसत नाहीत ग आता. देऊळच गाठू ये आधी.”

देवळात येताच एकट्या किशननेच नव्हे तर इतक्या वेळच्या उत्तेजनाने मन आणि तनु अगदी दुबळत आलेल्या मालतीनेही भुईवरचे सपशेल अंग टाकले. तिला दुरून किशनने पडल्यापडल्याचे आश्वासिले, “तू स्वस्थ नीज. तो सुरा इकडे दे, मी पहारा देतो. आता दुःख सारे विसर अं काही वेळ.”

“दुःख? छट्! सांगू का ह्या वेळेला काय वाटते आहे? आनंद! अवसान! कसे सांगू? माझ्या घरी एकदा एक नाग निघाला. दाराच्या वडापाशी तो कुठे तरी असे. आमची आई देवलसी. त्याला दूध ठेवी वाटीत. ते पिताना कितीदा तरी आम्ही त्याला दुरून बघाव. आई म्हणे, ‘साप झाला तरी जीव ना? त्याला क्रिया असते. तो दूधदेत्याला कधी डसत नाही.’ पण त्याच काय बिघडल काय की, तो त्या दिवशी पटकन् घरात निघाला नि माझ्याशी खेळत असलेल्या माझ्या एका लहान मावसबहिणीला डसून मला डसायला धावला. आम्ही सगळी मुले जीव घेऊन पळालो. ‘साप साप!’ एकच आरोळी ठोकली. त्यासरशी आमच्या गड्याने येऊन एका टोल्यासरशी त्याच टाळक शेकल. तो वळवळतच होता, पण तोंड वासून पडलेला आहे असे पाहून एक मोठी काठी मी दुरूनच त्याच्यावर अशा बळाने मारली की, त्याचा मधला माग पिचून निघाला नि माझा तसा संताप बाहेर पडताच मला सूडाचा जो आनंद तो पहिल्यानेच किती गोड असतो ते कळले. तसा उन्मत्त आनंद मला सध्या चढला आहे. माझे हे सारे अवसान त्या सूडाच्या आनंदाचं- ह्या सूडाच्या सुऱ्याच. तो जवळ आहे तोवर आज माझ्या जिवात जीव आहे. असा उशाशीच राहू दे तो माझ्या. मला झोप... किशन, अरे पण माझी आई? मला प्रथम सांग की, माझी आई कुठे आहे? काही माहीत आहे का तुला? मी उठून बसते अं; सांग.” ती कशीबशी, ग्लानि येत असलेला देह सावरून उठून बसली, पण तिचे ते बोलणे डोळ्यावर झोप आलेल्या माणसासारखे गुंगलेले, तुटक होते.

मालतीला गुलाम हुसेनच्या घरी अटक झाल्यानंतर नायडूबाईंची आणि तिच्या आईची त्या छद्मी योगानंदाने कशी फसवणूक केली आणि त्यावर विश्वासून त्या दोघीजणी मालतीला शोधायला नागपूरला कशा गेल्या आणि नंतर त्यांचा पत्ता त्यालासुद्धा कसा नव्हता, ते किशनने थोडक्यात सांगितले. पण ते संपत होते, तोच मालतीच्या संज्ञ मनाचे सारे व्यापार ग्लानीमुळे जवळ जवळ बंद पडते आले होते. ती काही ऐकत न ऐकत केव्हा खाली लवंडली आणि निजली ते तिला कळले नाही. किशनही भुईवरचे पडला. त्याच्या मनात त्या कृत्याच्या भयंकर भावी परिणामांचे विचार नुसते कोलाहल माजवीत होते. मधून गुंगी, मधून तो कोलाहल, मधून ती पायाची कळ. तो तसाच तळमळत पडून राहिला. दोनदा त्याला बुटांची टापटाप ऐकू येऊन तो भीतीच्या धडकीने उठला, बाहेर जाऊन पाहून कोणी नाही असे कळून पुन्हा आत येऊन पडला. पोलिसांच्या आकृति त्याचे डोळे मिटले की त्याच्यापुढे उभ्या राहात, त्याला धरीत आहेतसे वाटे.

तेव्हा तो पुन्हा डोळे उघडी, धीर धरी आणि पहाटे निसटून जाण्यासाठी काय करायचे, ह्याचे बेत गुंगीगुंगीतच करू लागे.

मालतीचे संज्ञ मन जरी किल्ली संपलेल्या घड्याळासारखे साफ बंद पडलेले होते, तरी त्या ग्लानीच्या गाढ झोपेतही तिच्या असेज्ञ मनाच्या थरातून किशनच्या चित्तांतील कोलाहलासारखाच धृति-भीति-माया-ममता-त्वेष-द्वेषांच्या नाना स्मृतींचा आणि क्लृप्तींचा एकच कोलाहल माजून राहिलेला असला पाहिजे. ती मध्येच दचकत, हसत, घोरत होती. स्वप्ने पडता पडता तिला झोपेत असे भासले की, ती आईसंगती त्या मथुरेच्या झोपाळ्यावर प्रेमळ ओव्या म्हणत एका दोरीने उंच उंच झोके घेत आहे, तोच झोपाळा उंचावून एकदम तिच्याखालून निसटला आणि त्या दोरीच्या विळख्यात तिची मान करकच्च आवळून ती लांबकळली. श्वास गुदमरून, गळफास बसून, तिची जीभ बाहेर पडली आणि तशा भीषण अवस्थेतील तिला तीच पाहात आहे. त्या धक्क्यासरशी 'मेले मेले! धाव! आई, गळफास बसला मला!' असे स्पष्टपणे किकाळून मालती ताडकन् उठली, थर् थर् थर् कापू लागली, धापा टाकीत झोपेत बदललेला श्वास बळाबळाने घेऊ- सोडू लागली.

किशनही ताडकन् उठला. ती घाबरून उभी होती, तेथे चाचपून तिच्या खांद्यावर एक हात ठेवून, दुसऱ्या हाताने पाठ थोपटीत धीर देऊ लागला. तोच मालतीने थरकापत्या दोन्ही हातांनी त्याच्या गळ्याला मिठी मारली. "किशन, मला उभे राहवत नाही. मला कसलीशी धडकी भरली आहे. मला पोटाशी घट्ट घेऊन शेजारी नीज. लाजू नकोस. मी होऊन ज्याला आपल्या शेजारी निजायला घेत आहे, असा तूच पहिला पुरुष आहेस!"

तिला अगदी जवळ घेऊन किशन निजताच ती पुन्हा इतक्या लगोलग गाढ झोपी गेली की, जशी ती मध्यंतरी पुरती जागी झालीच नव्हती. झोपेतच चालण्या-बोलण्याचा जो एक रोग असतो त्याचा जसा काही तिला एक झटका आला होता.

मग बेलावरच्या झाडांवरून त्याला कोकिळांची अगदी पहाटेची ललकारी जेव्हा ऐकू आली, तेव्हा किशनने मालतीला मोठ्या कष्टाने हालवून पुरती जागी केले.

"मालती, मी पुढच्या बेताची सारी आखणी नक्की केली आहे. धीर मात्र धरला पाहिजेस. धैर्य नाही ना चळू देणार?"

"वेड्या, मी आता काही स्वप्नांत का आहे? स्वप्नातल्या गळफासाने जे भितात त्यांच्यातील कित्येक खऱ्या गळफासाला मात्र मुळीच भीत नाहीत!"

"पण गळफासाची गोष्ट काढतेस कशाला? थोडक्यात ऐक. तू आता गंगेत जाऊन हा तुझा मुस्लिम वेष नि रक्ताने डागळलेले कपडे गंगेत बुडवून टाक, स्नान कर नि ह्या माझ्या गाठोड्यातील हे धोतर एखाद्या भिकारणीसारखे नेसून हा कटोरा घेऊन ह्या आडवाटेने अशी निसट नि खेड्यापाड्यातून मार्ग काढीत घरी आईला जाऊन भेट. नि..."

"छट्! थांब. माझ्या आईच नाव आता पूर्णपणे विसर. अरे, ती मला पाहताच माझे तोंड कुरवाळायला जर पुन्हा धावली तर तिचेही हात ह्या माझ्या तोंडावरील रक्ताच्या डागाने

रक्ताळतील! तिच्या अंगावर माझ्या हाताच्या कर्माचे शितोडे उडून त्या साध्वीची निर्मलताही डागळेल. मी माझ्या आईच्या अंगणातले एक निर्मळ फूल होते, तेव्हा मला मालती म्हणत! पण आती मी ते फूल नाही. आता मी झाले आहे समाजाच्या वाटेतील एक काटा! वाटेल तिथे धुळीत पडेल, पण पुन्हा आईच्या अंगणात पडून तिच्या पायात तरी खसकन् मोडणार नाही. आता माझे नाव देखील मी बदलणार. फूल नाही, काटा! मालती नाही, कंटकी! आता पुन्हा आठवण ठेव अं, मालती म्हणायचे नाही, कंटकी म्हणायचे मला!"

"चालेल; पण आता तू मला एकटा सोडून जा. मला चालवत नाही. मीही मागून कसाबसा निसटतोच. पकडलाच गेलो तरी एकटाच ह्या हत्येविषयी सगळे माझ्यावर घेईन. निसटलो तर तुला भेटेन. माझंही नाव बदलणे भाग. ध्यानात धर, माझे नाव कंटक! म्हणजे मागच्या खटल्याचे धागेदोरे माझ्या-तुझ्या, तुझ्या आईच्या भोवती पुन्हा सहसा गुरफटून जाणार नाहीत. ज्या अधमाचे डोके ठेचून पारिपत्य केले त्याचंही नाव सांगणे नाही. 'माहीत नाही' म्हणून सांगायच. आता एकत्र हिंडलो तर दोघेही फसू. म्हणून तू तरी निसट. मालती, तुझ्यापासून दूर होताना पाण्याबाहेर फेकलेल्या माशासारखा माझा जीव तडफडतो, पण तुझ्या केसाला धक्का न लागला तर पुन्हा तळ्यात पडलेल्या माशासारखा तो संतोषेल. अं हं, सारी चर्चा बंद! बघ फटफटू लागले."

तीं इतके बोलत आहेत तोच पुन्हा काही गलका दुरून ऐकू आला. आपल्याला रात्री बुटांच्या टापांचा भास झाला, तो जसा खोटा ठरला तसाच हाही भासच ठरेल, अशा आशेने किशनने बाहेर डोकावले. तो काय! खरोखरीच काही लोक गलबला करीत देवळाच्या दिशेने येताना वाटेतच थबकलेसे अंधुक अंधुक दिसले.

नीट न्याहाळले तो एका जवळच्या चबुतऱ्यावर दोघे जण उभे दिसले आणि ते... शंकाच नको! सवेष पोलिस!!

अपेक्षित असले, तरी भयंकर संकट नक्की कोसळताच मनाला बसायचा तो बळकट धक्का बसल्यावाचून राहात नाही. किशनला तर संकट टळेलही अशी थोडीबहुत आशाच होती. तेव्हा ते भयंकर संकट अगदी टळायच्या बेतातच अगदी पक्केपणी असे गळ्याशी भिडलेले दिसताच त्याला एकदम धडकी भरावी, हे स्वाभाविकच होते. पण त्याने सारे धैर्य लगोलग एकवटले. तो सट्कन आत वळला आणि मालतीला दबलेल्या स्वरात म्हणाला, "ते आले! आता मी जे त्यांना पुढे होऊन सांगेन, तेच काय ते तूही सांग, एक चकार शब्द अधिकउणा केव्हाही, कुठेही, पुढेमागे सुद्धा बोलू नकोस. शेकडो अट्टल हत्यारी चोर-दरोडेखोरांच्या टोळक्यात कारागृहामध्ये राहून मी आता ह्या प्रकारच्या निर्बंधातील छक्केपंजे पुरते शिकून चुकलो आहे. अशा प्रसंगी सारंच नाकारणे सर्वस्वी अशक्य. त्या शेतकऱ्यांनीच रातोरात ही बातमी पोलिसांना दिली असली पाहिजे. रक्ताची पावले उमटलेली, कपडे नि हात लडबडलेले!"

तोच...

“कौन है अंदर? चलो बाहेर आव!!” अंतरावरूनच पोलिसांची दटावती आज्ञा सुटली.

किशन खाड्दिशी बाहेर आला, पुढे झाला. त्यासरशी ‘पकडो पकडो!’ असे ओरडत दोघे-तिघे शिपाई चालून आले आणि त्यांनी किशनला तेथल्या तेथेच हातकडी ठोकली.

“हातकडी कशाला? इतके बळकट करकचून कशाला धरता मला! तुम्ही न येतेत तरी मी होऊन पोलिसात बातमी देण्यासाठी तिकडे येणारच होतो.”

“असे सरळ वागाल तर त्यात तुमचाच अनावश्यक जाचे टळेल.” पोलिस अधिकारी समजुतीची गोष्ट सांगण्याच्या शांत भाषेत म्हणाला, “सांगा, त्या पलीकडच्या झोपडीतल्या माणसाची तशी भयंकर हत्या तुम्ही का केलीत? तुमचे नाव? हां, हीच ती स्त्री. पकडा त्या स्त्रीलाही.”

“थांबा, त्या माणसाची हत्या मी केली, त्या स्त्रीने नाही. आणि ती अशासाठी की, तो माणूसच नव्हता, तर होता एक नृशंस राक्षस! माझे नाव कंटक, ही माझी बहीण कंटकी. आमच्या लहानपणी उज्जयिनीकडे एका मोठ्या जत्रेत भीक मागत फिरणारी आमची आई वाख्याने वारली. त्यापूर्वीची आमची काही एक माहिती आम्हांला ठाऊक नाही. पुढची माहिती ही की, आम्ही दोघे भीक मागत नि यात्रायात्रांतून फिरत जसेचे तसेच आजवर भटकत आलो. काही दिवसांपूर्वी माझी ही बहीण भीक मागत असता, एकाकी गाठून त्या मुसलमानी गुंडाने बळाने ओढून आपल्या घरात घातली, कोंडून ठेवली. माग काढीत मी काल त्याच्या घरापुढे जाऊन थडकताच नि त्याला ‘बहीण सोडून दे’ म्हणून दटावताच तो सुरा उपसून माझ्यावर तुटून पडला. झटापटीत तोच सुरा हिसकून मी त्याचा मुडदा पाडला, माझी बहीण सोडवली. अत्यंत थकव्याने इथेच रात्र काढून आत्ताच उठलो नि पोलिसात आपण होऊन आम्ही सगळी बातमी देणार होतो तो तुम्हीच आलात.”

मालतीला विचारता प्रसंगावधान राखून धीटपणे किशनच्या वरील बयानाला तंतोतंत जुळेल तेच सांगितले. त्या मुसलमानी गुंडाचे नाव-गाव, पूर्ववृत्त काहीच आपणाला माहीत नाही, असे तिला त्याविषयी पोलिसांनी खोदखोदून विचारता तिने ठासून उत्तरे दिले.

अंगझडतीत तिची रक्ताळलेली वस्त्रे, हात, तोंड, कटीला खोवलेली ती त्या पडक्या घराची किल्ली आणि तो रक्ताळ सुरा मालतीच्या अंगावर सापडला. ते ते टिपून त्या दोघांनाही पकडून ते चालू लागले. त्यांच्याबरोबर ते शेतकरीही परतले. आपणावरचे काही आळ येऊ नये म्हणून त्यांनीच त्या पडक्या घराकडे चाललेल्या काही तरी भयंकर प्रकाराची बातमी जी पोलिसांना रातोरात पोचविली होती तिचा, ओळखदेखप्रभृती सारा शक्य तो पुरावा त्यांनी पोलिसात नोंदवल्यानंतर त्यांना घरोघर परत धाडण्यात आले. ‘अपराध माझा! माझ्या बहिणीला सोडून द्या, परत धाडा!’ अशी विनंती किशनने करताच त्याला दटावण्यात आले, “दर्शनी पुरावा तुम्हा दोघांविरूद्ध. आम्हाला तुम्हा दोघांनाही अटक करणे भाग. अपराध कुणाचा ते अंती न्यायाधीश ठरवतात; ना आम्ही, ना तू.”

किशन आणि मालती ह्या दोघांवरही खटला भरला गेला. अपराधी लगोलग सापडले. त्या हत्येपुरता पुरावा जय्यत. अपराधाचे धागेदोरे कोठे गुंतलेले नव्हते. त्या ठार केलेल्या माणसाचे

पूर्ववृत्त सर्वस्वी अज्ञात. सुऱ्याच्या घावांनी छिन्नविच्छिन्न झालेल्या त्याच्या मुद्रेमुळे त्याची ओळखही दुर्घट आणि त्या नादात पडण्याचे त्या खटल्यापुरते काहीच कारण आडवेही आलेले नव्हते. ह्या सर्व परिस्थितीमुळे कोणत्याही खोलात फारसे न जाता त्या हत्येपुरताच आरोप ठेवून खटला चालवून पोलिस मोकळे झाले. बचाव असा त्यांच्या बयानापलीकडे आरोपींच्या वतीचाही नव्हताच.

शेवटच्या दिवशी न्यायाधीशाने निकाल दिला

"कोणत्या आरोपीने प्राणघातक वार केला हे चांगलेस सिद्ध झाले नाही. सिद्ध झाले ते हे की, दोघांनीही ह्या हत्येत जाणूनबुजून भाग घेतला. म्हणून आम्ही कंटक नि कंटकी ह्या दोघांही बहीणभावांना शिक्षा देतो. -जन्मठेप काळे पाणी!"

ते शब्द ऐकताच किशनच्या डोळ्यातून जरी टपटप टिपे गळली तरीही फाशी टळल्यामुळे त्याला काहीसे हलकेही वाटले. पण त्या शब्दात काहीतरी भयंकर अर्थ भरला आहे, असे अंधुकपणे वाटत असताही त्याच्या भीषणतेचे अगदी स्पष्ट चित्र तिच्या मनापुढे उमटले नसल्यामुळेच की काय, मालती 'जन्मठेप काळे पाणी' हे भयंकर शब्द ऐकतांनाही सुन्नपणे तशीच पाहात राहिली. पण न्यायाधीश उठू लागताना मात्र ती एकदम गहिवरल्यासारखी होऊन विनविती झाली,

"एक क्षणभर! थांबा ना! कृपावंत महाराज, मला इतके सांगा की, काळ्या पाण्यावर मी गेले तरी माझा हा भाऊ की -नव्हे, कंटक माझ्या संगतीच राहील ना? आपल्या बंदिपालाला तेवढी आज्ञा देऊन ठेवाल का की, काळ्या पाण्यावरही आम्हा दोघांना एकत्रच ठेवले जावे? दया व्हावी!"

"अजाण मुली, ते का न्यायाधीशांच्या हाती असते? काळ्या पाण्यावर पुरुषांची नि स्त्रियांची बंदिगृहं अगदी निरनिराळी असतात. त्यातही एकाच खटल्यातील सर्व अपराध्यांना तर पुरुष पुरुषांत वा स्त्री स्त्रियांतही सहसा एकत्र राहू देत नाहीत."

न्यायाधीशाने हे शब्द सहानुभूतीच्या स्वरात जरी उच्चारले तरी मघाच्या त्यांच्या शिक्षा सांगणाऱ्या भावनाशून्य शब्दांहूनही मालतीला ते दारूण वाटले. 'जन्मठेप काळे पाणी' ह्या शब्दातील भीषणतेपेक्षा किशन आता नित्याचा दुरावणार ह्या कल्पनेतील भीषणता तिच्या मनाला अत्यंत असह्य स्पष्टपणे पटकन् समजून घेता आल्यामुळे त्याच्या उच्चारासरशी मात्र ती अकस्मात् विव्हळली, स्फुंदून स्फुंदून, 'नका हो! नका हो!' असे अर्धवट वाक्यच घोळीत प्रार्थू लागली!

न्यायाधीशाच्या मनाला प्रथमपासूनच तिच्या अपराधाची निरपराध बाजू रिझवीत होती, पण निर्बंध म्हणजे निर्बंध! तो अनुल्लंघ्य! म्हणूनच ते खटला चालेतो ममतेचे म्हणून काही बोलले नव्हते. पण सबंध खटल्यात धीराने निश्चल असलेली आणि जन्मठेप काळ्या पाण्याची भयंकर शिक्षा ऐकतानाही न गहिवरलेली ती मुलगी तिच्या भावापासून ताटातुटणार हे ऐकताच अशी स्फुंदस्फुंदून रडू लागलेली पाहतांच, त्या न्यायाधीशाचेही मन पाझरले आणि काही तरी आश्वासन देऊन तिला समाधानण्यासाठी ते बोलून गेले,

"रडू नकोस मुली, काळ्या पाण्यावर जर तुमची वागणूक नीट राहिली, तर काही दहा-पाच वर्षांनी तुम्हाला लग्न करण्याची अनुज्ञा मिळायची सोय आहे. मग त्या बेटातल्या बेटात तरी तुम्ही सुखाने एकत्र राहू शकाल."

ते शब्द ऐकताच जशी काही काळ्या पाण्याची जन्मठेप रद्द होऊन ती सुटलीच असा, त्या संकटाच्या वादळात भांबावून गेलेल्या मालतीला मनातल्या मनात आनंद झाला. "महाराज, तुमच्या तोंडात साखर पडो! लग्न करता येईल ना मला हवे त्याच्याशी? बंदिगृहातील सारी शिस्त मी अक्षर न् अक्षर पाळीन बरे!"

तिच्या स्त्रीय निसर्गातील साऱ्या यौवनसुलभ भावना त्या कल्पनेसरशीच तृप्तल्यासारख्या झाल्या. किशनशी तिचे लग्न लागलेच असे तिला होऊन गेले. पण वेडे मालती, कल्पना म्हणजे वस्तुस्थिती नव्हे! इतक्या कठोर, निर्दय, निर्घृण अनुभवानंतरही हे तुला अजूनही कळले नाही ना की, मनुष्य हा स्वतःच्याच शिस्तीचे, पापपुण्याचे आणि कर्माकर्माचे फळ तेवढे काय ते भोगीत नसून ह्या प्रत्यक्ष जगात तरी समाजाच्या पापपुण्याचे आणि कर्माकर्माचेही फळ इच्छा नसली तरी भोगीत असतो; त्याला दुसऱ्याच्या दुष्कृत्यांचेही फळ प्लेगाच्या साथीत केवळ वातावरणीय संसर्गाने निरोगी स्वतःलाही प्लेग होतो, तसे भोगावे लागते?

तुझ्या दैवी तरी तेच लिहिले असल्याचे आतापर्यंत प्रत्ययाला आले नाही का? नाही तर ही तुझ्या देहाची, मनाची, भावनांची, असह्य आणि भयप्रद विटंबना आजवर ह्या कोमल वयात अशी सारखी होते राहावी, असे तू स्वतः कोणते पाप केले होतेस? कोणता अपराध केला होतास? कोणाचे काय बुडवले होतेस? आपल्या आईच्या ममतेच्या अंगणात उमललेली मालती, तू एक मालतीच्या कोवळ्या निर्मळ फुलाची अर्धफुल्ल कळी! जशी शरदऋतूतील चंद्रकोर, अशी आम्ही तुला प्रथम जेव्हा पाहिली तेव्हा जन्मकरंट्याला देखील तुझी तुझ्या अपराधावाचून ही दुर्दशा होईल असे भविष्य करवले नसते; दुष्टातील दुष्ट पिशाच्चालाही तुला असा शाप उगीच देववला नसता!

आणि ती असह्य दुर्दशा इतकी लाजिरवाणी की, सहानुभूतीपुढेसुद्धा उघडी करून सांगता येऊ नये. त्या आडदांड, ओंगळ आणि अभद्र नरपशूची अघोर वासना जेव्हा जेव्हा तुझ्या लज्जेचा बळी घेत गेली, तेव्हा झालेली ती तुझ्या कोवळ्या अंगाची आग आणि कोवळ्या भावनांची राख जी झाली, ती हे अनागस कुमारिके, तू स्वतः होऊन एखादा नीतिनियम, विनय वा शिस्त, भंगिलीस म्हणून का झाली? त्या अघोर दुर्दशेतून तुला आणि तुझ्यासारख्या अनेकांना सोडवायसाठी हा किशन पुढे आला, त्याने नीतिनियमांची, परोपकाराची आणि विनयाची चाड बाळगली आणि तुम्ही त्या राक्षसाच्या रक्ताचा पाट वाहावून ती त्या अत्याचाराची आग विझवली, म्हणून अत्याचारी ठरलात तुम्ही! समाजात काळोखी लागली तुम्हाला! काळ्या पाण्यावर पाठवणी होणार तुमची! समाजपीडक अत्याचारांचा नायनाट करणाराच केव्हा केव्हा समाजपीडक अत्याचारी म्हणून दंडिला जातो! नीतिनियमांची खरी शिस्त पाळणे हाच अपराध ठरून त्यासाठीच बेशिस्तीचे फळ भोगावे लागते!

हा दोष कोणाचा? हे असे का होते? किंवा हे असे होऊ नये ह्यासाठी काय उपाय योजावेत? हा प्रश्न येथे अगदी गैरलागू, अगदी अप्रस्तुत. हे असे होते खरे; आणि म्हणूनच मालती, तू स्वतः शिस्त पाळलीस की तिचे पारितोषिक तुला मिळालेच पाहिजे. पडलेले सुखस्वप्न खरे ठरलेच पाहिजे, असे ठाम मत गृहीत धरू नकोस!

परंतु सुखस्वप्ने खरी ठरतच नाहीत असेही काही नाही. तेव्हा सुखस्वप्नात हसते आहेस, रमली आहेस, तशी क्षणभर खुशाल हास, रम. पण त्याला एक स्वप्न समजून त्यात रम. जाग आल्यावर ते स्वप्नच सत्य ठरेल, असे ठाम समजू नकोस म्हणजे झाले.

***

नऊ

कलकत्त्याच्या बंदरावरील धक्क्यावरचे एक पटांगण अगदी रिकामे करण्यासाठी पोलिसांची धावपळ चालली. एकूण एक मनुष्य काढून देण्यात आले. ते हटवलेले लोक दूरवर जाऊन, मिळेल त्या जागी दाटून, काय होते ते पाहण्यासाठी कोणी कोणाच्या खांद्यावरून तर कोणी पुढच्यांना बळे रेटून बसवीत टाचेटाचेवर उभे राहिले.

इतक्यात जिकडून तिकडून गजबज झाली, “आया! चलान आया! चलान आया!”

‘चलान’ म्हणजे तुरुंगातुरुंगातून साचलेले काळ्या पाण्यावरचे दंडित एकत्र करून अंदमानला धाडण्यासाठी त्या धक्क्यावरील पटांगणात ज्या एक गटाने आणण्यात येतात तो गट.

साऱ्या अपराधात जे अत्यंत घातक आणि नृशंस अपराध असतात, तो ज्यांच्या हातचा मळ झालेला आहे अशा हत्यारी, आगलाव्या, विषदायी, दरोडेखोर इत्यादि अट्टल पाप्यांना बहुधा काळ्या पाण्याची शिक्षा देण्यात येते. त्यातही पुन्हा चाळणी होऊन जे इतिवृद्ध, अल्पवयी, इकडील बंदीशाळेत सद्वर्तनाने सुधारणीय ठरलेले ते वगळून उरलेले जे अट्टलातील अट्टल अपराधी, बहुधा त्यांनाच काळ्या पाण्यावर पाठविण्यात येते. राजकीय प्रकरण वगळले तर कोणत्याही सुव्यवस्थित समाजाला ज्यांचे अस्तित्व एखाद्या महामारीच्या साथीसारखेच भयप्रद वाटल्यावाचून राहणार नाही, असेच उग्र, हिसक, उच्छृंखल खल ह्या काळ्या पाण्यावर धाडण्यासाठी काढलेल्या ‘चलानां’त भरती केलेले असतात. अपवाद सोडले तर नियम असा हाच.

परंतु त्या पटांगणात ते ‘चलान’ येताना त्याची काहीच माहिती नसलेल्या कोण्या नवख्या मनुष्याने किंवा भाबड्या संताने जर त्याला पाहिले असते तर? तर त्या चलानाचा त्याला राग न येता उलट कीवच आल्यावाचून राहती ना. कारण ते बिचारे किती शिस्तीत, बहुतेकांच्या माना खाली, बहुतेकांच्या डोळ्यात टिपे - निदान मनात धडकी, तोंडे उतरलेली, शेजारच्या मनुष्याशी सुद्धा चकार शब्द न बोलता किंवा बोललाच कोणी तर एखाद्या मुलीसारखा लाजत, नुसता पुटपुटत, चाराचारांच्या रांगांनी, अगदी साधे भिकार गणवेष घातलेले, मोजून पाऊल टाकीत, शिपाई ‘थांब’ म्हणताच थांबत, ‘बैस’ म्हणताच बसत, ‘ऊठ’ म्हणताच उठत, शेसवाशे लोक पण थोडीसुद्धा गडबड न करता त्या पटांगणात चालत होते. इतक्या शांत, दांत, संयत जीवांचा तो कळप! शेसवाशे शेळ्यामेंढ्यांचा कळप कसाईखान्यात नेला जातानासुद्धा त्यांच्याहून अधिक गडबड करीत जाता, कमी केविलवाणी दिसता! अशा त्या बापड्या दीनदुबळ्यांना त्यांच्या आईबापांपासून, मुलालेकरांपासून, बायका -पोरांपासून त्यांची जन्माची ताटातूट करून काळ्या पाण्यावर त्या तेथल्या अनन्वित छळाला आणि कष्टाला बळी द्यायला असे नेले जावे ना? राजनिर्बंधाचा हा कोण निष्ठुरपणा, शिक्षेचा क्रूरपणा!

त्यांना त्या दुर्दशेतच काय ते नुसते पाहणाऱ्यांना किंवा पीडा दिसताच ती रोगहारक शस्त्रक्रियेची आहे, की मारक शस्त्राघाताची आहे हे न विवंचिता नुसते रडत बसणाऱ्या मळमळ्या दयेला त्या त्या वेळी गोगलगायीसारख्या केविलवाण्या भासणाऱ्या चलानातील दंडितांची मनापासून

कीवच आली असती; त्यांच्याविषयी हार्दिक सहानुभूती वाटली असती आणि राग जर कोणाचा आला असता तर त्या पोलिसांच्या निर्दय, नृशंस, दंडुकेबाजीचा. बंदुकीत संगिनी ठासून पोलिसांच्या तुकड्या काही पुढे मागे, काही दंडुके उपसून आजूबाजूला, अध्ये मध्ये रागीट मुद्रेने आणि कठोर स्वराने ओरडत, त्या बापड्या बंदिवानांच्या कळपाला, खाटीक पशूंच्या कळपाला नेतात तसे, ठोशीत पुढे हाकीत होत्या. कोणी थोडे मोठ्याने बोलला किंवा रेंगाळला की ठोसलाच त्याला दंडुक्याने पुढे. जरा का कोणी 'अरे तुरे' केली की पोलिसांचे तीन-चार दंडुके बसलेच टाळक्यात. तेथे न चौकशी, न साक्ष, न पुरावा. एकदम दंडुका! सारे न्यायनिर्बंध त्यात सामावलेले! वरवर पाहणाऱ्यांना खरे अत्याचारी आणि निर्दय वाटले असते ते पोलिस, खरे दीनदुबळे वाटले असते ते 'चलान'!

पण जर का त्या धारबंद संगिनी ठासलेल्या बंदुकांचा आणि दंडुक्यांचा गराडा एक घटकाभर काढून टाकून त्या चलानांवरील त्या माना खाली घातलेल्या आणि टिपे गाळणाऱ्या बापड्यां'ना मोकाट सोडले असते तर? डोळ्यातून दयेचे एकही टिपूस न गाळता त्या चलानांतील त्या बहुतेक बापड्यांनी अर्धा कलकत्ता जाळून राख केला असता, उरलेल्या अर्ध्या कलकत्त्याच्या माना मुरगाळून हाहाकार उडवला असता! सर्कशीच्या रिंगणात भाले आणि काटेरी चाबूक परजीत राहणारे नियंते जोवर समोर आणि आजूबाजूला असतात तोवर सिहव्याघ्रही जसे सुसभ्य नागरिकांप्रमाणे रिंगणात शिस्तीने चालतात, तसे ते 'चलान' शिस्तीत चालत होते, त्या संगिनी आणि ते दंडुके त्याला वेढून उभे होते म्हणून! अपवाद वजा जाता त्या चलानांतील बहुतेकांची ती सभ्यता, तो विनय, ती दीनता, ती टिपे नीतीची नव्हती, तर होती निव्वळ निरूपाय भीतीची! अशा उच्छृंखल खलांनाही समाजस्वास्थ्याला पोषक अशी शिस्त लावता येते, पण ती गीतेच्या पारायणाने नव्हे, तर संगिनीच्या पोलादानेच काय ती!

अगदी गोगलगाईसारखे बापडे दिसणाऱ्या ह्या चलानांतील दहा-पाच व्यक्तीची जरी थोडी ओळख तुम्हांला करून दिली, तरी मळमळ्या दयेला त्यांच्या ह्या दुर्दशेकडे नुसते पाहून जी कीव येते तीच शिसारी येईल आणि अशा हिंस्त्र मानवी श्वापदांतही जी माणुसकी असतेच असते तीच तेवढी जिवंत ठेवून त्या हिंस्त्रतेचे रोगाणु प्रतिरोधण्यासाठी, वरवर अत्याचारी वाटणाऱ्या ह्या धारबंद संगिनीचे टोचेच (इंजेक्शनेच) कशी अवश्य आहेत ते ध्यानी येईल. हे आलेच बघा ते चलान.

पोलिस संगिनीच्या आणि दंडुक्यांच्या चौफेर सापळ्यात कोंडलेली ती शेसव्वाशे हिंस्त्र श्वापदे चार-चारच्या रांगांनी त्या पटांगणात एक गटाने आली. तो अजस्त्र सबंध सापळाच्या सापळाच जसा काही पुढे ढकलीत पटांगणावर आणून उभा केला. त्या प्रत्येक काळ्या पाण्यावर जाणाऱ्या दंडिताच्या पायात ठोकलेल्या आणि वर कटीला चामड्याच्या वादीने बांधलेल्या दोन-दोन लोखंडी बेड्या खणखणत आहेत; प्रत्येकाच्या छातीवर एकेक जस्ती बिल्ला; त्याच्यावर शिक्षेची वर्षे नि नाव कोरलेले; प्रत्येकाच्या खाकोटीला त्याची अंथरूणाची वळकुटी; एका हातात त्याचे जस्ती

थालीपाट; त्या बोजाखाली तो त्यातल्या त्यात कच्चा, लेचापेचा, तो तो बंदिवान वाकत कण्हत, जो जो निर्ढावलेला धटिंगण तो तो ताठरपणे पण तरीही दंडुक्याला दबकत जळफळत, आपापल्या रांगेत उभा! त्यातील ह्या पहिल्याचे रांगेमध्ये असलेल्या काळ्या पाण्याच्या होतकरू नागरिकांची तेवढी ओळख वानगीपुरती करून घेऊ या.

हा पाहा पहिला बापडा. रामदयाल असे त्याचे नाव. त्याच्या छातीवरील बिल्ल्यात कोरलेले आणि शिक्षा चौदा वर्षे काळे पाणी. ह्याने आपल्या सख्ख्या भावाच्या मृत्यूनंतर त्याच्या एकुलत्या लहान मुलाला विष देववून मारायचा कट केला आणि त्यापायी तो मुलगा मेला. हेतु? त्या सख्ख्या पुतण्याचा काटा वाटेतून निघाला, म्हणजे त्याचा निर्वंश होऊन सारी समाईक मत्ता ह्याला एकट्याला गिळंकृत करता यावी!

हा जो दुसरा दंडित तो एका अर्थी सुधारणीय अपराधी म्हणता येईल. वयाने तो सतरा-अठरा वर्षांचा मुलगा. नाव गोपाळ, मुद्रा गयाळ. त्याच्या घरच्या बाप, चुलता, प्रभृति मोठ्या माणसांनी त्यांच्या शेताचा लिलाव केल्याच्या रागाने त्यांच्या गावातील सावकाराचा सूड उगवण्यासाठी त्याच्या घरावर दरोडा घातला. मोठ्या माणसांबरोबर हा मुलगाही गेला. सावकाराला खाली पाडून ते झोडपीत असता ह्याने जात्याची तळी उचलून त्या बिचाऱ्या सावकाराच्या डोक्यात घातली. त्याचा मेंदूच बाहेर पडला. सावकाराचा अपराध हा की, ह्या कुटुंबाने त्याचे ऋण फेडण्याचे तर राहोच, पण उलट त्याची गंजी, रास, गुरेसुद्धा जाळली, मारली, म्हणून त्याने खटला केला आणि रीतसर लिलाव करून ह्याचे शेत विकले! ह्याच्या बापाला फाशीच झाली. हा मुलगा दुय्यम, म्हणून ह्याला जन्मठेप काळे पाणी!

पण हा तिसरा बापडा पाहिलात का? किती शिस्तीत उभा, किती व्यवस्थित, निर्बंधशील (Law abiding) दिसतो आहे तो ह्या धारबंद संगिनींच्या चकचकाटांत! पण जेव्हा तो चकचकाट त्याच्या वाटेवर पडला नव्हता आणि ती वाट तो त्याच्या स्वभावाच्याच आंधळ्या उजेडात काय ती न्याहाळून स्वतंत्रपणे चालला होता, तेव्हा हा नागरिक कसा चालला होता माहीत आहे? ते त्याच्या शिक्षेच्या ह्या नोंदीत वाचा. हा बलुची, तिकडील उद्दंड टोळ्यातील एक माणूस. नाव अल्लाबक्ष. हा सिंध प्रांतांतील तुरळक हिंदू वस्तीवर ह्या टोळ्यांचे जे वारंवार दरोडे पडतात त्यात भाग घेता घेता इतका क्रूर बनला की, त्याला हिंदु मुलांमुलींच्या मांसाचे लचके तोडून खायची राक्षसी चटक लागली. शेवटी एकदा पेशावरला जाणाऱ्या एका आगगाडीतील स्त्रियांच्या डब्यात एक हिंदू स्त्री आपल्या तान्हुल्यासह एकटी बसली आहे असे टेहळून तो त्या डब्यात शिरला, सुरी रोखून तिच्या लज्जेचा बळी घेतला आणि त्या आसुरी आवेशात त्याने तिच्या दोन्ही गालांच्या मासाचे लचके आपल्या दातांनी तोडून ते चबाचबा खाऊन टाकले. ती आणि तिचे मूल मोठमोठ्याने विव्हळू लागले, म्हणून तो क्रोधाने अधिकच पिसाळला आणि त्याने त्या सुऱ्याने त्या निरागस, असहाय स्त्रीच्या मुलाच्या पोटात सुरा खुपसला, तिच्या तोंडावर सुऱ्याचे घाव घालू लागला, इतक्या बेभान रागाने की आगगाडी थांबली हेही त्याच्या ध्यानात आले नाही. गाडी

थांबताच त्याने खाली उडी घेतली, हाणमार करीत पळाला, धरला गेला तो धरणाऱ्या पोलिसांचे बोट त्याने काकडीसारखे कचकन् तोडले आणि ते कचाकच खाऊ लागला. न्यायालयात त्याने वेड्याचे सोंग घेतले, पण नृमांसभक्षणाच्या अघोर हौशीवाचून त्याच्यात वेडासारखे काहीच चिन्ह दिसेना; उलट तो हिंदूंच्याच कोवळ्या मुलांमुलींचे मांस लचके तोडून खात आणि रक्त मिटक्या मारून पीत असल्याचे, त्याच्या त्या राक्षसीपणालाही एक सैतानी धर्मबंधन असल्याचे, त्याच्या पिशाच्चपणालाही एक पद्धत असल्याचे सिद्ध झाले. त्याला जन्मठेप काळे पाणी होऊन वेड्याच्या रुग्णालयात काही दिवस बंद केले. तेथेही वाह्यातपणावरून जेव्हा दोनदा पन्नास-साठ फटके खाल्ले, तेव्हापासून काय ते त्याने वेड्याचे सोंग सोडले, शिस्तीने राहिला आणि आता काळ्या पाण्यावर धाडला जाते आहे. फटक्यासरशी त्याचे वेड उतरले. संगिनीच्या धारेवर राक्षसीपण तासले जाताच राक्षसांनाही कधी कधी माणसांचा आकार येतो तो असा! अनमानधपक्याच्या मंत्रांच्या पाण्याने माणसाळत नाहीत अशी हिंस्त्र श्वापदे रोखठोक संगिनीच्या पाण्याने माणसाळवता येतात, निदान निरुपद्रवी तरी करून टाकता येतात ती अशी!

मळमळ्या दयेला जी बापडी वाटली ती ह्या काळ्या पाण्यावरील चलानांतील माणसे त्या वेळी तशी बापडी का दिसली ते कळण्यापुरता त्यांच्यातील त्या तिघांचा परिचय वानगीसाठी वर करून दिला, त्यांच्या त्या भूमिका केवळ कादंबरीतील रोमहर्षण अद्भुतता वाढविण्यासाठी कल्पिलेल्या भूमिका नव्हेत. केवळ रोमांचांची थरथर उपभोगण्यासाठी मनुष्यजातीच्या माणुसकीची खोटी विटंबना करणे हे कादंबरीकाराच्याही माणुसकीला लांच्छनास्पदच झाल्यावाचून राहणार नाही.

पण ह्या भूमिका हे एक कादंबरीचे कल्पित नाही, तर हे एक सृष्टीचे वास्तव आहे. काळ्या पाण्यावरील दंडितांच्या इतिवृत्ताचे बाड- त्यांची History Sheet चाळाल, तर तुम्हांला त्या अघोर नगरीतील शेकडा पंचाहत्तर नागरिकांचे टिपण वरील दोघा-तिघांच्या टिपणाशी जुळणारेच आढळेल. अपवाद शेकडा पंचवीस. आणि तरीही आपल्या धार्मिक यात्रांतून सुद्धा जितकी हुल्लड होते, तितकी सुद्धा त्या राक्षसराष्ट्रांत सहसा होते नाही. तिकडे हत्यादरोड्यांचे वार्षिक आकडे अमेरिकेतील आकड्यांहूनही कमी प्रमाणात पडतात. कारण? मळमळी सोसाळू दया नव्हे तर संगीनदंड! तो दुर्धर्ष दंडच राक्षसाची माणसे करतो!

देहात जशी व्याधि तशी माणुसकीत राक्षसकी उपजाऊ! राक्षसकीला सुधारण्याचा उपाय दंड, माणुसकीला सुधारण्याचा उपाय दया!

असे ते ‘चलान’ पटांगणामध्ये आपल्या पायातील बेड्यांच्या खणखणाटामध्ये एखाद्या सैनिक पथकासारखे शिस्तीने चार-चारच्या रांगांत येताच ‘ठैरो’ अशी ठासून आज्ञा सुटली. तत्काळ ते सारे दंडित खाडकन् उभे राहिले. ‘बैठो’ म्हणताच बेड्यांचा एकदम खणखणाट होऊन ते सारे मटकन् खाली उकिडवे बसले. समोर ज्या समुद्रावर त्यांना आता चढायचे होते, तो समुद्र मोठमोठ्या लाटा उंच उंच फेकीत, नंतर त्या धक्क्यावर त्या लाटांना धडाडत आपटीत, फेसाळून हिसाळून अफाट रागाने चवताळल्यासारखा खळखळाटत होता. त्या दंडितांमध्ये बहुतेकांना समुद्र असा पाहण्याचा

तो पहिलाच प्रसंग असल्यामुळे त्या अफाट जलाशयाला तशा अफाट रागाने खवळलेला पाहताच त्या नुसत्या भीषण देखाव्याच्या धसक्यासरशीच सारखे धडधड होऊ लागले. दंडितांना एकमेकांशी बोलायची सक्त 'ना' असताही त्या धसक्यासरशी कोणाशी तरी आणि काही तरी उद्गारल्यावाचून राहावेनासेच होऊन जो तो शेजारच्या दंडिताशी कुजबुजू लागला, "हाच तो काळ्या पाण्याचा समुद्र!" "बापरे, ह्या उंच तुंबळ लाटा उसळताना पाहूनच माझा जीव खालीवर होते आहे!" "अरे, काळ्या पाण्यावर धाडतात त्यांना ह्या अफाट समुद्राच्या पार कोणच बेट आहे त्यावर नेतात, ते तरी खरे का रे?" "मी तर ऐकले आहे, ही निव्वळ थाप म्हणून! आम्हांला ह्या थापेने फसवून मोठ्या थोरल्या आगबोटीवर चढवले नि भर समुद्रात नेले की बुडवून टाकतात साफ!" नवख्या दंडितांना थरथर कापवणाऱ्या शंका, निर्ढावलेले दंडित त्यांना देत असलेली प्रत्युत्तरे ह्यांची कुजबुज वाढत दबलेल्या कोलाहलाचे स्वरूप घेऊ लागली, तेव्हा पोलिसांची सहनशीलता संपून त्यांनी पुन्हा दरडावले, "चूप! नही तो दंडुकेसे पीटे जावोगे!"

त्यासरशी पुन्हा सारे गप्प झाले. निर्ढावलेले आणि कारागारात वारंवार राबलेले जे बंदिवान असतात ते रखवालदारांची दृष्टि चुकवून शिस्त कशी मोडावी ह्यात पुरते पटाईत, पण नवखे बंदिवान त्यांच्या नादी लागून शिस्त तोडू जाताच पटकन पकडले जाणारे. त्यातही शिस्त तोडणाऱ्या निर्ढावलेल्या आणि दंडम बंदिवानांच्या वाटेला सहसा न जाता नवख्या नरम बंदिवानांवरचे शिस्त मोडल्याचा राग काढणे रखवालदारांनाही सोपे जाणारे असते. त्यामुळे पुन्हा गलका कोणी करते की काय, हे पाहणाऱ्या एका रागीट रखवालदाराने त्याच्या पलीकडे बसलेल्या दोघां-तिघां, मघापासून कुजबुजत असणाऱ्या पण निर्ढावलेल्या आणि दंडम न दिसणाऱ्या दंडितांवर उघडपणे तिकडे लक्ष नाही असे दाखवीत असताही चोरून डोळा ठेवला. थोड्याच वेळात पुन्हा जिकडे-तिकडे हळूहळू कुजबुज वाढत चालली आणि पचतही चालली आहे, हे पाहून त्या दोघा-तिघांपैकी जो अल्पवयी नवखा एक जण, समुद्रात नेऊन बंदिवानांना बुडवतात, ह्या कल्पनेने पूर्वीपासूनच धडकी भरल्यासारखा झाला होता, तो आपल्या शेजारच्या एका शिकल्यासवरल्यासारखे दिसणाऱ्या दंडिताला अगदी गयावया करून पुनः पुनः विचारू लागला,

"बाबूजी, कहो ना! असी समुद्रमे डुबायेंगे क्या हम सबको?"

"बच्चा, नही नही." एक निर्ढावलेला दंडित मध्येच, पोलिस पाठमोरा आहेसे पाहून झटकन् म्हणाला, "ए बात झूट है! काळ्या पाण्यावरून पळून आलेल्या एका पटाईत पठ्ठ्याला मी स्वतः तुरुंगात पाहिले आहे. अंदमान म्हणतात त्या बेटाला. त्यावर नेऊन सोडणार आम्हा साऱ्यांना!"

"आँ! क्या बोले?" तो मुलगा नवा जीव आल्यासारखा होऊन उद्गारला, "काळ्या पाण्यावरून कुणी कुणी पळून परत सुद्धा येऊ शकतो? बाबूजी, तुम कहो तो हम सच मानेंगे असे बातको!"

"दहा हजारात एखादाच! असा एक नराधम अपराधी काळ्या पाण्यावरून पळून आलेला मीसुद्धा पाहिला आहे!"

हे वाक्य तो बाबूजी (साक्षर बंदिवानाला आणि कारकून वा मोठ्या योग्यतेच्या दंडिताला बंदिवानात ‘बाबूजी’ संबोधतात.) शक्य तितक्या सावधपणे शेवटी बोलतो न बोलतो तो पाठ वळवलीसे दाखवून त्यांच्यावर लक्ष ठेवणाऱ्या त्या पोलिस रखवालदाराने झटकन् पळून धावून बाबूजींना पकडले. कारण पकडले न जाता शिस्त कशी मोडावी, ही विद्या बंदिवासाचा प्रसंग उभ्या जन्मात पहिल्यानेच आलेल्या आणि सरळ सत्य ते मोठ्याने बोलण्याची सभ्य जगतातील सवय बंदिगृहात अवश्य तितका लुच्चेपणा अंगी अजून न मुरलेल्या त्या ‘बाबूजी’चे ते शब्द त्यांची इच्छा नसताही बरेच मोठ्याने निघून गेले होते.

रखवालदाराने बाबूजीवर झडप घालून कुडत्याचा गळा पकडून त्याला उभे केले आणि आपल्या जमादाराकडे खेचीत नेऊन म्हणाला, “वारंवार चूप बैस म्हणून सांगितले असताही हा बंदिवान सारखा गलका करीत आहे, इतकेच नव्हे, तर इतर बंदिवानांना चिथावीत आहे की आपण काळ्या पाण्यावरून तुरुंग फोडून पळून जाऊ.”

“काय?” संतापाने लाल होऊन काळ्या पाण्यावरून पळून यायचा कट? नाव काय ह्या बेरडाच?”

“रखवालदाराने त्या बाबूजीच्या छातीवरील बिल्ला पाहून जमादाराला त्याचे नांव सांगितले, “कंटक.”

जमादाराने नाव आणि त्याचा बिल्यावरील बंदिक्रमांक आपल्या खिशातील नोंदवहींत टिपला आणि दरडावून तो म्हणाला, “कंटक, तुझा हा अपराध जर मी वर कळवला, तर तुझ्या गळ्याला तात लागेल. काळ्या पाण्यावरून पळणाऱ्याला पळताना गोळी घालतात, पकडला की फाशी देतात, माहीत आहे? काळ्या पाण्यावर हा अपराध सर्वांहून भयंकर समजला जातो.”

“पण जमादारजी, मी काळ्या पाण्यावरून पळून जाण्याच्या कटाविषयी एका अक्षरानेही कुणाला चिथावले नाही. मला...”

“चूप! बदमाष, तू तसेच चिथावलेस.” रखवालदार खेकसला.

“माझ्या शेजारच्या त्या बंद्यांना विचाराव मी म्हणतो ते खरे की खोटे?”

जमादाराने त्या मुलाला आणि त्या निर्ढावलेल्या बंदिवानाला उठवून विचारले, “काय रे, हा कंटक तुम्हाला काय शिकवीत होता?”

मुलगा नुसता थरथर कापत उभा राहिला. पण कंटकवरील ह्या आरोपाविषयीची पोलिसांशी चाललेली ती सारी बाचाबाची मुळापासून ऐकत असणारा तो निर्ढावलेला बंदिवान पटकन् उत्तरला,

“जमादारजी, हा बाबू आम्हांला सांगत होता की, काळ्या पाण्यावरून कसे पळायच ते त्याला ठाऊक आहे, तसा पळालेला एकजण त्याचा पुढारी आहे नि आम्ही जर त्यांच्या कटात मिसळू नि गुप्त बेत न फोडायच्या तशा शपथा घेऊ, तर एका वर्षाच्या आत सगळेजण तुरुंग फोडून काळ्या पाण्यावरून निसटून घरी परत येऊ. मी ह्याला म्हंटले, ‘आपण नाही बुवा येणार अशा भयंकर कटात, नि घेणार शपथबिपथ.’ “

त्या अट्टल सोद्या बंदिवानाची ही साक्ष ऐकताना तो कंटक असता दिङ्मूढ होत्साता आ वासून उभा राहिला. मग एकदम उद्गारला, 'अरे, हे काय बालंट! इतक्या उलट्या काळजाचा मनुष्य असू शकतो अं! एक अक्षरदेखील खरे नाही हा सांगतो त्यातील. जमादारजी, शपथ देवाची. मी..."

दणकन् एक दंडुका कंटकाच्या मांडीवर जमादाराने हाणून गर्जना केली, "चूप!" बस्स, त्या साऱ्या साक्षीपुरावा-आरोपा-बचावाचा न्यायनिर्णय त्या एका दांडक्यात समारोपिला गेला.

तोच घण घण घण कसची तरी घंटा घणघणू लागली. 'त्या तिघांना फोडून निरनिराळ्या रांगांतून बसव' असे त्या पोलिस रखवालदाराला सांगून जमादार धावतच घंटा वाजली तिकडे धावून गेला. ते चलान अंदमानला जाणाऱ्या आगनावेवर चढवी तोपर्यंत त्याचा भार त्या जमादारावर असल्यामुळे आणि ती घंटा ती आगनाव येण्याचीच होती म्हणून कंटकाच्या त्या प्रकरणाचा जमादाराला तेथेच विसर पडला. एकदा आपल्या हातून त्या चलानाची ब्याद आगनावेवर पोचवली गेली की सुटलो आपण! मग तिकडे पळोत वा जळोत! त्याचे सव्यापसव्य हा जमादार असल्या भानगडीचे प्रतिवृत्त वरच्या अधिकाऱ्याकडे पोचवून स्वतः कशाला करीत बसणार?"

जमादार निघून गेला, ते प्रकरण विसरला, पण मांडीवर हाणलेल्या त्या दंडुक्याचा रट्टा विसरणे त्या बिचाऱ्या कंटकाला थोडेच शक्य होते? त्याच्या मांडीत कळ येऊन तो विव्हळत तसाच बसवले त्या रांगेत बसला. त्या अन्यायाने, अपमानाने आणि विशेषतः त्याला प्रतिकारण्याच्या संपूर्ण अक्षमतेने कंटकला जगण्याची सुद्धा लाज वाटू लागली. काळ्या पाण्यावर जगण्यासाठी जितकी निलर्ज्ज तितिक्षा अवश्य, तितका तो त्या सद्गुणात अद्याप प्रवीण झाला नव्हता.

पण कारागृहे आणि काळे पाणी ह्यांचेच जीवन ज्यांच्या अस्तित्वावर आधारले आणि समर्थिले जाऊ शकते, अशा निर्ढावलेल्या निलर्ज्जातील तो साक्ष देणारा दंडित बसल्या बसल्या त्या कंटककडे पाहून फिदी फिदी हसत होता उलटा. शेजारच्या दंडिताना आपली एक बढाई म्हणून ते कंटकवर घातलेले बालंट सांगत होता, "भय्या, जिवावर बेतली होती माझ्याच पण दिली दवडून त्या शेळपट बाबूच्या शेपटावरच! कंटकाच्या तंगडीवर असा एक रपाटा देववला की यंव!"

कंटकला मांडीत कळ उठत असल्यामुळे सारखे उकिडवे बसवेना. शिपाई तर सारखा ओरडू लागला, "हां, उकिडवा! सीधा बैठ!" कंटकवर शिस्त मोडल्याचा दुसरा अन्याय्य प्रसंग गुदरणारच होता.

पण इतक्यात जिकडून तिकडून त्या संगिनीवाल्या रखवालदारांचा गर्ज झाला, "उठो! महाराजा आया!"

कंटक चमकून उठला आणि जिज्ञासेने बघू लागला, एवढे कोणचे महाराज इकडे येत आहेत?

निर्ढावलेले अनुभवी बंदिवान सारे उठून समुद्राकडे बोट दाखवून कुजबुजले, "महाराजा! आले बघा ते!"

कंटक पाहतो तो एक मोठी आगबोट भोंऽऽ असा बंब भुंकीत त्या खळखळणाऱ्या लाटांच्या जंगलांतून वाट कापीत धक्क्याकडे हळूहळू येत आहे, तिच्यावर ‘महाराजा’ असे अगडबंब नाव लटकते आहे.

“महाराजा आया” म्हणजे हे जहाज, आले! हेच का आता मला काळ्या पाण्यावर नेणार? त्या जलायानाला पाहताच कंटकच्या पोटात धडकी भरल्यावाचून राहिली नाही.

आजवर सहस्त्रावधि भल्याबुऱ्या स्त्रीपुरुष अपराध्यांना ह्या ‘महाराजा’ जलयानाने ह्या धक्क्यावरून उचलून काळ्या पाण्यावर नेऊन सोडले असेल, पण त्यातील हजारी एकाला देखील पुन्हा काही ह्या धक्क्यावर परत आणून सोडले नाही. जो एक काळ्या पाण्याचा दंडित म्हणून ह्या जलयानावर चढला, काळ्या पाण्यावर गेला, तो गेला! ह्या जगाला तो मेला, हे जग त्याला मेले! स्मशानात-मसणवटीत वाहून नेले जाताना प्रेताला जर काही वाटणे शक्य असेल, तर त्याला जे वाटत असेल, तेच काळ्या पाण्यावर जाण्यासाठी जेव्हा दंडितांना ह्या ‘महाराजा’वर चढवले जाते, तेव्हा त्यांना वाटत असते. निदान त्याच्या न ‘वाटण्या’ची माणुसकी ज्यांच्यांत उरलेली असेल, त्यांना तरी तसेच वाटते की, ‘महाराजा’ हे जहाज नसून आहे एक थडगे! ह्यात जो गाडला, तो पुन्हा जरी त्यातून बाहेर पडलाच तरी पडणार त्या काळ्या समुद्रापलीकडील यमपुरीत! यमलोकी! ह्या लोकी नव्हे! कंटकला कळत होते आणि म्हणूनच ह्या ‘महाराजा’ला पाहिल्याबरोबर त्याच्या हृदयात धडकी भरली. त्या वेळपर्यंत तो मनाला विचारीत असे, ‘ह्या समुद्राला काळे पाणी का म्हणतात? तसे पाहिले तर समुद्र ओलांडणे म्हणजे जातपात, धर्म नष्ट होणे, हिंदुसमाजापुरती तरी एक सामाजिक मृत्यूच होणे, अशी सिंधुबंदीची रुढि जेव्हापासून हिंदुसमाजात बळावली, तेव्हापासून समुद्र तितका काळे पाणीच वाटू लागला. काळाचा-मृत्यूचा-समुद्र भासू लागला. पण त्यातही ह्या अंदमानच्या जन्मठेपेवर जाणाऱ्यांनाच काळ्या पाण्यावर जाणारे असे विशेष भयंकर नाव का मिळाल?’ त्या समुद्राच पाणी कंटक किती वेळ तरी बसल्या बसल्या पाहात होता, पण ते विशेषतः काळे का ते काही त्याला आढळेना. पण ते ‘महाराजा’ जलयान बघताच आणि ‘आता ते मला ह्या माझ्या आजवरच्या आप्तेष्ट-जातगोताच्या जगातूनच नव्हे, तर जीवनातूनच हिसडून अत्यंत दुर्दशेच्या कुणा मृतखंडात नेऊन खचित खचित गाडणार’ ही प्रत्यक्षता पटताच त्याच्या हृदयात जी धडकी भरली, त्यासरशी मात्र त्याला तो सारा समुद्र खरोखरच काळा काळा कभिन्न दिसू लागला. त्याला काळे पाणी का म्हंटले, ते त्याला कळले- नव्हे, काळे पाणी ह्या नावाहून दुसरे यथार्थ नाव त्याला दिले असते तर ते वदतोव्याघातच कसे झाले असते, ते त्याला पटले.

हा कंटक म्हणजेच वाचकहो, तुमच्या ओळखीचा तो किशन. त्याला आणि मालतीला जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाल्यानंतर त्यांची जी ताटातूट झाली ती झालीच. तिला कोणत्या बंदिगृहात धाडले ते त्याला यत्न करूनही कळले नाही. त्याला निरनिराळ्या कारागारात कोंडीत कोंडीत दर चार-पाच महिन्यांनी साचलेले काळ्या पाण्याचे दंडित गोळा करून एकेक टोळी काळ्या पाण्यावर धाडण्याच्या पद्धतीप्रमाणे ह्या टोळीत धाडण्यासाठी जेव्हा कलकत्त्याला आणण्यात

आले, तेव्हा त्या जीवावरच्या संकटांतही एक स्निग्धभीषण जिज्ञासा त्याला चैन पडू देत नव्हती. न जाणो, मालतीला पण ह्याचे 'चलानां'त जन्मठेपीवर काळ्या पाण्याला धाडण्यासाठी आणली जाईल की काय? तिला तशा दुर्दशेत पाहणे, ढकलणे किती असह्य, किती कडू! पण त्या निमित्ते का होईना, पण तिला निदान पाहाणे, संकट भोगणेच तर एकत्र भोगताना वाटून घेऊन भोगणे त्यातल्या त्यात गोड! गुपचूपपणे त्याने किती शोध केला, पण दंडित स्त्रिया अशा काही त्या चलानात पाठवल्या जाणार नव्हत्या आणि असल्या, तरी त्यांना पुरुषी चलानाच्या दृष्टीला सुद्धा शक्य तो न पाडता धाडण्याची स्वतंत्र व्यवस्था ठेवलेली असते, तीच योग्य. अशा उच्छृंखळ कलिपुरुषांच्या आणि क्रूर पशूंच्या कळपात त्या क्रूर आणि दंडित स्त्रियांचीही देखता देखता राखरांगोळी उडाल्यावाचून थोडीच राहणार?

मालती त्या चलानात नाही हे कळल्यामुळे किशनला एक परी बरे वाटले असताही जसे वाईट वाटले, तिला नुसते पाहण्याची सुद्धा संधीही साधत नाही, म्हणून जशी त्याच्या जिवाला हुरहुर लागली, त्याच्या अगदी उलट आणखी एक व्यक्ति त्या चलानात न आढळल्यामुळे त्याच्या जिवावरचे एक संकट टळल्यासारखे त्याला हलके वाटले. ती व्यक्ति तो रफिउद्दिन! त्यालाही जन्मठेप काळ्या पाण्याचीच शिक्षा झाली होती, किशनला शिक्षा होण्याच्या काही दिवस आधीच. तोही ह्याचे चलानात आपल्या संगतीच येतो की काय? आपले नाव पालटलेल, किशनच कंटक ठेवलेल, पण रूप तेच. त्याने आपल्याला ओळखल तर? तो क्रूर नराधम आपला सूड उगवण्यासाठी पुन्हा वाटेल तो अत्याचार करायला सोडणार नाही. आपल्यालाही प्रत्याघात केल्यावाचून राहणार नाही. ह्या आधीच गुदरलेल्या एका भयंकर संकटात दुसऱ्या भयंकर यातनांची घोरपट गळ्यात पडणार. होवो काय होईल ते आता! जे वाईट ते झालेच आहे- जन्मठेप काळे पाणी काय, मृत्यु काय. उडदात काळे-गोरे ते काय निवडायचे? अशा विचारे किशन त्या आपत्तीला तोंड देण्याची मनोमन सज्जता करीत असताही ती आपत्ति टळेल तर बरे, असेच त्याला वाटत होते. म्हणूनच त्या चलानात तो रफिउद्दिन किंवा त्याच्या त्या खटल्यातील कोणीही साथीदार दिसते नाही, हे पाहून त्याला ती एक नवीन आपत्ति तरी टळली, हे बरे वाटले होते. फासावर चढवले जातानासुद्धा डोळे बांधून चढवले म्हणजे थोडे बरेच वाटते त्यातल्या त्यातही!

ते चलानचे चलान खणखण खळखळ बेड्या वाजवीत, प्रत्येकाच्या खाकेत अंथरूण, हाती थालीपाट, चार-चारांची रांग एकेकांची होऊन 'महाराजा'वर कचरत कचरत झोकांड्या घेत लाटांवर बळकट हेलकावे घेणाऱ्या त्या जलयानाच्या अरूंद शिडीवरून एकदाचे चढले. ते 'महाराजा' जलयान केवळ काळ्या पाण्यावरचीच ये-जा करण्यासाठी राखलेले, गेली तीस-चाळीस वर्षे तरी अशा शेकडो 'चलानां'ना जन्मठेपीवर नेऊन सोडीत आलेले! त्यावर पाऊल टाकताच लाटांच्या हेलकाव्यांची सवय नसलेल्या आणि हृदयातील उदास, निराश धडधडीच्या हेलकाव्याने आधीच चक्करलेल्या किशनला अगदी भोवळ आल्यासारखी झाली. ही आगनाव जन्मठेपेवर कसली, मृत्युठेपेवरचे आपल्याला नेत आहे, असे त्याला होऊन गेले. एका खांबाला टेकून तो भोवळ सावरीत होता, तोच शिपायाने "आगे

बढो!" म्हणून दंडुक्याने त्याला ठोसरले. त्यासरशी रांगेत पुन्हा नीट उभा होऊन सर्व बंदिवानांसह तो आगनावेतील अगदी खालच्या, पाण्याच्या आत बुडालेल्या जड तळाशी उतरून आला. पाहतो तो लोखंडी गजांचा बनवलेला एक पिंजराच्या पिंजराच पुढे ठाकला. त्या जलयानात काळ्या पाण्यावरील बंदिवानांसाठीच केलेली ही विशिष्ट सोय होती. तो पिंजरा म्हणजेच त्या सन्माननीय अंदमानी उतारूंचा राखीव कक्ष - Reserved Cabin!

पन्नास-एक माणसे निजू शकतील, अशा त्या एकगाळी पिंजऱ्यात ते शेसव्वाशे दंडित झटपट कोंबून टाकण्यात आले. ज्याला जेथे सापडेल तेथे त्याने वळकटी टाकली. कोणी पंजाबी ब्राह्मण, कोणी बंगाली चांभार, कोणी बलुची मुसलमान, कोणी मद्रासी अय्या, कोणी भिल्ल, कोणी मच्छीमार, कोणी वराडी, कोणी कारकून, कोणी भिकारी, कोणी शेठ, कोणी भूमिदार, कोणी फासेपारधी, कोणी लहान, कोणी मोठा, कोणी निरोगी, कोणी क्षयी, कोणी ज्वरी, कोणी अतिसारी, कोणी आमांशी- सारे एकत्र रेटून खेटून समतेने एकत्र कोंबलेले, आपत्तीत का होईना, पण समसमानता अशी चोख की त्यापेक्षा वर्गभेद, जातिभेद, धर्मभेद, स्थितिभेद अधिक निगरगट्टपणे नाकारायला रशियाच्या बोल्शेव्हिकांची देखील छाती होऊ नये!

किशनही त्या दाटीत कसाबसा आपली वळकटी ठेवून मटकन् खाली बसला. त्याला पूर्वीपासूनच मळमळ वाटत होती. त्यात पडावातून बोटीवर येताना तर अनेक बंदिवानांना जशा भडाभड उलट्या होते होत्या, तशाच त्यालाही येऊ लागल्या. ओकण्याची स्वतंत्र जागा कोठली? जो जेथे बसला तेथे ओकू लागला. त्यातही निलर्ज्ज दंडेलीत जो जितका अधिक आततायी, त्याची तितकी अधिक सोय. बळाने धक्के मारून आपण शक्य तितके पाय ते पसरीत. शिपायांनी शिव्या दिल्या, दंडुके मारले, तरी त्याची त्यांना लाजच नव्हती. सवयीने तितकीशी भीतीही नव्हती, पण ज्यांना ती भीति असे आणि दुसऱ्याची मुंडी मुरगाळण्यात थोडी तरी लाजही वाटे, अशा भ्याड किंवा माणुसकी अगदीच कोळून न प्यालेल्यांनाच ती दुर्दशा, त्या पोलिसांच्या आणि नीच दंडितांच्या शिव्या आणि ओंगळ घाण अधिक छळी, अधिक जाणवे. किशनलाही त्याच्या एका बाजूला असलेला एक उग्रट दंडित सारखा ढकलीत, रेटीत होता. किशनला तेथेच उलटी झाली, तिचे शितोडे आपल्या वळकटीवर उडाले म्हणून अभद्र शिव्या हासडीत होता आणि दुसऱ्या बाजूला एक दमेकरी सारखा खोकत होता, बडके थुंकत होता. अवशपणे आणि दाटीत उपाय नसल्याने त्याची थुंकी किशनच्या वळकटीवर आणि पायावरही पडे. अंग शक्य तो आवळून, गुडघे पोटाशी घेऊन आपल्या वळकटीच्या हातभर भागालाच पसरून स्थलाभावी बाकी गुंडाळलेलीच ठेवून, तीवरचे टेकून पडला. त्या थोरल्या जलयानाची सुटायच्या आधीची कर्कश घरघर मधून मधून होऊ लागली. बंब मधून मधून एखाद्या पिसाळलेल्या राक्षसी कुत्र्यांच्या टोळीसारखा भोंऽ भोंऽऽ करीत चेकाळू लागला.

त्या अगडबंब आगनावेची ती घरघर प्रत्यक्ष मृत्यूच्या घरघरीसारखी किशनला त्रासदायक वाटू लागली. बंबाची ती भोंऽऽ भोंऽऽ यमाच्या कोण्या काळ्याकुट्ट आणि रक्तपिपासू अशा प्रचंड

कुत्र्याच्या भुंकारासारखी भीषण भासू लागली. पोटात सारखी मळमळ, हृदयात सारखी कालवाकालव, डोक्यात सारखी भोवळ आणि ‘मी काळ्या पाण्यावर जन्मठेप चाललो- आता जगलो तरी असा ह्या गलिच्छपणाच्या, शिव्याशापांच्या, लाथाबुक्क्यांच्या असह्य दुर्दशेत मेलेला जगणार आणि ती दुर्दशा कधी तरी संपेल ह्याची लवलेश आशा नाही!’ ही जाणीव मनात. किशन गुंगून वळकटीच्या उशावर तसाच पडला तोच त्याच्या त्या अस्ताव्यस्त विचारात एक विचार, जसे कोणी एकदम ओरडून उठते, तसे ओरडतच उठला.

“का? ह्या दुर्दशेला अंत का नसावा? काळे पाणी - जन्मठेप! पण सुटका करणार नसले, तरी सुटका करून घेता येणारच नाही, असे कशावरून? तो रफिउद्दिन नाही का काळ्या पाण्यावरूनच पळून आला? मलाही तसे येता येणार नाही कशावरून?”

ह्या गुंगीतल्या अस्ताव्यस्त पण बळकट विचारासरशी त्याची मरू घातलेली आशा एकदम एक उसळी मारल्यासारखी चमकून उठली. मरणासन्न मनुष्य अकस्मात् प्रबळतेने हातपाय झाडतो, तशी त्याची आशा सहसाच झडझडून बळावली. त्याने तर्कशास्त्र अभ्यासले होते आणि कुतर्क हाही एक तर्कच आहे! शक्याशक्यता, साध्यसाधने, ह्यांचा काही एक अडथळा आशेच्या आणि वाताच्या झटक्याला अडवीत नसतो. बुडता जो काडीचा आधार घेतो, तो जसा घेतल्यावाचून राहावत नाही म्हणून घेतो, तसा त्याच्या ज्या काळ्या पाण्याच्या अथांग समुद्रात बुडणाऱ्या आशेने त्या बिचारांना पटकन् कळवले आणि त्याचे त्या बेभान गुंगीतले सारे भान तेच एक वाक्य एकवटून उद्घोषू लागले, “काळ्या पाण्यावरून पळायच! बस्स् पळायच!”

खळ्ऽऽऽ खळ्ऽऽऽ सळसळाटात आगनावेची चाके, पंखयंत्रे, समुद्राच्या पोटात ढवळावे तशी ढवळू लागली. “निघणार! सुटणार! बोट काळ्या पाण्याकडे सुटणार!” पोलिस, बंदिवान, नाखवा, नावाडी, अधिकारी, चाकर, साऱ्यांच्या तोंडांतून हा एकच ध्वनि उठू लागला.

तोच खाड्खाड् बूट उडवीत दोन गोरे सार्जंट बेडी हातकडी ठोकलेल्या एका बंदिवानाला सक्त पहाऱ्यात खाली उतरवीत त्या पिंजऱ्याच्या दाराशी ठेपले. धाडकन् ते दार उघडले आणि त्या पिंजऱ्यात त्या विशेष बंदोबस्तात आणलेल्या अट्टल दंडितासह ते सार्जंट आत शिरले.

त्या खडखडीसरशी चमकून एवढे सार्जंटबिर्जंट कोणाला घेऊन येताहेत, ते पाहण्यासाठी किशन पडल्यापडल्याचे डोळे उघडीत तिकडे बघू लागला. तोच! कोण? हा तर?...

अरे! हा तर रफिउद्दिन अहमद! अवघ्या चार हातांच्या अंतरावर ताठरपणे उभा!

मुठी वळवीत, अर्धाअधिक खाड्कनी उठत, रागाने, धसक्याने, आश्चर्याने, कापणाऱ्या ओठात किशन पुटपुटला,

“रफिउद्दिन! तोच हा रफिउद्दिन अहमद!”

त्याचे पूर्ववैर किशनच्या हृदयात एकदम खवळून उठले. स्थलकालपरिस्थितीचा विसर पडला. जणू काय रफिउद्दिन आपणाला पाहाताच वाघासारखा आपल्यावर झडप घालणार, अशी ऊर्मि

किशनच्या रक्तातून उसळून ती झडप पडताच उलट झडप घालण्यासाठी तो दबा धरून वळकटीच्या आड बसला.

तोच रफिउद्दिनची दृष्टीही त्याच्या दृष्टीला पडली.

***

दहा

रफिउद्दिनची दृष्टि किशनच्या दृष्टीला भिडताच हा आताच आपल्यावर झडप घालणार असे होऊन किशनच्या मुठी मारामारीच्या उसळीने आपोआप वळल्या, पण एका क्षणात रफिउद्दिनने आपल्याकडे पाहिले तसेच इतर बंदिवानांकडेही तो पाहू लागला आहे, तो कोणत्याही प्रकारे चलबिचल झालेला दिसते नसून त्याचे सारे लक्ष, त्याची वळकटी त्यातल्या त्यात अघळपघळपणे कोठे टाकता येईल ह्याचे विवंचनेत गुंतलेले आहे, असे किशनला दिसले. त्या अवकाशात त्याला थोडा विचार करायलाही वेळ मिळाला. ‘जर ह्याने मला पक्कं ओळखल नाही तर? तर आपणही आपली ओळख ह्याला होऊन देऊ नये. आपण कंटक ह्याचे नावाचा दुसरा कुणी बंदिवान आहोत, अशीच ह्याची समजूत शक्य तो करून द्यावी, करवेल तो ह्याच्याशी ओळख द्यायचीच टाळाटाळ करावी, असा त्या अवकाशात किशनने निश्चय केला आणि तो पुन्हा आपल्या वळकटीवर डोके टेकून, मिटल्यासारखे वाटणाऱ्या पण किलकिले असणाऱ्या डोळ्यांनी, रफिउद्दिनच्या हालचाली पाहू लागला.

रफिउद्दिनने आपली वळकटी पिंजऱ्यातल्या अशा एका कोपऱ्यात ठेवली की, गजाशी पहारा करणाऱ्या शिपायांशी सोयीने बोलता यावे. गोरे सार्जंट त्याला इतक्या विशेष बंदोबस्ताने पिंजऱ्यात सोडून पिंजरा बंद करून निघून गेलेले पाहताच त्या बंदिवानात त्याचा वचक आधीच बसला होता. दंडितामध्ये अधिकारी ज्याला असा अत्यंत भयंकर दंडित समजून जडातील जड हातकड्या बेड्या ठोकतात, त्याला दंडित लोक तिरस्कारार्ह पापी माणूस न समजता कोणी तरी एक अत्यंत कर्तृत्ववान् मनुष्य समजू लागतात. त्याचे वजन त्या अपराध्यांमध्ये वाढते आणि भयभीत आदराने ते त्याच्या कह्यात आपण होऊन वागू लागतात. दंडितांच्या ह्या प्रवृत्तीमुळेच तसल्या दाटीतही रफिउद्दिनला त्या कोपऱ्यातील दंडितांनी कोणतीही घासाघीस न करता स्वतः एकमेकांत कोंबून घेऊन थोडी ऐसपैस जागा करून दिली. हा कोण, हा कोण अशी जिज्ञासा जो तो करीत असता, हा पूर्वी काळ्या पाण्यावर गेलेला पण तेथून पळून देशी परत आलेला एक मोठा नामांकित बंदी आहे, ही माहिती बोलता बोलता, ठाऊक होती त्या दोघां-चौघांकडून ठाऊक नव्हती त्या सर्वांना कळली. जो तो आपल्याकडे सभय आदराने पाहात आहे, हे रफिउद्दिन तर पूर्णपणे जाणून होता आणि त्या दंडितांचा जसा काही तो एक सम्राटच होता, अशा ऐटीत खोकत होता, खाकरत होता, पोलिसांची दृष्टि चुकवून जे बोलता येईल ते बोलत होता. त्याची सम्राट्पणाची जी विशिष्ट राजचिन्हे, त्या त्याच्या पायांतील सर्वांहून जड बेड्या, त्या वरचेवर खळखळाटवीत आणि मिरवीत होता.

आता किर्रर अंधकार पडला होता. ते जलयान कलकत्त्याचे बंदर सोडून काळ्या पाण्याच्या वाटेला लागून समुद्रातून भर वेगात चालले होते. कलकत्त्याहून अंदमानाला जायला जे चार-पाच दिवस लागतात, त्यामध्ये बंदिवानांना केवळ पोहे आणि फुटाणे ही कच्ची पोटगीच काय ती मिळते. कारण त्या दंडितांतील बहुतेक जण घाबरलेले, समुद्रप्रवासाचा जन्मातला तो पहिलाच

प्रसंग असल्यामुळे एकसारख्या उलट्या होणारे, खाण्यावर वांछाच नसते असे असतात आणि दुसरे कारण की, एवढ्या शंभर-शंभर जणांच्या सैंपाकपंगतीची सोय आणि व्यय करण्याची अधिकाऱ्यांनाही खुमखुमी नसते. त्याप्रमाणे सर्व बंदिवानांना चणेकुरमुरेपोहे- जे संध्याकाळी पिंजरा बंद करतानाच वाटून दिले होते ते- उलट्या होणाऱ्या बहुतेकांनी तसेच ठेवलेले होते. पण रफिउद्दिनला तो काळ्या पाण्याचा समुद्र म्हणजे एक जुनाच सोबती होता. रफिउद्दिन घाबरलेलाही नव्हता, उलट्या होणाराही नव्हता, त्याला उलट खमंग भूक लागलेली होती. त्याची छाप त्या साऱ्या दंडितावर आधीच पडलेली. सम्राट्च होता तो त्यांचा! तेव्हा त्याने आपला कर राजा उकळतो तशा निष्पाप भावनेने त्याच्या आसपासच्या त्या दंडितांकडून त्यांची पडलेली पोटगी चक्क मागून घेतली. एक-दोघांनी अळंटळे करताच काही तरी दुसऱ्याच निमित्ताने भांडण उभारून, शिव्या हासडून त्यांना दरडावले आणि त्यांचीही पोटगी उपटली. तो चण्यांचा आणि पोहे-कुरमुऱ्यांचा, ढीग फाकून टाकून रफिउद्दिन आता पिंजऱ्याच्या गजांशी कोणाची तरी वाट पाहात थोडा उभा राहात होता, थोडा बसत होता. त्याला कोणी बंदिपालाने विचारले तर सांगत होता,

"थोडे थांबा, मग बोलू."

तोच त्याला हवी होती ती संधि आली. रात्री नऊ वाजताच पिंजऱ्यावरील पहारा बदलला. ते 'चलान' काळ्या पाण्यावर घेऊन येण्यासाठी काळ्या पाण्यावरचेही काही पोलिस कलकत्त्यापर्यंत धाडण्यात येतात त्यापैकी दोघांचा तो दुसरा पहारा होता. त्या काळ्या पाण्यावरचे पोलिस त्या रफिउद्दिनच्या चांगले ओळखीचे निघाले. तो त्यांच्याच पहाऱ्याची वाट पाहात होता. ते येताच गजांतून थोडा हात बाहेर काढून रफिउद्दिनने त्या पहारेवाल्यांशी ओळखीचे हस्तांदोलन केले. पण पहारेवाल्यांच्या हातात काहीतरी- हळकुंड म्हणा, खडीसाखर म्हणा, म्हणजेच सोन्याचे नाणे म्हणा- चांदीचे नाणे म्हणा- पण पडले खरे. पहारेवाला झटकन् दुसऱ्या टोकापर्यंत फेरी मारीत गेला. पुन्हा थोडी सामसूम होताच रफिउद्दिनच्या कोपऱ्यात गजातून एक विड्यांचे पुडके आणि आगपेटी टपकन् पडली. त्या पिंजऱ्यातल्या संस्थानांत त्याचा जन्म त्या वेळेपासून सर्वाधिकाऱ्यासारखा चांगलाच जमला. त्या सर्वाधिकाराचा उपयोगही तो काही काही प्रकरणी चांगलाच करू लागला.

जशी पेंढाऱ्यांच्या काही पुढाऱ्यांची पुढे संस्थाने झाली, तसेच धाडसी दरोडेखोर जेव्हा जेव्हा राज्ये स्थापून राजे होतात, ते राजाप्रमाणेच वागूही लागतात. त्यांचा अन्याय वजा जाता इतरांच्या न्यायान्यायाचे निवाडे ते चोख करतात. त्यांची लूट वजा जाता इतरांना आपसात लुटू देत नाहीत. त्यांना द्यावासा वाटेल तो उपद्रव वजा जाता इतर प्रकरणी दुसऱ्यांना आपसातला उपद्रव कमी करण्यासाठी दयाळूपणाची उदारताही दाखवितात.

रफिउद्दिन एक क्रूर मनुष्य होता. त्याची क्रूरता खवळून उठण्याइतका त्याच्या मनाचा कल जोवर कोणी मोडीत नव्हते, तोवर तोही निव्वळ मनुष्यपणानेच वागत होता. त्याने काळ्या पाण्याच्या नावाने घाबरलेल्यांना किती तरी धीर द्यावा, "घबराव मत्! दहा हजार लोक तिथे

चांगले पंचवीस, तीस, चाळीस वर्ष जिवंत राहतात; कित्येक बायका, मुलेबाळे असा पसारा वाढवून संसारही थाटतात; शेती आहे, गुरंढोर, घरंदार सर्व काही आहे तिकडे! अरे, मी तुझ्यासारखाच प्रथम घाबरलो होतो. पण तिकडे गेल्यावर चांगले हजार रुपये गाठीला बांधून बसलो होतो! घबराव मत्, पठ्ठे घबराव मत्!" कित्येकांना रेच-उलट्यांचा फारच त्रास झाला असता त्याने शिपायांशी आणि वेळी डॉक्टरशीही भांडून त्यांनाच, बंदिवानांना कसे वागवले पाहिजे ते नियम का मोडता असे फटकारून, कप्तानसाहेबांना सांगू म्हणून दमदाटीही करून औषधे देणे भाग पाडावे. त्याला हवी असलेली चण्यापोह्यांची पोटगी जे त्याला आपल्या वाट्याची अर्पीत, त्यांना तो त्याला नको असलेल्या विड्यांची थोटके चोरून प्यायलाही देई. त्याच्याच चरित्रांतील खऱ्याखोट्या प्रसंगांच्या अशा अवाच्या सवा गोष्टी तो सांगे, अशी पदे, भजने गाई, की त्या बंदिवानांना त्यांच्या आजाराचे आणि हालअपेष्टांचे सुद्धा काही वेळ विस्मरण व्हावे, मन रमावे. त्या प्रत्येक जन्मठेप्यापुढे मागे, वर, खाली पिशाच्चासारखा एकच प्रश्न त्या दुर्धर प्रसंगी उभा असे, "काळे पाणी कसे असेल? काय काय भयंकर यातना तिकडे भोगाव्या लागतील? त्यातून येतच असेल, तर सुटका कशी करून घेता येते?" प्रत्येक मनुष्याला 'यमपुरी कशी असेल?' ह्या प्रश्नाची जशी असह्य जिज्ञासा, तसेच 'महाराजा'वरील जन्मठेप्याला 'काळे पाणी कसे असेल?' ह्या प्रश्नाचे एक वेडच लागलेले असते! ज्याला जो भेटेल, त्याला तेच विचारावेसे वाटे. अशा मनःस्थितीत काळे पाणी प्रत्यक्ष भोगून आलेला तो रफिउद्दिन म्हणजे त्या लोकांना यमपुरीचा भूगोल रेखाटणारे मूर्तिमंत गरुडपुराणच वाटला! किशनच्याही मनात त्याला ती माहिती विचारावी आणि विशेषतः तो काळ्या पाण्यावरून कसा पळाला ती रोमहर्षण कथा ऐकावी अशी उसळी येत होती. पण ओळख निघण्याच्या भीतीने 'भीक नको पण कुत्रा आवर' असे धोरण अवलंबून किशनने पहिले एक-दोन दिवस रफिउद्दिनकडे उघडपणे बघण्याचा प्रसंग देखील टाळला.

परंतु रफिउद्दीन थोडाच स्वस्थ बसणार होता? त्याचा पहिलाच कार्यक्रम म्हणजे त्याला दिसेल त्या त्या विशेष बंदिवानांच्या खटल्याची आणि चरित्राची माहिती विचारण्याचा होता. जन्मठेपेवर जाणाऱ्या प्रत्येक बंदिवानाची कथा म्हणजे एकेका अजब कादंबरीचे कथानक! असाधारण दुष्टता, सुष्टता विक्षिप्तता, संकटे, सुटका, रक्तपात, हत्या, उपद्रव, सूड, सुखदुःख, दुर्दशा ह्यांचा तो कोलाहल! तो पिंजरा म्हणजे जगातील कोणत्याही ग्रंथालयात न सापडणारे असे भावना उचंबळून आणि उन्मळून सोडणाऱ्या कादंबऱ्यांचे एक कपाट? नव्हे, खलनायकाचे जिवंत प्राणिसंग्रहालय! पहिल्या वर्गातील उतारू कोण्या आगबोटीवर जसा रोमहर्षक कादंबऱ्यांची पुस्तके चाळीत केबिनमध्ये गुंगून पडतो, तसाच रफिउद्दीन त्या पिंजऱ्यामध्ये त्या एकेका दंडिताचे रोमहर्षक चरित्र चाळीत नुसता रंगून गेला होता. किशन जरी चूपचाप, समुद्र लागून मगरळलेला आणि थिल्लरपणे अंथरूणावरचे पडलेला होता, तरी त्याच्याकडे रुफिउद्दीनचे लक्ष दोनदा- तीनदा जायचे ते गेलेच होते. आपल्या खटल्यातील त्या 'उल्लू किशन'शी त्याची मुद्रा किती तरी मिळते, असे आश्चर्यही रफिउद्दिनला एकदा-दोनदा वाटले, पण किशनसारखा एक 'मुर्दाड उल्लू' एकदा तशा भयंकर

खटल्यातून निर्दोष सुटल्यावर पुन्हा असल्या भानगडीत कधी काळी पडेल, ह्याची कल्पनादेखील त्याला असंभाव्य वाटल्यामुळे रफिउद्दिनच्या मनाला तो विचार एकदा चाटून गेला तरी चिकटून असा मुळीच राहिला नाही. तरी देखील त्या जिवंत रहस्यकथा वाचता वाचता हे पुस्तकही कसले आहे, असे वाटून रफिउद्दिनने दोघा-तिघांना शेवटी विचारलेच, "हा प्राणी कोण बुवा? न हालतो, न हसतो, न बोलतो, न चालतो! अगदीच थिल्लर! भुरटा चोर दिसतो कुणी!"

त्यावर त्याला एक दोघांनी सांगितले, "छे छे, आमच्या चलनांत तो आज दहा-बारा दिवस रुळलेला आहे. 'बाबू' आहे तो! फर्डा अंग्रेजी, संसकुरुत का काय शिकला आहे म्हणे! शिक्षा लागल्यावर तुरुंगात लिखापढीचच काम दिले होते त्याला! माणूस पण माणूस आहे हो तो बाबू!"

रफिउद्दिनची उत्सुकता वाढली, "नाव काय त्याच?"

"कंटकबाबू त्यांना म्हणत साहेबलोक देखील."

"त्याचा अपराध काय!"

"हत्या! खून!"

ही माहिती दोन-तीनदा ऐकतांच रफिउद्दिनला जणू जे हवे तेच सापडल्यासारखा आनंद झाला. कंटकबाबूला साहेबलोक देखील मानीत. तुरुंगात त्याला बंदिलेखकाचे काम आधीच मिळाले. आणि त्याला केवळ हत्येसाठी ही शिक्षा झाली, हे ऐकताच काळ्या पाण्यावरील नियमात मुरलेल्या त्या रफिउद्दिनच्या चटकन् ध्यानात आले की, ह्या जन्मठेप्याला काळ्या पाण्यावर जाताच आज-उद्या 'बाबू'चे महत्वाचे काम मिळणार, मनुष्यहत्येचा अपराध तात्कालिक आवेशात घडणे हा एक त्यातल्या त्यात सौम्य अपराध समजला जावा, हे रफिउद्दीनसारखे उलट्या काळजाचे निर्ढावलेले नृशंस पापीच ज्या काळ्या पाण्यावर जिकडे तिकडे पसरलेले आहेत, त्या यमपुरीत अगदी न्यायाला धरूनच होते. त्यामुळे तिकडे गेलेल्या दंडितांमध्ये जो अशा तात्कालिन आवेशात घडलेल्या हत्येसारखा अपराधाचा बंदिवान असतो तो सुधारणीय बंदिवानाच्या वर्गात नोंदविला जातो आणि त्याला पुष्कळ सौम्यपणे- काळ्या पाण्याच्या क्रूरतेतील सौम्यपणे - वागवले जाते. त्यातही अशा 'सुधारणीय' वर्गातील बंदिवानांपैकी जर कोणी लिहिणारा- वाचणारा असेल तर त्याला काळ्या - पाण्यावर बंदिवानातील लेखकाची जागा मिळते. त्याच्या हाती साहेबांच्या सान्निध्याची किल्ली पडल्यामुळे इतर निर्ढावलेल्या दरोडेखोरादिक बंदिवानांच्या भवितव्याची बरीच सूत्रे त्या लेखक बंदिवानाच्याच प्रतिवृत्तान्तावरून चाळविली जातात. कोणाला वॉर्डर करणे, वॉर्डरांना लाभाची, सोयीची कामे वाटून देणे, काराद्वारावरील आवकजावक टिपणे, शिपायांची उपस्थिती ठेवणे, मोठमोठ्या कारखान्यांचे आयव्ययगणन ठेवणे, अशीं कामे ह्या लेखक बंदिवानांच्या हातीच हळूहळू सोपविली जातात. त्यामुळे निर्ढावलेल्या बंदिवान वॉर्डर -प्रभुति दंडितांवरचे नव्हे, तर स्वतंत्र अशा शिपाई- कामगारांवरही ह्या बंदिवान लेखकवर्गाची मोठी छाप पडलेली असते. त्यांची सगळी लाचलुचपतीची अंडीपिल्ली उघडकीला आणणे वा उबविणे पुष्कळ

अशी ह्या बंदिलेखकाच्या हातीच असते. ह्याचे बंदिलेखकांना 'बाबू' म्हणतात, दंडित जन्मठेप्यांच्या परिभाषेत!

रफिउद्दिन काळ्या पाण्यावरून पळून जाण्याच्या घोर अपराधासाठी परत काळ्या पाण्याचीच शिक्षा होऊन जाते असल्यामुळे तिकडे त्याला प्रथम प्रथम तरी कठोर स्थितीत राबावे लागणार, हे तो जाणून होता. अशा प्रसंगी त्याच्याच चलनातील एक जण जर असा बाबू होणार असला तर त्याची दाट ओळख आपल्याला फारच उपयोगी पडेल, हे त्याच्या तेव्हाच लक्षात आले आणि म्हणूनच त्या 'कंटकबाबू'ला प्रसादविण्याची त्याला एवढी लालसा वाटली. त्याने लगेच कंटकबाबूपाशी जाऊन ओळख करून घेतली. त्याचे नाव कंटक, अपराध साध्या हत्येचा, त्यामुळे त्याची मुद्रा किशनशी जुळे असे वाटत असताही इतर गोष्टींची कशाला काही मेळ नसल्याने रफिउद्दिन बऱ्याचशा निःसंदेहपणे कंटकबाबूशी घसट करू लागला. कंटकबाबूला शक्य ते साहाय्य देऊन चुचकारू लागला. त्याच्या ओळखीच्या आणि ऋणानुबंधाच्या शिपायांचा पहारा आला की कंटकपाशीच जाऊन त्याने शेवटच्या दोन रात्री आपल्या अघळपघळ गप्पाष्टकांचा अड्डा ठोकला. कंटकलाही त्याच्यापासून पुष्कळ माहिती हवी होती, नव्हे, त्याच्याशी जर संधान बांधता आले तर काळ्या पाण्यावरून पळून जाण्याचा एखादा मार्ग आपल्याही सापडणार नाही कशावरून? अशी निकराची धाडशी आशाही कंटकला मोहवू लागली! गारुडी जसा नागाशी तसा कंटकही रफिउद्दिनशी त्याच्या विषारी दंशाच्या टप्प्याबाहेर शक्यतो राहून करता येईल तसा खेळ करू लागला. त्याची आपल्याला काहीच माहिती नाही, हे रफिउद्दिनच्या मनावर पूर्णपणे ठसविण्यासाठी गप्पांचा अड्डा रात्री पडला तेव्हा किशन म्हणाला,

"पण मिय्याजी, आपल्यासारखा धाडसी नि चतुर पुरुष काळ्या पाण्यावरून पळून येण्याच्या दुष्कर अशा लपंडावी साहसात तिकडे यश मिळवितो नि इकडे देशात सुखरूप पोचल्यानंतर हिंदी पोलिसांच्या जाळ्यात पुन्हा न फसण्याची जी अगदी साधी चतुराई ती करण्यास चुकून त्यांच्या जाळ्यात इतक्या पक्केपणी पुन्हा फसतो, हे झाले तरी कसे? चोऱ्या, दरोडे इत्यादि दुष्कृत्यांपाई एकदा भयंकर ठोकर खाल्ली असता आपण हिंदुस्थानात तुम्हाला काळ्या पाण्यावरून पळून येण्यात जी जिवावरची संकटे भोगावी लागली असतील ती ह्या चुकीमुळे सारी निष्फळ व्हावी नि पुन्हा तीच दुर्दशा भोगायला जावे लागाव ह्याचे मला फार वाईट वाटते, म्हणून विचारल्यावाचून राहवत नाही!"

"कंटकबाबू, क्या कहूं! मैने सचमुच बडे प्रामाणिकपणे अपना जीवन चलानेका निश्चय किया था! काळ्या पाण्यावरून पळून हिंदुस्थानात येताच मी फकिरीच घेतली!! हिंदु साधूवरही माझी भक्ति बसल्यामुळे मी योगाच्या अभ्यासाला लागलो, कंटकबाबू तुम्ही सारे जण खरे माना न माना, पण देवाच्या शपथेवर सांगतो की पूर्वी दरोडे, चोऱ्या उपद्रवादि पापं मी जी केली ती केली, पण काळ्या पाण्यावरून आल्यानंतर मी जर कशाचा लोभ धरला असेल तर तो भक्तीचा, योगाचाच काय तो होय. भोग असा मला रुचेनासाच झाला आणि खरे पाहता मजवर हे संकट जे

पुन्हा गुदरल; ते माझ्या कोणत्याही नव्या दुष्कृत्यामुळे नसून धर्मन्यायाने वागायचा निश्चय केल्यानंतर जे एक सत्कृत्य माझ्या हातून करवून घेण्याच देवाच्या मनात आले त्या सत्कृत्यामुळेच होय!” तो गंभीर विचारात गुंगल्यासारखा गप्प झाला.

ते ऐकणाऱ्या अनेक बंदिवानांच्या तोंडातून एकसहाच प्रश्न बाहेर पडला, “असे? बोलो ना मिय्याजी, कहो क्या बात हुई? ते कोणत सत्कृत्य?”

आपला पूर्ववृत्तान्त माहित असलेला इथे कोणीही बंदिवान नाही, अशी बरीच निश्चिती झालेला रफिउद्दिन कोण्या धर्मवीराच्या बाण्यात सांगू लागला, “क्या कहूं बाबूजी? अच्छा, आपने गवालियारका नगर देखा है?”

कंटकबाबू उत्तरले, “नाही!”

त्यामुळे आता ग्वाल्हेरविषयी काय तोंडाला येईल ते ठोकून देण्यास हरकत नाही. असे ताडून रफिउद्दिन पुढे हिंदीत कथू लागला, “ग्वाल्हेरच्या एका मोठ्या सरदाराची एक अत्यंत सुस्वरूप मुलगी होती. तिच नाव मालती. ती इतकी गोरीपान, सौंदर्याने निर्मळ, तितकीच देवलसी. मी योगाचा अभ्यास हिंदु साधूपाशी करीत असता भगवी कफनी घाली नि देवळात बसे. तिथेच ती पूजेला येई. मला पाहाता पाहाता तिची माझ्या साधुत्वावर म्हणा, रूपावर म्हणा, पण फारच भक्ति जडली. तिने पूजेची फुल मलाच वाहावी, नैवेद्यही दाखवावा, भजनाला रात्र पडेतो बसाव. एके वेळी तिला अशीच रात्र झाली. तेव्हा “एकटी घरी जायला भीति वाटते, आपण घरापर्यंत मला पोचवा,” म्हणून तिने गळ घातली. माझ्या गुरुजींना विचारून निःसंकोचपणाने मीही तिला पोचवायला निघालो. देऊळ गावापासून लांब, मध्ये एक आंबराई, निर्जन, तिथे येताच एकदम घाबरून गेल्यासारखी मालती माझ्या अंगाला लगटली. स्त्रीस्पर्श मला तर वर्ज्य! पण काय करणार? तिने गळ्यालाच मिठी मारलेली! थरकापत ती म्हणाली, “माझ्यावर एक मनुष्य पापी दृष्टि ठेवून आज कित्येक दिवस मला सतावतो आहे. मी तुम्हांला देवासमान मानून भजते, तुमच्याकडे येते जाते, ते असह्य होऊन मला त्याने काल इथेच अडवले होते नि ठार मारायची धमकी दिली होती. ह्यासाठी मी आज तुम्हांला सोबतीला घेतल! मला त्याची आत्ताच चाहूल लागलीशी वाटते!’ मी विचारल, ‘तो कोण? त्याच नाव काय?’ ती म्हणाली, ‘किशन! त्या नीचाच नाव किशन!’

“ते नाव ऐकताच माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले! कारण ती व्यक्ति माझ्या चांगल्या माहितीची होती! काळ्या पाण्यावर मी पूर्वी गेलो त्याच्याआधी आम्ही जे दरोडे मारीत असू त्या टोळीतच किशन हा उलट्या काळजाचा दरोडेखोर सामावलेला होता. पळून आल्यानंतर तो मला ग्वाल्हेरलाच गुप्तपणे भेटला नि मी पुन्हा त्याच्या दृष्कृत्यात भागी ठेवावी, असे म्हणाला. पण मी ‘माझे हातच नव्हे तर मनही सर्व पापांमुळे धुऊन देवाच्या सेवेला वाहिल - तूही असेच कर!’ असा उपदेश त्याला देताच तो शांत न होता उलट खवळला. माझी तीव्र निर्भर्त्सना करून माझा सूड उगवायची धमकी देता झाला. त्या सर्व माहितीमुळेच मी किशनला चांगलाच ओळखून होतो.

किशन एक अधम होता. किशन हा एक निर्दय भामटा होता. किशन भयंकर दुराचारी होता. कृतीने दुष्ट असताही तो बुद्धने एक निव्वळ गद्धा होता! कंटकबाबूजी, आप जो क्षमा करेंगे तो केवले हसीकी एक बात बतलाऊंगा! सांगू? हसू येत आता मला त्याच! मी ह्या पिंजऱ्यात कोंडलो गेल्यानंतर प्रथम प्रथम जेव्हा तुम्हाला पाही ना, तेव्हा तेव्हा या किशनच्या तोंडावळ्यासारखा मला तुमचाही तोंडवळा भासे!"

रफिउद्दिन हसू लागला, बंदिवानही हसले. तत्काल कंटकच्या पोटात धस्स झाल्यावाचून राहिले नाही? हा भामटा अशी घालून पाडून मिर्भत्सना करीत आहे, त्यात मीच किशन आहे की नाही हे चाचपण्याचा तर ह्याचा हेतु नाही ना? अशी शंकाही 'कंटक'ला आली आणि त्याचा तोच हेतु असल्यास तो निष्फळावा; ह्यास्तव रफिउद्दिनने किशनला हासडलेल्या शिव्यांची गुप्त चीड, मालतीच्या नावाचा त्याच्या तोंडी चाललेला तो उद्धार ऐकताच वाटणारा सोपहास तिरस्कार आणि ती शंका ह्या सर्व विचारांची खळबळ आतल्या आत दाबून कंटक रफिउद्दीनच्या आधी बंदीवानाच्या हसण्यात आपलेही हसू मिळवीत म्हणाला, "ठीक, मिय्याजी, ठीक तो किशन एक निव्वळ गद्धा होता म्हणता नि माझा तोंडवळा त्याच्यासारखाच तुम्हाला दिसला म्हणून सांगता; म्हणजे माझा तोंडवळा गद्ध्यासारखा आहे असे का तुमचे म्हणणे?"

हसत पण हात जोडून रफिउद्दिन क्षमा याचू लागला, "हे काय बाबूजी! किशनची बुद्धि गाढवासारखी होती; पण त्याचा तोंडवळा चांगल्यापैकी होता, हे मी आपल्या तोंडवळ्याशी तो तोलून सुचविणारा होतो! कुठे सदाचारी कंटकबाबू नि कुठे तो दुराचारी किशन!"

"इच्छा! आगे क्या हुवा?" गोष्टीत रंगून गेलेला एक बंदिवान घाई करू लागला!

"आगे क्या कहूं भाई! मी मालतीला धीर देतो न देतो तो झाडीतून दगडामागून दगड येऊ लागले त्या अबलेच रक्षण हाच माझा धर्म समजून, तिला एका हाताने अशी कवटाळून घेत मी पण उलट दगड फेकू लागलो नि शक्य त्या त्वरेने गाव गाठले. तिचा वाडा येताच ती गहिवरून म्हणाली, 'माझ्या माडीच्या दाराच्या किल्ल्या माझ्यापाशीच आहेत, माझी माडी स्वतंत्र माझ्याकडेच असते, आपण वर येऊन माझ्या हृदयातील भीतीची धडधड बंद होईतोपर्यंत तरी माझ्यासंगे राहा, मग जा.' मी तिच म्हणणे नाकारणे म्हणजे अबलेशी कठोरपणाने वागायच पाप करणे होते! मी तिच्या माडीवर गेलो. आत पाय टाकतो तो तिने दार आतून कडी-कुलूप केले! पाहतो तो जिकडे तिकडे साजसजावट, सरदारी सौंदर्य, सुगंध च सुगंध, आरसे, चित्र, पलंग, पुष्पपात्रंर केवळ अद्रभुवन! आणि मध्ये ती गोरीपान मालतीर रूपाची केवळ अप्सरा! माझ्या गळ्याला तिने पुन्हा घट्ट मिठी मारली! कामोन्मत्त पुरुषांनी स्त्रीवर केलेले बलात्कार तुम्ही पुष्कळ ऐकले असतील; पण त्या कामलंपट स्त्रीने, मालतीने माझ्यासारख्या एका साधुपुरुषावर बलात्कार केल्याची अशी कथा कधी ऐकलीत का?"

“वो सब् जाना देव! परंतु...” एक लुच्चा बंदिवान छद्मपणाने हसला, “सच बोलो मिय्याजी, तो बलात्कार का होईना, पण तुम्हाला हवासा वाटला की नाही? तिच्या त्या गोऱ्यापान मऊ मऊ देहाची ती घट्ट मिठी पडताच तुम्हाला काय मालतीचा राग आला? शपथ देवाची!खरे सांगा!”

मोठ्याने हसत जणू काय हवा तोच प्रश्न झाला असे वाटून असे वाटून रफिउद्दिन मिटक्या मारीत बोलला, “मित्रा, शपथ देवाची! मालतीचा राग तशा स्थितीत तिथे शुकदेव जरी असता तरी त्यालासुद्धा आला नसता! मालती! हाय! मेरी गोरीपान मऊ मऊ मालती! तिचा राग? अरे मित्रा, ती माझी जान आहे जान!...”

सगळे बंदिवान खो खो हसले!

भर रंगभूमीवर कोण्या काळ्याकुट्ट नटाच्या तोंडावर फासलेली रंगाची पूड मध्येच कोठे पुसून गेली असता त्याचा काळा रंग तेवढा जागीच डांबरी चट्ट्यांसारखा जसा दिसू लागतो; तसे त्या ढोंगी मनुष्याच्या मनाचे मूळचे काळेपण ती साधुत्वाची शुभ्र पूड अशी पटकन् पुसली जाताच उघडे पडले! पण नट जसा लोक हसताच सावधून तो काळा चट्टा रूमालाने झाकून मूळचा अभिनय पुढे अभिनय कसाबसा संपवून टाकतो, तशा गोंधळात रफिउद्दिनने मनाची सावरासावर केली.

“पण मला हो-ना म्हणायला तिने वेळच दिला नाही. कुठलासा कसल्या तरी मोहनाचा एक रूमाल तिन माझ्या नाकाशी घट्ट धरला; त्या श्वासाने मी गुंगल्यासारखा झालो नि निपचित पलंगावर पडलो. अर्धा बेशुद्ध, प्रतिकाराला पुरता अक्षम! फेर क्या पुछते हो यार! बस्स्! मोहनास्त्राने हालचाल बंद केलेल्या, भान हरपलेल्या माझ्यासह ती प्यारी मालती मनसोक्त आनंद लुटीत राहिली. पहाटेच्या वेळेला तिने हुंगायला दिलेल्या त्या मूर्च्छाचूर्णाची गुंगी ओसरून मी पुरता भानावर आलो नि म्हणालो,’ऐ जादुगारीण! अब तो मुझे छोड दे! सकाळी तुझे लोक मला पकडतील, तुला पकडतील!’ ती म्हणाली ‘छट! प्रियकरा, हे काय बोलतोस! कामरूप देशांतील एका मांत्रिकाने मला एक विद्या शिकवली आहे. मी तुला एक पोपट करून ह्या सोन्याच्या पिंजऱ्यात दिवसभर ठेवीत जाईन; रात्री पुन्हा तुझे रूप तुला येऊन तू माझ्याशी असाच रममाण होते जा!’ हे तिच बोलणे ऐकताच मी भीतीने थरथर कापू लागलो! पुराण्या कथानकातून अशा कामरूपातील मांत्रिकांच्या विद्या शिकून माणसांना पक्षी करून ठेवलेल्या जादुगारीण राजकुमारीच्या मी ज्या अजब गोष्टी वाचल्या होता, त्या मला आठवल्या!”

मध्येच एक छद्मी बंदिवान हसला, “त्या अजब गोष्टीतीलच ही एक गोष्ट नाव बदलून तर सांगत नाहींना मिय्याजी आपण?”

“देवाची शपथ! माझ्या रूपावर मोहून मालती सचमुच ऐसाही बोली थी भाई! और क्या कहूं? तुला पोपट करते असे ती म्हणते न तोच, माझ्या वदनाची चोच, हाताचे पंख नि देह आकुंचन मी पोपट होतो आहे असे मला धडधडीत दिसून येऊ लागले! ‘नको नको, तुझ्या पाया पडतो प्यारे मालती, सोडून दे मला!’ अशी गयावया करू जातो तो माझी मनुष्यवाचा त्या माझ्या नव्या

तोंडातून - त्या पोपटाच्या चोचीतून - निघेनाशी होऊन मी नुसता पोपटासारखा चक चक चक करीत राहिलो!' रफिउद्दिन त्या आठवणीने अंगावर काटा आल्यासारखा थोडा अंग चमकून थांबला!

अलौकिक किंवा अजब गोष्टी सांगणाराही भोळसटपणे ऐकणाऱ्यांना तेवढ्यापुरता तरी एक अजब मनुष्य वाटू लागतो! त्या बंदिवानातील बहुतेक जण अडाणी, आश्चर्यप्रिय आणि अपक्वबुद्धि भोळसटांतीलच असल्यामुळे तेही त्या गोष्टीत अगदी गुंगून जाऊन रफिउद्दिनच्या तोंडाकडे टकमक बघत राहिले. त्या राजकुमारी जादुगारिणीने त्याला पोपट करून टाकले, ह्या कल्पनेसरशी त्यांच्याही अंगावर, रफिउद्दिनचे अंग थरारताच काटा उभा राहिला. दुसऱ्याने जांभई दिली की आपल्यालाही केव्हा केव्हा अशीच जांभई येऊ लागते! त्या गोष्टीत तन्मयलेले ते बंदिवान आग्रह करू लागले, "अच्छा, आगे क्या हुवा! बोलो ना, फेर क्या हुवा!"

"फेर हुवार जन्मठेप कालापानी! और क्या?" कंटकबाबू थोडासा चिडून म्हणाला, मघापासून मालतीच्या विटंबनेने त्याच्या मनात दबलेला राग थोडा तरी उफाळलाच! पण तेवढ्या अवकाशात ज्या एका पुस्तकी भारुडाला आपल्यावर लावून रफिउद्दिन ती कहाणी सांगत होता, तिचा रफिउद्दिनला न आठवणारा शेवटचा कथाभागही त्याला काहीसा आठवून तो पुढे सांगू लागला,

"फेर क्या पूछते हो भाई! मला ती पोपट बनवून पिंजऱ्यात कोंडू लागली! परंतु माझ्या सुदैवाने मला माझ्या एका ऐंद्रजालिक गुरूंची अचानक आठवण झाली! ह्याचे गुरूने मला समुद्रावर चालत जाण्याची ती विद्या शिकवली होती की जिच्या बळे मी काळ्या पाण्यावरून अदृश्य होऊन देशी परतलो होतो! त्या गुरूने मला सांगितले होते की, कुणी तुझ्यावर उलट जादू मारली तर माझे तीनदा नाव घे! बस्स्! मैने गुरूके नाम तीनदा घेताच फटकिनी पुन्हा पोपटाचा मनुष्य झालो! ती जादुगरीण सुंदरी चमकून पाहते तो मी दाराशी धावत गेलो होतो! पण काय! दार कडीकुलूपलेल बंद! झटपट मी खिडकीशी आलो नि जीव घेऊन खिडकीतून खाली जी उडी घेतली, ती थेट खालील राजमार्गाच्या फरशीवरच!

परंतु हाय हाय! आगीतून निघून फुफाट्यात काय तो पडलो! कारण राजमार्गात कोसळलेला मी उभा राहून सावरून जो पळतो तोच माझ्या कंबरेला विळखा मारून कुणी तरी मोठमोठ्याने ओरडायला आरंभले! तो किशन होता! तो नीच किशन, तो भामटा किशन, माझी पाळत राखून, गुप्तपणाने पाठलाग करीत, त्या आंबराईतून येऊन तिथे छपलेला होता! मी रागाने बेभान होऊन हातातील धारबंद चिमटा त्याच्या पोटात खुपसला. तो पापी तिथल्या तिथेच ठार झाला! पण इतक्यात माणसंच माणस त्या आरडाओरडीने जमा होऊन मला पोलिसांच्या हाती देती झाली! आणि शेवटी मालतीच नाव बद्दू करण्यापेक्षा मीच माझ्यावर ह्या हत्येचे दायित्व घेतल्यामुळे मला हे पुन्हा जन्मठेप काळे पाणी झाले! एका अबलेच्या रक्षणापायी ह्या जंजाळात फसलो; धरमके लिये मैने यह बलिदान किया!"

"आणि ती राजकुमारी? त्या मालतीच पुढे काय झाले?" एक बंदिवान दुःखाचा उसासा टाकीत पुसू लागला.

"क्या पूछते हो भाई! वह प्यारी मालती! माझ्या विरहाने वेडी झाली! हाती एक माळ, तीसह 'हाय रफिउद्दिन!' 'हाय रफिउद्दीन!' असा जप करीत मथुरेच्या वाटेवाटेने जो भेटेल, त्याच्यापुढे आज ती हे सुरेल पद गात विचारीत भटकत आहे- 'बता दे सखि कौन गली गये शाम?"

रफिउद्दिन ते पद गाऊन दाखविणाऱ्या बेतातच आला होता. पण स्वतःच्या उपमर्दाच्या त्या गोष्टीचा पाल्हाळ अगदी असह्य झालेल्या कंटकने तो विषय एकदाचा बदलून टाकण्याची ही संधि साधून विचारले,

"पण मिय्याजी, मंत्रविद्येने समुद्रावर पायी चालत जाण्याची अलौकिक शक्ति जर आपल्या अंगी आहे, तर आपण आताच उडी घेऊन परत देशी का जाते नाही?"

"कितने भोले हो कंटकबाबूजी आप! पोलिसांसमक्ष उडी टाकली, तर भूमीवर पाय ठेवताच ते पुन्हा पकडतील! और दूसरी बात ऐसी है की ती विद्या स्त्रीस्पर्श झाला की काम देईनाशी होते! मालतीच्या आधी मी स्त्रीस्पर्श असा कधीच केला नव्हता! आता पुन्हा तीन वर्ष तरी अखंड ब्रह्मचर्य पाळल्यावाचून देह तसा हलका होणार नाही की तो पाण्यावरही अलगद चालवता यावा! वीर्यसंचय झाला की त्याच तेजोमय ओज मस्तकातून उंच जाऊ पाहात. त्यामुळे देह आपोआप वर उचलला जातो. ह्यालाच योगविद्येत लघिमासिद्धि म्हणतात. ती साधली की जलस्तंभनमंत्र सफळतो! मग काळ्या पाण्याचा समुद्र म्हणजे बंगल्यात अंथरलेली सतरंजी! तिच्यावर नुसत मनात आले की चलाव!"

"पण मिय्याजी, ह्या जन्मठेपीच्या स्थलालासुद्धा काळे पाणी का म्हणतात?" एका बंदिवानाने विचारले.

"गवार लोक म्हणतात तसे, झाले! त्याच खरे नांव काळे पाणी नसून अंडेमान है अंडेमान!"

"पण त्याला अंडेमान तरी नाव का पडले? तिकडे कोंबडीची अंडीच अंडी पिकतात की काय!" बंदिवान जिज्ञासले.

त्यांच्या अज्ञानाची कीव आल्यासारखे हसत हसत कोण्या इतिहाससंशोधकाच्या ऐटीत रफिउद्दिन सांगू लागला, "अंडेमान नाव कसे पडले ते बड्या बड्या अंग्रेजांना देखील कळत नाही. हिंदूतील काही गवार लोक म्हणतात, हनुमानजीने आपल्या नावाची आठवण म्हणून त्या बेटाला 'हनुमान' म्हणावे, असे लंकेवरून परततांना सीताजीला विनवले! पण हे झूट आहे; सच बात तो मेरे गुरूने कही वोही है! सुनो! सृष्टीच्या आधी जेव्हा जिकडे तिकडे पाणीच पाणी होते. तेव्हा मक्काशरीफमे एक ईश्वरका प्यारा अवलिया रहता था. ईश्वराने त्याला सांगितले, एक नौका घे नि पूर्वेकडे चालू लाग! अगदी सूर्य उगवतो तिथपर्यंत! जिथे तुला हवे तिथे, तुला हवी त्या आकाराची भूमि, त्या आकाराचा पदार्थ तू समुद्रात टाकताच निर्माण होईल! माणसांसाठी आता समुद्रात अधिक स्थल मी निर्मू इच्छितो!' ईश्वराची आज्ञा होताच अवलिया तसाच नौकेत बसून समुद्रात मनाजोगे स्थल कुठे निर्मावं ते त्याला कळेना. इतक्यात आकाशवाणी झाली, 'तुझी नाव वल्हवतो आहेस तिथेच स्थल निर्माव!' त्यासरशी अवलियाने आपली वेलबुट्टींनी सजवलेली सतरंजी

समुद्रावर अंथरली! आणि कोण आश्चर्य! त्या सतरंजीचीच लगोलग नाना वेलीलताफुलाही डंवरलेली एक विस्तीर्ण, सुपीक सपाट भूमि झाली! तीच ही हिंद! हे हिंदुस्थान!- तीवर ईश्वराला एक कोकराचा बळी देऊन अवलिया तिथून नाव वल्हवीत लंकेला वळसा घालून पुढे चालला. तो एक प्रचंड वादळ झाले, त्याची नाव उलटली; सारी बस्तविस्त बुडाली. अवलियाही गटांगळ्या खाऊ लागला. तो बुडताच, पण कुराणशरीफ उसके हातमे था, उसको बादलका बाप भी न डुबा सकेगा! त्या कुराणशरीफला उंच करताच तो तरला, त्याने नाव पुन्हा सुलटी केली, तोच आकाशवाणी झाली, 'ह्या समुद्रात अशी वादळे नेहमी होतात, तेव्हा इथल्या ह्या समुद्रातील जलप्रवासाला सुरक्षितपणा यावा, म्हणून इथे एक स्थल निर्माव!' ही आकाशवाणी ऐकताच तिथे काही वस्तु फेकावी म्हणून अवलिया पाहू लागला, तो त्याच्यापाशी काही वस्तुच नाही! एक हाती कुराणशरीफ नि दुसऱ्या हाती खाण्यासाठी म्हणून मोठ्या काळजीने धरलेल एक कोंबडीच अंडे तेवढे होते. तेव्हा अवलियाने ते अंडे समुद्रावर फेकले नि म्हंटला, 'हो जावे भूमि!' बस्स, तुरंतही अंडसे बेट बना! असे लिये उसका नाम पडा 'अंडेमान'! अंडेका बेट!"

"या खुदा! क्या तेरी करामत!" एक मुसलमान फकीर दंडितांपैकी होता तो धर्माभिमानाने फुरफुरत आपल्या शेजारील सर्व हिंदु बंदिवानांना हिणविता झाला, "देखो, हमारे इस्लाम धरम की बडेजावी!! कैसे कैसे अवलिया! कुराण शरीफमे इमान रखनेसे आदमी कैसे करामती बनते है! क्यो कंटकबाबू, आप इस किस्सेको सच मानते है या नही?"

सारे हिंदु बंदिवान कंटकबाबूच्या तोंडाकडे, ह्या फकिराने आपल्या हिंदु धर्माचे काढलेले हे उणे सव्याज फेड कराच करा, अशा आदेशक लालसेने पाहू लागले. कंटकबाबू हसला. "जर मिय्याजीने सांगितलेली ही त्या अवलियाची अजब कथा खरी असेल तर आमच्या पुराणातील अगस्ति ऋषींचीही कथा खरी असलीच पाहिजे! आणि ह्या अवलियापुरतच पहायच तर हिंदु अवलिया अगस्ति हाच ह्या मुस्लिम अवलियापेक्षा अधिक करामतीचा होता हे उघड आहे की नाही हे तुम्हीच सांगा. कारण ज्या समुद्राच पाणी नाकातोंडात भरून हा मुस्लिम अवलिया गटांगळ्या खाता झाला, तो समुद्रच मुळी त्या अगस्ति ऋषीची होती केवळ लघुशंका!"

सारे हिंदु बंदिवान विजयानंदात खो खो करून हसले! जो तो म्हणू लागला, 'भली जिरवली!"

पण ह्या एकाएकी झालेल्या गलक्याने रागावून पिंजऱ्यावरील पहारेकरी ओरडला, "ए बदमाष लोग! तुम्हाला चूपचाप बोलायला सवलत दिली, त्याचा हा परिणाम करता काय? काळ्या पाण्याच्या पिंजऱ्यात आहा, की आपल्या बापाच्या बंगल्यात? उठा, जा, आपापल्या अंथरूणावर जाऊन निजा! जावे! जावे!"

सारे जण त्या कडक आज्ञेसरशी पटापट आपआपल्या अंथरूणावर जाऊन पडले. तरी देखील पहारेकरी रफिउद्दिनच्या अर्ध्या 'हळकुंडा'ने पिवळी झालेला असल्यामुळे रफिउद्दिनकडे काही त्याने प्रत्यक्ष असा त्या आज्ञेचा रोख दाखविला नव्हता. ह्यामुळे रफिउद्दिन मात्र तसाच एकटा

कंटकबाबूच्या अंथरुणापाशी टिकाव धरून पण गुपचूप असा थोडा वेळ बसला. मग वातावरण शांत झालेले पाहून, एकांत साधून, कंटकबाबूच्या अगदी कानाशी बोलू लागला,

"कंटकबाबू, आजची ही ह्या पिंजऱ्यातील इतक्या मोकळेपणी बोलण्याची शेवटली रात्र! उद्या ही आगबोट काळ्या पाण्याला लागणार. आपण सर्वजण त्या भयंकर तुरुंगातील कोठड्यातून, एकलकोंडी कोठड्यातून तालेबंद कुलुपबंद केले जाणार! मला प्रथम प्रथम फार कडक पहाऱ्यात ठेवण्यात येईल; फार कठीण सक्त कामं देण्यात येतील, छळ होईल; पण तुम्ही लवकरच 'बाबू' व्हाल. तुमचे संबंध ऑफिसातील कारकुनादिकांशी येऊन आम्हां कडक पहाऱ्यातील बंदिवानांवर उपकार करण्याच्या हजार संधि तुम्हाला सापडतील! जर तुम्ही मला ह्या पहिल्या वर्षांत तुमच्या हाती येईल तेव्हा तेव्हा सवलतीने घ्याल, तर बाबूजी, मी पण तुमच्या कल्पनेबाहेर तुमच्या उपयोगी पडेन! हे पहा, पहिले एक वर्ष मला कठीण; ते उलटले की तिकडच्या रीतीप्रमाणे नि माझ्या ओळख - पैसा वशिल्यामुळे मला तुरुंगातून बाहेर सोडतील लवकरच. मी बंदिवान जमादार होणार! लिहून ठेवा हे; आणि मग तुमच्या पहिल्या उपकारांची फेड तुमच्या शतपटींनी अधिक उपयोगी पडून करीन! आणखी-आणखी सांगू का? जर तुम्ही माझ्या शब्दांवर विश्वसत असाल नि माझ्याशी भाऊबंदीच नात मनापासून जोडू इच्छित असाल तर - तर जेव्हा पुन्हा एकदा काळ्या पाण्यावरील अधिकाऱ्याच्या हातावर तुरी देऊन त्या पिंजऱ्यातून एक पक्षी निसटेल, तेव्हा बाबूजी, तुम्हाला पण तुमची ही जन्मठेपेची असह्य बेडी तुमच्या पायातून अचानक गळून पडली आहे असे दिसेल - अर्थात् ती तुटावी अशी तुमची मनीषा असेल तर!"

"मनीषा? मिय्याजी, माझा तो निर्धार आहे, नुसती इच्छाच नव्हे! पण मार्ग कोणचा? साधन काय? तुमचे हे बोलणे प्रामाणिकपणाच आहे हे मी कसे समजू? ती खरी खरी माहिती जर मला पटेल अशी सांगाल, तर मी तुमच्यावर विश्वसेन!"

"इच्छा कंटकबाबू, तुमको वह सब बात मैं संधि मिलतेही सच सच कहूंगा. देखो, भाईभाईका नाता जितना अपने घरमे प्यारा लगता है, उतनाही जो नाता तो काले पानींमे प्यारा समजा जाता है. वह 'चलानी' यह है! एकाच चलनात जे येतात, ते सारे दंडित एकमेकांचे 'चलानी' ह्या नात्याने भाईबंद होतात! हे एक नव गोत्रच बनत तिथे! आपलंही तेच नात जुळते आहे. तुम्ही माझे चलानी आहात माझे भाई आहात! कंटकबाबू, तुम्ही माझ्यावर विश्वास टाका, टाकू नका, पण मी तुम्हांला माझे वचन दिले. तुम्ही माझे भाऊ. माझे चलानी. मी तुमच्या जिवास जीव देईन! केले तर तुमचे हितच करीन. विश्वासघात तर कधीही करणार नाही! दरोडेखोर तर खरेच आम्ही, पण आमच्यात एक विशेष असतो, तो हा की, आम्ही जितके दुष्ट होऊ शकतो, तितकेच मनात आले तर सुष्टही होऊ शकतो. तुम्ही माझ्याशी भाईबंदी निष्कपट ठेवून पाहा! उपकार केला, तर आमच्यासारखा हिंस्त्र पशूसुद्धा कधीं कधी उपकारकर्त्याला विसरत नाही, उपद्रवीत नाही. प्रत्युपकारिल्यावाचून सोडीत नाही! जसा त्या अंडोक्लीजला तो सिह!"

“रफिउद्दिन!” पहारेकरी घाईघाईने ओरडला, “ऊठ जावो! पहारा बदलण्यासाठी जमादार येतो आहे! जा आपल्या जागी! आमची पहाऱ्याची पाळी संपली!”

रफिउद्दिन लगेच उठला. “बंदिवानांना आपसात बोलण्याचा सक्त निषेध! ओळखीचा पहारेकरी म्हणून साधले हे साधले! आता उद्या सकाळी काळ्या पाण्याला ही आगनाव लागणार! आता हाच सलाम! भुलना नही जो कुछ बात अभी हुई उसको! आजसे, कंटक, तुम मेरे भाई हो! आप चाहे मुझे कुछ भी समजो!”

इतके कंटकशी घाईघाइने बोलून रफिउद्दिन आपल्या जागी परत गेला. सकाळीच जिकडे तिकडे गडबड उडाली, “आया, काला पानी आया!”

त्यासरशी कठोर, क्रूर, उलट्या काळजाच्या जन्मठेप्या दंडितांच्या हृदयातही धस्स झाले! धडकी भरली! “आया! काला पानी आया!”

त्या दंडितांच्या हृदयाप्रमाणेच जणू काय तिच्याही हृदयाला धक्का बसावा तशी ती अगडबंब आगबोटही धक्क्यावर धक्के खात धडधडत धडधढत बंदरात शिरली आणि तिचे बंब भोकाड पसरून भोंऽ ऽ भों ऽऽ भुंकारू लागले.

आया! काला पानी आया!

***

अकरा

जगात आजही काही भूभाग असे आहेत की, ज्यांना भूगोल आहे, पण इतिहास असा नाहीच. काळे पाणी ज्याला आज म्हणतात, तो अंदमानचा द्वीपपुंजही त्या भूभागातच गणला पाहिजे.

ज्या काळी हिंदुराष्ट्राने आपल्या स्वतःच्या पायात सिंधुबंदीची बेडी स्वतःच ठोकून घेतली नव्हती, विधर्मीयांसच नव्हे, तर स्वधर्मीय हिंदुहिंदूसुद्धा विजातीयांसह खाण्याने वा पिण्याने जातच जाते, धर्मच बुडतो, अशा बाष्कळ धर्मभोळेपणापायी हिंदुस्थानाबाहेर गेल्याने विधर्मी, विदेशी, विजातीयांसह अन्नोदकव्यवहार घडून आपली जाते नष्ट होणारच, ही भ्रामक भीति हिंदु-राष्ट्राच्या पोटात उत्पन्न झाली नव्हती आणि तिच्या योगाने तिन्ही बाजूंच्या समुद्रावरचे नव्हे, तर चौथ्या बाजूच्या भौमिक सीमेवरही 'अटके'च्या धार्मिक चौक्या बसून कोणीही हिंदु देशाबाहेर असा ज्या काळापासून जाईनासाच झाला, त्या साधारणतः इसवी सनाच्या नवव्या दहाव्या शतकाच्या काळापूर्वी हिंदु राष्ट्राचे त्रिविक्रमशील चरण, ह्या सिंधुबंदीच्या बेडीने जखडलेले नसल्यामुळे पूर्व-पश्चिम-दक्षिण समुद्रांना आणि महासागरांना उल्लंघून राजकीय, धार्मिक, सामाजिक दिग्विजय करीत त्या काळाच्या ज्ञात जगात आपणा हिंदूंचे महासाम्राज्य गाजवीत चाललेले होते. परदेशगमन त्या काळीं मुळीच निषिद्ध नसल्यामुळे, परदेशगमननिषेधाची अवदसा त्या काळी आठवली नसल्यामुळे हिंदु रणतरीची (war-ships) प्रचंड नौसाधने (आरमारे) दिग्दिगंती अप्रतिहतपणे संचरत होती. ज्यांना परकीयांनी लिहिलेल्या आणि पढविलेल्या आजच्या आमच्या हिंदुस्थानच्या बाटग्या भूगोलात 'अरबी समुद्र' ह्या मानहानिकारक नावाने संबोधले जाते, त्या आमच्या पुरातन 'पश्चिम समुद्रां'तून एका बाजूला आणि ज्यांना आमच्या आजच्या कूपमंडूकांनी 'काळे पाणी' असे समुद्रगमनभीरू नाव दिले आहे, त्या, ही अंदमान बेटे असलेल्या पूर्वसमुद्रातून निदानपक्षी चंद्रगुप्त मौर्याच्या म्हणजेच इसवी सनापूर्वी तीन-चारशे वर्षांच्या अगदी ऐतिहासिक काळापासून हिंदु-राष्ट्राच्या शतविधि वणिग्नौका आणि रणनौका दूरदूरच्या विदेशांना अव्याहतपणे जाते येत असते! हिंदुराष्ट्राची हा सागर म्हणजे एक सडक झालेली होती!

ह्या पूर्वसमुद्रांतून मगध, आंध्र, पांड्या, चेर, चौल प्रभृति हिंदु राज्यांनी मोठमोठी दिग्विजयी नौसाधने (आरमारे) धाडून सयाम, जावा, बोर्निओ ते फिलिपाअन्सपर्यंत हिंदु वसाहती, राज्ये, धर्म आणि संस्कृति स्थापली. हिंदुचीन (इंडोचायना) आणि ते फिलिपाअन्स येथे हिंदुराज्ये स्थापलेली असल्याचे निर्विवाद ताम्रपटशिलालेखादी पुरावे परकीय संशोधकांनीच आज प्रकाशात आणलेले आहेत. बौद्ध हिंदूंचीच नव्हेत, तर वैदिक हिंदूंची ही क्षत्रियवंशीय राज्ये, भारतीय प्रांतनगराची तिकडे स्थापलेल्या वसाहतींना आणि नगरांना दिलेली नावे, राज्ये, भारतीय प्रांतनगराची तिकडे स्थापलेल्या वसाहतींना आणि नगरांना दिलेली नावे, शिव, विष्णु, बुद्ध, प्रभृति देवतांची देवालये, वेद मनुस्मृति प्रभृति शतावधि संस्कृत ग्रंथांची ग्रंथालये, हिंदु वाणिज्य, कला, संस्कृति ही सयाम, जावा, ब्रह्मदेश,हिंदुचीन, बाली ते फिलिपाअन्सर्यंत तरी शतकोशतके भरभराटलेली होती, हा निर्भेळ इतिहास आहे.

पण, त्या इतिहासात अंदमान द्वीपपुंजासारखा लहान लहान बेटांचा नामनिर्देशही अजून सापडू नये, ह्याचे त्या कालाच्या प्राचीनत्वामुळे आणि इतिहास विरलतेमुळे फारसे आश्चर्य वाटायला नको.

तरीही, अंदमानशी आपल्या भारतीयांचा संबंध असल्याची आज सापडण्यासारखी पहिली खूण म्हणजे त्याचे नाव. जावा हे नाव जसे या देशाच्या आकारावरून यवद्वीप असे ठेवले, तसेच अंदमान हे नावही त्याच्या अंडाकृतीवरूनच भारतीयांनी ठेवलेले असावे, असे पुढे सापडणाऱ्या एखाद्या विरूद्ध पुराव्यापर्यंत तरी समजण्यास हरकत नाही. त्यापुढील त्या बेटांवर भारतीय प्रत्यक्षपणे गेल्याचा आणि ती बेटे जिकल्याचा निर्विवाद असा ऐतिहासिक पुरावा म्हणजे पांड्य राजांची शिलालेखीय प्रशस्ती होय. ह्या एका प्रशस्तीवरून हे सिद्ध होते की, पांड्यांचा एक प्रबल सेनापती इसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या आगेमागे ह्या समुद्रावर दिग्विजय करण्यासाठी मोठमोठ्या रणतरीचे एक प्रबळ नौसाधन घेऊन निघाला होता. परतीरावरील आजच्या पेगूवर त्याचे जलसैन्य चढून जाऊन तो देश त्याने जिकला. परतताना त्या भारतीय हिंदु सैन्याने अंदमानादिक बेटांवर स्वामीत्व स्थापून त्याने पांड्य साम्राज्याला जोडले. ह्या स्पष्ट उल्लेखावेरून ह्या द्वीपपुंजाच्या इतिहासाची जी एक पहिली ओळ काय ती लिहिता येते, ती येते.

पण ती ओळही लिहिता लिहिताच अपुरी राहते. कारण, भारतीय सैन्य तेथे गेले होते, हे जरी निश्चित, तरी ते हिंदु सैन्य वा त्या हिंदु राज्याचे कोणी अधिकारी वा नागरिक तेथे राहिले की नाही, ह्याचा काहीच पत्ता अद्यापि लागलेला नाही. आम्ही अंदमानात असताना एकदा एका विश्वसनीय इंग्रज अधिकाऱ्याने आम्हाला सांगितले होते की, अंदमानात खणताना कोठेसे एका राजवाड्याचे अवशेष सापडते आहेत. पण पुढे त्याचे काय झाले ते अद्यापही आम्हाला काही एक कळले नाही. तसा एखादा उत्खननीय शोध लागला वा न लागला तरीही ही गोष्ट निश्चित आहे की, अंदमानात बाहेरच्या लोकांची अशी कोणतीही वसाहत गेल्या तीन हजार वर्षांच्या ऐतिहासिक कालात तरी टिकलेली नव्हती.

पांड्य राजाची वरील प्राचीन प्रशस्ती सोडली, तर अंदमानचा ओझरता उल्लेख अर्वाचीन काळच्या मार्कोपोलो, निकोलो, युरोपियन आणि काही अरबी प्रवासी ह्यांच्या प्रवासवृत्तात येतो; पण तो त्या बेटावर वसति केल्याचा नसून ती ऐकल्याचा, त्यांच्या अस्तित्वाचा, केवळ भौगोलिक!

बाहेरच्या लोकांच्या संबंधाने त्या बाहेरच्या लोकांच्या इतिहासात अंदमानाचा इतिहास जसा काही सापडते नाही, तसाच त्यांच्या स्वतःच्या लोकांतही इतिहास असा एका अक्षरानेसुद्धा आढळत नाही, हे सांगणेच अनावश्यक. कारण, अंदमानात त्यांचे स्वतःचे असे लोक जरी आहेत, तरी त्यांना अक्षर कशाशी खावे, हेच मुळी अद्याप माहीत नाही.

आणि परंपरेच्या दंतकथात्मक इतिहासा-विषयीही म्हणाल, तर त्या अंदमानातील मूळ निवासीयांचे दंत जरी अत्यंत बळकट आणि तीक्ष्ण आहेत, तरीही त्यांना कथा अशी मुळीच नाही. कथेची कल्पनाच अजून आलेली नाही. कारण स्मृती असते, तेथे कथा संभवते. पण अंदमानचे

मूळ निवासी जे आहेत, त्यांची स्मृतिशक्ति अद्याप इतकी अपक्वावस्थेत आहे की, त्यांना चार-दोन वर्षांपूर्वीच्या घटना देखील आपल्या अर्थी आठवत नाहीत. आठवण म्हणून आपण ज्याला म्हणतो, तशी आठवण त्यांना राहातच नाही. ओळख देखील ते फार लवकर विसरतात. मग जातीय सुसंगत, सांधिक स्मृति आणि परंपरेच्या प्राचीन कथा ह्या कोठल्या असणार! प्राण्यांच्या कळपाला किंवा वानरांच्या समूहाला जितकी परंपरा आणि सामाजिक स्मृति, तिच्याहून काही अंशी अधिक इतकीच काय ती त्याची सामाजिक स्मृतिशक्ति विकसलेली दिसते. त्यामुळे दंतकथात्मक असाही कोणता अलिखित इतिहास स्वतःचा असा अंदमानच्या लोकांना नाही.

मिळून काय? जगातील अन्य राष्ट्रांच्या वाङ्मयांत एका वर दिलेल्या पांड्य राजाच्या प्रशस्तीवाचून अंदमानाविषयी ऐतिहासिक उल्लेख नाही. युरोपियन नि अरबी प्रवाशांचे मध्यकालीन उल्लेख केवळ भूगोलविषयक, अंदमानातील काही इतिहास सांगणारे नव्हते; आणि अंदमानची जाती अवघ्या अगदी रानटी, आदिम, अविकसित मानव, त्यांच्या स्वतःच्या लिखित कथा राहोतच, पण जातीय पूर्ववृत्ताच्या दंतकथाही नाहीत. ज्याला भूगोल काय तो आहे, इतिहास असा नाहीच, असा अंदमान हा एक अजस्त्र भूभाग आहे. त्याचा सारा इतिहास म्हणजे एक ओळ! पांड्य राजाच्या प्रशस्तीतील!

अंदमानाला इतिहास नसला, तरी मनुष्यसमाज मात्र आहे. इतकेच नव्हे, तर जो त्याचा मूळचा मनुष्यसमाज आज अंदमानला आहे, तो ऐतिहासिक गणनेच्या भाषेत तरी अगदी अक्षरशः अनादि आहे. कारण तेथे आज ज्या मूळच्या रानटी, आदिम मनुष्याच्या जाती निवसत आहेत, त्यांच्या अस्तित्वाचा आरंभच सापडते नाही. अगदी प्राचीनतम काळापासून, क्वचित मर्कटांचा मनुष्य होते आला तेव्हापासून त्या जशाच्या तशा आजही जवळजवळ होत्या तेथेच, बहुतांशी होत्या तशाच निवसत आहेत.

माकडांची मनुष्ये होऊ घातली, तेव्हा प्रथम शेपटी झडू लागून माकडहाड तेवढे राहू लागले. माकडहाड हे नाव जरी आपल्याही त्या जागच्या कण्याच्या एका हाडाला आपण इकडे लावतो, तरी ते हाड आता मुळापेक्षा अगदी सपाट झालेले आहे. पण तिकडे अगदी अंदमानात नसले, तरी त्या द्वीपपुंजाच्या आजूबाजूच्या भूभागात आजही अशी मनुष्ये कधी कधी आढळतात की, ज्यांचे माकडहाड चांगले दीड-दोन इंच उंचावलेले आणि पुढारलेले असते. आम्ही अंदमानाला असता असा एक रानटी मनुष्य तेथील डॉक्टरने आम्हाला औषधालयात आलेला दाखवला. त्याचे माकडहाड, शेपटीचे ते हाड, असेच पुढे घुसलेले, वाढलेले, त्याला खुर्चीच्या पाठीला टेकून ज्यायोगे सरळ बसता येईना असे वर लांबटलेले होते. त्याला लागून शेपटीच्या केसांच्या झुबक्याचा स्नायु तेवढा लांबलेला नव्हता. तो तेवढा लोपलेला होता. त्याची हनुवटी आणि गालफडे हीही माकडाशी किती तरी मिळतीजुळती दिसते. त्याची चाळीस-पन्नास शब्दांचीच का होईना, पण एक भाषा होती की जी जातिवंत मर्कटमनुष्यांना, ‘ओरांगओटांग’ ‘गोरिल्या’ ना असते. ह्या ओरांगओटांग वा गोरिला वानर माकडांचीही एक भाषा आहे. तिचे बरेच शब्दही काही प्रवासी प्राणिशास्त्रज्ञांनी मोजण्याचे

यत्न केले आहेत. पण तरीही ती मनुष्यभाषेच्या वर्गात मोडणारी नाही. पण ह्या आम्ही पाहिलेल्या पुच्छास्थिअवशिष्ट माणसाला कोणती तरी मानवी भाषेत मोडणारी भाषा येत होती. मनुष्यवाणी होती, हा मुख्य फरक आढळला.

हा अपवादात्मक प्राणी म्हणून सांगितला, पण अंदमानामधील अगदी तज्जन्य अशी अनादि कालापासून निवसत आलेली जाते जी 'जावरा ' ती काही शेपटीचे हाड असलेली नाही. त्यातली माणसे साधारणतः चार-साडेचार फूट उंचीची, वर्ण काळाकुट्ट, केस राठ, आखूड आणि बुचक्यांनी वळून वळून असतात. दाढीमिशा अशा पुरुषांनाही येतच नाही. ते सगळे अगदी उल्लींग! मनुष्यप्राणी 'सुधारत सुधारत' आपल्या इकडे आजच्या यांत्रिक युगांत ज्या अवस्थेप्रत पोचला आहे, ती आपली सुधारणा आणि ते आपले यंत्रयुग हाच आपल्यातील ज्या एका संप्रदायाला मनुष्यजातीला झालेला एक दुर्धर शाप वाटतो, त्या साध्या राहणीच्या यंत्रयुगविद्वेषी पंथाच्या तोंडाला अगदी पाणी सुटावे, इतकी साधी राहणी ह्या 'जावरा' जातीत अनादि कालापासून तो थेट आजपावेतो चालत आलेली आहे. कपडे वापरण्याचा मोह असा त्यांना पडतेच नाही. नागवेपणा हा जर साधुपणा असेल, तर जावरा हे आपल्याकडील साधूंपेक्षाही वरचढ साधू आहेत. आपल्याकडील साधूंना कटीला एक पंचा गुंडाळण्याचा, निदान लंगोटी तरी नेसण्याचा मोह आवरत नाही. पण ह्या जावरा जातीत पुरुष तर काय, पण स्त्रियासुद्धा कटीला बोटभर चिंधीसुद्धा बांधीत नाहीत आणि आपण उल्लिंग राहण्यात कोणते तरी शतकृत्य करीत आहोत, ही भावना पण त्यांच्यात नसते; कारण वस्त्राची कल्पनाच त्यांना शिवलेली नसते. त्यांची 'साधी राहणी' इतकी साधी की, गिरण्यांचा 'शाप' तर काय, पण चरख्याचा वा चातीचा शापसुद्धा त्यांना झालेला नाही. छानछोकीच्या व्यसनापायी सुधारलेला मनुष्य अगदी अधोगतीला चाललेला आहे, अशा विवंचनेने ज्यांना अन्न गोड लागते नाही, त्या आपल्याकडील 'साध्या राहणी'च्या अभिमान्यांना हे ऐकून आनंदच होईल की, हे जावरा छानछोकीपासूनही अगदी अलिप्त आहेत. त्यांच्यातील स्त्रियांत एखादी तरुणी अगदीच विलासलोलुप निघाली, तर एखादे झाडाचे पान तेवढे कटीपुढे लटकावते आणि एखादा पुरुष फारच नटवा निघाला, तर त्याची सारी छानछोकी रंगदार लालसर मातीचे पट्टे अंगावर ओढण्यातच काय ती सामावलेली आणि संतुष्टलेली असते. यंत्रयुगाला अधोगती म्हणणाऱ्यांच्या भाषेत बोलायचे तर ह्या जावरांची फारच प्रगति झालेली आहे. यंत्रयुगाच्या प्रलोभनापासून ते अगदी अलिप्त आहेत. त्यांना मोटारी, आगगाड्या तर काय, पण बैलगाडी, गाडी अशीच ठाऊक नाही. त्यांना खुर्ची माहीत नाही, आगपेटी माहीत नाही, जोडा माहीत नाही, बंगला माहीत नाही, शेती माहीत नाही, जिलबी माहीत नाही, द्राक्षे माहीत नाहीत, लोणी माहीत नाही, बाजरी माहीत नाही, मग 'भिशी वॉटर'ची गोष्टच दूर! मनुष्यजातीवरील मनुष्याच्या असमाधानाचे, कलहाचे, कृत्रिम जीवनाचे संकट ज्या एकाच कारणाने ओढवलेले आहे, अशा, 'साध्या राहणी'च्या आपल्या इकडील अध्वर्यु समजतात त्या 'सुधारणे'च्या नावापासूनच नव्हे, तर इच्छेपासूनसुद्धा हे जावरा अलिप्त, अकलंकित आहेत.

पण म्हणून ‘साध्या राहणी’ने यंत्रयुगाच्या शापापासून विमुक्त झाल्याने निसर्गाकडे परत फिरल्याने, मनुष्यात निरपवाद समाधान नांदू लागेल, म्हणून ‘Back to Nature’ वादी लोक म्हणतात, त्याप्रमाणे ह्या जावरात ते समाधान नांदत आहे काय? मुळीच नाही. शेती नाही, नांगर नाही, बँकेत नोटा नाहीत, बंगला नाही, पण जी एखाद्या दाट अरण्यातील खबदाडीतील जागा किंवा मांसाचा तुकडा तात्पुरता अग्राधिकाराने एका जावराचा असेल, त्यावर दुसऱ्याची दृष्टि पडताच, वा पडू नये म्हणून त्याला वाहवी लागणारी चिंता, करावी लागणारी निरवानिरव आणि प्रसंगी लढावी लागणारी झुंज ही तितकीच उत्कट आणि भयंकर असते की, जितकी एखाद्या कैसराची, झारची वा लेनिनची! तुम्हांआम्हांला शेतीचे जितके कष्ट वा चिंता, त्याहून अधिकच चिंता, वन्य फळे वा मृगया संपादण्यात आणि ती मिळेल की नाही ह्या विवंचनेत प्रत्यही सकाळी जावरालाही वाहवी लागते. डुकरांच्या मागे तीर घेऊन लागताना किंवा मासे धरताना कष्ट सहावे लागतात. भयाने जीव घेऊन पळावे लागते, दुखण्यात कण्हावे लागते, विषारी रानटी माशामच्छरे डसताच विव्हळावे लागते. आपसात मत्सराने जळफळावे लागते. शिव्यागाळी, मारहाण, टोळक्यांच्या लढाया, हा मारलेला मासा माझा की तुझा- ह्या भांडवलशाही प्रश्नांवर, ही सोन्याची खाण माझी की तुझी, हे राज्य माझे की तुझे ह्यासाठी आम्ही जसे मरेतो लढतो, तसेच जावरा जावरांनाही झोंबाझोंबीत मरेतो झुंजावे लागते. नुसत्या साध्या राहणीने ‘यंत्रयुगाचा शाप’ तेवढा सुटला की जर समाधान आणि शांतता नांदती, तर हे जावरा जीवन्मुक्तच समजावे लागते! कारण ते जवळ जवळ माकडांइतक्याच ‘साध्या राहणी’चे उपासक आहेत, ‘निसर्गा’ला धरून आहेत; पण असेतोष, असमाधान, जीवनकलह ह्यांची पातळी आणि प्रकार जरी भिन्न असले, तरी त्यांची तीव्रता आणि अपरिहार्यता त्या, त्या जावरांच्या ‘नैसर्गिक’ युगातही आमच्या यंत्रयुगाहून काही कमी असलेली आढळत नाही. उलटपक्षी त्यांच्या जीवनाचा विकास माकडाच्या जीवनाहून जो फारसा जास्त झालेला नाही, त्याचे कारण ही साधी माकडराहणीच होय, हेही उघडच आहे.

अंदमानातील वर उल्लेखिलेली जावरा जाते, ही एक त्यातल्या त्यात अगदी आदिम रानवट, सुधारलेल्या आजच्या आमच्या वळणाच्या परकीय लोकांपासून सडेतोडपणे, भयाने आणि द्वेषाने दूर राहू इच्छिणारी अशी असली, तरी अंदमानातील मूळ निवासियांच्या इतर अनेक जाती त्या जावरांहून चालीरीती, राहणी, घटना प्रभृति प्रकरणी भिन्न प्रकारच्या आहेत, त्या त्या मानाने पुढारलेल्याही आहेत. त्यांच्या पृथकपणाचा आणि साम्यतेचा कसून अभ्यास केलेल्या इंग्रजी समाजज्ञांनी त्यांच्याविषयी जी माहिती दिलेली आहे, तिची साधारण रुपरेखा आपल्या ह्या कथानकाला लागू तितकी खाली देऊ.

अंदमानात ज्या दहा-बारा तत्रस्थ मूळ लोकांच्या जाती आहेत, त्यांची काही नावे ‘कारि, कोरा, टबो, बी, बलवा, जावरा, जुबई, कोल’ इत्यादि प्रकारची आहेत. शेवटचे ‘कोल’ हे नाव ध्यानात घेण्यासारखे होय. कारण, आपल्या इकडील वन्य वा डोंगरी कोळी लोकांशी ते नाव आणि त्या लोकांचे रानटी चरित्र तुलनार्ह वाटते. ह्या जातीचे संघ कोणी घनदाट जंगलात, तर कोणी उंच

डोंगरातून, तर कोणी समुद्रतटालागून राहात आले असल्याने, त्यांच्या चालीरीती, भावभावना, रंगरूप ही वरील परिस्थितीभेदाने, आणि क्वचित् वंशभेदाने निरनिराळी आहेत. त्यामुळे त्यांच्या सरसकट वर्णनात जी काही विसंगती आढळेल, तिचा उलगडा वाचकांना करता येतो.

जावरा प्रभृति जाती अत्यंत क्रूर असतात. पूर्वी वादळांत कित्येक परकी जलयाने ह्या बेटांना लागून फुटत वा फसत, तेव्हा त्यावरील निःसहाय्य लोकांवर तुटून पडून त्यांची हे जावरा प्रभृति अंदमानी लोक क्रूरपणे कत्तल करीत. आजही त्यांच्या ओळखीच्या तत्रस्थ जातीबाहेरील कोणत्याही परकीय वा अंदमानीय जातीची मनुष्ये दिसताच हे रानटी लोक निबिड झाडीतून त्यावर तीक्ष्ण बाणांचा मारा करून वा एकट्यादुकट्या मनुष्याला पकडून ठार मारतात. कधी कधी कोणाला जीवदान मिळालेच तर त्याचे भाग्य अद्भुतच समजावे. जावरांनी ठार मारलेल्या अशा लोकांच्या मढ्यांवर दगडांचे ढीग रचलेले असतात. आपण जंगलात ठार केलेल्या अशा परकीय माणसाची बातमी त्या परकीय शत्रूंना पक्षी नेऊन देतात, अशी एक समजूत त्यांच्या काही जातीत आढळून येते. कारण ते पशुपक्ष्यांना माणसाहून फारसे भिन्न समजतच नाहीत.

ह्यांच्यात स्त्रीपुरुषांसंबंधी रीतीभाती निरनिराळ्या असतात. स्त्रीपुरुषांची कामे बहुधा वाटलेली असतात. स्त्रीचे स्थान पुरुषापेक्षा उणे समजतात. म्हाताऱ्या स्त्रियांना सन्मानाने वागवितात. लग्नाआधी स्त्रिया पुरुषांशी सलगी करतात. अविवाहित स्त्रियांना लैंगिक निर्बंध फारसे नसतात. काही जातीत त्या आपला वर आपणच निवडतात. काहीत आईबापांनी लग्न ठरविले की लग्न ठरले, असे मानतात. इकडे बहुपत्नीत्वही फारसे नाही आणि बहुपतित्वही नाही. काही जातीत पुरुष आपल्यापेक्षा तरुण अशा दुसऱ्या विवाहित स्त्रीशी फारसा बोलत नाही. त्याचप्रमाणे आपल्या बायकोच्या बहिणींना ते स्पर्शत नाहीत. मुलींची नावे निराळी, असा प्रकार बहुतेक जातीत नाही. आईच नावे ठेवते. गर्भारपणाची चिन्हे दिसू लागताच गर्भाचे नाव ठेवण्यात येते. पण काही जातीत मुली वयात आल्या की, त्यांना ठरलेल्या सोळा फुलांपैकी ती वयात येत असता जी फुले फुलत असतील, त्यापैकी एका फुलाचे नाव ठेवण्यात येते. ही ह्या रानवट लोकांची ललितप्रवृत्ती आमच्या नागर लोकातील मुलींना दगडी, धोंडी, भिमी अशी नावे ठेवणाऱ्या अरसिक प्रवृत्तीहून अधिक सुभग नाही काय? पुरुषांची लग्ने पंचविसानंतर आणि स्त्रियांची अठराच्यानंतर बहुधा होतात.

ह्यांना मुले फार आवडतात. पण काही जातीत मुले सात-आठ वर्षांची झाली की आईबापांशी एकत्र राहात नाहीत, ती निराळी आयुःक्रम थाटतात. आयुःक्रम असा सर्वांचा एकच आणि मोजका. भक्ष्याकरिता दिवसभर शिकार करणे आणि रात्री झोप येईतो नाच नाच नाचणे! नाचण्याच्या समारंभात स्त्री-पुरुष उल्लिंग, एकत्र!

ह्या लोकांतील पुरुष त्यातल्या त्यात चांगले दिसतात. स्त्रिया मात्र अगदी बथ्थड, स्त्रियांची ढुंगणे बेडौल आणि शरीराच्या मानाने फारच स्थूल असतात. हे त्यांचे सौंदर्य वाढविण्यासाठीच की काय कोण जाणे, त्या स्त्रियांच्या डोक्याचे केस काढून ती अगदी गुळगुळीत केलेली असतात! त्या

अंदमानीय सौंदर्यदृष्टीला तरुण स्त्री अशा केस काढून गुळगुळीत केलेल्या डोक्यानेच अधिक सुरेख शोभते असे वाटतेसे दिसते. आपल्या कवींना सुंदरीचे ओठ तोंडल्यासारखे आहेत, ही उपमा जशी आवडते तशीच त्यांच्यात जर कोणी कवी असेल, तर त्याला त्यांच्यातील सुंदरीची डोकी सोललेल्या आणि तासलेल्या नारळांसारखी लोभनीय वाटतात, अशी उपमा सहज सुचत असेल, रुचतही असेल. कारण सोललेला नारळ हा नारळीच्या झाडांचा सुकाळ असलेल्या त्या अंदमानीय रानातील त्या नैसर्गिक नागरिकांचा एक मोठा आवडता पदार्थ आहे!

त्या लोकांची बुद्धि लहानपणी चाणाक्ष असते, पण तिची वाढ झटकन् खुंटते. स्मरणशक्ति अगदी थोडी, अर्थात् बौद्धिक दूरदृष्टि त्यांच्यात नाहीच म्हंटले तरी चालेल. मागे आणि पुढे पाहून वागणारा प्राणी तो मनुष्य, अशी एक मनुष्यत्वाची व्याख्या आहे. तिला ही अंदमानी माणसे अपवाद! त्यांना चालू क्षणी काम, क्रोध, लोभ प्रभृति विकारांची जी ऊर्मि येईल, तीप्रमाणेच ते चालतात. मागील दहा वर्षांची बाकी वा पुढील दहा वर्षांची योजना वा पुरवठा असा त्यांच्यात नाही. क्षुधा, तृष्णा, राग, द्वेष ह्यांची तत्काळ तृप्ति झाली की तो प्रश्न तेथेच मिटला. शत्रूचा वा अपराध्याचा सूड हा देखील त्या ऊर्मित ते जो काय घेतील तोच. काही काळ नाहीसा होऊन तो विपक्षीय मनुष्य जर पुन्हा त्यांच्यात आला, तर त्याचा राग, अपराध आणि सूडाचा निश्चय ही सारी ते लोक बहुधा विसरून जातात, तो मनुष्य त्यांच्यात पुन्हा मिसळतो. अर्थात् स्मृतिशक्ति अशी तुटपुंजी असते, हे जे त्यांच्याविषयी म्हणतात, ते आपल्या स्मृतिशक्तीच्या आणि बौद्धिक दूरदृष्टीच्या प्रदीर्घकालीन टिकाऊपणाशी तुलना करूनच काय ते म्हणता येईल, कारण त्या जातीनाही काही स्मृति, काही दूरदृष्टी असलीच पाहिजे. जातीशः उपजत आणि व्यक्तिशः अर्जित स्मृति आणि दूरदृष्टि माकडांच्या कळपांतही असते, मग ही तर आदिम असली तरी माणसेच!

त्यांची भाषा अगदी मोजक्या शब्दांची; जे प्रत्यही अगदी शारीरिक आणि प्राथमिक भावभावना, आवश्यकता, त्या व्यक्तिविण्यापुरते. त्यातही ते थोडे अपुरेच, कारण त्यांच्या भाषेत एक मुख्य शब्द बोलून टाकला की त्याचे वाक्य करण्याचे काम हावभाव हेच काय ते पुरे करू शकतात! हातवारे, मान, डोळे ह्यांच्या अभिनयानेच ते शब्दांपेक्षा परस्परांशी अधिक बोलतात. कोणी पाहुणा कोणाला भेटला, तर ते प्रथम एकमेकांकडे नुसते टवकारून पाहात राहणे हा पहिला शिष्टाचार समजतात. अर्थात्, एकमेकांना ओळखण्यात जो धोका त्यांच्या हीन स्मृतीमुळे आणि परकीयांच्या कपटामुळे त्यांना सोसावा लागतो, त्या जातीय अनुभवामुळेच नीट पारखून घेण्याचा आधी कोणाशी न बोलण्याची ही चाल पडली असावी! आणि मग खाकरून खोकरून आगताशी बोलण्यात आरंभ करणे, हा दुसरा शिष्टाचार! प्रत्येक जातीची एक निराळी पोटबोली असते. साधारणतः वीस मैलांवर पोटबोली बदलते.

कोणी मरण पावले असता त्याची आप्तमंडळी मुक्त कंठाने रडतात. लहान मूल मेले तर आईबापांच्या खोपटीतच पुरतात. इतर कोणी, विशेषतः मोठे माणूस वारले, तर त्याची मोट बांधून प्रथम झाडाच्या ढोलीत व्यवस्थितपणे ठेवण्यात येते. त्या जागेभोवती वेताच्या पानांचा माळा

बांधण्यात येतात. त्या स्थलाकडे तीनएक महिने कोणी जाते नाही. ही स्मशानाची जागा निराळीच ठेवतात. हे सुतक चालू असता ते मुरी माती डोक्याला फासतात आणि त्या दिवसात नाच बंद ठेवतात. काही महिन्यांनंतर मेलेल्या माणसाची हाडे धुऊन त्यांचे तुकडे करण्यात येतात. मग त्याचे निरनिराळे दागिने करून ते त्या मृताचे स्मरण म्हणून वापरण्यात येतात. रोग झाल्यास ह्या हाडांच्या दागिन्यांचा स्पर्श करताच रोग बरा होतो, अशीही समजूत आढळते. पण ह्या सर्व हाडात मृताच्या कवटीचा मान विशेष! त्या कवटीची इतर हाडांत गुंफलेली एक माळ करून ती मानेवरून पाठीवर टाकलेली असते आणि ती कवटी तशी वापरण्याचा अधिकार विधवा, विधुर आणि अत्यंत निकटाचा नातलग ह्यांनाच काय तो असतो.

मेल्यानंतर भूत होते, असा काही जातीचा विश्वास! काहींचा समज की, अंदमानात त्यांना ठाऊक ते ते सर्व प्राणी जे हिडतात ते आपलेच पूर्वज ती ती रूपे घेऊन हिडत आहेत. स्वतःच्या भूताची कल्पना त्यांना सावलीपेक्षा समुद्रात पडणाऱ्या त्यांच्या प्रतिबिंबाकडूनच मूळ आलेली असावी. कारण प्रतिबिंबाला ते भूत समजतात आणि ते मेल्यानंतर दुसऱ्या ठिकाणी रहायला जाते असे मानतात.

ह्यांच्यात धार्मिक दृष्टीचे कर्मकांड असे नाहीच म्हंटले तरी चालेल. लग्न, मृत्यू इत्यादी प्रसंगी ठराविक रीति, व्यावहारिक चाली असतात; पण धार्मिक स्वरूपी कोण्या देवदेवतेच्या प्रार्थना वा पूजा वा महामंत्र -फार काय, धार्मिक असा कोणी पुरोहितसुद्धा नसतो. परंतु त्यांच्यातील कित्येकात ब्रह्मज्ञान असे अगदीच नाही, म्हणून त्यांना कोणी हिणवू नये. कारण आमच्या अगदी ईश्वरदत्त पुस्तकातून सांगितलेल्या काही धर्मसमजुतींना आणि ब्रह्मज्ञानाच्या गोष्टींना हार न जाणारे असे थोडेसे ब्रह्मज्ञान आणि कुराण पुराण त्यांच्यातही आहे. उदाहरणार्थ, पुलगा ह्या दैवताने हे जग निर्मिले, मेल्यानंतर ज्या जगात भुते निवसण्यास जातात, ते अद्भुत जग एका मोठ्या जगड्व्याळ नारळाच्या वृक्षाने तोलून धरलेले आहे, जशी शेषाच्या मस्तकावर पृथ्वी! पुलगा त्याच अद्भुत उंच जगात आताशा रहातो; पण पूर्वी तो अंदमानातील सर्वांत उंच पर्वत जो 'सॅडल पीक' त्याच्या शिखरी रहात असे! कैलासावर जर आमचे महादेव शंकर राहातात, मूसा पैगंबराचा महादेव अल्लाह जर सीनाय पर्वतावर येत असे, आय.सी.एस्.चे महादेव गव्हर्नर जनरल जर सिमल्यावर जातात, तर अंदमानाचा महादेव पुलगा ह्यानेही 'सॅडल पीक' वर का राहू नये? मृत्युनंतर अंदमानीय जीव एका वायुरुपी पुलावरून पाताळांत जातो, जसा ख्रिश्चन मुस्लिम जीव थडग्यांमध्ये जगाच्या शेवटच्या न्यायनिर्णयाच्या दिवसापर्यंत वाट पाहात राहतो. हा अंदमानी महादेव पुलगा मुसलमानी महादेवाप्रमाणे अगदीच एकलकोंडा नाही. त्याला आमच्या हिंदु महादेवाप्रमाणे एक पत्नी आहे आणि ख्रिश्चन महादेवाला जसा जीजस हा पुत्र तसा एक पुत्रही आहे. इतकेच नव्हे तर ह्या आपल्याकडील कोणत्याही महादेवाच्या भाग्यी जे सुख नाही ते, स्वतःची अनेक कन्यारत्नेही कुटुंबात असण्याचे भाग्य त्याच्या वाट्याला आलेले आहे.

ह्या पुलगाव्यतिरिक्त अदृश्य शक्तीत समुद्राचे भूत 'जुरुवीन' आणि अरण्याचे भूत 'एरम चौग' ही मोठी खाष्ट आहेत. पुलगादेखील ती मानीत नाहीत, जसा सैतान अल्लालादेखील सहसा बधत नाही. पण त्यातल्या त्यात एवढे बरे आहे की, हे जंगलाचे खाष्ट भूत, 'एरम चौग' आगीला भिते. ह्या समजुतीमुळे ह्या अंदमानी जंगली जाती आग नेहमी बरोबर पाळतात, आग विझू देत नाहीत, जसे आम्ही हिंदु, पारशी अखंड अग्निहोत्र पाळतो!

उत्तरध्रूवासारख्या अगदी हिममय आणि अंग गोठवून टाकणाऱ्या थंड प्रदेशात मनुष्य वसत असता त्याला उष्णतेसाठी आगीचे अखंड सान्निध्य अत्यंत आवश्यक आणि म्हणूनच आवडते असणारच. पण त्या काळी आगपेटीसारखे आग चेतविण्याचे झटपट साधन माणसाला गवसलेले नसल्याने आणि लाकडावर लाकडे किंवा गारगोट्यांवर गारगोट्या घासून विस्तवाची ठिणगी पाडून प्रयासाने आग पेटवावी लागते असल्यामुळे ती एकदा पेटल्यावर पुन्हा सहसा विझू न देता, सारखी भडकलेली ठेवणे अपरिहार्य होते. त्यामुळेच उत्तर ध्रूवाकडील आर्यात अग्निप्रस्थ वाढले असावे. त्यालाच प्रथम सदाचाराचे आणि मग धर्मकर्तव्याचे रूप येऊन आमची अग्निहोत्रसंस्था बनली. ह्या आम्ही लावलेल्या आमच्या अग्निहोत्राच्या उपपत्तीला अंदमानातील ह्या वन्य अनार्य जातीचे हे वरील अग्निप्रस्थ बळकट पुष्टि देते आहे. कारण, त्या घनदाट जंगलात मोठमोठ्या विषारी डासांचे आणि माशांचे थवेच्या थवे, सापसुरळ्या- जळवांचा नुसता चिकार सुळसुळाट. जेथे तेथे दलदल, बहुधा अंधःकार? अशा 'जंगलाचे' हे भूत भ्यायले तर आगीलाच भिणार! आग तेथे अत्यंत उपयुक्त; पण त्या जंगली लोकांमध्ये आजही आग पेटवणे आगपेटी नसल्यामुळे प्रयासाचे. गारगोटी झाडून ठिणगी पाडायाची, त्यामुळे एकदा पेटलेली आगच आगी पेटविण्यासाठी शक्यतो पेटत ठेवणे अवश्य. ह्यामुळे जंगलाचे भूत जे 'एरम चौग' त्याला सदोदित धाकाने दूर ठेवण्यासाठी सदोदितचे प्रदीप्त अग्निहोत्र अवश्य झाले.

पण तरीही त्यांची दैवीकरणाची कल्पनाशक्ती त्या आगी इतकी जाज्ज्वल्य नसल्यामुळे आगीचा अग्निदेव झाला नाही, आगोटीचे अग्निहोत्र झाले नाही. आमच्या आग पाडायच्या लाकडांचीसुद्धा जशी अरणी देवता होऊन ती समंत्रक आव्हानली जाते, तशी त्यांच्या गारगोट्यांना 'चमक पाड, प्रसन्न हो' म्हणून प्रार्थावे लागते नाही. त्यांचा अग्नि 'पावत' नाही, नुसता पेटतो; रागावत नाही; नुसता विझतो, तो विस्तव 'जंगलाचे भूत पळविणारा' असला तरी एक पदार्थ, एक नुसती वस्तू आहे, देव झालेला नाही.

आणि एकंदरीतच त्यांच्यातील बहुतेक जातीत कोणत्याही देवाची प्रार्थना वा मंत्रतंत्र वा परलोकी उपयोगी पडावी म्हणून पूजा अशी नाहीच. स्वर्गनरकाची कल्पना आपल्या कुराणपुराण-बायबलीय घाटाथाटाची मुळीच नाही, 'पुलग्या'ची देखील संकटनिवारक पूजा प्रार्थना नाही.

असे हे अंदमानीय जंगली नागरिक ह्या एकदोन जिल्ह्याएवढ्या टापूत अवघे तीनचार हजारही असतील नसतील. तेही विखुरलेले, बाकी सगळे घनदाट जंगलच जंगल. इतके घनदाट आणि वसाहती मनुष्याचा पाय आत न पडलेले दुर्गम की, त्याची नक्की पाहणीही गेल्या तीसएक

वर्षापर्यंत झालेली नव्हती! मोठमोठे वृक्ष, त्यावर आणि त्यामधून शेकडो प्रकारच्या काटेरी, बिनकाटेरी लतावेलीतृणांच्या घनदाट गुंतागुंतीची दाटी, वरून जवळ जवळ बाराही महिने- निदान नऊ महिने तरी सारखा पडणारा पाऊस; वरचेवर मुसळधार; नाही तेव्हा झिमझिम; तळाशी त्यामुळेच पाणीच पाणी सदा साचलेले; त्यात वृक्षलतावेलीच्या त्या अथांग दाट रानाचा पालापाचोळा वर्षोनुवर्षे सारखा थरावरथर पडते असलेला, वर्षोनुवर्षे तसाच कुजत असलेला; जिकडे तिकडे त्या दलदलीत भरभराटणाऱ्या लक्षावधी माशा, मोठमोठे डास, जळवा, भयंकर सापसुरळ्या, विषारी जीवजंतू, ह्यांचा एकच सुळसळाट! वृक्षांत वृक्ष, वेलीत वेली, काट्यात काटे, झुडपात झुडपे दाटून, गुंतून असे एक रानटी छतचे छत मैलोमैल पसरलेले की, सूर्य वर आकाशात तळपत राहिला, तरी किरणाचा स्पर्श त्या रानाच्या तळाला असा म्हणण्यासारखा, म्हणजेच ती दलदल सुकविण्यासारखा, युगानुयुगे होऊच नये; प्रकाशही पुरता असा युगानुयुगे पडूच नये! जंगलाची वाढ मैदानातच नाही, तर जे डोंगर मधून मधून आहेत त्यावरही तेच जंगल तसेच चढून गेलेले! त्यायोगे ही बेटे दुरून जरी हिरवीगार आणि मोहक दिसली, तरी मनुष्यवस्तीला पूर्वीपासून अगदी प्रतिकूल अशी ठरली. जे काही इंग्रजी धाडसी लोक वसाहत स्थापण्याचा प्रयत्न करते झाले, त्यांनासुद्धा अगदी अठराव्या शतकाच्या साधनांनीसुद्धा तेथे पाय टिकविता टिकवणे दुर्घट झाले. दोनदा त्यांनी स्थापलेल्या वसाहती तेथील त्या लक्षावधी विषारी जीवजंतूंनी आणि दलदलीतील रोगाणूंनी कत्तल करून टाकल्या, माणूस नि माणूस रोगराईने ठार केले, वसाहती उठून गेल्या.

ह्या अंदमान बेटांना जे परकीय लोक, अपघातपरत्वे जलयाने वादळात सापडून किंवा वसाहती स्थापण्यासाठी येत, त्यांच्यावर जावरा प्रभृति तत्रस्थ रानटी मनुष्ये विषारी तीरांचा मारा करून धरून फाडून टाकीत, हे तर खरेच; पण तसल्या तेथील मानवी प्रतिकाराने ह्या बेटाचे 'स्वातंत्र्य' अनादि कालापासून सतराव्या ख्रिस्ती सनापर्यंत जे अबाधित राहिले, ते केव्हाही राहिले नसते. ह्या बेटांचे ते स्वातंत्र्य जे असे अबाधित राहिले, ते तेथील त्या सापसुरळ्या, जळवा आणि त्या दलदलीतील असंख्य विषारी माशा, डास व रोगाणू इत्यादी कडव्या 'देशभक्तां'च्या, लक्षावधी सूक्ष्म सैनिकांच्या 'स्वातंत्र्य भक्ती' ने होय. परकी स्वाऱ्यांचा हेच रोगाणू नुसता धुव्वा उडवून देत आले.

तेथील अशा ह्या घनदाट जंगलातील जावरांपेक्षा जळवांच्याच सैन्याचा पराक्रम अचाट! आजही त्या जंगलात ते कापण्यास जेव्हा बंदिवानांच्या टोळ्या जातात तेव्हा त्यांना ह्या जळवा रक्तबंबाळ करून माघाऱ्या पिटाळीत आहेत! झाडांवरून त्या जळवांचे थर चढलेले असतात, पायाखाली पालापाचोळ्यांचे थरावर थर, साचलेल्या दलदलीत त्या जळवांचे लक्षावधी 'देशभक्त' सैनिक दबा धरून दडलेले असतात! मनुष्ये आत घुसली, त्यांचा वास आला की झाडावरून त्या जळवा पटापट अंगाडोक्याखांद्यावर उड्या घेतात, पायाखालून भराभर मांड्यांवर चढतात. जी जेथे चिकटली; ती तिथे सुपसुप रक्त पिऊ लागलीच. हातांनी बुचके काढून टाकावे तरी आटपत नाहीत, दंशच दंश. त्यातच विषारी डांस, कांटेरी झुडपे आणि भयंकर सापसुरळ्या. एक एक फूट लांबीच्या. शंभर शंभर पायांच्या. दाट थरचे थर. त्या सापसुरळ्यांचा- त्यांना 'कानखजुरे' म्हणतात.

तिकडे बंदिवान- दंश इतका विषारी की, अंग भयंकर सुजते, आग मनस्वी, केव्हा केव्हा ते अंग लुळेच पडते. क्वचित् प्राणघातही होतो. त्या मानाने साप तिकडे थोडे. पण जी एक फुरशासारखी जाते आहे, ती डसताच प्राण घेणारी. विंचू पूर्वी नव्हते म्हणतात, पण आताशा तेही सापडतात. अशा त्या जंगलात बंदिवानातील कंटकातील कंटक आणि क्रूरातील क्रूर बंदिवानही जेव्हा टोळ्यांच्या टोळ्या बळाने हुसकीत जंगल काटायला नेल्या जातात, तेव्हा चळचळ कापतात. मारीत, पिटीत नेलेली अशी शंभर शंभर माणसे दिवसभर त्या भयंकर अरण्यात ते सक्तीने काम करून संध्याकाळी जेव्हा परततात, तेव्हा एकेकाच्या अंगावर चिकटलेल्या जळवांच्या सूक्ष्म दंशातून रक्ताच्या बारीक धारा वाहात असताना, पायात काटे, अंगावर डासांच्या गांधी उठलेल्या, दलदलीच्या चिखलाने लडबडलेल्या, त्या बंदिवानांच्या टोळ्या अगदी रडकुंडीला आलेल्या असतात, ह्यात काय नवल? त्यातही त्या जंगलात मधमाश्यांचे आणि गांधीलमाश्यांचेही साम्राज्य आजवर अबाधित! ते कोण्या माणसांनी असे उपद्रविले जाताच त्या मधमाश्या आणि गांधीलमाश्याही त्या परक्या शत्रूंवर तुटून पडून आपल्या ह्या स्वदेशाच्या आणि स्वराज्याच्या संरक्षणार्थ त्या देशभक्त जळवा, सापसुरळ्या रोगाणूंनी चालविलेल्या ‘स्वातंत्र्ययुद्धा’त भाग घेण्यास सोडीत नाहीत.

अशाही परिस्थितीशी टक्कर देऊन, ह्या जावरांच्या, जळवांच्या आणि रोगाणूंच्या प्रतिकाराला तोंड देऊन, मलेरिया प्रभृति रोगांनी दोनदा वसाहतीच्या वसाहती ठार झाल्या, तरी पुन्हा प्रयत्न करून आज इंग्रजांनी त्या अंदमान बेटात शेवटी एक चिरस्थायी आणि भरभराटत जाणारी वसाहत स्थापण्यात यश मिळविले आहे, तिलाच ‘काळे पाणी’ म्हणतात. जन्मठेप बंदिवानांची ती ‘महाराजा’ आगबोट त्याच अंदमानला लागताच ज्याच्या त्याच्या हृदयांत धडकी भरते,

“आया! काला पानी आया!”

***

बारा

काळे पाणी येताच आगनावेतून बंदिवानांना पायात ठोकलेल्या बेड्यांसह जे उतरवितात, ते थेट त्या बोटावर समुद्राच्या उतारापाशीच बांधलेल्या टोलेबाज विस्तीर्ण आणि मुख्य अशा एका कारागृहाकडे सशस्त्र पोलिसांच्या पहाऱ्यात घेऊन जातात.

ह्याचे कारागृहाला कक्ष-कारागार (Cellular Jail) असे नाव आहे. त्या 'सेल्युलर जेल' ह्या नावाचे, बंदिवानांच्या बोलीत 'सिल्व्हर जेल' (रुपेरी बंदिगृह) असे मोहक रूपांतर झालेले आहे. अर्धवट शिकलेले असे जे बंदिवान ह्या जन्मठेप्यात असतात, त्यांना 'सिल्व्हर जेलमध्ये न्या!" हे पोलिसांच्या तोंडाने शब्द ऐकतांच मोठे आश्चर्य वाटते. रुपेरी तुरुंगात जायचे? काही देवळांच्या खांबांना वा कळसांना रुप्याचे पत्रे मारून जसे मढविलेले असते, तसा रुप्यांत ज्याचा निदान दर्शनी भाग तरी मढविलेला आहे, अशा एखाद्या विलक्षण आणि भव्य कारागृहाचे दृश्य त्यांच्या डोळ्यापुढे ते 'सिल्व्हर जेल' हे नाव ऐकताच अकस्मात् उभे राहते. काळ्या पाण्यावर सगळेच विचित्र! कोणी सांगावे, पाणी जसे काळे, तसे तेथील कारागृहही रुपेरी नसेल म्हणून!

निदान ते 'सिल्व्हर जेल' हे नाव तरी बंदिवानांच्या आणि पोलिसांच्या तोंडून वारंवार ऐकत असता कंटकला तरी आकर्षक वाटले. वास्तविक पाहता भयंकर आणि अट्टल पाप्यांना त्यांच्या भीषण पापाचा कठोर दंड देण्यासाठी ज्या बेटात नेऊन सोडायचे. त्याचे नाव जसे अंगावर काटा उभा राहण्यासारखेच 'काळे पाणी' असे पाडले गेले, तसेच त्या कारागृहाचेही नाव कोठले तरी, 'नरकभुयार' किंवा 'छळघर' असे ऐकताच वचक पाडणारे असावयास हवे होते! पण ते नाव तरी निदान किती मोहक! 'सिल्व्हर जेल!' रुपेरी तुरुंग!

नुसते नावच मोहक नव्हे- ते पाहा, येथूनच ते भव्य बंदिगृह दिसते ते पाहा! तोच तो सिल्व्हर जेल! आं? तो? अगदी सिल्व्हर- रुपेरी नसले, तरी किती आकर्षक आहे ते भवन! रेखून ठाकठीक, नीटनेटके, कोरे करकरीत, लांब, प्रशस्त, समांतर, सुरेख, खिडक्याच खिडक्या, मजल्यावर प्रमाणबद्ध तीन मजले, मधोमध उंच बांधीव असा एक टॉवर! कंटकला क्षणभर वाटले, माझी चेष्टा तर हे पोलिस करीत नाहीत? मला काळ्या पाण्यावरचे मुख्य बंदिभवन म्हणून एखादे आरोग्यभवन तर दाखवीत नाहीत ना श्रीमंत अधिकाऱ्यादिक लोकांसाठी बांधलेले? हा सिल्व्हर जेल की सॅनिटोरियम?

आत पाऊल टाकले, तरीही बंदिगृह म्हणताच साध्या हिंदी बंदिगृहाचासुद्धा जो एक उदास, भयाण, काळोखी दरारा वाटायचा, तो वाटेना! प्रकाश-वायू भरपूर खेळविलेला, रेखीव आणि टुमदार अशी एकसारखी खोलीला लागून गेलेली तीन मजली पाचसहा पंखे त्या मध्यस्थित टॉवरच्या चहूंबाजूंनी लांबवर शिस्तीत पसरलेली, मोठी मोठी अंगणे, मध्ये सोडलेली, वर्तुळाकार, सभोवती नारळी-केळीचे दाट बन! त्या अंदमानातील घनदाट जंगलात केव्हा केव्हा मऊ मऊ तीस-तीस फूट लांबीचे प्रचंड अजगर जसे वेटाळे घालून पहुडलेले आढळतात, तसा तो अजगरच जसा काही! अजगरासारखाच किती मोहक दिसायला!

त्यांत प्रत्येक बंदिवानाला स्वतंत्र अशी ती एकेक एकलकोंडी खोली, गजांचे दार बंद असणारी ठेवलेली असे. अशा त्या सातशे -साडेसातशे एकलकोंड्या खोल्याचे खोल्या त्यात आहेत, म्हणून त्यास Cellular Jail, कक्षकारागार, हे यथार्थ नाव ठेवलेले होते.

त्या प्रत्येक खोलीत बाहेरून पाहणाऱ्या डोळ्यांना प्रकाश भरपूर दिसे. पण प्रकाशाचा विशेष हा असे की, त्या खोलीत पाऊल टाकून गजांच्या दाराला एकदा का बाहेरून कुलूप ठोकले गेले की डोळ्यांना किती जरी लख्ख दिसले, तरी हृदयात एकदम काळोख पसरावा! जीव गुदमरावा! त्या प्रशस्त खोलीची एकलकोंडी होऊन पडावी!

तशा एकेक एकलकोंडीत त्या काळ्या पाण्याच्या बंदिवानांचे ते चलानही एकेक बंदी अलग अलग करून कोंडण्यात आले. तीन-चार दिवस त्या एकलकोंडीत एकेकटा बंदिवान तसाच डांबून ठेवल्यानंतर त्यांच्या शिक्षापत्रकांतील माहिती निरीक्षून त्यांच्या अपराधाच्या आणि पूर्ववृत्ताच्या अनुरोधे निरनिराळे वर्ग पाडण्यात आले. जे तात्कालिक उत्क्षोभात अपराध करून गेले आणि प्रथमच दंडित, त्यांचा सुधारणीय म्हणून एक वर्ग; जे निर्ढावलेले अपराधी त्यांचा दुस्सुधारणीयांचा भयंकर म्हणून दुसरा वर्ग, असे अपराधविज्ञानास (Criminology) धरून दोन वर्ग पाडण्यात आले. कंटक पहिल्या वर्गात पडला आणि तो इंग्रजी-हिंदी शिक्षितही असल्याने महिना दोन महिन्यांतच लेख्यालयात बंदिलेखकवर्ग जो असतो, त्यात थोडेफार लिहिण्याचे काम मिळून बंदिवानात तो 'बाबू' म्हणून गाजणार हे उघड झाले. परंतु रफिउद्दिनचे शिक्षावृत्त भयंकर वर्गात मोडून त्यावर अर्थातच पाच वर्षेपर्यंत त्या कारागारातच बंद ठेवण्याचा आणि कडक पहाऱ्यात वर्तन चोख दिसेतो सक्त काम करण्याचा प्रतिबंध घातला गेला.

अंदमानला आताशी भयंकर निर्ढावलेले (Habitual) बंदी धाडण्यात येत नाहीत; त्यामुळे तिकडील बंदिवानांना बऱ्याच सवलती आजकाल मिळतात. पण तीसपस्तीस वर्षांपूर्वी भयंकर आणि निर्ढावलेले असे अट्टल दंडितच बहुधा तिकडे धाडण्यास येत असल्यामुळे त्यांना राबवून घेण्यासाठी तसेच कडक नियम आणि त्यांची दुष्ट रग जिरवण्यासाठी तसेच सक्त काम योजावे लागे. त्यावाचून दुसऱ्या कोणत्याही लेच्यापेच्या व्यवस्थेला तसले राक्षसी दंडित ताळ्यावर आणणे आणि समाजाला हितकारक अशी कामे त्यांच्याकडून करवून घेणे, निदानपक्षी समाजाला त्यांच्या स्वैर अस्तित्वापासून भोवणारा उपद्रव टाळणे, जवळ जवळ असाध्यच होणारे होते.

रफिउद्दीनसारखे उलट्या काळजाचे काही दंडित (Convicts) तसल्या कडक व्यवस्थेलाही धूळ चारून काळ्या पाण्यावरूनसुद्धा पळून जाते, देशाला परत पोचत आणि परत समाजावर अघोर अत्याचार करीत, असे आढळून आल्यामुळे रफिउद्दिन मागे पळून गेल्यानंतर मधल्या काळात ही व्यवस्था अधिकच कडक करण्यात आली होती. त्या दुर्दमनीय बंदिवानांनाही पुरून उरावे, असेच त्यांच्याशी प्रसंगी त्यांच्याहूनही कठोरपणे वागणारे चाणाक्ष अधिकारी त्या कक्षकारागारावर मध्यंतरी नेमण्यात आले होते. रफिउद्दिन काळ्या पाण्यावर आता जेव्हा पुन्हा धाडण्यात आला, तेव्हा त्याची गाठ अशाच एका सवाई दंडम बंदिपालाशी पडणार होती.

आपल्या पूर्वीच्या परिचयाची व्यवस्था आणि अधिकारी बदललेले आहेत, हे रफिउद्दिनच्या ध्यानात तेव्हाच आले. आणि ह्या नव्या अधिकाऱ्याच्याही डोळ्यात धूळ फेकण्यासाठी जेथे जे जे लागू पडेल तेथे ते ते चुगल्या, मनधरणी, पायधरणी, वाह्यात बकबक, शिवीगाळ, खुळेचार, दांडगाई, हसरी तोंडपूजा वा खट्याळ निगरगट्टपणा, इत्यादी प्रकारच्या वर्तनाचे साधन योजायला त्याने आरंभिले.

त्या नव्या बंदिपालाने, भयंकर आणि अधम असे जे नवे बंदिवान येत, त्यांच्या पूर्ववृत्तांच्या सरकारी टिपण्यावरून त्यांच्याविषयी काय धोरण ठेवायचे, ते मनात ठरवावे आणि मग त्यांच्या प्रस्तुतच्या मनोवृत्तींना चाचपून पाहण्यासाठी त्यांच्या एकदा-दोनदा समक्ष गाठीभेटी घेत असावे; अवश्य तेथे प्रथम अगदी मनमोकळेपणे बोलण्याचा आव आणावा, सौम्यपणा दाखवावा, आणि मग स्क्रू हवा इतका पक्का दाबीत चलावे. त्याप्रमाणे त्या नव्या चलानातील बंदिवानांनाही त्याने चाचपण्यास हळूहळू आरंभ केला. पाच-सहा दिवस त्यांना एकलकोंडीत कुजत टाकल्यानंतर एक दिवस बंदिगृहावरील मुख्य जमादारासह तो बंदिपाल रफिउद्दिनच्याही कोठडीपुढे अचानक येऊन ठेपला.

बंदिपालसाहेब स्वतः ज्याच्या एकलकोंडीपुढे (Solitary cell) न बोलवता जातात, त्या बंदिवानाचे महत्व इतर दुलर्क्षित बंदिवानात एकदम वाढते! त्या नगण्य सामान्यात आपण एक गण्य प्रस्थ आहोत, असा त्या बंदिवानालाही अहंकार चढतो. तसाच रफिउद्दिनलाही तत्काळ चढला. तो इतक्या सक्त पहाऱ्यात एकलकोंडीत सारखा कुजत पडला होता की कोणी चिटपाखरू जरी त्याच्याशी बोलायला आले असते, तरी भाग्य समजता - मग आता तर स्वतः 'साब' त्याच्याकडे आपण होऊन आलेला आणि येताच विचारता झालेला,

"क्यो, रफिउद्दिन! ठीक आहे ना तुझे? काही गाऱ्हाणे- बिऱ्हाणे?"

"सरकार, आप ही माबाप है अब हमारे!" रफिउद्दिन अगदी नम्रतेचा बुरखा घेऊन गयावया करू लागला, "मला हवे तर फाशी द्या, परंतु ह्या एकलकोंडीत असे एकटे बंदीत कोंबून ठेवू नका! चकार शब्द कोणाशी बोलायची चोरी! मी असा एकटा ह्या भयंकर एकान्तात आणखी काही दिवस राहीन तर वेड लागेले मला वेड!"

"एकटा राहायला तू कंटाळलास?" बंदिपाल हसला, "एवढेच ना तुझ्या ह्या तुझ्या तळमळण्याच कारण? अच्छा, जमादार, ह्याला एक बिबी आणून द्या सोबतीला! आमच्या त्या स्त्रीयांच्या बंदिखान्यात हव्या तितक्या बिब्या आहेत!"

बंदिपाल चेष्टेखोर आहे हे पाहताच रफिउद्दिन एकदम पाघळला. त्यातून बिबीचीच गोष्ट निघालेली! त्याची मुद्रा लगेच रंगेले झाली आणि तो म्हणाला,

"साब, त्याला स्त्रियांचा बंदिखाना का म्हणता? बहुतेक बंदिवान त्याला बिबीघर म्हणतात; आणि आमच्यात जे खरे रसिक आहेत, ते तर त्याला म्हणतात चिडियाखाना! 'पाखरान'! पण साब, त्या पाखरानांतले पाखरू तुम्ही आमच्यासारख्याच्या वाट्याला कुठले येऊ देणार! तो समोर

बसला आहे ना काथ्या कुटीत - तो काळा कुरूप कोळसा! तशा डोमकावळ्यांना काय ती तुम्ही देणार ती पाखर! साब, खरोखरीच हा काय बरे पक्षपात सरकारचा? तो डोमकावळा- तो कंटक- माझाच चलानी, तोही गळेकापू, दंडित, जन्मठेप काळ्या पाण्याचा अपराधी! मीही तसाच. पण मला पाच वर्ष ह्या बंदिशाळेत - ह्या एकलकोंडीत सडत पडण्याची शिक्षा; नि त्याला लगेच कोठडीतून बाहेर काढून ते काथ्या कुटण्याच हलक काम दिले गेले नि सांगितले गेले की, तुला लवकरच बंदिलेखकात नेमू म्हणून! त्याला लिहितावाचता येत. तर मला पण काही येतच की साब! या बाबूंना लिहिता येत, तर साब, आम्हांला लढता येते! पलटणीत होतो मी सरकार! मर्द आहे साब! पण आम्हांला 'भयंकर' म्हणून ह्या काळ्या पाण्यावर एकलकोंडीत सडत टाकता नि बाबूंना, ह्या डोम कावळ्यांना, ह्या मेषपात्रांना, 'सुधारणीय' म्हणून निवडून त्यांना लग्नाची परवानगी देता! आणि त्या 'पाखरांना'तल्या वाटेल त्या पाखराला पाळायला नेऊ देता! हा अगदी अन्यायाचा नियम नाही का? साब! आम्ही शिपाई लोक, दारचे शिकारी कुत्रे! जिवावर बेतली तरी जो पाळील त्याच्या पायी प्राण द्यायला माघार घेणार नाही. अशांना कोठडीत सडवीत मारण्यापेक्षा सरकारने मला वाटेल त्या लढाईवर धाडाव, शत्रूच्या तोफेच्या तोंडावर सोडाव! सरकारकामी माझे शिर द्यायला हटणार नाही बघा."

"अरे वा! अगदी वेळेवर सांगितलेस बघ हे! सरकारला एक शिर हवंच होते की आता! ते जररेवाले आहेत ना? ह्या काळ्या पाण्याच्या घनदाट जंगलातील राक्षस? माणसाच्या शिरातील कवटी काढून ते तिला तासून घासून, त्यांत रंगी शिंपल्या खचून असा एक सुरेख दारूचा पेला तयार करून देतात म्हणे, की यंव! तसा एक पेला लंडनच्या प्रदर्शनात ठेवायचा आहे सरकारला! त्या जररेवाल्याकडे देतो धाडून तुला! तुझे डोके अगदी फक्कड आहे त्यांना हवी तशी पोकळ कवटी पुरवायला!" साब मोठ्याने हसले.

"माझे डोके? छट्! त्या समोरच्या डोमकावळ्याच - त्या कंटकच डोकंच त्या कामी अधिक उपयोगी! साब, डोक्याच्या कामी बाबूलोकच अधिक डोकेबाज! लवचिक डोके असते ते तासायला - घासायला तशा जडावाच्या कामाला!"

"पण ते त्या कंटकच डोके ब्राह्मणाच आहे, होय ना जमादार? ब्राह्मणाची कवटी म्हणे भरीव असते, मेंदू असतो तिच्यात! आम्हांला पोकळ कवटी हवी तुझ्यासारखी! आम्हांला पोलिसांनी कळवले आहे की, त्या कंटकच घराणे मोठे कुलशीलबुद्धिमान् समजल जाई नि त्याचा बाप म्हणे मोठा शास्त्री होता!"

"हो हो तर! नुसता शास्त्रीच नव्हे, ह्या कंटकाचा बाप मोठा ज्ञानी नि परोपकारी पण होता साब! त्याच्या बापाने आपल्यापाशी असलेली अपरंपार संपत्ती शेवटी एका अनाथालयाला धर्मार्थ देऊन टाकली!"

"हं? अशी तरी किती ती संपत्ती?" आश्चर्याने जमादार मध्येच पुसून गेला.

"तीन मरतुकडी मुले नि एक मुलगी!" रफिउद्दिन हसला. भोळा जमादार फजीत पावल्यासारखा झाला. रफिउद्दिन पुढे सांगू लागला, "ती सारी मुले त्याने अनाथालयाला दिली! त्या भुक्कड मुलांतला हा कंटक वडील भाऊ इथे बाबू बनू पाहतो आहे! आणि ती बहीण कलकत्त्याच्या मासळी बाजारातली बिबी बनके पानपट्टीका दुकान चलाती है साब! मैने खुद उसको देखा है, पान भी चबाया है उसको दुकानका! किधर का कुल और किधरका शील! पोलिसको उसने जो कुछ गपोड बाते बतायी उसको उन्हे भी लिख मारी, और क्या! ऐसे भुक्कड आदमीको आप बाबू बनाते, और हमारे सरीखे सरकारके विश्वासू पलटनवाले विश्वासू मर्द शिपाईओंको कुत्तेकी मौतसे मरवाते है इस कोठडीओंमें!"

"परंतु, तुम काले पानीसे पीछे भागा हुआ बंदिवान है! यह भूलो मत!"

"सरकार, माझा अक्षम्य अपराध आहे तो! पण पश्चात्तापाने माझे मन राख झाले आहे आधीच! त्या दुष्कृत्याने मी काय मिळवल? पहिल्यापेक्षा शतपट अधिक यातनात मात्र पडलो. पुन्हा त्याच कोठडीत बेड्यांनी हातपाय जखडलेल्या बंदीमध्ये येऊन! आता तुम्ही हुसकलंत तरी काळ्या पाण्यावरून परत जाणारा नाही मी! द्याल ते काम करीन, सांगाल तेव्हा इथेच घरदार करीन. पण लग्न तेवढे लावून द्यावे अं सरकार माझे! तिथेच आता माझी माती पडणार! ती ह्या एकलकोंडीतून काढाव एवढीच आपल्या पायी विनवणी!"

"इच्छा जमादार, उद्यापासून ह्याला तेलाच्या घाण्याचं- कोलूच काम द्या! जर तू नीट पुरे पुरे काम करीत राहिलास, तर सहा महिन्यांनी तुला हलके काम देईन. पण बघ, तुझी ही वाह्यात बडबड करण्याची खोड सोडली पाहिजे तुला! कुणाशी अवज्ञेचा चकार शब्द बोलता कामा नये आणि ध्यानात धर की, जर पुन्हा बंदिगृहाचा रस्ता भंगलास, मस्ती केलीस, तर हाडन् हाड तोडून काढीन! पळून जाण्याचा यत्न करणाऱ्या दंडिताला एकदम गोळी घालायचा नवा अधिकार आम्हाला आता देण्यात आला आहे. मागल्या सरकारी ढिलाईच्या भरवशावर पूर्वीच्या फंदात परत पडू नकोस! गाठ आता माझ्याशी आहे! तुझे मागचे अपराध मी विसरतो; पण समाजाला ह्यापुढे तरी उपद्रव न देता कष्ट करून पोट भरशील तर! जमादार, ह्याला ह्या एकलकोंडीतून काढून धाडा घाण्यावर नि तिथल्या बंदिवानात मिसळू देत जा दिवसभर. रात्री बंद करीत जा इथेच."

त्या कक्षकारागृहात प्रत्येक चाळीच्या अंगणात एक छपरी बांधलेली होती. त्यातच ते पायकोलूचे म्हणजे पायघाण्याचे काम चाले. एका मोठ्या लाडकी घाण्याला एक जुवासारखा मोठा दांडा जोडून त्याला प्रत्येकी दोन माणसे लावीत. घाण्यात सरसू ( मोहरीच्या जातीचे बारीक दाण्याचे धान्य) घालून प्रत्येकी तीस पौंड तेल संध्याकाळपर्यंत काढावे लागे. बैलाच्या ठायी जुंपलेली ती माणसे दिवसभर त्या घाण्याभोवती गरागरा फिरत. त्यांच्यात कोणी कुचराई केली, तर त्यांना बैलासारखे हाकण्यासाठी वॉर्डर नेमलेले असते. त्या छपरीत अशा घाण्याची ओळच्या ओळ असे. आणि त्या सर्वांवर देखरेख करण्यासाठी एक तांडेल-दंडितांपैकीच चढवलेला एक दुय्यम जमादार नेमलेला असे. त्या कामाचे कष्ट इतके कठीण असतात की, अट्टल दंडितसुद्धा त्या

छपरीत पाय टाकताच रडकुंडीला येते. यांच्यातील निगरगट्ट सोदे फारच अळंटळे करू लागले तर संध्याकाळी तेल पुरे काढीतो त्यांना तसेच जे जुंपून ठेवीत, ते प्रसंगी रात्री सातआठ वाजेतो! संध्याकाळचे जेवणसुद्धा रात्री तेल पुरे करीतो दिले जाते नसे! अशी सक्ती होती, म्हणूनच ते अट्टल दरोडेखोर, हत्यारी गावगुंड, प्रभृति निर्ढावलेले दंडित काहीतरी शिस्तीत राहत; त्यांच्याकडून काही तरी काम करून घेता येई, जे दुबळे, वा बंदिगृहात तरी जे सद्‌वर्तनी राहू लागते, त्यांना त्या कठोर कष्टांच्या कामी सहसा जुंपीत नसते. निदान जुंपू नये, असा प्रघात तरी असेच.

ह्या कोलूच्या कामाचा रफिउद्दिनला पूर्वीचा परिचय होताच आणि त्यामुळे ते काम न करता कसे करता येते, त्या अंतःस्थ खुब्याही त्याला माहीत होत्या. त्यातही तो कोलूच नव्हे, पण ह्या वेळी त्यावर देखरेख करण्यासाठी नेमलेला तो दंडितातील एक दुय्यम अधिकारी (Convict Petty Officer) तो तांडेल, तो रफिउद्दिनच्या पूर्वीच्या काळ्या पाण्यावरील वास्तव्यातला ओळखीचा निघाला. त्यामुळे बंदिपालाने जे कठिणातले कठीण म्हणून काम त्याला दिले, तोच तो घाणा, ते त्याला सोप्यातले सोपे वाटले. पहिल्याचे दिवशी तांडेलच्या हाती एक ‘हळकुंड’ रफिउद्दिनने हात हलविताना चूपचाप देताच त्यांची जुनी मैत्री नवी झाली आणि रफिउद्दिन दिवसभर मांडी ठोकून गप्पा छाटीत पडून राहू लागला. त्याच्या जागी तांडेलाने दुसरा एखादा थापडवाईक दंडित चोरून लावावा, संध्याकाळच्या आत रफिउद्दिनच्या वाट्याचे तेल पुरेपूर रफिउद्दिनच्या नावे मोजून देण्यात यावे, असे चार-पाच दिवस लोटले.

ह्या दंडित तांडेलाच्या हाताखाली जे दंडित वॉर्डर होते, त्यात जोसेफ हा त्याच्या फार भरवशाचा झाला होता. कारण तांडेलाला मोठेमोठे लोटे भरून तो दही चोरून आणून देत असे. बंदिवानांना आठवड्यातून दोनदा दही मिळे. ते वाटले गेले की, ह्या चाळीतील बंदिवानांच्या पुढील सारे दही हा जोसेफ वॉर्डर धाकधपटशाने काढून नेई आणि ते तांडेलाला देई; तो छपरीच्या आड ते चोरून गट्ट करी. ह्या जोसेफला दागिने आणि पैसे गिळंकृत करण्याच्या लोभाने त्याच्या दोघा लहान लहान मेव्हण्यांना भुलवून, जेवायला घरी आणून अन्नांत विष देऊन ठार केल्याच्या अघोर अपराधापायी जन्मठेप झाली होती.

आणि हा तांडेल, मत्सरापायी आपल्या बायकोची कुऱ्हाडीने खांडोळी उडविण्याच्या अपराधासाठी काळ्या पाण्याची जन्मठेप शिक्षा गेली दहा वर्षे भोगीत आला होता. अशी ही त्या तांडेलाची आणि ज्या जोसेफ वॉर्डरची जोडी होती. त्या चाळीतील घाण्यांना जुंपलेल्या चाळीस-पन्नास बंदिवानांना हुसकीत राहण्याचे काम आणि वाटेल ते करून तेल पुरते पिसून घेण्याचे दायित्व (जबाबदारी) त्या जोडीकडे असे. जे पैसे चारीत वा अत्यंत दंडम पण तांडेलाचे दास, त्यांना चक्क बसवून ठेवण्यात येई आणि त्यांचे काम जे त्यातल्या त्यात सद्‌वर्तनी, गयाळ, सोसाळू, त्यांना मरेमरेतो राबवून भरून काढण्यात येई.

तांडेलाच्या साऱ्या छद्मकर्मांना हातभार लावीत असल्यामुळे जोसेफवर त्याचा विश्वास बसून तो जोसेफपासून फारसे काही चोरून ठेवीत नसे, ठेवणे कठीणही होतेच. रफिउद्दिनने जोसेफलाही

लागेले तेवढी तंबाखू आणि प्रसंगी थोडी मोहरीएवढी अफूची गोळीही देऊन आपलेसे करून ठेवले होते. परंतु तांडेलाला कितीही प्रसन्न केले, तरी आपल्याला वॉर्डरच्या वरची बढती देऊन तांडेल काही तांडेलपद अर्पू शकत नाही; ते साधले तर बंदिपालाचीच कृपा काय ती साधून मिळू शकणार, हेही जोसेफ काही विसरला नव्हता! म्हणूनच बंदिपालाची ती कृपाही साधण्याचा यत्न जोसेफने सारखा चालविलेला असे. आणि त्याचे साधन - बंदिगृहातील बढतीचे बहुधा जे एकच तुरतदान महापुण्य देणारे साधन असते ते -चुगली! ह्यासाठी आपल्या छद्मी वर्तनाचा संबंध फारसा ज्यात येणार नाही, आपली हानी एकंदरीत ज्यात फारशी होणार नाही, अशा त्या घाण्याच्या छपरीतील त्या तांडेलाच्या अनेक दुष्कृत्यांच्या चुगल्या हा जोसेफ कोणालाही न कळेल अशा बेताने आणि अशी वेळ साधून बंदिपालाकडे गुपचूप जाऊन सांगत असे? ‘शठासि आणावा शठ’ ह्याचे न्याये ह्या शठांच्या राज्यात व्यवस्था ठेवणे भाग असल्याने बंदिपालसाहेबही अशा हेरांना नेहमी हाताशी धरीत. त्यांनी आणलेल्या चुगल्यांपैकी अनेक दुष्कृत्ये अपरिहार्य म्हणून पोटात घालीत. जी अगदीच अक्षम्य, ती स्वये जाऊन अचानक पकडीत; पण अशा बेताने की, जोसेफसारख्या पटाईत हेरानेच ती चुगली केली, हे बंदिवानाच्या ध्यानात सहसा येऊ नये, हे हेर आहेत बाहेर फुटू नये, नाहीतर त्यांच्यासमोर त्यांच्यावर विश्वासून कोणीच काही दुष्कृत्य करणार नाही!

आठ दिवसांनी दुपारी बारा वाजता, लेख्यालयातले सारे लेखक, गणक घरी गेले असता, बंदिपाल अवेळी एकटाच लेख्यालयात आला. “शिपाई!” म्हणून त्याने हाक मारताच पहाऱ्यावर असलेला एक शिपाई आत आला! “जोसेफ वॉर्डरको बुलाव!” असे बंदिपालाने आज्ञापिताच शिपायाने बंदिगृहात जाऊन जोसेफला बंदिपालाकडे धाडले आणि आपण पुन्हा पहाऱ्यावर बाहेर येऊन उभा राहिला.

“क्यौं जोसेफ?” बंदिपाल पुसू लागला, “घाण्याचे, तुझ्या चाळीतील छपरीत कसे काय चालले आहे काम? तो नवा दंडित रफिउद्दिन घाण्याच त्याच्या वाट्याच तेल पुरंपुर पिसून देतो का? त्याच्याशी कुणाचे काही सूतबीत जमत आहे की काय?”

“साब, त्याच तेल तो पुरंपुर मोजून देतो...”

“हं? पहिल्या दिवसापासून पुर काम करतो तसला नाठाळ दंडितसुद्धा? खरे सांग, चाचरू नकोस!”

“साब, तेल पुरंपुर मोजून देतो तो; पण ते सगळे तो स्वतः पिसीत नाही. आपली सकाळची बंदिगृहातल्या फेरीची वेळ टळेतो, तो घाणा कसाबसा ओढतो, पण पुढे तो बसून राहतो नि त्याच काम दुसरा कुणी तरी दिवसभर घाणा ओढून पुर करतो. तांडेलच बदली माणूस देतो.”

“काय?” बंदिपाल संतापला, “तू मला हे इतके दिवस न सांगता दाबून ठेवलेस? मग तुला मी कशाला ठेवले आहे तिथे टेहाळणी करायला?”

"क्षमा करावी साब! पण मागे इतर काही दंडितांना असेच बसवून ठेवून नि बदली माणूस देऊन तांडेल काम करून घेतो, म्हणून मी गुपचूपपणाने आपणाला कळवले, तेव्हा आपण तिकडे कानाडोळा केलात; म्हणून मी भ्यालो तेच ते आताही सांगायला!"

"केव्हा कानाडोळा करायचा नि केव्हा नाही, तो प्रश्न माझा आहे. खरेच जे दुबळे वा सुधारणीय, त्यांना शिस्त वेळी ढिली असली तरी चालेल. काम पुर झाले की आटोपल. पण हा रफिउद्दिन अनेक अधमाधम अपराध केलेला; त्यात काळ्या पाण्यावरून पळालेला! त्याच्याशी कोणाचंही सूत पटता कामा नये. बोल, तांडेल त्याला का बसवून ठेवतो? तो का रफिउद्दिनचा मिंधा?"

"सरकार, ते मला अजून पक्कं कळले नाही. नाही तर ती गुप्त बातमी मी तेव्हाच दिली असती. पण होय ना होय रफिउद्दिनने तांडेलला पैसा चारला असावा!"

'पैसा? नि रफिउद्दिनापाशी? त्याची झडती सांजसकाळ बसून स्वतः जमादार घेतो ना? माझी सक्त आज्ञा आहे तशी!"

"झडती कस्सून घेतो जमादार! पण रफिउद्दिनपाशी पैसे आहेत खरे कुठे तरी लपवलेले. नाही तरी तंबाखू नि अफू, पण तांडेल इतकी त्याच्यासाठी स्वतःच्या पैशातून चोरूनमारून बंदिगृहात कशाला आणवणार होता!"

"हां! त्यातीलच काही तमाखू नि अफू तुलाही ते चारीत असतील म्हणून तू तू चुगली अजून मला केली नव्हतीस!"

देवाची शपथ, साब, मी शिवलो नाही कधी त्याच्या तंबाखूच्या चिमटीलासुद्धा पण तांडेलाला तो पैसा देतो, ह्याचा पक्का पुरावा मिळाल्यावाचून मी चुगली करतो, तर आपण मलाच खोटे पाडतेत, म्हणून मी डोळा तेवढा ठेवून होतो. तांडेलाच्या पोटात शिरून मी त्याच बिंग लवकरच उजेडात आणीन साब. बहुधा उद्याच त्यांची काही तरी देवघेव होणार आहे पुन्हा, अशी भाषा मी ऐकली आहे छपरीआड. साब, पण मला तांडेलाची भीती वाटते; मी नुसता वॉर्डर! जर मला आपण, धनीसाब, तांडेल कराल ना..."

"तर तू त्या तांडेलापेक्षाही जास्त पैसे खाऊन दुर्जन निघशील! बरे, तू धरून दे पुराव्यासुद्धा रफिउद्दिनचे पैसे घेताना त्या तांडेलाला, किंवा रफिउद्दिन पैसे कुठे लपवितो ते तरी पकडून दे, मग बघेन तुझ्या बढतीच काय ते! जा, लाग आपल्या कामाला. पण थांब, तुला मी एकटाच बोलवला ह्यामुळे बंदिवानांना तुझा हेर म्हणून संशय येईल. एवढ्यासाठी हे काही तरी उघड काम घेऊन जा. तांडेलाला सांग की, सरसू तेलाची तीन मोठी पिंप आत्ताच्या आता भर, मद्रासच्या तारवावर चढावयाची आहेत ती ताबडतोब! ही घे चिठ्ठी! हं जा! एवढ्यासाठी बोलावले म्हणून सांग!"

बहुतेक बंदिगृहांतून दुपारी बारा ते दोनची वेळ म्हणजे सर्वतोपरी ढिलाईची असते. वरचे सारे उत्तरदायी (जबाबदारी) अधिकारी घरोघर गेलेले असतात. त्यामुळे शिपाई काय, बंदिवान

अधिकारी (Convict Officers) काय, शिस्तीचे पायबंद सोडून पाय पसरून पडलेले असतात. अगदी अपरिहार्य तेवढीच व्यवस्था, शिस्त आणि कामे चालू असतात.

ह्या वेळी नेहमीप्रमाणे बंदिपाल आपल्या त्या कक्षकारागृहाच्या महाद्वारावरचे असलेल्या बंगल्यात खिडकीपाशी उभा होता. तोच खालून जोसेफ वॉर्डर त्याच्याकडे येते असलेला त्याने पाहिला. त्याला बंदिपालाने वरूनच बंगल्यावर ये म्हणून अनुज्ञा दिली. जोसेफला पहारेवाल्या शिपायाने बंगल्यात जाऊ दिले.

जाताच जोसेफने बंदगी करून सांगितले, “साब, आत्ताच्या आता चलाल तर पुराव्यासह तांडेलला पकडता येईल. रफिउद्दिनने सोन्याची गिनी तांडेलाला दिली, ती आपल्या कुडत्याच्या खालच्या पट्टीला असलेल्या चोरखिशात घालून तांडेलाने शिवून ठेवली आहे. रफिउद्दिनपाशी आणखी दोन गिन्या तरी त्याच्या अंगावरचे आहेत. तंबाखू नि अफू तांडेलाने त्याला आणून दिली, तीही सरसूच्या पोत्यात सध्यापुरती कोंबून ठेवून ते दोघे छपरीच्या मागच्या बाजूला आडोशाला निष्काळजीपणाने डुलक्या घेत पडले आहेत. मी कपडे धुवायच्या निमित्ताने चाळीबाहेर पडलो, तो कुणी नाहीसे पाहून तडक आपल्याकडे आलो. पण धनी! माझे नाव मात्र सांगू नये! नाही तर माझे डोकंच फोडतील ते कुणी तरी बंदिवान मला गाठून कुठे तरी! पण आपण मात्र लवकर जावे.”

“ठीक. जा तू. हे सारे पकडले गेले तर तुला बढती मिळेल! तू आपल्या कामावर त्या छपरीत जाऊन बैस जा गुपचुप.”

जोसेफ जाताच बंदिपालाने जमादाराला आपल्यासह घेतले आणि नेहमीची खालची वाट टाळून, वरच्या टॉवरच्या तिसऱ्या मजल्याच्या वर्तुळात येऊन आणि साऱ्या चाळीची दारे त्या टॉवरमध्ये जी वाटोळी लागलेली होती, त्यातून रफिउद्दिन असलेल्या चाळीचे ते तिसऱ्या मजल्याचे दार वरच्या वर उघडून तो बंदिपाल अचानक त्या छपरीच्या अंगणात खाली उतरला. कोणी पाहते न पाहते तो तिच्यामागे त्या आडोशाला आला; तो जोसेफने सांगितल्याप्रमाणे रफिउद्दिन आणि तांडेल डुलक्या घेत पडलेले आहेत आणि रफिउद्दिनच्या घाण्याला एक दुसराच बापडा बंदिवान- जो तांडेलाने धाकदपटशा दाखवून लावलेला होता, तो बिचारा रडकुंडीला येऊन पायघणा फिरवीत आहे, असे आढळले!

“तांडेल!” बंदिपाल गरजला.

ताडकन् दचकून तांडेल उठला, पाय लटपटले, तोंड रडकुंडीला झाले, हात जोडून ठाकला.

“तुझ्यापाशी काही नियमाविरुद्ध वस्तू आहे? नाही? त्या कुडत्यात काय शिवले आहेस? काही नाही? जमादार, घ्या ह्याची झडती, त्या कुडत्याची ती खालची पट्टी फाडा!”

बंदिपाल त्या जमादाराशी हे बोलतो आहे तो तो रफिउद्दिन मागच्या पायी निसटून आपल्या घाण्याकडे जाऊ लागला.

“ठैरो! ऐ बंदिवान रफिउद्दिन! ठैरो! पकडो उसको!”

दोन-तीन वॉर्डरांनी, बंदिपालाचा आवाज ऐकला न ऐकलासे करून तसाच निसटून छपरीत जाऊ पाहणाऱ्या रफिउद्दिनला अडविले. तो उभा ठाकला; पण भीतीने गांगरून नव्हे तर उलट एखाद्या बिथरलेल्या सर्कशीतील वाघासारखा - त्याची सारी हिंस्त्र वृत्ती अंगात उसळून, डोळे वटारून, ताठरपणे त्या अडविणाऱ्या वॉर्डरचे हात मधून मधून झटकीत! जमादाराने तांडेलाचे कुडते काढून पट्टी फाडली; तो खळकन् एक सोन्याची गिनी खाली पडली! “ह्या रफिउद्दिनची पण झडती ध्या!” बंदिपालाने आज्ञा दिली. जमादार पुढे झाला. बंदिपालाच्या आड जमादार थोडासा येताच! रफिउद्दिनने स्वतःच्या पोटगुळीस खोचलेले काहीतरी कमरेमागे हात नेऊन चलाखीने काढले. त्यासरशी जमादार ओरडला,

“साब! साब! ह्याने पोटगुळीचे पैसे हाती घेतले आहेत, गिन्या आहेत साब ह्याच्या हातात! ह्या, ह्या हातात! धरा, हा हात, हा!”

जमादार, वॉर्डर हाताशी झगडतात, तोच रफिउद्दिनने गिरकी मारून बंदिपालाकडे पाठमोरे होताच हातातले काही तरी तोंडात टाकले.

“तोंडात घातल्या गिन्या ह्याने! हो हो धनी, अगदी गिन्याच! मी पाहिल्या! आत्ता ह्याच्या तोंडात आहेत!” जमादार, वॉर्डर प्रतिज्ञेवर ओरडू लागले.

बंदिपाल ओरडला, “तोंड उघड! रफिउद्दिन, उघड! तोंड उघड!”

एक-दोन वेळा जमादाराच्या हाताला हिसडून, मान खालीवर केल्यानंतर रफिउद्दिन स्पष्ट शब्दात ठासून म्हणाला,

“काय निष्कारण छळ हा साहेब, आम्हा बापड्यांचा चालवला आहात ह्या लबाड हलकटांच्या चुगल्या ऐकून! हे पाहा तोंड उघडतो! आहे काही तरी आत? बोलता तरी आले असते का मला जर तोंडात सोन्याची खाण असती तर!”

आ वासून रफिउद्दिन जमादाराला वेडावू लागला. बंदिपालासमोर आ वासून दाखवू लागला. “जीभ वर घे, मागे ने, हा जबडा नीट उघड! तो उघड!” बंदिपाल म्हणे तसतसे रफिउद्दिनने केले. पण तोंडात काही एक आढळले नाही!

“क्यौं, जमादार, किधर है उसके मूंहमे गिनिआँ?” बंदिपालाने विचारले.

ओशाळलेला जमादार थोडा चाचरत पण पुन्हा तेच सांगू लागला,

“काही म्हणा साब, ह्याच्या तोंडात काहीतरी होतंच होते!”

“काही तरी माझ्या तोंडात होतंच, आहेही, पण ते काही तरी म्हणजे सोन्याच्या टिकल्या जडवलेले माझे दात! ते चमकताना तुझ्यासारख्या भुक्कडाला सोन्यासारखे वाटले, भासले असावे नि आज ना उद्या, रे दुष्टा, तुझ्या नरडीला तेच फोडल्यावाचूनही राहणार नाहीत!”

रफिउद्दिन बेछूटपणे जमादाराला शिव्या हासडू लागला! हा दुर्जन बिघडला आहे, असे पाहताच बंदिपाल गरजला,

“बेड्या ठोका आताच्या आता ह्याच्या हातात! आणि धरून ठेवा त्याला इथे! मानेची हिसडफिसड करीत होता, तेव्हा गिळलंही असेल त्याने न समजू देता काही तरी!”

रफिउद्दिनच्या हातात बेड्या ठोकून शिपाई त्याला धरून ठेवताहेत तो बंदिपाल छपरीत गेला आणि ते कोपऱ्यातले सरसूचे पोते उपसून पाहिले तो आत एक मोठी जुडी आणि तीतच अफूची डबी सापडली!

जोसेफने दिलेली गुप्त बातमी तंतोतंत खरी होती. दुरून जोसेफ सगळे सगळे तिऱ्हाईतपणे पाहात होता. पण एवढ्या घोटाळ्यात जो मुख्य अपराधी रफिउद्दिन त्याच्या अंगावर किंवा त्याला गोत्यात आणण्यासारखे काहीच सापडले नाही. तरीसुद्धा हजारात एखादा बंदिवान इतका बेडर आणि खट्याळ असतो की, पकडला जाण्यापेक्षा वस्तू गिळून टाकून नाहीशी करायला सोडीत नाही, ह्याचे दोन-तीन अनुभव त्या बंदिपालालाही आलेले होते. त्याचा विचार करून त्याने रफिउद्दिनचा पिच्छा पुरविण्याचे ठरविले. तांडेलाला तात्पुरते कमी करून त्यावर खटला भरला आणि डॉक्टरला बोलावून रफिउद्दिनला ओकारीचे औषध देण्यास सांगितले.

हातकड्या घालून कोठीत नेऊन रफिउद्दिनपुढे ओकारीचे औषध ठेवताच त्याने तो पेला भितीवर भिरकावून दिला. तो पुरता पिसाळला. “बळाने पाजा त्याला!” बंदिपाल गरजला. वॉर्डर, जमादार, शिपाई पुढे सरसावले. ओढाताण करीत, लाथाबुक्क्या खात देत, रफिउद्दिन शेवटी खाली पडला. त्याचे हातपाय दाबून, तोंडचाप असतो तो घुसवून, त्याचे तोंड उघडून, औषध एकदाचे पाजले गेले. पहारे बसविले. संध्याकाळपर्यंत दोन-चार उलट्या झाल्या, पण काही एक पडले नाही. बंदिपालही थोडा कचरला! कारण रफिउद्दिनने पैसे गिळताना त्याने स्वतः पाहिलेले नव्हते. रफिउद्दिन तर ‘जमादारानेच कुभांड केले आहे’ म्हणून धडाधड अगदी गलिच्छ शिव्या जमादाराला हासडीत होता. पण प्रथमची झडती घेणारे वॉर्डरही ‘त्याने गिन्या गिळल्या नक्की?’ असे शपथेवर सांगू लागले. डॉक्टरचा अभिप्रायही ‘रेच द्यावा, काही चिंता नाही, उलट पोटांत गिन्या अडकल्या तरच दंडिताच्या जिवाला धोका आहे,’ असा पडला. तेव्हा पुन्हा रफिउद्दिनला बळाने खाली पाडून तोंड वासून रेचाचे औषध पोटात राहितो पाजले आणि त्याच्या कोठडीत नेहमीच प्रत्येक बंदिवानाच्या एकलकोडींत ठेवतात त्याहून मोठी अशी कुंडी ठेवून पहारा बसवून कोठडी तालेबंद करण्यात आली. डॉक्टर, बंदिपाल प्रभृति सर्व जण रात्रीच्या पद्धतीप्रमाणे गणती घेऊन चाळींना कुलपे ठोकून घरोघर निघून गेले.

ती रात्र रफिउद्दिनने अत्यंत असह्य आणि अस्वस्थ अवस्थेत घालविली. रेच होते असता त्या पोटदुखीमुळे शरीराला जी अस्वस्थता वाटत ती तर होतीच; पण आपल्यावर त्या दिवसभर छळांचा आणि अन्यायाचा भडिमार व्हावा ह्या विचारासरशीं त्याच्या अंगाची संतापाने लाही होते होती. त्याने जगाचा पूर्वी वा आता कोणता तरी छळ केला होता काय? वा दुसऱ्या कोणाला काही तरी उपद्रव दिला होता काय? असा प्रश्न त्याच्या वाऱ्यालाही कधी उभा राहिला नव्हता! छळ म्हणजे त्याला त्रास होईल असे लोक जे जे करीत तो, एवढीच काय ती छळाची त्याची कल्पना!

त्याच्या इच्छेविरूद्ध दुसरे कोण जे जे करतील तो अन्याय! ह्या पलीकडे त्या शब्दांना त्याच्या कोशात अर्थच नव्हता! त्या जमादाराने जर त्याला गिन्या लपविताना पाहिले नसते, तर कशाला हा प्रसंग येता! पाहूनही जर त्या जमादाराने सांगितले नसते, तर सारे निभावते! त्यावरही बंदिपाल जर त्याकडे कानाडोळा करून तो वागेले तसा त्याला वागू देता, तरीसुद्धा काय बिघडले असते? अर्थात् तसे न करता त्या जमादाराने ते पहावे, सांगावे आणि बंदिपालाने त्याला असे सतवावे, त्याची तंबाखू-अफू तोडावी, त्याच्या गिन्या पकडण्याची भामटेगिरी चालवावी, हा केवढा दुष्टपणा त्यांचा! किती अन्यायी छळक आहेत हे सारे! 'मला एकट्याला पाडले, कुदलले, नि दिले पाजून!"

हेच हेच विचार त्याच्या तापलेल्या आणि पिसाळलेल्या मस्तकात सारखे चकरू लागले. संताप! संताप! संतापून गेला तो अगदी! त्या जमादाराचा आणि त्या बंदिपालाचा गळा घोटू की रक्त पिऊ! पण काय उपाय! तरी देखील काही तरी सूड असा घेतलाच पाहिजे. कोठडीत बंद करून जाताना जमादाराने त्याच्या हातातली हातकडी काढलेली होती. पण नुसता हात काय करणार? पण हो रे हो! लाहोरच्या बंदिगृहात त्या नूरमहंमदाने वेड्याचे सोंग घेतले होते, तेव्हा अगदी असेच केले होते, नाही का? बस, त्याने वेड साधावे म्हणून जे केले, तेच मी सूड साधावा म्हणून करणार! यव रे यव! येऊ दे आता सकाळी माझे दार उघडायला त्या जमादाराला! बंदिपाल नि तो डॉक्टरही तेव्हाच येईल तर किती बहार होईल! रेच देता काय सा... नो मला! हाः हाः हाः! अशी उडेल एकेकाची की यव रे यव!

असा काय जो त्याने सूडाचा बेत म्हणून मनात योजला, तो घडताच त्याच्या अपमानाची भरपाई होऊन त्या छळवादी जमादारादिकांची जी दुर्गति होणार तिचे, ती जशी आता झालीच आहे असे, चित्र त्याला दिसू लागले! तो पोट धरधरून समाधानाने स्वतःशी हसू लागला.

बंदिगृहात हजारात एखादा अघोर दंडित जेव्हा केव्हा असा काही भलताच पदार्थ गिळून बसतो आणि त्याला रेचाचे औषध बळाने देण्यात येते, तेव्हा सकाळी त्याची खोली अधिकारी स्वतः उघडतात आणि भंग्याकडून त्याच्या रेचाच्या कुंडीची झडती घेण्यात येते. तो पदार्थ पोटाबाहेर पडला की नाही, ते निरीक्षिण्यात येते. त्याप्रमाणे भंग्याला घेऊन जमादार आणि दोन वॉर्डर सकाळीच रफिउद्दिनच्या खोलीसमोर आले. गजाच्या दाराचे कुलूप काढून जमादार जो आत पाऊल टाकतो तोच-

रफिउद्दिनने त्याचे पिण्याचे म्हणून आत असलेले टमरेल फाड्किनी जमादाराच्या तोंडावर फेकले! त्या टमरेलातच त्याने रेच केला होता! तो सारा मैला जमादाराच्या तोंडावर, डोळ्यांवर, मिशात, कपड्यांवर फवाऱ्यासारखा पडून, निथळून जमादाराच्या अंगाची घाणच घाण झाली, जीव गुदमरून गेला, ओकारी आली! जमादार एकदम "शीः शीः शीः!" करून ओरडला.

तो अघोरी रफिउद्दिन "हाः हाः हाः" करून मोठ्याने खिदळू लागला.

"माझ्या पोटातले सोने हवे होते ना तुला? रे पाजी, रे भंगी! घे ते सोनं! खा, पी! मढवून टाकल बघ त्या सोन्यांत तुला! हरामी.."

शिव्यांची गदळ लाखोली मोजीत रफिउद्दिन एका कोपऱ्यात आश्रय घेऊन, ते टमरेल उगारून, ठाण मांडून राहिला.

लज्जेने, रागाने, घाण घाण होऊन गोंधळलेला जमादार ओरडला,

'बघता काय! वॉर्डर, ओढा त्या डुकराला पुढे!"

वॉर्डर पुढे धावले; पण त्याच्या अंगावर जाणार तोच थबकले! इतकी माणसे असून त्याच्या अंगाला कोणी हात लावीना!

कारण त्या निलर्ज्ज पशूने आपल्याला शिवायला कोणी धजू नये, म्हणून एक विलक्षण घाणेरडी युक्ति आधीच योजलेली होती! त्याने आपलेही अंग आपल्याचे मैलाने लडबडून ठेवलेले होते! ते वॉर्डर त्या घाणीची किळस येऊन आणि घाणीला शिवायचे नाही ह्या भावनेमुळे रफिउद्दिनच्या अंगाशी बिलगण्यास कचरू लागले! संतापाच्या भरात स्वतःचाच दंडा रफिउद्दिनच्या डोक्यात हाणावा म्हणून जमादार धावला; पण बंदिपालाच्या आज्ञेवाचून बंदिवानाचे डोकंबिके फुटले तर आपणच संकटात पडू, म्हणून त्याने राग पुन्हा आवरला. नुसत्या हाताने रफिउद्दिन आपल्या एकट्याला आवरेल असे वाटेना, म्हणून पुन्हा थबकला.

बंदिपाल येतच होता; इतक्यात ही आरडाओरड ऐकून शिपायासह धावतच तो तेथे आला. तो प्रकार पाहताच क्रोधाने लालबुंद झाला आणि शिशाची भरीव मूठ असलेली काठी त्याने रफिउद्दिनच्या डोक्यात घातली. रफिउद्दिननेही टमरेतील घाण बंदिपालावर शिंपली, त्यासरशी जमादार, शिपाई सारेच तुटून पडले. दाण दाण दंडुक्यावर दंडुके पडून रफिउद्दिन खाली कोसळला; बैलासारख्या मोठमोठ्याने डुरकू लागला,

“मारो मत्! साब, तुमको बंदिवानको मारनेका हुकूम नही! बंदिगृहात नियम तोडते हो तुम! अन्याय, अन्याय! गळेकापू कसाई! भ्याड आहात तुम्ही सगळे!”

“रे डुक्कर!” बंदिपाल गरजला, “बंदिगृहाचे नियम तुला आता आठवतात काय? लोकांच्या माना कचाकच कापणाऱ्या राक्षसा, तुझी मान मुरगळली जाताच तेवढा न्याय नि अन्याय कळू लागला अं तुला! 'गळेकापू' ही शिवी आहे समजल ना तुला? ठोका आणखी! मेला तरी चिंता नाही! पशु, घाणीतला किडा!”

रफिउद्दिन आता मात्र खरोखरच नरम आला. तो धापा टाकीत पडला.

भंग्याने रफिउद्दिनच्या कुंडीतला रेच बंदिपालासमक्ष ओतून पाहिला. त्या घाणीत रफिउद्दिनच्या पोटातून काही गिळलेला पदार्थ पडला आहे की काय! त्यात काही मिळेल, ही रफिउद्दिनला धास्तीच नव्हती; कारण त्याने गिनीबिनी काही गिळलीच नव्हती मुळी! बंदिपालाची फजिती झालेली पाहून तो उलट आनंदला! तशा घायाळ अवस्थेतही तो निगरगट्ट डुक्कर गदळ विनोदाने उपहासला,

“काय? सोनंच सोने पडले नाही पोटातून माझ्या? घ्या! घ्या तो वाटून तुम्ही सगळे आवडेल तितके!”

डॉक्टरसुद्धा ओशाळला.

"आपण उगीचच ह्याला त्रास दिला. पर्यवेक्षक महाशय (सुपरिटेंडंट) रागावणार तर नाहीत ना? ह्याने काही गिळले होतंस दिसते नाही!" डॉक्टर बाहेर येऊन बंदिपालाला इंग्रजीत म्हणाले,

बंदिपाल उत्तरला,"ते दायित्व माझ्यावर! तुम्हांला माणसाच्या प्रकृतीची परीक्षा कळते, राक्षसाच्या नि रानडुक्करांच्या नव्हे! कारागृहातील जग कसे असते, ह्याचा तुमच्यासारख्या ह्या विभागाला नवीनच चाकरी करू आलेल्या डॉक्टरांना पुरता अनुभव आलेला नाही! ह्याला पुन्हा एक ओकारीच औषध दिलेच पाहिजे!"

"काय? ओकारीच? त्याचा काही उपयोग नाही! ह्याच्या पोटात काही नाणे नसावे, नाही तर पहिल्यांदाच उमळत."

"पोटात नाहीच. पण-थांबा; पुन्हा नक्की पाहून सांगतो." असे बोलून बंदिपाल जमादाराला म्हणाला, "हं! ह्याला हातकडी ठोका, भंग्याकडून धुऊन काढा."

हे वाक्य बंदिपाल उच्चारीत आहे, तोच रफिउद्दिन पुन्हा चिडला,

"काय? भंग्याकडून मला धुवायचे? मी काय पायखान्याची फरशी आहे? माझी जाते बाटवणार? भंग्याचा जीव घेईन! तू साहेब नाहीस! कुणा भंग्याच्याच पोटचा..."

हा अपशब्द ऐकताच पुन्हा साऱ्यांनी त्याला लाथाबुक्क्यांखाली कुदलला आणि बंदिपालाने स्वतः त्याच्या गळयाच्या फासळ्यांपाशी इतक्या बळाने दाबून तो चिमटला की, रफिउद्दिनने एकदम किंकाळीच फोडली! डॉक्टर घाबरला, पुढे होऊन बंदिपालाचा हात धरून त्याने त्याला बाजूला केले आणि समजावले.

"हे काय? रागाच्या भरात मारीत होतात की त्याला गळा दाबून ठार! भलतसलत होईल बरे एखादे वेळी."

"भलते नाहीच, पण सलते मात्र झाले खरेच?" बंदिपाल हसला. "डॉक्टर, ह्या माणसाच्या गळ्याला 'खोबडी' आहे, नि ती भरलेली आहे, ह्यात शंका नाही! मी म्हणूनच गळा दाबून पाहण्याची ही संधि जुळवून आणली, कळले? मी ती खोबडी दाबताच आतील वस्तू त्याला एकदम सलली, बोचली, म्हणून तो ओरडून पुन्हा पुन्हा ती गिळीत दाबून धरीत होता तोंडातल्या स्नायूंनी! उलटीच औषध द्या बळकट एक, की 'खोबडी' उघडलीच ह्याची!"

"पण 'खोबडी' म्हणजे काय?" डॉक्टर जिज्ञासले.

"त्याच थोडक्यात असे आहे की, पशु रवंथ करण्यासाठी गळ्याच्या ज्या पोकळीत चर्वण साठवून ठेवतात, ती पोकळी मनुष्यालाही आपल्या त्याच जागी करून घेता येते. अत्यंत निर्ढावलेले अपराधी गुरुपरंपरेने ह्या विद्येत पटाईत होतात. तोंडात एक शिशाची गोळी, तिला मांस जाळत एक रसायन लावून ते ठेवतात. ती गळ्याच्या कानाच्या बाजूला रुपेल अशा बेताने बरेच दिवस सारखी राहिली की भाराने मांसात उतरत त्या पोकळीला भोक पाडीत आत जाते. पुष्कळांना ते पुरते साधत नाही. त्यांना उथळ भोक पडते. चवलीपावली राहील इतके; ज्यांना पुरते

साधत त्यांना मोठे भोक पडते. गारूडी एका खेळात तोंडातून नाना प्रकारच्या वस्तू काढून दाखवतात, त्या ह्याचे पोकळीत साठवलेल्या असतात. उलटीने त्या वर येऊ न देता पटाईत दंडित त्या अडवू शकतात. पण स्नायू थकले तर दाबासरशी त्या वस्तू वर येऊ शकतात. मला दोन- तीन अनुभव आले असले! ह्याचाही पिच्छा मी शंका फिटेतो फेडणार. आता उलट्या झाल्या, तर कोरड्याच होणार त्याची दमनशक्तीही क्षीणावलीच आहे! दायित्व माझ्यावर! माझी आज्ञा म्हणून औषध पाजा!"

डॉक्टरने उलटीचे औषध हो ना करून पुन्हा देण्याचे मान्य केले. पण ते आणायला जाताना मनात म्हणतच होता की, ' हा बंदिपालही विक्षिप्त! हट्टाला पेटलेला दिसतो! उगीचच त्या दंडिताला छळीत आहे. काय म्हणे गळ्यात गिन्या असतात! उद्या हा मला असेही समजावू धजेल की दंडितांच्या करंगळीत कांद्याचे पोते भरलेले असते! शेवटी फजीतच पावणार हा!'

उलट्यांचे औषध पुन्हा आणले जाताच सगळ्यांनी मिळून ते रफिउद्दिनास बळे बळे पाजले. काही वेळातच त्या दुर्जनाला पुन्हा मोठमोठ्या कोरड्या ओकाऱ्या येऊ लागून त्याचे आतडे न आतडे ताणताणून त्याचे अवसान सुटले. इतक्यात एका आचक्यावर आचके येणाऱ्या उलटीस पाहून बंदिपालाने हातकडी घालून पाडलेल्या रफिउद्दिनाच्या गळ्याच्या फासोळ्यांतील कानाखालत्या दोन्ही पोकळ्या बळकट दाबून घरल्या आणि बोटे वर वर सरकवीत नेली, तो एका आंचक्यासरशी तीन, चार, पाच, गिन्या खळ खळ खळ करीत रफिउद्दिनच्या तोंडातून भुईवर पडल्या! आणि एक लहान डबी -तीत अफू!

“गिन्या! गिन्या! पडल्या उन्मळून! गिन्या!” वॉर्डर, शिपाई, डॉक्टर, भंगी- सारे जण एकदम गलका करून उठले!

सगळ्यात आनंदाने बेभान झाला तो जमादार! पुत्रजन्माचा आनंद झाला त्याला त्या गिन्यांची सुखप्रसूति होताच! त्याच्यावर खोटे बोलण्याचे जे किटाळ येणार होते, ते टळले! उलट अपराध पकडणारा पटाईत जमादार असा तोच ठरणार होता आता!

आजवर रफिउद्दिन ‘खोबडी’त भरभरून घेऊन जाई त्या गिन्यांच्या जिवावर तो ज्या अनेक वेळां अनेक बंदिगृहात पडला, त्यात जिवंत राहिला होता, चैनीत असे. पण आता मात्र तो पहिल्यानेच बंदिवासात हताश झाला! अशा पाच गिन्या म्हणजे पाच लाख रुपयांची संपत्ती समजली जाते बंदिगृहात! कारण तंबाखूची एक चिमटी म्हणजे बंदिवान जगातला एक रुपया! एका रुपयाने जे काम बाहेर जगात करून घेता येते, ते तंबाखूच्या एका चिमटीने; आणि शंभर रुपयात जे काम बाहेर करून घेता येते, ते अफूच्या मोहरीएवढ्या एका गोळीने बंदिगृहात करून घेता येते! अशा ‘एक चिमूट, एक रुपया’ भावाने पाच गिन्या म्हणजे पाच हजार रुपये होते ते त्याचे! त्यावर स्वतः काही काम न करता पन्नास बंदिवान सेवेला ठेवून पाच वर्षे त्या कक्षकारागृहातील त्याचा सारा श्रीमंत संसार थाटणार होता! पण आता तो निष्कांचन, भुक्कड झाला! आता त्याला कोण विचारतो बंदिवानात! हताश असा तो आज झाला!

आणि त्यातच त्यावर भरलेल्या त्या दिवशीच्या त्या सगळ्या आततायी दूर्वतनाविषयीच्या खटल्याचा निर्णय देताना पर्यवेक्षकाने रफिउद्दिनला बंदिगृह्य नियमानुसार शिक्षा ठोठावली, तीस फटके!

फटके हा शब्द ऐकताच रफिउद्दिनच्या अंगात कापरेच भरले! हिंस्त्र श्वापदे जशी, तशीच हिंस्त्र श्वापदमाणसेही जर कोणत्या दंडाला खरोखरच भीत असतील तर ती शारीरिक शिक्षेलाच होते. मानसिक नव्हे! मन असे मनाच्या अर्थी ह्यांना जवळ जवळ नसतेच! हिंस्त्र श्वापदे माणसाळलीच तर चाबकाने! हिंस्त्र श्वापदमाणूस फटक्याने! हा त्या शेकडो अघोरी दंडिताना माणसाळविण्यात जन्म गेलेल्या बंदिपालाचा ठोकताळा रफिउद्दिनच्या प्रकरणीही खरा ठरतोसा दिसला. जन्मठेपेच्या शिक्षा तो हसत ऐके; फटक्यांची शिक्षा ऐकताच तो आज प्रथमच थरथर कापला, खरोखरच भ्याला!

फटके मारण्याच्या आदल्या रात्री रफिउद्दिनला झोप अशी लागली नाही. फटक्यांचे सपसप आवाज त्याला ऐकू येते. त्याचे मन थरथरू लागे. तरीही त्याचे एक वैद्यशास्त्र त्याच्यासारख्याच अघोरी आततायाच्या संप्रदायात तो जे शिकला, त्याचा काही त्याला विसर पडलेला नव्हता, त्यावरील त्याचा विश्वासही उडाला नव्हता! फटके मारण्याच्या आदल्या रात्री जर मनुष्य आपलेच मूत्र प्याला तर त्याचे अंग आणि मन बधिर होते, फटक्यांची कळ फारशी लागते नाही, ही समजूत अशा अघोर आततायी दंडितात प्रचलित असते. आणि त्याप्रमाणे ते ते ‘ओखद’, तो ‘दवा’ घेतात, ही गोष्ट अगदी खरी आहे. रफिउद्दिन पहाटेसच उठला आणि त्याने त्याच्या पिण्याच्या टमरेलात स्वतःचे मूत्र मिसळून ते पाणी यथाविधि प्राशिले! त्याने काही कुराणातील आयतेही-मंत्रही म्हंटले आणि नमाज पढून देवाला प्रार्थिले, “फटक्यांच्या आघातांना वरच्या वर झेल! आग होऊ देऊ नकोस कातड्याची!” माणसाप्रमाणे राक्षसांतही एक देव असतोच! त्याने भुई नखाने उकरून त्या मंत्राने चिमूटभर माती भरली आणि तो अंगारा लावला आणि अल्लाच्या नावाचा अखंड जप करीत तो एकलकोंडीत उजाडेतो फेऱ्या घालू लागला. एका मोठ्या धर्मयुद्धाला जाणार होता ना तो देवाचे नाव घेऊन!

पण आततायी आणि निर्ढावलेले दंडित अशा वेळी असेच करतात, हे अगदी खरे! दोन-तीन उदाहरणे तरी प्रत्यक्ष माहितीची आहेत आमच्या स्वतःच्या आणि हेही खरेच आहे की, यमपुरीत पाहायला जायचे तर गालिच्यांच्या पायघड्यांवरून जाता येते नाही, निवडुंगाच्या आणि सावरीच्या काटेरी रानातून वाट काढीत गेले पाहिजे. मसणवटीतच जर वसतीला उतरायचे, तर पेटलेल्या चिता, हाडकांचे काटे, पायभाजत्या फुफाट्याचे ढीग, ताड्ताड् फुटणाऱ्या कवट्यांचे आपटबार, भुतांच्या किकाळ्या, हीच सोबत! भेसूर भयाण विरस हाच रस!! मानवी मनाचे काळे पाणी कसे असते हेच जाणण्याची जर जिज्ञासा, तर असे असते तसे काळे पाणीच दाखविले पाहिजे. उगीच आपले शिष्टाचार म्हणून गुलाबपाणी दाखविले तर वंचना होईल! गुलाबपाणी हीच काळ्या पाण्याची विटंबना- शोभा नव्हे!

"अल्ला तू रहीम! देवा, तू दयाळू आहेस!" असा नामघोष करीत त्या एकलकोंडीत फेऱ्या घालणाऱ्या रफिउद्दिनला त्या मंत्रतंत्रानी थोडासा धीरही आल्यासारखे वाटले. तोच शिपाई येऊन खडाखड् दार उघडले गेले. बंदिगृहाच्या मधल्या चौकात साऱ्या चाळीतील बंदिवानांना दिसेल, अशा जागी त्याला उभे केले. तीन भक्कम लाकडीचा एक उंच तिकोन असतो, त्याला 'तिकडी' म्हणतात, ती तिकडी तेथे आणली. त्या तिकडीच्या पायरीवर चढवून तिच्यावर रेलून रफिउद्दिनला पाठमोरे बांधले. त्याचे दोन पाय दोन बाजूंना असलेल्या लोखंडी कड्यात पक्के गुंतवले; त्याचे हात उभारवून त्याच दोन लाकडाच्या वरच्या टोकांना असलेले दुसऱ्या दोन लोखंडी कड्यात खिळवून टाकले; मान एका पट्ट्यात गुंतविली.

जंतुघ्न असे काही औषध एका थाळीत आणि फटके संपताच त्या घावांवर बांधावयाच्या पट्ट्या हाती घेऊन औषधालयाचा मिश्रक (Compounder) आणि त्याच्या पाठोपाठ डॉक्टरही तेथे आला. शिपाई रांग धरून ठाकले. अंगावर एक लंगोटी तेवढी ठेवून रफिउद्दिनला डोक्यापासून पायापर्यंत सताड उघडे करण्यात आले. त्याने काहीएक गडबड, बडबडसुद्धा केली नाही. त्याची नेहमीची आडदांड खोड होती की नव्हतीशी झाली होती. सुन्नपणे तो आपली ती दूरवस्था जशी कोण्या दुसऱ्याची पाहावी, तशीच अद्याप पाहात होता. ती सर्व व्यवस्था तेथेच उभे राहून करविणाऱ्या त्या त्याच्या शत्रू झालेल्या जमादाराला देखील तो एक चकार शब्द बोलला नाही; बोलूच शकला नाही.

घण घण घण घंटा वाजली. तत्काळ टापटाप बूट उडवीत टॉवरमध्ये बसलेला बंदिपाल बाहेर आला आणि त्याच्या मागोमाग चड्डी आणि जाकीट तेवढे अंगावर घातलेला, केस पिंजारलेला, दंडाचे बळकट स्नायू फुगलेला फटकेवाला! त्याच्या हातात एक लांब तीन बोटे जाडीचा सरळ वेत होता.

रफिउद्दिन पाठमोरा बांधलेला, त्याला ते दिसले नाही, पण दिसावे तसेच भासले. तो थरथर कापला!

"मारो!" बंदिपाल गरजला. त्यासरशी जणू काय वेतच ढुंगणावर सटकला असे होऊन रफिउद्दिनने केविलवाणी हाक फोडली, "साब! साब! आसते! अलगत तरी मारा!"

हातातील वेत सरसावून डोक्याभोवती फिरवून फटकेवाल्याने नेम धरला.

"एक!" बंदिपाल ओरडला! फाड्दिशी रफिउद्दिनच्या ढुंगणावर वेत सटकला.

"अय्याया..." रफिउद्दिन किचाळला!

"दोन!" पुन्हा डोक्यावरून फिरवून बळ घेऊन फटकेवाल्याने दुसरा वेत मारला! रफिउद्दिन गुरासारखा हंबरला. आजूबाजूच्या बंदिवानांची अंगेही लटलट कापू लागली! कित्येकांना दया आली! त्यातच कंटकही होता! पण त्याला दया येते न येते तोच आठवले - हाच तो रफिउद्दिन! कुऱ्हाडीने माणसे तोडणारा लाकडे तोडावी तशी! वर्षाकाठी निदान एकेका तरुणीचा तरी विलास म्हणून जीव घेणारा - नृशंस नरराक्षस!

“तीन!” “चार!” “पाच!” “सहा!”

वेतावेताच्या फटाकाऱ्यासारखी रफिउद्दिनच्या दोन्ही ढुंगणातून रक्ताचे फवारे उडू लागले आणि मासाचे भूस! तो मध्येच हंबरडू लागला, तर मध्येच “सोडा, पुरे, पाया पडतो,” अशी धाय मोकलू लागला, तर मध्येच त्या जमादाराला आणि त्या बंदिपालाला आईमाईवरून बीभत्स शिव्या मोजू लागला.

“सात! आठ! नऊ! दहा!” वेतामागून वेत सटकत चालले, मासात घुसत चालले! रफिउद्दिन अर्धा बेशुद्ध, निपचित पडला! केवळ ठेचलेला साप जसा काठी लावताच तेवढ्यापुरता पुन्हा वळवळतो तसा. वेताच्या फटकाऱ्यांसरशी एकेक किंकाळी तेवढी शारीरिक प्रतिक्रियेपुरती त्याच्या तोंडून बाहेर पडू लागली!

“अठ्ठावीस! एकोणतीस! तीस!!”

तो तिसावा फटका मारताच वेत फेकून देऊन घामाघूम झालेला, धापा टाकीत मटकन् खाली बसला तो फटके मारणारा! तोसुद्धा इतका थकला!

डॉक्टर झटकन् पुढे झाला. तिकडीवरून सोडून खाली पालथे निजविलेल्या रक्तबंबाळ रफिउद्दिनची त्याने नाडी चाचपली. जिवंत आहे की नाही तो, इतकेच पाहण्यापुरती. घावांवर तात्कालिन मलमट्टी करून रफिउद्दिनला बंदिगृहाच्या रुग्णालयातील एका एकलकोंडीत नेले. कोठडीला कडीकुलुपवून बंद केले.

त्या रात्री घावांच्या कळांवर कळा उठून, आग आग होऊन रफिउद्दिनला खूप ताप चढला. तापात मस्तकाची उष्णता फार वाढली, म्हणजे मज्जाकेंद्रेही (Brain Cells) उत्क्षुब्धतात. त्या मज्जाकेंद्रात विचारांच्या धक्क्याने जे कोणते आकस्मिकपणे डवचळते त्याची चित्रावली (Film) तात्काळ इतक्या उत्कटतेने प्रकाशून उठते की, ती ती घटना जिवंतपणे चालू आहेसे गुंगून पडलेल्या जिवाला भासते. इतक्यात त्या विचारांसंबंधाने दुसरे मज्जापिड चळले की ते त्याचा बोलपट चालवू लागते. देशकालाच्या क्रमाची जाणीवच स्थिरू शकत नाही. त्यायोगे स्मृत घटनाभावभावनांची विक्षिप्त भेसळ होऊन अनेक असेभाव्य दृश्ये प्रत्यक्षशी भासू लागतात. रफिउद्दिनचे तसेच झाले.

ताप भरू लागल्यानंतर जोवर तो साधारण शुद्धीत होता, तोवर त्याच्या घावातील कळांच्या असह्य तिडिकीने तो विव्हळत असता त्याला आपली अशी दुर्दशा आपल्याचे दुष्कृत्यांनी उगीच करून घेतली, ह्याचा वारंवार तीव्र पश्चात्ताप वाटत होता. पश्चात्ताप असा हा त्याला उभ्या जन्मात पाहिल्यानेच खराखरा वाटला! पाप का केले म्हणून जरी त्याला पश्चात्ताप वाटत नव्हता, तरी पाप पचेतो करून लगेच सोडले का नाही, अजीर्ण होईतो, अपचन होईतो तोच भयंकर आततायी मार्ग का चोखाळला, ह्याचा तरी त्याला खेद होऊ लागला, काळ्या पाण्यावरून पळून गेलो, देशाला पोचलो, पुन्हा दरोडे घालून, मैंदपणा करून, अपार धन मिळविले, अनन्वित इंद्रियभोग घेतले, तेथपर्यंत आपण केले, ते ठीक केले; पण पुढे हात आखडून मिळविले त्यात

समाधानून कोठे तरी परप्रांती व्यवस्थित जीवन नेले असते तर जन्मभर पुन्हा संकटात म्हणून पडलो नसतो; असा त्याचा विवेक चालला होता. त्याच्या त्या विक्षिप्त विवेकाने त्याची ती चुकी त्याला वाटली ती इतकीच की, पुष्कळ पैसा आणि रंगढेग ह्यांच्यापायी समाजावर भयंकर अत्याचार करीत करीत जेव्हा तो ती बिहारची हिंदू तरुणी पळवून बागलाणात येऊन लपला, तेव्हा त्याने ह्या भयंकर उपद्रवी दुष्कृत्यांना नित्याचा रामराम ठोकावयास हवा होता. ती तरुण स्त्री आणि तो पैसा घेऊन सिंधकडे कोठे तरी एक सद्‌गृहस्थ बनून, निर्बंधशीलपणे जी चैन करता येते ती करून, शांततेत आयुष्य न्यावयास हवे होते. आपल्या कृत्यांना तो दुष्कृत्ये म्हणून देखील मनातल्या भाषेत संबोधून गेला, जशजशी तापाची गुंगी आणि फणफण चढत चालली, तसतसा हा शेवटचा विचार त्याच्या चित्तात थैमान घालू लागला.

"अरेरे! त्या बिहारीला- त्या बिहारच्या सुंदर पोरीलाच -रीतसर निक्का लावून बायको करून मी सुखाने नांदलो का नाही? अरेरे! मी तिला भर महापुरात खापर फेकावे तशी की रे फेकली! नीचा! अरेरे! पाण्यात गुदमरून काय रे तिच्या जिवाची - डोके ठसकन् खडकावर! - आपटले! फुटले! अबब! आई ग! कोण ह्या कळा!!"

"पुन्हा पुन्हा कण्हत, बडबडत, गुंगीत काहीच्या बाहीच पाहात, भावीत, त्याच्या डोक्यातील गुलाम हुसेनच्या स्मृतीचे केंद्र कोठून तरी डवचले गेले.

"हरामी...ए दुष्टा! दे ती माझी मालती परत! ठेव म्हणून ठेवली होती मी ती तुझ्यापाशी!... माझी, माझी आहे ती...ठेवली आहे तुझ्या बापाने! गुलाम, देतोस की नाहीस....मारा! हाणा!....पाय ओढला! अय्याई! मेलो! मेलो!

.....पुन्हा थोडा जागा झाला तो ताप फणफणत होता. गुंगीतील गुलाम हुसेनशी झालेल्या मारहाणीत पाय आपटले होते त्याने त्वेषाने आणि त्यासरशी त्याचा घाव हिसडून विव्हळत उठला होता तो, त्याला तेच आठवू लागले.

"मालती गुलाम हुसेनने पळवली नाही? कुठे असेल ती? अरेरे! चोरावर मोर झाला नाही तो! त्याच्या पिंजऱ्यात ठेवली असेल त्याने त्या माझ्या छबेलीला!"

मथुरेमध्ये मालतीला त्या रात्री रफिउद्दिनने गुलाम हुसेनच्या घरी जी लपविली, त्यानंतर तिचे काय झाले, ते त्याला काहीच माहित नव्हते आणि किशन त्याच्यासहच झालेल्या हत्या, दरोडे ह्यांच्या कटाच्या खटल्यातून जो निर्दोष सुटला, त्याचीही रफिउद्दिनला तीच शेवटची माहिती. तोच विचार त्याच्या क्षीणतास्वैर मनात आता सारखा चकरू लागला! गुंगी आणि वायूचा झटका येऊ लागला.

"मालतीच काय झाले असेल? गुलाम हुसेनच्या जनान्यात? हो जनान्यातच! पण मालती - ती -आं? लाहोरला! इथे बाजारात तू कशी?...'

तो पुन्हा अकस्मात् तापाच्या उत्क्षुब्ध गुंगीत त्याच विचाराच्या उतरणीवरून विहिरीत पडावा तसा खोल खोल गडगडत चालला?

......लाहोरच्या बाजारात उभ्या असलेल्या मालतीला अचानक पाहताच त्याने तिला जशी मिठी मारली. “प्यारी! - मालते! ‘ओ! आव प्यारे रफिउद्दिन. मेरेको छोडके किदर गये थे प्रीतम आजतक?”

...गळ्यात गळा घालून मालतीने जसे त्याला तिच्या बंगल्यात नेले, दार लावून टाकले, त्याचे सारे कपडे काढले आणि इतक्यात तेथे असलेल्या एका मोठ्या पेटीतून खाड्दिशी किशन सुरा उपसून बाहेर पडला! बाप रे! घात घात! ह्या दुष्ट स्त्रीने घात केला! ह्या मारेकऱ्यांच्या, ह्या किशनच्या हाती मला सोपवलेस काय? चांडाळणी, मालते, राक्षसी!......’चूप राक्षसा! किशन, बांध त्याला त्या तिकडीवर! बांध! माझ्या त्वेषाचा हा पाहा मी एक बळकट वळीव वेत केला आहे. तू किशन! ज्यावर हा माझ्यासह बसू पाहात होता, त्याच ह्या पलंगाची तिकडी कर!....

पलंगाची अकस्मात् तिकडी झाली; मालतीच्या त्वेषाचा भयंकर वेत झाला; बोलता बोलता स्वतः मालतीची एक केस पिजारलेली, शेंदूर कपाळावर फासलेली, लाल लाल जीभ सापासारखी काढणारी कोणी विक्राळ कृत्या झाली! किशनने उद्दिनला तिकडीवर पक्का जखडला आणि त्वेशाच्या त्या वेताला तिने उगारून रफिउद्दिनच्या पाठीवर रक्ताचे कारंजे उडविणारा एकच भयंकर फटका मारला!

“अबबब! अय्याय्या!....पाया पडतो, मालती, सोड! अय्याय्या- हळू! मालती! क्षमा -क्षमा-क्षमा!”

......पण मालती मोजीतच आणि मारीतच चालली ते रक्ताळ काटेरी फटके....

“तीन! चार! पाच! पन्नास! शंभर....!” वायूच्या झटक्यात स्वतःच ओरडून उठला, “शंभर!”

***

तेरा

"उषे! ए उषे! अगं, आज बोलत का नाहीस? घरात काय करते आहेस तिकडे? ये, ये!" साठी उलटून गेलेले पण अजून खणखणीत स्वर आणि सकस अंगकाठी असलेला एक पुरुष, आपल्या एका साध्या बैठ्या आणि कौलारू घराच्यापुढील झाडसारवण केलेल्या अंगणात खाटेवर येऊन बसता बसता आपल्या सात-आठ वर्षांच्या लहानग्या नातीला आवर्जून बोलवीत होता. दुपारी त्या अंगणात दोन-तीन वाजता सावली आली की तो त्या खाटेवर येऊन आताशी असाच बसत असे. कामकाज आटोपून कलत्या दिवसाला गुरेढोरे शेतातून, मुले शाळेतून आणि त्याची सूनबाई - त्या नातवंडाची आई- आपल्या चाकरीच्या कामावरून घरी येईतो, तो म्हातारा त्या खाटेवर जेव्हा असा बसे, तेव्हा त्याची सोबत म्हणजे एक चंची आणि त्याची ती दोन लहान नातवंडे- उषा आणि तिचा वडील भाऊ बारा एक वर्षांचा मोहन. त्यांना काही शिकवीत, काही गोष्ट सांगत, मधूनच समोरील फुलझाडांना झारीने पाणवीत किंवा मोहरलेल्या आंब्याफणसाच्या दिवसात अंगणाला लागून असलेल्या वाडीतील त्या त्या झाडांची राखण करीत तो तेथे अगदी रमून गेलेला दिसे.

त्याच्या घराच्या आजूबाजूला एक तीस- चाळीस तशाच घरांचे आणि त्याहूनही साध्यासिध्या झोपड्यांचे मिळून एक खेडे वसलेले होते. ते खेडे होते जरी अंदमानात तरी दिसते होते अगदी एखाद्या कोकणातील खेडेगावाची थेट प्रतिमा! कारण एकंदरीत अंदमान हेच मुळी आपल्या पूर्व समुद्रावरील एक प्रतिकोकण आहे. झाडे, ऋतू, पक्षी, पीकपाणी, बहुतेक कोकणाचा थाट! जर पश्चिम समुद्राच्या कोकणतटाला मुडपून पूर्वसमुद्रावर उचलून धरले ना क्षणभर, तर त्या पूर्वसमुद्रात कोकणचे जे पुसट प्रतिबिंब पडेल, तसेच अंदमान आहे. कोकणाची रानेबिने तोडून मनुष्याने आजवर जी बरीच कायापालट केली, तेवढाच बहुतेक फरक.

"उषे, 'ओ' देखील ग का देत नाहीस? मोहन, कुठे आहे रे उषा?" म्हाताऱ्याने पुन्हा विचारले.

"ती ही इथेच बाहुलीशी खेळत आहे. ती म्हणते की, मी अप्पांवर रुसले आहे आज." मोहनने आतून सांगितले.

"का बुवा? काय अपराध घडला माझा? बरे मोहन, तूच ये अं तर आपला इकडे. पिकल्या पिकल्या पानांचा विडा आज मी उषेला देणार होतो, पण ती रूसली असेल तर तुलाच घे आपला. चल."

त्या म्हाताऱ्या अप्पांचे हे आमंत्रण स्वीकारून मोहन तात्काळ धावला. मोहन आता विडा उपटणार हे पाहताच बाहुली टाकून उषापण हलकेच उठली, दारापाशी आली, पण अगदीच शरण जाण्याचे जिवावर येऊन दारातून आपले गोजिरवाणे तोंड तेवढे बाहेर काढून आणि आपला वकील आपणच होऊन रूसव्या आवाजात म्हणाली,

"मी रुसले आहे तुमच्यावर अं अप्पा!"

"अग, पण का ते सांगशील की नाही? हा पिवळ्याधमक पानांचा विडा नको ना तुला?"

"हवा पण तिथून धाडून द्या मला मोहनच्या हाती. मी तिथे नाही येणार तुमच्यापाशी. तुम्ही मग माझा पापा घ्याल कालच्यासारखा. मला तुमच्या मिशा नाही वाटत लागते! तुम्ही बळ बोचवता त्या माझ्या गालाला. तुम्हांला हवा तर विडा इकडेच धाडून द्या!" उषेने तडजोडीची अट सुचवली.

"अडले नाही माझे एवढे! ज्याला विडा हवा असेल ते पापा देईल! बरे, मिशा न बोचवता पापा घेतला तर मग देशील का?" अप्पांनी उलट अट कळवली.

त्या उलट अटीला तिने तोंडाने जरी होकार दिला नाही, तरी एकेक पाऊल भुईवर घसटीत घसटीत उषा हळूहळू त्या आजोबांजवळ येते चालली. जणू काही ती होऊन येत नव्हती तशी, पण तिला आजोबा बळेच ओढून नेत होते. म्हणूनच ती पुढे चालली होती! अशा डौलाने एकदाची आजोबांच्या हाताच्या आटोक्यात येऊन ती थडकली, तोच आजोबांनी तिला पकडून हसत हसत जवळ घेतले, रीतसर एका गोड पाप्याची खंडणी उकळल्यानंतर एक विडा उषेला आणि एक मोहनला दिला आणि त्या आपल्या लडिवाळ लहान लहान नातवंडांना दोन्ही बाजूंना घेऊन अप्पा स्वतःच्या हातावर आपल्या पानाबरोबर खावेयाच्या तंबाखूच्या बोकण्याला मळू लागले.

जो जो उषेचा विडा तिच्या तोंडात रसरसून तिला गोड लागते चालला, तो तो तिची कळी खुलू लागली. ती आपण होऊन आजोबांच्या मांडीवर केव्हा बसली आणि हसत हसत त्यांच्याशी गुलगुलू गोष्टी केव्हा करू लागली ते तिच्या ध्यानात देखील आले नाही. उषा आणि मोहन ही दोन्ही मुले मोहक, खेळकर, बोलकी आणि तरतरीत होती.

इतक्यात सन्मुखच्या एका टेकडीवरून एका मनुष्याला उतरत असलेला पाहून मोहनने टाळी पिटली.

"अप्पा, अप्पा, कंटकबाबू येताहेत. कंटकबाबू! तेऽ पाहा, ते!"

उषेने पण अनुमोदिले.

"हो रे हो, कंटकबाबूच ते!"

अप्पाजी त्या वेळेला जवळ पडलेले कलकत्त्याचे एक हिंदी पत्र वाचीत होते. ते बाजूला सारून दृष्टि ताणताणून ते पुढे पाहू लागले, पण त्यांच्या डोळ्यांना चांगलेसे दिसले नाही. त्यांना भासले, दुसरेच कोणीतरी येत आहे.

"कंटकबाबू काही नाही ते, काहीतरीच ओरडता झाले."

त्यांचा नकार न खपून उषा म्हणाली, "कंटकच हो अप्पाजी. तुम्हांला नीट दिसते नसले तर माझ्या डोळ्यांतून पाहा. हं, पाहा ना! नाही जा, माझ्या डोळ्यांतून पाहा!"

तिने आपले चिमुकले डोके अप्पाजींच्या अगदी तोंडाशी धरले, त्यांच्या डोळ्यापुढे ते अगदी पोचावे म्हणून त्यांच्या मांडीवर ती चढली, आपल्या मऊ मऊ केसांनी आच्छादिलेल्या डोक्याची मागजी बाजू त्यांच्या तोंडावर टेकून त्यांच्या डोळ्यांपुढेच आपले डोळे येतील अशी पाठमोरी बसली आणि ती चिमुकली उषा आग्रह करू लागली,

"अप्पाजी, बघा ना माझ्या डोळ्यांतून! दिसते? असे अं, आता दिसते?"

तिला तोच एक खेळ झाला क्षणभर!

त्या अल्लड लेकराच्या खेळातल्या करमणुकीचा विरस होऊ नये म्हणून आजोबांनीही आपल्या त्या लहानशा नातीचे ते कुंतलमृदुल मस्तक आपल्या डोळ्यांपुढे, एखादी दुर्बीण धरावी तसे, अगदी गंभीरपणे धरले आणि तिच्या डोळ्यांतून निरखून पाहिलेसे केले आणि काय काय दिसते ते सांगू लागले,

"अगदी खरेच! उषे, दिसते ग दिसते तुझ्या डोळ्यातून मला आता अगदी स्वच्छ! बघ कंटकबाबू ते येताहेत हो! आणि ती बघ आमची चिमुकली उषा एखाद्या मोठ्या सूज्ञ आणि समजूतदार मुलीप्रमाणे आपली पाटी पेन्सिल नि पहिले पुस्तक घेऊन त्यांच्यापाशी कशी शिकायला बसते आहे पाहा! तो आमचा मोहन पण धडा वाचू लागला अं! बघ, सगळे मला तुझ्या डोळ्यांतून कसे स्वच्छ दिसते आहे? आता हे सगळे अस्संच्या अस्सं खरे घडल पाहिजे अं! नाही तर तुझ्या डोळ्यांतून खोटे दिसते असे म्हणेन मी! मग अळंटळे न करता बसशील ना शिकायला कंटकबाबू येताच?"

"हं. शिकवायला बसेन....पण...!" उषा किंचित असेतुष्ट मुद्रा करून बोलू लागली "पण तुमच्यापाशीच बसेन, कंटकबाबूंपाशी नाही!"

"का ग? ते कसे छान शिकवतात तुम्हा दोघांना! गुरुजी पण गुरुजी आहेत ते....कसे छान!"

"अश्श! कसले आले आहेत छान! अप्पाजी, खरेच त्यांना काही म्हणता काहीसुद्धा येत नाही."

"ते कशावरून? कंटकबाबूंना काहीसुद्धा येत नाही? नि ते तुला कसे कळले?"

"अहो, त्यात ते काय कळायच? धडधडीतच दिसते ते मला! खरेच अप्पा, कंटकगुरुजी उलट आमच्या मोहनला नि मला सगळे विचारून घेतात. त्यांना आठवले नाही की मोहनला विचारतात, कलकत्ता कुठे आहे? बंबई कुठे आहे? इंग्रजीत आईला काय म्हणतात? मांजराला काय म्हणतात? आणि मलासुद्धा विचारतात बे पंचे किती? तीन दाही किती? असे दिवसभर आम्हांलाच विचारीत असतात सगळं. त्यांना स्वतःला येत तर आम्हांला हो कशाला विचारीत बसते ते! पाढेसुद्धा येत नाहीत त्यांना!"

त्यासरशी "वा रे वा! खुळी रे खुळी" असे तिला खिजवीत मोहन सारखा हसू लागला. आजोबांनाही हसू आले. उषाताई अगदी चिडायच्या बेतात आल्या...

पण तितक्यात कंटकबाबू अंगणात आले आणि नेहमीप्रमाणे भेट म्हणून येणारा एक खाऊचा पुडा त्यांच्या हातात पाहताच चिडून हातघाईवर येणारे प्रकरण थोडक्यातच निभावले. उषेचे लक्ष पुड्याकडे वेधले आणि हसत हसत कंटकबाबूला ती सामोरी गेली.

"काय कंटकगुरुजी," अप्पा हसले, "परीक्षेत तुमच्या विद्यार्थ्यांनी तुम्हांलाच नापास केले आहे बरे का!"

"ते कसे बुवा?" कंटकगुरुजी जिज्ञासले.

"अहो, आमची उषा म्हणते की, तुम्हांला पाढेसुद्धा येत नाहीत. तुम्हीच काही अडल की तिला सारखे विचारता की बे पंचे किती, तीन दाही किती? आणि तिने सांगितले म्हणजे तुम्हांला ते कळत! तिला येत तितकेसुद्धा तुम्हांला येत नाही!"

"असे काय?" कंटक त्या आक्षेपाचे कौतुक वाटून हसला, "बरे तर. मी आता जो हिशोब घालतो तो जर उषाताईंनी सोडवला तरच म्हणेन मी ते खरे! घालू एक हिशेब तुला?"

"हं, घाला. आत्ता सोडवून देते बघा. पण मला येईल असाच घातला पाहिजे अं!" उषेने अटीवर आव्हान स्वीकारले.

"बरे, सांग तर. एका बाईने पिकलेल्या आंब्याची एक पाटी भरून आणली. अं? एक पाटी भरून आणली. तिच दोन रुपये मूल्य ठरले. आता ते आंबे अर्धे अर्धे करून तिने दोन सारख्या लहान टोपल्यांत भरले. कळले? अर्धे अर्धे आंबे दोन सारख्या टोपल्यात भरले, तर त्या दोन टोपल्यांतील प्रत्येक टोपलीच काय मूल्य देशील तू? तू पण सांग हं मोहन.

मोहन पटकन् उत्तरला,

"प्रत्येकी टोपलीचा एक एक रुपया देईन मी!"

पण थोडा वेळ आकुंचित नेत्र करून विचार केल्यानंतर उषा झिडकाऱ्याने उत्तरली,

"मी दमडीसुद्धा देणार नाही त्या टोपल्यांची!"

"का ग?" अप्पांनी उषेला विचारले.

"का म्हणजे? सुरेख सबंध आंबे बाजारात हवे तितके मिळत असता तिचे अर्धे अर्धे केलेले ते गदळ आंबे कोण घेणार आहे बाई!"

'आंबे अर्धे केले, ह्या वाक्यावर नकळत कोटी लढवून उषेने अगदी अनपेक्षित उत्तरे दिले!

त्या मुलीच्या अजाण पण स्वतंत्र बुद्धीची ती चुणूक पाहून ते अगदी अनपेक्षित उत्तरे ऐकताच आजोबा उषेच्या पाठीवर थोपटून कंटकबाबूला म्हणाले,

"काय गुरुजी, आमच्या उषेला येत तितकेसुद्धा तुम्हांला येत नाही, ही गोष्ट अगदी खरी ठरली की नाही?"

अगदी खरी ठरली, खरेच बुवा! नि आमच्या ह्या चिमुकल्या विद्यार्थिनीने गुरुजीलाच जो धडा शिकवला, त्यासाठी गुरुजीच्या ह्या विद्यार्थिनीला ही फी पण देणार!"

कंटकने खाऊचा एक पुडा उषेला दिला नि दुसरा मोहनला दिला.

आणि खाटेवर कंटकबाबू बसू लागला. त्याला स्थान देण्यासाठी अप्पाजी आपली मांड मोडून बाजूला सरकू लागले. पण तोच त्यांच्या गुडघ्यात एक बळकट कळ आली आणि ते, "आई ग!" करून मोठ्याने कण्हू लागले.

"अं? एकदम इतकी मोठी कळ आली? काय झाले पायाला?" कंटक घाईघाईने विचारीत अप्पाजींचा पाय दाबू लागला.

“इथे, इथे गुडघ्यात!” अप्पाजी गुडघा हळूहळू पुढे-मागे करीत, पाय पसरण्याचा यत्न चालवीत आणि कण्हत म्हणाले, “ह्या गुडघ्यात दोन दिवस अशीच असह्य कळ उठत आहे. थांबेल थोडा वेळ पाय पसरून ठेवला म्हणजे. एक फार जुना घाव आहे तो तिथे मुरलेला! आता अशक्तपणाचे दिवस आले, तो पुन्हा नडू लागला.”

“जुना घाव? कसला तो?” कंटक जिज्ञासला.

“तो? तो एक इतिहास आहे! तो घाव सत्तावनच्या स्वातंत्र्युयद्धात मला लागलेल्या इंग्रजांच्या एक गोळीचा आहे! होय, इंग्रजांच्या गोळीचा! कारण मी बंडवाल्यांच्या वतीने लढत होतो!” मी एक बंडवाला होतो. बोलता बोलता दुसरा पाय खाटेवर टेकून, दुसऱ्या पायावर ताठ उभे राहून, छाती फुगत चाललेला तो वृद्ध पुरुष जणू काय होता त्याहून अधिक उंच दिसू लागला!

“तुम्ही बंडवाले होते? प्रत्यक्ष लढले होते, त्या बंडामध्ये इंग्रजांशी?” कंटक हे प्रश्न तुटक तुटक शब्द जुळवून, विचारून, तो वृद्ध पुरुष गर्वाने ताठलेली त्याची मान होकारार्थी किंचित हलवीत असता त्याच्याकडे विस्मयपूर्ण आदराने पाहात राहिला आणि त्या दृष्टीने पाहताच तो आजवरचा एक साधा म्हातारा गृहस्थच कंटकला एक कसलेला झुंझार, एक वंदनीय वीर, एक पौराणिक योद्धा भासू लागला.

क्षणभर त्या वृद्धाकडे तसेच विस्मयपूर्ण आदराने पाहिल्यावर कंटकने विचारले,

“अप्पा, आजवर नाही ते कुठे सांगितलंत हे मला? गेल्या सहा महिन्यांत आपल्या ह्या प्रेमळ कुटुंबात मी इतका रुळलो असताही मी होऊन आपणाला आपले पूर्ववृत्त का विचारले नाही, त्याच कारण अगदी उघड आहे. जे जन्मठेपीचे बंदिवान आपली सक्त बंदीची दहा-बारा वर्षांची अवधि संपवतात नि त्यात वर्तन नीट ठेवल्यामुळे ह्याचे बेटात स्वतंत्र कुटुंब थाटून राहायची ज्यांना आपल्यासारखी अनुज्ञा मिळते, त्या ह्या अंदमानातील दाखलेवाल्या (Pass Holder) जन्मठेपी गृहस्थांना ज्या घृणित अपराधासाठी पूर्वी शिक्षा झाली ते सांगण्याचा बहुधा फार संकोच वाटतो. स्वतःच पूर्ववृत्त ह्या तुमच्या वर्गातील ते दाखलेवाले स्त्री-पुरुष बहुधा लपवू इच्छितात. ह्यासाठी पुष्कळ वेळी जिज्ञासा होते असताही मी आपल्याला आपले पूर्ववृत्त विचारायच टाळीत आलो. पण आपण स्वतःतरी, सत्तावनाच्या ह्या स्वातंत्र्ययुद्धात लढणे हा राजकीय अपराध गणला जाते असला तरी नैतिक नीचता नव्हे असेच मानणारे आहात, हे उघड आहे. मग आपण होऊन आपले तितके पूर्ववृत्त तरी मला का बरे सांगितले नाही? सत्तावन्नच्या बंडातील गोष्टी ऐकायची मला लहानपणापासून फार आवड! माझा आजा ब्रह्मवर्तात श्रीमंत नानासाहेब पेशव्यांचाच एक आश्रित असे, असे लहानपणी आमचे बाबा आम्हाला सांगत. सेनापती तात्या टोप्यांचे नाव तर त्यांच्या तोंडी नेहमीच असे.”

“त्याच वीरवर तात्या टोप्यांच्या सैन्यातला मी एक होतो!”

“काय म्हणता? अहाहा! सेनापती तात्या टोपे! ज्यांचे नांव लहानपणी आम्हाला एखाद्या पौराणिक वीरासारखे अद्भुत वाटे, त्या सेनापती टोप्यांना प्रत्यक्ष पाहिलेला नि त्यांच्या

स्वातंत्र्यसैनिकांतील एक सैनिक असलेला पुरुष प्रत्यक्षपणे माझ्यासमोर आता उभा आहे, ही कल्पना मला आता ह्यावेळी देखील अद्भुतच आहे. हे पाहा अप्पा, जर तुम्हाला त्यात काही धोका वाटत नसेल ना, तर निदान तुम्ही त्यात जी जी गोष्ट प्रत्यक्ष पाहिलीत ती ती तरी ऐकायची माझी उत्कट ईच्छा आहे. आहे का काही धोका त्यात?"

"धोका? बाबा रे, पूर्वी एकदा तात्या टोप्यांना मी ओळखतो इतके जरी सांगितले असते तरी मला, जे झाड समोर दिसेल त्यावर टांगले गेले असते! मग मी तात्या टोप्यांच्या पक्षाने लढलो हे सांगायची गोष्टच दूर! त्या वेळी ती माहिती सांगायची जी धास्ती आमच्या मनाने घेतली, त्या स्मृती आम्ही चित्ताच्या खोल भुयारात ज्या दडपून टाकल्या, त्या आता उकरू म्हंटल्या तरी उकरवत नाहीत! तसे म्हंटले तर आता तो काल पालटला आहे. ते स्वातंत्र्ययुद्ध आता इतिहास झाला आहे. प्रस्तुतच्या परिस्थितीशी त्याचा काही संबंध उरला नाही; असेल तरी इतिहासाचा वर्तमानाशी असतो तितकाच काय तो! स्वतः इंग्रजी लेखकांनी त्या वेळच्या माहितीचे शेकडो ग्रंथ लिहिले आहेत. मला स्वतः एक-दोन इंग्रज गृहस्थ अगदी मोकळ्या मनाने नी प्रत्यक्ष पाहिलेली माहिती विचारायला आले होते इथे, पण ती पूर्वीची धास्ती जी एकदा आम्हाला बसली, ती मुळे ते काही मनमोकळे सांगवत नाही. म्हणूनच काय ते मी होऊन तुम्हालाही अद्याप ते वृत्त सांगत नव्हतो. नाही तर आता त्यात लपवायासारखे काय आहे? पुन्हा, त्यापायी जी शिक्षा होणे तीच तर भोगायसाठी आम्हांला ह्या अंदमानात धाडण्यात आले नि आम्ही त्या जन्मठेपेला आता भरूनही बसलो आहोत!"

"म्हणजे सत्तावन्नाच्या बंडात लढण्यासाठीच का आपल्याला जन्मठेप झाली? अंदमानमध्ये तेव्हापासूनच का जन्मठेपीचे बंदिवान धाडण्यात येत?"

"सत्तावन्नच्या पाचपन्नास वर्षांपूर्वी एकदा दोनदा अंदमानात वसाहत करायचा यत्न इंग्रजांनी केला होता. पण त्या वेळी जी थोडी हिंदी माणस इकडे आणली, ती त्या भयंकर रानावनांत नि दलदलीत अनादी कालापासून बुजबुजाटत आलेल्या रोगट जंतूच्या नि वातावरणाच्या भक्ष्यस्थानी पडली. विशेषतः हिवतापाने तर त्यांचा नुसता फडशा पाडला नि ही बेटे मनुष्यवस्तीला सर्वथा अयोग्य म्हणून टाकून दिली गेली. पण सत्तावन्नच्या बंडानंतर, क्वचित् ह्या बेटाच्या त्याच सद्गुणासाठी, त्या बंडात इंग्रजांविरूद्ध लढतांना पाडाव केलेल्या आम्हां शतावधी बंडवाल्यांना ह्याचे बेटामध्ये जन्मठेपीवर धाडण्यात आले! आणि आश्चर्याची गोष्ट ही की, आम्ही ह्या बेटावरसुद्धा सारेच्या सारे येताच मेलो नाही! त्या घनदाट रानावनांना, त्या सडक्याकुजक्या दलदलींना, त्या भीषण रोगाणूंना, त्या मारक वातावरणाला, त्या असाध्य हिवतापाला आम्ही पुरून उरलो! आणि अशा रीतीने ह्या आजच्या वसाहतीचे आम्हीच मूळ संस्थापक, आद्य पूर्वज, कुलपुरुष ठरलो! ह्या बेटात वसाहत करण्यास्तव धाडलेल्या त्या पहिल्या बंडवाल्यांच्या जमावातलाच मी एक! अजून जीव धरून उरलेल्या त्या बंडवाल्यांतील चारपाचांपैकी वृद्धतम! पण ह्या दीर्घ जीवनाचा आनंदापेक्षा जेव्हा माझे सेनापती तात्या टोपे हे फाशी चढले...."

"तात्या टोपे फाशीवर गेले तेव्हा आपण तेथेच होतात?"

"नव्हे, नव्हे! तेच तर शल्य मनात बोचत आहे! काळ्या पाण्यावर धाडले जाण्यापेक्षा आम्ही आमच्या सेनापतीसहच फाशी गेलो असतो तर आम्हाला अधिक आनंद झाला असता, हेच तर मी सांगत होतो! इंग्रज त्या काळी आमचा शत्रू होता, पण तरीही इंग्रज हा जातीचा वीर! वीरतेची मनातून त्याला खरी पारख, ही गोष्ट आम्ही जाणून होतो. पाहा, तात्या टोपे मरेतो सशस्त्र युद्धात इंग्रजांनीही तोंडात बोट घालावे अशा निकराने नि शौर्याने लढले. मृत्युदंडाच्या वेळी थेट फासावर चढताना त्यांनी सांगितले की, 'मी महाराष्ट्राच्या राजाचा, श्रीमंत नानासाहेब पेशव्यांचा सेनापती; मी इंग्रजांचा अंकित प्रजानन नव्हे! आमच्या राजाच्या आज्ञेने आमच्या स्वातंत्र्यास्तव झुंजलो, ह्यास्तव मी बंडवाला अपराधी होऊच शकत नाही!' ह्या त्याच्या वीरोचित ठाणाचा इंग्रजांच्या मनातही इतका वचक बसला, इंग्रजालाही इतका आदर वाटला की, तात्या टोपे ह्यांना फाशीवर मरण येताच ते पाहायला जमलेल्या शेकडो गोऱ्या लोकांनी त्या शूर पुरुषाच्या प्रेताभोवती गराडा घातला नि त्यांची स्मृतिचिन्हे म्हणून कित्येक इंग्रजी, फ्रेंच स्त्रीपुरुषांनी त्यांच्या केसांची झुलपे कापून नेली. फ्रान्सच्या पत्रांतून त्यांचे दुःखद मृत्यूलेख आलेः पण आम्ही त्यांचे सैनिक असता आम्हांला त्यांच्याच संगती त्याच स्वातंत्र्ययुद्धात मरण येण्याच भाग्य लाभले नाही, त्यांच अंतिम दर्शनही झाले नाही!" त्या वृद्ध वीराने दीर्घ उसासा सोडला.

"आपण प्रथमपासूनच तात्या टोप्यांच्या सैन्यात होतात का? त्यांच्या मृत्यूच्या आधी किती दिवस घायाळ झालेत? कसे पडलात इंग्रजांच्या हाती?"

"ती कथा लांब आहे! थोडक्यात म्हणजे, माझी नि पेशव्यांच्या कोणत्याही मंडळींची प्रत्यक्ष ओळख आधी मुळी नव्हतीच. आम्ही महाराष्ट्रीय ब्राह्मण. मूळ बुंदेल्यांचे आश्रित म्हणून उत्तरे हिंदुस्थानात वसतीला गेलो. पुढे माझ्या वडिलांच्या पिढीत अरानगराच्या बाजूला आमचे कुटुंब स्थायिक झाले. सत्तावनच्या आधी एक-दोन वर्षं श्रीमंत नानासाहेबांचे दूत आमच्या गावात येऊन लवकरच एक मोठ बंड होणार असे सांगत नि आमच्यातील तरुणांमध्ये महाराष्ट्राची हिंदुपदपादशाही पुन्हा स्थापायची चेतना संचारवीत चालले. मराठ्यांचा राजा स्वराज्यासाठी पुन्हा शस्त्र उपसणार, ह्या कल्पनेसरशीच माझे तरुण रक्त सळसळून उठल. तोच बातमी आली की, कानपूरला मोठे बंड होऊन श्रीमंत नानासाहेब पेशव्यांनी कानपूर घेतले नि उघड युद्ध पुकारले आहे! मागोमाग प्रतिदिवस बातम्या येत चालल्या. दिल्ली, लखनौ. जगदीशपूर, जिकडे तिकडे त्या राष्ट्रीय युद्धाचा वणवा भडकून राजेमहाराजे, सरदार, भूमिदार, सैनिक, नागरिक, सारा हिंदुस्थान बंड करून उठला आहे! त्यासरशी आमची नगरी अरा अथेही एक सैनिक पथक बंड करून उठल नि आम्ही तरुण मंडळीही त्यातच शिरलो."

"मग? तिथल्या इंग्रजी सैन्याने तुम्हाला लगोलग पकडल नाही?"

"इंग्रजी सैन्य होते कुठे तालुक्यातालुक्याला? हिंदी सैनिक होते, तेच उलटलेले! इंग्रज अधिकारी असा एकच तिथे होता. तो म्हणजे कलेक्टर, मॅजिस्ट्रेट असे सर्व अधिकार चालवणारा,

ए.ओ. ह्यूमसाहेब. सारे अरानगर अकस्मात् उलटलेल पाहताच ह्यूमसाहेबाने जीव मुठीत घेऊन पळायच ठरवल. पण पळणार तरी कुठे? तेव्हा त्यांच्या ठाण्याला गराडा पडायच्या आत त्यांनी एक युक्ती योजली. हात, पाय नि तोंडाला काळा रंग फासला; त्यांच्या एका हिंदी नोकराणीचा बुरखा मागून घेतला, तो अंगातोंडावर तिकडील स्त्रियांसारखा गुरफटून घेतला नि त्या स्त्रीवेषात रातोरात ह्यूमसाहेब अऱ्याहून निसटून गेले. त्या वेळी जिथे इंग्रज दिसे तिथे बंडवाले मारीत, बंडवाला दिसे त्याला इंग्रज मारीत! पण तशा भयंकर स्थितीतही त्यांच्याशी विश्वासाने राहिलेल्या दोघातिघा हिंदी सैनिकांच्या साहाय्याने अनेक प्रसंगी त्यांचा जीव वाचला नि शेवटी ते ह्यूमसाहेब दुसऱ्या ठाण्यावर असलेल्या इंग्रजी छावणीत सुखरूप पोचले."

"ए.ओ. ह्यूमसाहेब? म्हणजे राष्ट्रीय सभा काढणारे ह्यमसाहेब की काय?"

"होय. त्यांनीच पुढे ती संस्था काढली. इतकेच नव्हे, तर ह्या बंडात त्यांच्यावर ओढवलेल्या ह्या भयंकर प्रसंगामुळेच हिंदी जनतेत पुन्हा तसा भयंकर असेतोष पसरू न देण्यातच इंग्रजी राज्याची बळकटी आहे अशी त्यांची निश्चिती पटली, हे त्यांची पुढची काही भाषणे जी मला इकडे अंदमानातील एका साहेबाकडून वाचायला मिळाली, त्यावरून मला पुढे कळले. 'सत्तावनच्या बंडातील इंग्रजी राज्यावर कोसळलेल्या भयंकर अरिष्टांत ज्यांना दिवस काढावे लागले, अशा कोणत्याही इंग्रजी अधिकाऱ्याला हे मान्य झालेच पाहिजे की, हिंदुस्थानांत माजणाऱ्या असेतोषाला आतल्या आत कढू नि वाढू देता कामा नये. ज्यायोगे त्या असेतोषाला वाचा फुटत राहील, त्याची वाफ साचण्याच्या आधीच जाते राहील अशी काही सोय काढली पाहिजे. वाफ बिनधोकपणे निसटायला जर कोणत बिनधोक छिद्र- सेफ्टी व्हॉल्व्ह- तुम्ही ठेवणार नाही, तर ती एजिने फोडून बाहेर पडेल! ते बिनधोक छिद्र म्हणजेच मी काढू म्हणतो. तशी एखादी राष्ट्रसभा!' अशी त्यांची शहाणपणाची भाषणे जी पुढे झाली, ते शहाणपण ह्यूमसाहेब त्या अऱ्याच्या अरिष्टातच शिकले!"

"मग अऱ्याहून कुठे गेलेत तुम्ही?"

"जाऊ दे रे सारे! झाली गेली गोष्ट! आता काय त्याच? आता नवी विटी नव राज्य! आहे ते निभावून नेले पाहिजे!"

"ते तर आहेच! पण तुमच्यापुरत तरी काही सांगा. कसे पकडले गेलेत तुम्ही?"

"अऱ्याहून आम्ही तडक कानपूरला गेलो नि सेनापती तात्या टोप्यांच्या सैन्यात शिरलो. वीस हजार इंग्रजी सैन्यासह चालून आलेल्या जनरले विन्डहॅमचा कानपूरला ज्या तुंबळ लढाईत सेनापती तात्या टोपे ह्यांनी पराजय केला, त्या लढाईत बंडवाल्यांच्या पक्षाने मी स्वतः लढलो होतो नि त्याच रणांगणावर ह्या गुडघ्यावर इंग्रजांची गोळी लागून घायाळ होऊन पडलो असता इंग्रजांच्या हाती पडलो. परंतु मी इंग्रजांच्या हिंदी शिपायांतील एक, असे सांगून मी ती वेळ मारून न्यायची युक्ति योजली नि तसल्या अंदाधुंद धुमाकुळीत अनेक असेभव गोष्टी जशा घडतात, तसेच हेही घडून माझी युक्ति सफळली. जनरले विन्डहॅम तात्या टोप्यांच्या हातून पराभव पावून जेव्हा अव्यवस्थितपणे माघारी परतला, तेव्हा त्याचे शेकडो घायाळ सैनिक त्याने घाईघाईने एका

सुरक्षित इंग्रजी छावणीकडे धाडले. त्यात मीही धाडला गेलो. तिकडे बरा झाल्यावर पुन्हा निसटणार तो एका हिंदी शिपायानेच मी बंडवाला होती म्हणून चुगली केली. पण इतर कित्येक सैनिकांनी तो चुगलीखोरच बंडवाला होता म्हणून चुगली केली होती.

"त्या वेळी अशा उलटसुलट चुगल्या सारख्या चालू असते. अशा सावळ्या गोंधळात नि त्या वेळच्या इंग्रजांच्या जिवावरच्या धांदलीत वैयक्तिक चौकशी म्हणून पदार्थच नव्हता. सरसकट शिक्षा. फाशी तर फाशी, जन्मठेप तर जन्मठेप! बंड लवकर शमावे म्हणून शेवटी सरसकट क्षमा! त्या धांदलीत नि त्या सोडतीत मी होतो त्या बंदिवानांच्या सरसकट तुकडीच्या नावे जन्मठेपीचे तिकीट निघाले! आणि हिंदुस्थानातून बंडवाल्यांचा वंश म्हणून वाढणेच नको, अशा अटीपायी शतावधी बंडवाल्यांचा जन्मठेपी टोळ्या तारव भरभरून, 'मनुष्यवस्तीला अयोग्य नि मारक' म्हणून इंग्रजी अधिकाऱ्यांनीच त्या वेळी ठरवलेल्या ह्या अंदमान बेटात आणून सोडल्या गेल्या. त्यातच मीही एक होतो. अगदी पंचवीशीच्या आत होतो. मनुष्यवस्तीला मारक म्हणूनच ह्या बेटांत आणून सोडलेल्या त्या आम्हा शतावधी सत्तावनच्या बंडवाल्यांनी आपल्या असह्य कष्टाच, घोर यातनाच, गोठलेल्या रक्ताचे, भंगलेल्या आशांचे, झिजलेल्या हाडांचे नि प्रेतांच्या राखेचे खतपाणी घालून त्याच बेटांना आज मनुष्यवस्तीला योग्य करून सोडले  आहे. तेच हे अंदमान, आपल्या हिंदूंची भरभराटत चाललेली एक नवी वसाहत होऊन बसले आहे. इतकेच काय ते आमच्या जन्माचे किंवा जन्मठेपेचे सार्थक."

"पण आता एकदा हिंदुस्थानात जाऊन यायची अनुज्ञा का मागत नाही आपण? आता दाखलेवाले ह्या स्वतंत्र वर्गाचे झाला आहात आपण. अशा फ्री पास-होल्डर्सना अनुज्ञा देतात ना देशी जायची? काही प्रकरणी हिंदुस्थान आता पुष्कळ सुधारले आहे. पाहाव एकदा आपण ते!"

"काय पाहायचे आता तिथे? जशी ही काळ्या पाण्याची वसाहत भरभराटत चालली आहे. म्हणून मी म्हंटले तसेच हिंदुस्थान सुधारत चालले आहे हे तुम्ही म्हणता! आधी आम्हा सत्तावनच्या दाखलेवाल्यांनासुद्धा कोणी धाडीत नाही परत, तो नियम आम्हाला लागू नाही नि गेलो तरी जे हिंदुस्थान आम्हाला पाहायचे होते ते आता आहे कुठे? आता जसे हे जन्मठेपी अंदमान तसेच ते हिंदुस्थान!" त्यांच्या हृदयात रुतलेले एखादे शल्य जसे डवचळले जावे, तसे होऊन त्या वृद्ध वीराने एक दीर्घ निःश्वास सोडला.

आपण ह्याला उगीच दुखावेले असे वाटून त्याला काहीतरी समाधानाचे दोन शब्द बोलावे म्हणून कंटक म्हणाला,

"काही झाले तरी देव न्यायाचा पाठीराखा आहे. न्यायाचा जय शेवटी...."

"छट् छट्! न्याय नि अन्याय ह्यांचा जय नि पराजय ह्यांच्याशी काही एक संबंध नाही. हे आम्ही जितके लवकर शिकू तितके बरे. न्याय नि अन्याय हे प्रकरण निराळे! जय नि पराजय हे निराळे! जयापजयाचा जर कशाशी संबंध असेलच तर तो पराक्रमाशी आहे, न्यायाशी नव्हे! ध्यानात धर, पाठ कर तो शब्द पराक्रम! जयाचा मंत्र! तो शब्द शीक!"

‘अप्पा, अप्पा, अप्पाजी!” त्याचे चित्त त्या उंच वातावरणांतून ओढून खस्दिशी खाली आणीत ती चिमुकली उषा हसली, “हे पाहा, अप्पा, तुम्ही देखील कंटकबाबूंना नवे शब्द शिकवीत आहा! मी म्हंटले, त्यांना काही येत नाही, तेच खरे! तेच खरे!”

त्या लेकराला त्या विषयात तेवढेच कळले.

अप्पाही हसले, “लबाड कुठली!” असे म्हणत कंटकाने तिच्या गालावर कौतुकाने टिचकी मारली.

तोच अंगणाच्या फाटकाशी गेलेला मोहन खिदळत आला,

“आली! आई आली! आई आली!”

उषेने पण सन्मुख पाहून तीच टाळी पिटली,

“आई आली! आई आली!”

आणि कोण पहिल्याने आईला जाऊन बिलगतो, अशी चढाओढ लागून ती दोन्ही लेकरे धावली. फाटकाशी आई येताच मोहनने तिला पहिल्याने धरले. मागोमाग उषेने तिच्या मांड्यांना विळखा घातला. आई पण त्या दोघांचे मटामटा मुके घेत, त्यांच्या मिठ्यांच्या पेचातून चालवेल तितके चालत, त्यांच्या मृदुल कुंतलावरून क्रमाने हात फिरवीत, खाटेपाशी आली. तोच कंटक तिला दिसला.

“बाई बाई! वाटच पाहात बसला होतात ना इथे? भेटली हो एकदाची तुमची मैत्रीण मला! अगदी पोटभर बोलून आले बरे तिच्याशी.” इतके कंटकला सांगून ती अगदी सलगीच्या स्वरात आपल्या सासऱ्याला संबोधती झाली, “खरेच, अप्पाजी, मुलगी पण मुलगी आहे हो ती! किती मनमोकळी पण विनयशील, करारी पण प्रेमळ आहे ती बघा! आणि सुरेख तरी किती आहे म्हणून सांगू! तिच्यात जर काही व्यंग असेल ना, तर ते एकच, तिच नाव! तिला कंटकी हे नाव कुण्या अरसिकाने ठेवल. ते असो. अशा फुलासारख्या कोमल मुलीच नाव गुलाब, मालती, असे काही तरी असायला पाहिजे होते! कंटकबाबू तिच्यासाठी इतके तळमळत होते, ते काही उगीच नव्हते हो! कंटकबाबू, आहे खरीच बाई तुमची मैत्रीण तुम्हांला चटका लावील अशी...” तिने गंमतीने डोळे किंचित उडवीत आपला द्व्यर्थी भाव सुचविला!

आज पाच वर्षे झाली, ते प्रिय नाव ‘मालती’ नकळत का होईना, पण त्या बाईच्या तोंडून पुन्हा त्याच्या कानावर आले. गेली पाच वर्षे काळ्या पाण्यावर जी त्याने काढली, त्यात त्याच्या मनात ते सारखे गुणगुणत होते, पण एक नाव म्हणूनच काय ते! आज ती व्यक्ती, ती प्रिय मूर्ती, प्रत्यक्षपणे अगदी एका हाकेवर कोठेतरी उभी आहे, असे त्या नावात जिवंतपण आले! कंटकचे अंतःकरण त्या कल्पनेसरशी इतके भरून आले की, त्याविषयी अधिक काही पुसावयालासुद्धा त्याच्या तोंडून शब्द उमटेना. तो स्वतः काळ्या पाण्यावर आल्यापासून गेली पाच वर्षे मागे मालतीचे शिक्षा लागल्यानंतर काय झाले, ह्याचा त्या कंटकाला -किशनला शोध लागला नव्हता. आज ती मालती त्याला पुन्हा सापडली अशी झाली? त्या बाईला तो शोध करायला त्याने

आज किती दिवस तरी सांगितले होते. ती बाई काळ्या पाण्यावरील स्त्रियांच्या बंदिगृहात एक स्त्री जमादार म्हणून काम करीत असे. आज तिला त्या काळ्यापाण्याच्या स्त्री-बंदिगृहात कंटकने सांगितलेली ती कंटकी नावाची तरुणी भेटली आणि त्या बाईने तिचा पत्ता कंटकला हा असा दिला. “तुझी मैत्रीण किती चांगली! तुला चटका लगण्यासाखी तुझी ती ‘मैत्रीण’!” असे डोळे गमतीने उडवून बोलताना कंटकची ती जिवलग प्रिया आहे असा भाव जो तिने चेष्टेने सुचवला, त्याचा कंटकला इतका अभिमान वाटला की, ‘ती माझी खरोखर सखीच आहे, मी तिच्यावर लंपटलेला तिचा प्रियकर आहे, असे बोलून जायचा त्याला अनावर मोह झाला. पण....’

“त्या सुरेख मुलीत जर कोणत व्यंग असेल तर तिचे ते विसंगत नाव ‘कंटकी’ हेच...” असे ती बाई जे बोलून गेली होती, त्याविषयी लगोलग तिचा प्रतिवाद करून तिला सांगून टाकावे की, “नाही, तिच्यात त्या विसंगत नावाचंदेखील व्यंग नाही! तिच खरे नाव ‘कंटकी’ नसून तुला हवे तसे ‘मालती’च आहे!” असाही त्याला अनावर मोह झाला. पण....

लिहिताना इतके लांब वाटणाऱ्या ह्या भावभावना त्याच्या मनात चमकून जाण्यास दहा-पाच क्षणदेखील लागले नसतील. त्यातच त्याने विवेकही केला की, सध्या ते काही एक सांगणे इष्ट नाही. ती माझी बहीण नावे कंटकीच आहे, सरकारी लिखाणाने शिक्षावृत्तांत नोंदल्याप्रमाणे आमच्या हातून तिला पळवून नेणाऱ्या एका दुष्टाचा वध झाला, हाच काय तो आमचा अपराध! त्यासाठींच दोघांना झालेले हे जन्मठेप काळे पाणी! हे जे पूर्वी आपण सांगत आलो, तेच पुढे सांगत चलावे. तिच्या आईचा वा आपल्या पूर्वीच्या मथुरेच्या ओळखीचा वा खटल्याचा वा रफिउद्दिनचा काही एक संबंध दाखवू नये हेच इष्ट, असे त्याने मनामनात ठरवले. पण....

ही सारी विचारांची घडामोड त्याच्या चित्तात चालली असता तो नुसता आपल्याकडे पाहात, काही अनुच्चारित शब्द ओठाओठांवर पुटपुटवीत गोंधळलेला दिसतो आहे, असे या बाईने निरखून ती पुन्हा त्याच गोड चेष्टेच्या स्वरात हसली,

“लाजलेत होय? कुणाचा, अप्पाजींचा संकोच वाटतो होय तो विषय काढायला?”

“हो, असेच दिसते!” अप्पाजी हसले, “बरे, तुम्ही आपले आत जा नि मनमोकळी माहिती हवी, तुमच्या मैत्रिणीला जो काय निरोप द्यायचा- घ्यायचा तो आमच्या ह्या अनसूयेला सांगा आपला जा! तुमच्या प्रेमभावनांशी आम्हासारख्या विरसलेल्या नि रुक्ष वृद्धांपेक्षा आमच्या ह्या अनसूयेसारख्या गोडबोल्या, वत्सल नि कनवाळू स्त्रीचे हृदयच अधिक समरस होऊ शकेल हे अगदी खरे. जा, अनसूया, चहा करतेस ना प्रथम?”

त्या सहानुभूतिशील वृद्धाने आपल्या सुनेला आत जायला एक वरकरणी चहा करण्याचे निमित्तही सुचवून दिले. अनसूयेने पण ते समयज्ञपणे ताडून आत जाता जाता कंटकबाबूला पाचारले,

“या ना कंटकबाबू, आतच या असे. मी चहा करते तोवर बोलू या! गोड गोड बातम्या किती तरी सांगते या तुम्हाला तुमच्या हरवलेल्या मैत्रिणीच्या! या ना!”

बोलता बोलता तिने लवून चिमुकल्या उषेचे कुंकूच किंचित नीटवले; मोहनच्या अंगरख्यालाच कॉलरची घडीच सावरून घातली; मग दोघां लेकरांचे हात आपल्या दोन्ही हातात घेऊन ती आत चालली. तिने “या ना! आतच या” अशा पुन्हा एकदा घराच्या दारात शिरतानासुद्धा दिलेल्या आमंत्रणासरशी आणि त्याला ओढून नेण्यासाठी माघाऱ्या आलेल्या मोहनने त्याच्या चिमुकल्या हातात कंटकची करंगळी धरून ती नेटाने ओढण्यास आरंभिल्यानंतर कंटक उठला आणि जणू काय मोहनच्या बळाने आपण ओढले जाते आहो; असे समाधान मोहनला देण्यासाठी पण खरोखर पाहता वरवर निमित्त करण्यासाठी “अरे बाळ, आलो, आलो,! मोडलीस की करंगळी माझी!” असे हसत हसत म्हणत मोहनसह आत गेला. अप्पाजी पण ते पाहत मिश्किलपणे थोडेसे मनाशीच हसले आणि मग जवळ पडलेला ‘साप्ताहिक टाइम्स’ ह्या इंग्रजी पत्राचा अंक हाती घेऊन चाळीत बसले.

कंटक आत आल्यावर अनसूयाबाईंनी त्याला जी जी हवी ती ती माहिती सांगता येईल तितकी रसाळपणे सांगितली. दुरावलेल्या, नव्हे नाहीशा झालेल्या प्रियजनाचा अशा अनपेक्षितपणे पत्ता लागला असता प्रेमी हृदयाला त्याचे वृत्त किती पुसू आणि किती न पुसू असे कसे होऊन जाते आणि अशा वेळी त्याच्या मधूनमधून कंटाळवाण्या होणाऱ्या जिज्ञासेचाही विरस न करता समाधानिणे हे प्रेमी दूतांचे कसे आद्य कर्तव्य असते, ते जाणण्याची सहृदयता अनसूयेत होती. तिला कंटकने एक महिन्यापूर्वी प्रथम विनविले होते की, ‘ज्या स्त्री कारागारावर ती स्त्री जमादारीण होती त्यात त्याची एक बहीण आलेली असली पाहिजे. त्याच्याच बरोबर तिलाही जन्मठेपेची शिक्षा झालेली होती; पण तिला हिंदुस्थानातच निराळ्या कारागृहात धाडल्यामुळे तिचे पुढे काय झाले, तीही त्याच्याप्रमाणेच काळ्या पाण्यावर धाडली गेली आहे की हिंदुस्थानाच्याच कारागृहात ठेवली आहे, त्याचा कितीही शोध केला तरी त्याला काही एक पत्ता लागलेला नव्हता. तेव्हा तो पत्ता अनसूयेने काढून द्यायचा शक्य तो यत्न करावा.’ कंटकने तिला ही विनंती केल्यापासून अनसूया त्या शोधात होती. पण कंटकने सांगितलेल्या ‘कंटकी’ नावाच्या त्याच्या बहिणीसारखी कोणतीही मुलगी त्या वेळी काळ्या पाण्याच्या स्त्रीकारागारात नव्हती; पूर्वीही आल्याचा सुगावा लागते नव्हता. परंतु ह्या महिन्यांत जे ‘चलान’ आले, त्यांत कंटकी नावाची एक तरुण मुलगी जन्मठेपेच्या शिक्षेची, कंटकने दिग्दर्शविलेल्या विशीच्या आतील वयाची, रूपाची, जिच्या शिक्षावृत्तातील माहिती कंटकने दिलेल्या माहितीशी जुळते, अशी आली असल्याचे त्या अनूसया जमादारिणीच्या आठ-दहा दिवसांपूर्वी लक्षात आले होते आणि तिने ते कंटकला सहा-सात दिवसांपूर्वी कळवले होते. तिला प्रत्यक्ष भेटून तिची माहिती शक्य तितकी तिच्याच तोंडून काढून घेण्याचे काम अनसूयेने तेव्हा अंगावर घेतले होते आणि त्याप्रमाणे संधी साधून ‘कंटकी’ला भेटून तिने तिची कारागृहातील घाईत जितकी शक्य तितकी माहिती आज विचारून घेतली होती. तिचीच मार्गप्रतिक्षा अत्यंत उत्सुक व्याकुळतेने करीत असलेला कंटक त्याविषयी ठरल्याप्रमाणे अनसूयेकडून काही तरी आज नक्की कळेल, ह्याचे आशेने त्यांच्या घरी मोठ्या साहसाने त्या

भागातील वरिष्ठ अधिकाऱ्यांचा डोळा चुकवून आणि खालच्या चौकीदाराची मूठ दाबून स्वतः आला होता.

कारण कंटक हा बंदिवानांतला बाबू असला तरी बंदिवानच असल्याने त्या 'दाखलेवाल्या' स्वतंत्रांच्या गावात असे वेळीअवेळी येण्याजाण्याचा त्याला परवाना नव्हता आणि म्हणूनच संध्याकाळची नाकेबंदी चौकीचौकीवर होण्याच्या आधीच त्याला निसटून परत जाण्याचीही घाईच झाली होती.

त्या घाईघाईत त्याने घरात जाताच अनसूयेला इतके प्रश्न इतक्या अध्येमध्ये, इतक्या आक्रमाने, काही उगीच पुन्हा पुन्हा, तर काही अर्धवटच विचारले होते की, त्याचा सुसंगत मतितार्थ त्याच्या ध्यानात यायला आणि त्याप्रमाणे त्याला त्या अनुरोधे जे काही निश्चित निरोप सांगायचे त्यांच्या रूपरेखा ठरवायला सुद्धा संधी वा अवधान राहिले नाही. चोरटे गुरु शेतात शिरले असता जसे भराभर दिसेल त्या गवताचे, कडब्याचे, हिरवळीचे घास खुडून तोंडात कोंबून घेते, तसे त्या थोडक्या वेळात विचारवेल किंवा ऐकवेल तितके तो विचारून आणि ऐकून घेतो, तोच साडेपाचचा ठोका पडला. परतण्याची ती उशिरातील उशिराची वेळ. ह्यासाठी त्याने अनसूयेला इतकाच निरोप शेवटी दिला की,

"माझ्या बहिणीला म्हणावे, घाबरू नकोस. मी आठवड्याच्या आत काय ते पुढचे बेत तुला कळवीन. तोवर धीर धर नि प्रकृतीला त्या खुनी बंदिगृहाच्या यातनांतही शक्य त्या त्या प्रकाराने जप."

इतका निरोप कंटकीला सांगण्यासाठी अनसूयेपाशी ठेवून आणि अप्पाजींना घाईघाईने नमस्कारून कंटक लपत छपत त्या घरातून बाहेर पडला आणि त्या झाडाझुडपांत झाकलेल्या टेकडीच्या वळणावळणाने परत चालला.

***

चौदा

कंटक अप्पांना नमस्कार करून त्या टेकडीच्या झाडाझुडपांतून लपतछपत लगबगीने जो निघाला, तो त्या दाखलेवाल्यांच्या वसतीच्या टापूची जी चौकी होती, तीवर अगदी सुरक्षितपणे पोचला. चौकीवाला त्याच्या हातातीलच असल्यामुळे त्यानेही त्याच्याकडे कानाडोळा करून झटकन् पुढे निघून जाण्यास खुणावले. ती राखीव वाट संध्याकाळी बंद होण्याच्या आधीच कंटक पुढे सरला आणि बंदिवानांना मोकळ्या असलेल्या राजमार्गाला तो एकदाचा लागताच त्याचा जीव थोडासा खाली पडला.

अंदमानात काळ्या पाण्याचे बंदिवान आणले जाताच, त्या काळी त्या कक्षकारागृहात प्रथमतः कोंडले जाते. तेथे ज्याच्या त्याच्या वर्गवारीप्रमाणे प्रथमदंडित आणि न्यूनापराधी ह्यांना, वर्तणूक चांगली राहिल्यास बहुधा सहा महिन्यांनी कारागृहाबाहेर सोडण्यात येई; जे निर्ढावलेले बहुवार दंडित, त्यांच्या अपराधभीषणतेच्या आणि तेथील त्या कारागारातील वर्तणुकीच्यामाने एक ते पाच वर्षांनंतर साधारणतः कारागृहाबाहेर धाडण्यात येई. कंटक जेव्हा तिकडे काळ्या पाण्यावर गेला, त्या वेळी कारागृहाबाहेर सोडलेल्या बंदिवानांना राहण्यासाठी ज्या सरकारी चाळी बांधलेल्या होत्या, त्यातच ठेवले जाई. लाकूडकाम, रानतोडाई, वीटकाम, बांधकाम, चहामळा, रबरमळा, प्रभृति निरनिराळ्या कामांचे मोठमोठे कारखाने अंदमानाच्या वेगवेगळ्या टापूत काढलेले असते; त्यात ते बंदिगृहाबाहेर सोडलेले बंदिवान टोळ्याटोळ्यांनी धाडले गेले की ह्या चाळीत ठेवण्यात येत. त्यांच्याकडून सक्त काम करून घेण्यात येई. पण ठरलेल्या टापूत (तालुक्यात) त्यांना मोकळेपणी सुटीचा वेळ घालवण्याची, हवे ते खाण्यापिण्याची, निवडक इष्टमित्रांना भेटण्याची, अनुज्ञेने इतर टापूत जाण्यायेण्याची, बोलण्याची, मोकळीक असे. त्यांच्यातील निवडक दंडितांना बंदीजमादार इत्यादी करण्यात येऊन महिना दोन-चार रुपये खिसाखर्चही मिळे. अशा स्थितीत एकंदर दहाएक वर्षे वागणूक ठीक राहिली तर त्यांच्यातील चांगल्यांना ‘दाखला’ देऊन स्वतंत्रपणे घरदार, शेतीवाडी करता येई. ह्यांनाच ‘दाखलेवाले’ स्वतंत्र म्हणतात. त्या दाखलेवाल्यांची लहान लहान गावे बंदिवानांच्या टापूपासून निराळ्या राखीव वस्तीत वसवीत. त्या ‘दाखलेवाल्यां’ स्वतंत्र गावी बिनदाखलेवाल्या बंदिवानांना विशेष अनुज्ञेवाचून जाता येत नसे. ते दाखलेवाल्यात, दाखलेवाल्या स्त्रीबंदीशी लग्न केल्यानंतर ज्याला मुलेबाळे होते, त्यांची ती मुले मात्र जन्मतःच अगदी स्वतंत्र नागरिक समजली जाते. ही कुटुंबे स्वतः शेतीवाडी, गुरेढोरे किंवा कामधंदा करून पोट भरीत. त्यांच्यात कित्येक जण आपल्या कर्तृत्वाने चांगले धनत्तर बनू शकत.

काळ्या पाण्यावर गेलेल्या दंडित स्त्रियांचीही व्यवस्था अशीच. पण त्यांची बढती मात्र लवकर होई. काम पुरुषांसारखे कठीण नसे. स्त्रीबंदिगृहात प्रथम पाच एक वर्षे त्यांना बंद ठेवीत. मग एक विहारस्थानात त्यांना सुट्टीत हिडण्याफिरण्यास जाता येई. तेथे ज्यांना लग्नाची अनुज्ञा मिळे त्या बंदिवान पुरुषांनाही धाडण्यात येई. सक्त पहाऱ्यात त्या स्त्रीपुरुष बंदिवानांना त्या सुट्टीत एकमेकांची ओळखदेख, प्रेमपरिचय करू देण्यात येई. हे विहारस्थळ म्हणजे अंदमानाच्या

लंडनमधील 'हाइड पार्क,' पुण्याचा बंडगार्डन, त्या काळ्या पाण्यावरील पाप्यांचे प्रेमोद्यान!" तेथे होणाऱ्या प्रत्यक्ष परिचयानंतर जर कोणा स्त्रीपुरुषांचे आपसात विवाह करण्याचे त्या दोघांच्याही संमतीने ठरले तर ते योग्य की अयोग्य ते निरीक्षून सरकार ज्यांना संमती देईल त्यांची नोंदपद्धतीने लग्ने लावण्यात येत आणि 'दाखला' मिळून ते जोडपे दाखलेवाल्यां स्वतंत्र गावी धाडून देण्यात येई. लग्नाला जातीपातीची अडचण मुळीच नसे. घटस्फोटही ठराविक कारणांसाठी मिळे.

कोणी पुन्हा अपराध केला तर दाखला रद्द होऊन त्या व्यक्तिला परत बंदीत पडावे लागे. रीतसर चौकशी होऊन फाशीपर्यंत शिक्षाही मिळे. हत्येचा प्रयत्न हाही वधार्ह अपराध अंदमानातील बंदिवानांच्या प्रकरणी समजला जाई. उद्दंड, अघोरी आणि अमानुष प्रवृत्तीच्या शतावधी जन्मठेप्यांना अशा अत्यंत कडक शिस्तीत ठेवल्यावाचून त्या बेटात जीवनसुरक्षितता, शांतता आणि सुव्यवस्था राखणे एकंदरीत दुर्घट होते.

अपराधविज्ञानाची (Criminology) ध्येये तीन : प्रतिशोध, प्रायश्चित्त आणि प्रगती. अपराध्यावर सूड उगविणे ही मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ती. 'दातांस दात नि डोळ्यास डोळा' हा यहुद्यांचा धर्मदंडकच होता. ज्या अवयवाने अपराधिले त्याचा छेद हा काही प्रकरणी तर मनुस्मृति काय, जगातील प्राचीन ग्रीकादि निर्बंध (कायदे) काय, पठाणासारख्या किंवा अगदी रानटी जातीतील 'ज्याने हत्या केली तो न सांपडला तर त्याच्या वंशातील कोणाला तरी पण ठार मारणे' हा रूढाचार काय- प्रतिशोधांचेच उग्र वा सौम्य प्रकार होते. त्या पुढचा विवेक असा की, राजसत्तेने तरी अपराध्याचा प्रतिशोध, सूड, हाच एक उद्देश न ठेवता ज्यायोगे कृतकर्माच्या भोगाव्या लागणाऱ्या दंडामुळे त्याला वचक बसेल इतकाच काय तो दंड, प्रतिबंधक प्रायश्चित्त द्यावे. चोराचा हातच तोडून न टाकता हात इतर उपयुक्त कामासाठी राखून, चोरी करण्याचे तेवढे त्याला भय वाटावे, शिक्षेच्या भीतीने तरी नको ती चोरी, अशी त्याचे उदाहरण पाहून इतरांनाही धास्ती बसावी, असा दंड तेवढा करणे उचित, ही पुढची पायरी ठरली. प्रतिशोध हे ध्येय नसून प्रायश्चित्त हे दुसरे ध्येय इष्टतर वाटू लागले. त्याही पुढे जाऊन अपराध्याचे मन केवळ शिक्षेच्या भीतीने नव्हे, तर मूलतःच स्वेच्छेने अपराध्यापासून परावृत्त करावे, ज्या परिस्थितीमुळे सुशील मनातही अपराध करणे अगतिक होते, ती परिस्थिती पालटावी, शिक्षण, सत्संग, मनोविकास इत्यादिकांच्या जोपासणीने त्यांची मनेच समाजशील आणि सुसंस्कृत करावी, त्यांच्यातील माणुसकी वाढवील अशी त्यांच्या स्वभावाचीच सुधारणा करावी, त्यांच्यातील माणुसकीचीच प्रगती व्हावी, हे अपराध्यांना वागविण्यातले तिसरे उद्दिष्ट असले पाहिजे.

एकंदरीत पाहता अंदमानाच्या अपराध्यांना वागविण्यासंबंधी जे धोरण तीस-चाळीस वर्षांमागे आखले गेले होते, त्यात काटेकोरपणे नसले तरी बऱ्याच प्रमाणात ह्या तिन्ही शास्त्रीय उद्दिष्टांचे एक अशास्त्रीय का होईना, पण सहेतुक मिश्रण करण्यात आले होते, हे आम्ही वर वर्णिलेल्या काळ्या पाण्यावरील दंडितांच्या त्या वेळच्या वर्गवारीवरून बढत्यांच्या क्रमावरून, सुधारणीय आणि

दुःसुधारणीय अशा कसोटीप्रमाणे प्रत्येकी पात्रापात्रतेनुसार कडक वा लवचिक अशी विभिन्न वागणूक देण्याच्या धोरणावरून दिसून येईलच

ज्या बंदिवानांचे दहा-बारा वर्षांच्या कडक शिस्तीने, सक्त कामाने आणि कृत कर्माचे यथेष्ट प्रायश्चित्तही भोगल्याने शील सुधारलेसे वाटे, त्यांना 'दाखला' देऊन अंदमानातल्या अंदमानात स्वतंत्रपणे राहण्याची अनुज्ञा मिळाल्यावर त्यांची गावे निराळी बसविण्यात आणि त्या सुधारलेल्यांच्या गावात चांगल्या वागणुकीची बारा वर्षे अजून न भरलेल्या बंदिवानांना मोकळेपणी जाऊ येऊ न देण्यातही अधिकाऱ्यांचा हाच कटाक्ष असे की, अशा पृथक्करणाने त्या सुधारलेल्यांचे ह्या न सुधारलेल्या चंडप्रकृति बंदिवानांच्या उपद्रवापासून संरक्षण व्हावे आणि त्यांच्या कुसंगतीने त्या दाखलेवाल्यांचे किंवा त्यांच्या तिथेच जन्मलेल्या नव्या पिढीचे अधःपतन होऊ नये.

कंटकलाही तेव्हा काळ्या पाण्यावर येऊन पाच एक वर्षेच झाली असल्यामुळे अजून तो बंदिवान वर्गातच मोडत होता. त्याला कक्षकारागृहात थोडे दिवस सक्त हस्तश्रम करावे लागल्यानंतर लिहिण्याचे काम मिळाले. तेथे त्याने फार चांगली बंदिगृहीय वागणूक ठेवल्यामुळे सहा महिन्यांनंतर त्याला कारागृहातून सोडून बाहेर टापूत लेखकाच्याच कामावर धाडण्यात आले. त्याने इंग्रजी लेखनवाचनही वाढविले, कामही चोख केले, त्याची चहा अधिकारीवर्गही करू लागला. अंदमानातील अत्यंत कठीण आणि कष्टप्रद कामात मोडणारे जे रानतोडाईचे काम त्यावर आता त्याची, गणती आणि देखरेख करणारा, 'बंदिबाबू' (Convict Clerk) म्हणून नेमणूक झाली होती आणि त्याच्या हाताखाली शंभर सश्रम बंदिवानांची तुकडी घनदाट रान तोडण्याच्या कामावर धाडण्यात येत होती. पण तरीही तो स्वतः त्याला पाच वर्षेच काळ्या पाण्यावर झाल्यामुळे बंदिवान वर्गातच नियमाप्रमाणे मोडत होता आणि म्हणूनच त्या दाखलेवाल्यांच्या वसतीत त्याला मोकळेपणी येण्या-जाण्याची अनुज्ञा नव्हती. अप्पाजींच्या कुटुंबाशी रानतोडाईवर जाता-येता त्याची योगायोगानेच ओळख होऊन चांगला घरोबाही जो झाला तोही अंतःस्थपणेच होता आणि म्हणूनच आजही त्या वसतीत तेथील चौकीदाराच्या अंतःस्थ फुशीनेच काय तो तो नेहमीप्रमाणे चोरटी भेट घेण्यास जेव्हा गेला तेव्हा ती थेट संध्याकाळी चौकीवर ये-जा बंद करण्याच्या वेळेआधीच संपवून आणि अप्पाजींचा निरोप घेऊन असा त्या टेकडीवरून लपत छपत शेवटी बंदिवानांना उघड्या असलेल्या आणि त्याच्या रानतोडाईच्या तुकडीची ठराविक वाट असलेल्या त्या मार्गाला लागताच त्याचा जीव एकदाचा खाली पडल्यासारखा झाला.

कंटक बिनधोकपणे वाटेला लागल्यानंतर त्याच्या मनात, अनसूयेच्या तोंडून मालतीविषयी त्याला जी माहिती फार दिवसांनी मिळाली, तिच्या विचारांचे चक्र चालू झाले. गेल्या पाच वर्षांचा सारा इतिहासही त्याच्या डोळ्यांपुढे उभा राहिला. त्या दोन्ही विषयांतच, त्या दिवशी अप्पाजींनी सत्तावनच्या स्वातंत्र्य-युद्धात भाग घेतल्याची जी गोष्ट त्याला सांगितली आणि तिच्या जाणिवेसरशी त्या कुटुंबाविषयी जो एक राष्ट्रीय आदर वाटू लागला होता, त्याचे विचारही घोळत होते. त्याच्या अनुषंगाने त्या कुटुंबाशी त्या कंटकाचा परिचय कसा झाला आणि कसा वाढत गेला

ते चरित्रही त्याच्या त्या विचारक्रांत गुंफले जाते होते आणि सगळ्यात महत्वाची जी चिंता, 'पुढे काय करावे?' ती भविष्याची होऊ घातलेली घडामोड त्या होऊन गेलेल्या घडामोडींच्या स्मृतींना पुन्हाः पुन्हा मागे सारीत, 'माझा, माझा निकाल पहिल्याने कर!' असे बजावीत त्याच्यापुढे दत्त म्हणून उभी ठाकत होती.

हे सारे विचार कोणत्याही विषयावर क्रमाने त्याच्या चित्तात येत नव्हते, तर अधूनमधून आगेमागे, ह्या विषयात तो, त्यात हा, असे गुंतागुंतीने येत चालले होते. दीडदोन मैलाची ती वाट झपाझप चालत असता कंटक त्या विचारांच्या गुंतागुंतीत अगदी गुरफटून गेलेला होता. त्या विचारांच्या गुंतागुंतीला उकलून जर विषयवार क्रम लावला तर मालतीच्या प्रकरणाची जुळवाजुळव साधारणतः अशी करता येईल.

अप्पांच्या कुटुंबाशी काही महिन्यांपूर्वी परिचय झाल्यानंतर कंटकला कळले होते की त्यांची सून अनसूयाबाई ही स्त्री बंदिगृहांची एक 'दाखलेवाली' जमादारीण आहे. काळ्या पाण्यावर आल्यापासून, अंदमानाच्या स्त्री बंदिगृहात मालती आलेली आहे की नाही, का ती जन्मठेपीची शिक्षा तिला झाल्यानंतर हिंदुस्थानच्याच कोण्या कारागारात अडकवून ठेवलेली आहे, त्याचा त्याने कसून शोध चालविलेला होता; पण स्त्री बंदिगृहावर असलेल्या सक्त पहाऱ्यामुळे आणि त्यात बंदिवान पुरुषांचा प्रवेश वा संबंधसुद्धा न यावा अशी कडेकोट व्यवस्था ठेवलेली असे. त्यामुळे, कंटकला त्या गोष्टीचा काही मागमूस लागलेला नव्हता. जी काही माहिती त्याला मिळाली होती, तीवरून कंटकी नावाची कोणीही स्त्री बंदी त्या बंदिगृहात हिंदुस्थानातून आलेली नाही, असेच त्याला कळले होते. जेव्हा अनसूयाबाईला त्याने ती माहिती सहा-सात महिन्यांपूर्वी प्रथम विचारली, तेव्हा ही कंटकी त्या स्त्री बंदिगृहात आलेली नाही, हेच नक्की कळले होते. त्यायोगे मालतीला जन्मठेपेची शिक्षा झाल्यानंतर तिचे काय झाले, ह्याची चिंता त्याला सारखी व्याकुळवीत होती. तिची आठवण झाली की, त्याला अन्न गोड लागेनासे होई. ती त्याला पूर्वी प्रत्यक्ष भेटत असे तेव्हा देखील तिच्या स्पर्शासाठी तो जितका रोमांचित होते नसे, इतका आता स्पर्शाच्या नुसत्या स्मृतीसरशी तो रोमांचित होई. अन्न मिळते तेव्हा ते लागते त्याहून ते जेव्हा मिळेनासे होते तेव्हा त्याच्या स्मृतीतच ते शतपटींनी, अधिक गोड लागते! पुन्हा, आताशी त्याच्या मनात मालतीच्या त्या स्पर्शाची आठवण येताच पूर्वीप्रमाणे नुसत्या स्नेहाच्या भावनाच जागत नसून उपभोगाच्या भावना उद्दिपू लागते. 'ती प्रत्यक्ष माझ्यापाशी असताना मी तिच आलिंगन घ्यायला कसा धजलो नाही, कोण जाणे!' ह्याचेच त्याला राहून राहून वाईट वाटू लागले होते. शेवटच्या रात्री त्या तिला छळणाऱ्या मुस्लिम गडाला ठार केल्यानंतर त्या भयंकर साहसाच्या परिणामापासून बचावले जाण्यासाठी तो किशन त्या मालतीसह त्या देवळात भर काळोखात जाऊन लपला होता, त्या रात्री तर झोपेतून भयाने थरकापत ती दचकून उठली, आपण होऊन त्याच्या गळी पडली आणि 'माझ्या सोबतीस मला घेऊन नीज ये,' असे आपण होऊन त्याला पाचारून त्याला लगटून निजली; त्या वेळची त्या प्रत्येक हालचालीची आठवण न आठवण आताशी तो रात्री एकान्ती

असता त्याला वारंवार व्हावी. मालतीच्या केसांच्या बटा, ती त्याच्या छातीशी बिलगून निजली असता त्या रात्री त्याच्या गालावर जशा रुळत अगदी तशा पुन्हा जणू काय त्याच्या मुखावर आणि गालावर रूळत आहेत असे त्याला भासे! त्याचे सारे अंतःकरण कामकंपित होऊन थरारे, पश्चात्तापाने तळमळू लागे की, "त्या रात्री तरी निदान मी नुसत्या संयमाच्या नि भ्याड संकोचाच्या आहारी उगीचच्या उगीच का गेलो? अमृताचा पेला अगदी ओठाशी धरला, पण पिण्याच तेवढेच विसरलो! तिच्या संगसुखाला जन्माचा आचवलो!"

प्रेमिक व्यक्ति समक्ष सन्निध म्हणजे अगदी आलिंगनांतही तिच्या इच्छा-अनिच्छेचा दाब तिच्यावर अनुरक्त असणाऱ्या प्रणयी जनाच्या मनसोक्त इच्छेवर काहीतरी पडलेला असतोच असतो. पण जेव्हा त्या प्रेमिक व्यक्तीच्या स्मृतीशीच काय तो तिच्यावर अनुरक्त असा प्रणयी जन कल्पनेच्या मंदिरात विहरू लागतो, त्या वेळी त्याच्या मनाच्या हौशी अनिवारपणे प्रकटू लागतात; त्याच्या मनासारखेच सगळे घडते आहे, अशी मनाची समजूत पडण्यास काहीच अडथळा उरलेला नसतो. त्याची अतृप्त आणि अव्यक्त वासना सारा संकोच सोडून आपली इच्छा पुरवू शकते. त्या प्रेमिक व्यक्तीला ती समक्ष सन्निध असता जे हृद्गत सांगण्यास मन लाजे, ते तिच्या स्मृतिमूर्तीला मोकळेपणी सांगता येते, आपल्या लहरीप्रमाणेच तिची लहरही आपल्याला हवी तशी जुळवून घेता येते.

कंटकचेही त्या त्याच्या एकान्त तळमळीत तसेच होई. मालती त्याच्या सन्निध समक्षपणे होती तेव्हा तिच्याविषयीच्या कामुक भावना त्याच्या असेज्ञ मनात काय रुजत असतील त्या असतील; त्याच्या संज्ञ मनाशी देखील मोकळेपणी आपले हृद्वत सांगू लागते पण आता त्या पण त्या विरहातील अश्रूंच्या पाण्याने पाणवत पाणवत अंकुरित होऊन, पल्लवित होऊन त्याच्या संज्ञ मनाच्या भूमिकेतही बहरून राहिलेल्या होत्या! पूर्वी प्रथमतःच तिच्या कल्याणासाठी आणि त्याच्या कर्तव्यासाठी तिला संकटातून सोडवून सुखविण्याच्या कामी स्वतःचा जीव त्याने धोक्यात घातला. पण आता तर तिच्या कल्याणासाठी किंवा त्याच्या कर्तव्यासाठीच नव्हे, तर त्यासहच तिच्या प्राप्तीसाठी आणि तिच्या संगाच्या स्वर्गीय सुखासाठीही तो तळमळू लागला. तिला संकटातून सोडविण्याच्या कामी स्वतःचा जीव पुन्हा एकदा धोक्यात घालण्यास तो कचरेनासा झाला.

आणि त्याला आज अनसूयेने सांगितलेल्या बातमीप्रमाणे पाहता मालती त्या स्त्रीबंदिगृहातही जिवावरच्या संकटातच होती; तिला सोडावयाचे तर कंटकलाही त्याचा जीव मागच्यासारखा एकाभयंकर धोक्यात ढकलावा लागणार होता! ह्या पाळीचे तिच्या जिवावरचे संकट दुसऱ्या कोणी तिच्यावर आणले होते असे म्हणण्यापेक्षा ती आपण होऊनच तिच्या जिवावर आणणार होती! तिने स्वतःच अनसूयेच्या हाती तसा अत्यंत कळवळलेला निरोप सांगितलेला होता!

अनसूयेला त्याने 'कंटकी'चा शोध करण्याच्या कामी पाच-सहा महिन्यांपासून नेमले होते. पण त्या स्त्रीबंदिगृहात कंटकी नावाची कोणीही जन्मठेप शिक्षेची स्त्री तोवर आलीच नव्हती, असे तिला त्या वेळी कळले; तरीही तिच्या घरी तिच्या मुलांना - त्या मोहन नि उषेला -

शिकविण्यासाठी कंटक नेहमी जाई- येई. अनसूयेला बहीण मानून तिला भाऊबीजेची वा सणावाराची भेट म्हणून काही ना काही तरी देणगी देत जाई. त्याच्या त्या सुशील लोभाळू स्वभावाने, त्याच्या सुविद्य योग्यतेमुळे, नाना विषयातील सार्वजनिक हिताहिताच्या कळकळीमुळे प्रौढप्रज्ञ अप्पाजींना तो फार हवासा वाटे. त्याचा हा घरोबा असा वाढत गेल्याने त्याचे कंटकीच्या शोधाचे काम मनापासून करण्याचे अनसूयेनेही ठरविले होते. ज्या दिवशी वर दिलेली भेट त्या कुटुंबाला कंटकने दिली त्याच्या आठ एक दिवस आधीच कंटकी नावाची अपेक्षित स्त्रीबंदी, हिंदुस्थानातून जन्मठेपेच्या शिक्षेवर धाडलेली त्या अंदमानाच्या बंदिगृहात आली आहे, हे अनसूयेला कळले होते. तिने कंटकला कळविले होते. तिची प्रत्यक्ष भेट घेण्याची संधी अनसूया जमादारिणीने त्या दिवशी साधून बंदिगृहातील असल्या चोरट्या भेटीत घाईघाईने जितके विचारवेल तितके विचारून घेतले. त्यात कंटकीनेही कंटकपाशी पूर्वी हिंदुस्थानात धरपकड होताना जे धोरण ठरले होते, त्याप्रमाणे आपल्या 'मालती' ह्या नात्याने पूर्वीचे कोणतेही वृत्त उघडकीस न आणता कंटकची आपण बहीण आहो, आपल्याला अपहरणाऱ्या एका दुष्टाचा वध करण्याच्या साहसापायी कंटकला आणि आपल्याला जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली, असेच पूर्ववृत्त सांगितले. शिक्षा झाल्यानंतर कंटकपासून वेगळे करून आपल्याला हिंदुस्थानात दुसऱ्याच एका बंदिगृहात कोंबण्यात आले आणि तिथेच गेली पाच वर्षे आपण सडत, कुढत, रडत पडलेलो होतो! कंटकचे काय झाले ते आपणास बरेच दिवस काही कळेना, पण तो जन्मठेपीवर अंदमानात गेला, असा सुगावा बंदिवानांच्या तोंडून पुढे पुढे लागला. तेव्हापासून हिंदुस्थानातील त्या बंदिगृहात अत्यंत हालअपेष्टांमध्ये दिवस काढण्यापेक्षा आपणास अंदमानातील काळ्या पाण्यावरचे धाडण्यात यावे, असे आपण सरकारशी सारखे धरणे धरले आणि शेवटी त्याप्रमाणे आपले चलान होऊन आपणास काळ्या पाण्यावर धाडण्यात आले! असे आपले शिक्षेनंतरचे पूर्ववृत्त कंटकीने अनसूयेला थोडक्यात सांगितले.

मग त्या भेटीत कंटकी अनसूयेला म्हणाली,

"जमादारीणबाई, माझ्या वयाला अजून विशीसुद्धा उलटली नाही. पण जगातील अत्यंत असह्य यातनांचा जो भडिमार शंभर वर्षे जगणाऱ्यांच्या वाट्याला सहसा येत नाही, तो माझ्या वाट्याला येऊन चुकला. इतका छळ, इतकी विटंबना, इतका जाच, इतके दुःख मी आजवर सोसल! आणि विशेष हे की, बाई, मी देवासन्मुख सांगते, माझा स्वतःचा असा एकच दोष काय तो जो घडला, तो सोडला तर असा माझा अनन्वित छळ ज्याच्यासाठी व्हावा असा दुसरा कोणताही अपराध स्वतः माझ्या हातून असा घडलेला नाही! आणि तो जो माझ्यातील माझ्या असा एकच दोष तो म्हणजे हे मेल माझे रूप! मी जिथे जाते तिथे हे नडत! ह्या रूपापायी मी भ्रातृगृहातून बंदिगृहात पडले, ह्या रूपापायी बंदिगृहातही मी ज्यांच्या हातात पडले, त्यांनी माझी विटंबना केली, ज्यांच्या हातात पडले नाही त्यांनी म्हणूनच माझा छळ केला! बाई, आता हे जीवनच मला नकोस झाले आहे! हिंदुस्थानातल्या बंदिगृहातच मी एकदा जीव देण्याचा प्रयत्न केला; पण तो फसून मला

उलट सहा महिने हातकडी नि कोठडीबंदीची शिक्षा झाली. छळापासून सुटण्याचा यत्न केल्याच्या अपराधासाठी अधिक छळ होऊ लागला! शेवटी एकच आशातंतू उरला होता, त्याला कसंबस लांबकळून माझे जीवन मरणाच्या खाईत लगोलग कोसळण्याच अरिष्ट तात्पुरत टळल. तो आशातंतू म्हणजे मला काळ्या पाण्याची शिक्षा जेव्हा झाली, तेव्हा न्यायाधीशाने दाखवलेला एक आश्वासत संभव! ते म्हणाले होते, 'काळ्या पाण्यावर काही वर्षांनी तुला क्वचित् मोकळे सोडले जाईल नि मग त्या टापूत का होईना, पण तुला तुझ्या आवडीच्या सहचरासह ममतेच्या नि वत्सलतेच्या कौटुंबिक सुखाला उपभोगिता येईल!' ते त्या न्यायाधीशाचे शब्द अमृताच्या तुषारांप्रमाणे माझ्या मनातील कोमल अशा स्त्रीय लालसेला पुन्हा पुन्हा अंकुरवीत!

"इतक्यात मला कळले की, कंटकही अंदमानातच आहे! आत्मघाताच्या आधी एकदा तरी त्याची भेट व्हावी, ह्या आतुरतेने मी हरप्रयत्न करून काळ्या पाण्यावर आले! पण इथे पाहते तो ह्या ओंगळ घाणीतच मला अजून वर्षानुवर्षे खितपत पडाव लागणार! छे, छे! बाई, मी आता एक दिवस देखील इथे तशी सडत पडू इच्छित नाही! ह्या देहाचा मला वीट आला आहे. तुम्ही कंटकची चिठ्ठीच तेवढी आणलीत म्हणून तुमच्यावर पुन्हा एकदा विश्वासते. शेकडो दिखाऊ आपले म्हणविणाऱ्यांनी विश्वासघात करून मला इतक्या वेळा फसविल आहे की, तुम्ही मला फसविणार नाही असे काही मला सांगता येत नाही! रागावू नका! मी तुम्हाला खोटे म्हणत नाही, माझ्या दैवाला म्हणते. पण तरीही तुमच्या मांडीवर मी पुन्हा माझी मान देते. कापाल? कापा! आई मानते मी तुम्हाला, पाया पडते तुमच्या, मला तुम्ही फसवू नका! नाही तर कंटकबाबूच्या नावाने मी सांगत असलेले हृद्गत विश्वासघाताने सरकारी अधिकाऱ्यांनाच कळायच, माझ्यावर नवंच संकट कोसळायच! नको ना भीती बाळगू?

"बरे, मग कंटकला कळवा की, जर त्यांना माझी सुटका तीन-चार महिन्यात करता येत असेल तर मी जगते. मी आता इतकी कठोर, इतकी धीट, इतकी कृत्या बनले आहे, दुष्टातील दुष्टाच्या संगतीची दारू बळेबळे पाजली जाता जाता इतकी दुष्ट बनले आहे, माझ्या सुटकेसाठी मी वाटेल ते साहस, कपट, क्रूरता करायला कचरणार नाही. पण जर ह्या चार-सहा महिन्यात ह्या बंदिगृहातूनच नव्हे, तर ह्या घाणेरड्या दुर्दशेतून माझी सुटका होते नसेल तर मी आत्मघाताचे यत्न आत्मघात साधतो सारखे करीत राहणार! आणखी दहा-पाच वर्षे ह्या कारागृहाच्या नियमाप्रमाणे मी इथे मुळीच जिवंत राहणार नाही हे निश्चित! बाई, बाई, हा माझा बेत कंटकला कळविण्याचा, दुसऱ्या कोणालाही न कळविण्याचा, हे दोनच उपकार करण्याची दया कराल ना मजवर? हो, एक आणखी अगदी महत्वाचा शब्द! कंटकबाबूंना विनंती की, जर ते आता स्वतः सुखात नांदत असतील तर ह्या माझ्या निरोपामुळे त्यांनी असे कोणतेही कृत्य करू नये की, ज्यायोगे त्यांचा जीव पुन्हा धोक्यात पडेल! पण खरेच, माझी सुटका करा ही माझी पहिली विनंती ह्या दुसऱ्या विनंतीला अगदी विसंगत आहे, नाही? नका, नका, बाई, चुकले मी! माझी पहिली विनंती त्यांना मुळी सांगूच नका! मी इथे समाधानात आहे नि तुम्ही खुशाल आहात हे ऐकून

आनंदले, इतकेच सांगा! शपथ अं, बाई, मी बोलले ते बोललेच नाही असे समजायच अं! नाही तर माझ्या सुटकेसाठी कंटक काही तरी धोक्याचा यत्न करतील, पुन्हा भलताच एखादा प्रसंग त्यांच्यावर गुदरेल! काय? तुम्हांला आता ही भेट संपवलीच पाहिजे? बरे, जाते मी! हो, अगदी गुपचूप ह्या दाराने अशी लपून निघून जाते! पण बाई, हात जोडते, मला पुन्हा अशा कधी कधी तरी भेटत जाल ना? कोण? येते आहे कुणी? गेलेच ही मी, बघा!"

अनसूया जमादारणीने कंटकीच्या भेटीतली जी विखुरलेली अनेक वाक्ये कंटकला सांगितली, त्यांचा आपल्या मनात सुसंगत क्रम लावून कंटकने मालतीच्या त्या भेटीतील भाषण असे मनोमन जुळवून घेतले तेच ते पुनः पुन्हा मनात घोळले मालतीने केले असावे असे जे त्याला वाटले तसे त्या तन्मय गुंगीत काही हातवारेही त्याने मधूनच केले आणि तरीही त्या तन्मय गुंगीतच तो झपाझप वाटही चालतच राहिला.

तोच त्याला आठवली, मालती बंदिगृहात काय कामावर आहे, तिची प्रकृति कशी दिसली असे त्याने अनसूयेला जेव्हा विचारले तेव्हा तिने तिची सांगितलेली दुर्दशा! बंदिगृहाच्या सैपाकाच्या कामात तिला घातलेली होती. तेथील तिचे चित्र त्याच्या मनात उभे राहिले. वाळून गेलेली, गुडघाभर एक जाडेभरडे फटकूर नेसलेली, जाडीभरडी बंदिगृहछापाची एक चोळी घातलेली, आठवड्याच्या काठी पळीभर तेल मिळे ते पुरवून पुरवून उगीच औषधासारखे ज्या केसावर हात फिरविण्यास तेवढे उपयोगी, ज्यांना विंचरायला वेळ नाही. गुंतलेले, घामाघूम होऊन प्रत्यही चिकटा आलेले आणि त्या गदळ, ओंगळ, उलट्या काळजाच्या कैकाडणीसारख्या शेकडो स्त्रीबंदीच्या हलकट सहवासात उवालिखांचा बुजबुजाट झालेल्या तिच्या केसांचा कसाबसा अंबाडा घातलेली, अंगात चोरटा ताप येत असलेली आणि तशा स्थितीतच, बंदिगृहातील एका पत्र्याच्या तापलेल्या छपरीत भट्ट्यांसारख्या भडकलेल्या, मोठमोठ्या चुलीच्या असह्य उष्णतेत कवळीत न मावणाऱ्या अजस्त्र लोखंडी भांड्यातून भाताचे, भाज्यांचे ढीग शिजवीत, उकडीत, गुडघ्याएवढाल्या आट्यांचा ढिगांना कुटीत, त्यांच्या दोनदोनशे भाकरी थापीत, दिवसभर अंग बरबटून गेलेली -अशी मालती त्याच्यापुढे उभी राहिली! त्याच दिवशी सैंपाक कामावरील स्त्रीवॉर्डरने मालतीला तिने ती वॉर्डरबाई चोरून मागत असलेला चारपाच शेर आटा अधिकाऱ्यांच्या चिठ्ठीवाचून देऊन टाकण्याची लबाडी केली नाही म्हणून, नसत्याच एका आळशीपणाच्या आरोपाचे खुसपट काढून अगदी हलकट, वेड्यावाकड्या शिव्या हासडल्या होत्या. मालतीने पण उलट शिवी हासडली-तीही आता किती तरी नव्यानव्या शिव्या शिकली होती! त्यासरशी दोघीतिघी दुष्ट स्त्रीवॉर्डरांनी धरून तिच्या फाडफाड थोबाडीत दिल्या होत्या! अनसूया जमादारीणच तेथे तेवढ्यात आली म्हणून मालतीची बाजू खरी तरी ठरली! नाहीतर विनापराध मार खाऊनही तिलाच उलट उद्दंडपणासाठी अधिकाऱ्यांपुढे त्यांनी ओढून नेले असते, शिक्षा देवविली असती!

कंटकच्या मनातील डोळ्यांपुढे त्या राक्षसिणींनी तिच्या तोंडात फाडफाड मारल्यामुळे धायधाय रडत, संतापाने कावत, निरूपायाने कढत असलेली ती मालती अगदी वाट अडवून उभी राहावी,

तशी उभी राहिली! करुणेने कासावीस झालेल्या त्या कंटकच्या डोळ्यांतून आसवे टपटप गळली, त्याची दृष्टि बाष्पधूसर झाली! पण तरीही त्याची पाऊले सरळपणे ती वाट झपाझप काटीत चाललीच होती पुढे!

ह्या सर्व करुण वृतान्ताच्या दुःखद आठवणीने भारावलेल्या त्याच्या चित्तात, पाणावलेल्या त्याच्या त्या बाष्फकुल दृष्टीपुढे पुढचा बेत असा काही जुळून आलाच नाही. पुढचा निश्चय मात्र ठरलेलाच होता. वाटेल ते झाले तरी आता आपली नि मालतीची ह्या बंदिवासातून सुटका करायचीच. तिचा आत्मघात टाळायचाच. आयुष्यातले दोन दिवस का होईनात, तेच दोन दिवस त्या साहसापायी आयुष्याचे शेवटचे ठरले तरी, मरायच्या आधी दोन दिवस का होईना, पण मालतीच्या गाढ आलिंगनात प्रीतीच्या गाढ गुंगीतील स्वर्गसुखाला उपभोगायचेच उपभोगायचे! तिला सुखी करायचे, स्वतः सुखी व्हायचे!!

इतक्यात, विचारांच्या अशा असेगत कल्लोळात एखादी दिसण्यात अगदी क्षुल्लक दिसणारी अडचण अकस्मात् सुचून मोठमोठ्या मनोरथांची धाव जशी एकदम थबकविते, लहान पेराएवढा विंचू एखाद्या महारथी वीरालादेखील जसा झटकन् विव्हळायला लावतो, तशी एक शंका कंटकाच्या त्या स्वर्गसुखाच्या भराला एकदम नांगी मारून गेली! 'गाढ आलिंगनात तिला सुखी करायचे, दोन दिवस तरी तिच्या संगतीच सुख उपभोगायच!' ह्या रंगात त्याचे मन रंगले न रंगले तोच, मनामनातच कोणी त्याला झटकले, 'अरे, पण ती किती सुरूप नि तू? किती कुरूप! तिचा संगम तुला स्वर्ग वाटणारच, पण तिला?'

त्याचा अकस्मात् विरस झाला! क्षणभर किशन सुन्न झाला! सुरूप हाच मालतीला शाप वाटला; कुरूप हाच किशनला शाप वाटला! त्या चमत्कारिक विचारासरशी त्याचे त्यालाच हसू आले. त्याचे मन खंगले, खंगण्यातच हसले, पण त्याची गती मात्र खंगली नाही. स्वयंचल (Automatic) यंत्रासारखे त्याचे पाय झपाझप वाट काढीत पुढे चालले होते. आपल्याला सरकारी नियमाप्रमाणे ठराविक वेळी बंदिवान-चाळीत पोचलेच पाहिजे, हे त्याचे मन जरी विसरले होते, तरीही त्याच्या पायांतील ज्ञानतंतूची स्मृति काही ते विसरली नव्हती!

खंगून गेलेले त्याचे मन अनिष्टांतूनही जे काढता येणे शक्य होते, ते इष्ट तात्पर्य काढू लागले की, 'तरीही काय चिंता! ती माझ्यासारख्या कुरुपावर अनुरागाने अनुरक्त झाली नाही तरीही माझ्या स्नेहाला तरी काही पारखी होणार नाही! रूपापेक्षा शीलाच आकर्षण अधिक गोड लागाव इतकी ती स्वतः सुशील नि सुरुचि आहेच आहे! तिच्या संगाचे सुख नसले तरी सोबतीचे सुख तरी मला दुष्प्राप्य होणार नाही! ते तरी ती होऊनच वांच्छीत आहे हे निःसंशय!'

ह्या विविध भावभावनांच्या कल्लोळात त्याचे मन गुरफटून गेले आहे तोच त्याच्या नेत्रांनी, जणू काय एखाद्या पहारेकऱ्याने हालवून जागवावे तसे त्याच्या मनाला जागविले, 'सावध! ती पाहा बंदिवानांची चाळ दिसू लागली. बघ! काय करायचे हे ठरवण्यातच वाट संपली! कसे करायचे त्याची वाट काय?

तसे म्हंटले असता सारा जन्म काळ्या पाण्याच्या बंदिवासाच्या घाणीत कुजत पडावयाचे नाही. संधी साधताच बंदीच्या बेड्या तोडून निसटायचेच, हा निश्चय किशनचा आजचाच काही होता असे नाही! काळ्या पाण्यावर येतानाच तो निश्चय केला होता. रफिउद्दिनसारख्या अघोरी माणसाला आपल्या हाडवैराची ओळख न देता त्याच उद्देशाने किशनने जवळ केले होते. त्याच्याशी गेल्या पाच वर्षांत काळ्या पाण्यावरही त्याच बेताची त्याने गुप्तपणे अनेकवार बरीच चर्चाही केली होती आणि त्या चर्चेच्या अनुरोधेच त्याने लाकूडतोडाईच्या कामातच जी आपली नेमणूक करून घेतली होती. इतकेच नव्हे तर त्या लाकूडतोडाईच्या कामावरील शेसवाशे बंदिवानांचा तो मुख्य बंदिबाबू होताच त्याने हस्ते परहस्ते खटपट करून युक्तीने रफिउद्दिनलाही त्या कामावरील बंदिवानातच आपल्या हाताखाली भरती करून घेतले होते. परंतु त्याला मालतीचा काहीच सुगावा लागेना, ह्यासाठी त्या साहसाविषयी त्याने अगदी उचल अशी घेतली नव्हती. ती त्याच्या मनाने जी आज घेतली, ती मात्र मालतीच्या निर्वाणीच्या निरोपाची, तिच्या दुर्दशेच्या आणि आत्महत्येच्या बेताची अत्यंत चिंताजनक बातमी ऐकल्यामुळेच होय!

काळ्या पाण्यावरील बंदिवासाचे जन्मठेपी साखळदंड तोडणे हे साहस साधे नव्हते, ही गोष्ट तोंडची नव्हती. शिर हातात घेऊनच त्या कामाला जो हात घालील त्याचेच ते काम, हे किशन जाणून होता. ती धास्ती त्याचे मन खात होते, म्हणूनच आजवर तो नुसते बेत योजीत, हळूहळू त्या दिशेला वळत आला; पण फासा नुसता हातात खुळखुळवीत बसणाऱ्या पण टाकायला भिणाऱ्या जुगाऱ्याप्रमाणे निर्बंध मर्यादेच्या बाहेर असे कोणतेही पाऊल टाकायला तो कचरत होता. आज त्याने ते पाऊल टाकायचे धारिष्ट्य करायचेच, हाही निश्चय केला. ते साहस कितीही जिवावरचे असले तरी दिवसगतीवर लोटण्याचा तो प्रश्न न राहता आज अगदी निकडीचा, एक अगदी त्वर्य (urgent) प्रश्न होऊन बसला! आणि त्याची ती तशी निकडीची चर्चाही आता रफिउद्दिनशी करायची, असा त्याने निर्धार केला.

पण मालतीसंबंधी मिळालेली माहिती? नि त्या दुर्जनाला, रफिउद्दिला, कळवावी की नाही? छट्! किशनला लगोलग निश्चय झाला! त्याचे अवाक्षरही रफिउद्दिनला निदान सध्यातरी कळवायचे नाही! “रफिउद्दिनला हेही कळवावयाच नाही की, आपल्यासहच आपल्याला मालतीचीही सुटका करायची आहे.

मनातच उच्चारलेल्या त्या नावासरशी त्याने खसकन् आपली जीभ चावली! मघापासून तो आपल्या मनातल्या मनात मालतीविषयीच्या आठवणी काढीत असता मालती हेच ते तिचे प्रेमळ नाव तो योजीत आला होता. कंटकी हे नाव योजताना त्याच्या मनातील त्या मालती ह्या नावानेच काय ते मुळापासून संभवलेले, संबद्धलेले प्रेमळ भाव काही केल्या जागून उठत नसते. त्यामुळे तो मनातल्या मनात बोलत होता, तोवर तिला तो मालतीच म्हणत आला होता. पण मनाच्या काठोकाठ भरून राहिलेले ते नाव जर का ओठावर सांडले तर आपले आणि तिचे आजवर छपवून ठेवलेले अज्ञातवासातील सारे गुपित फुटायचे; रफिउद्दिनचे जुने हाडवैर पेटायचे; तिच्या

आईचा, पहिला आपल्या खटल्याचा, सारा संबंध उघड व्हायचा! नसती विघ्ने दत्त म्हणून उभी राहायची! पुन्हा विसर पडू नये म्हणून तो स्वतःशी पुटपुटत अगदी घोकत चालला, “मी कंटक! कंटक! आणि ती मालती नव्हे, कंटकी! कंटकी! माझी सख्खी बहीण कंटकी!”

आणि त्याचा पाय चाळीच्या आवारात पडला न पडला तोच बंदिवानांना चाळीत परतण्याचा रात्रीच्या घंटेचा पहिला ठोका घण्घण् करीत घणघणतच होता. ‘पोचलो बाबा एकदाचा परत अगदी वेळेवर’ असा कंटकने दीर्घ उसासा सोडला आणि मटकन् दारापुढेच पडलेल्या एका खोक्यावर पायावर पाय टाकून तो बसला.

थोड्या वेळाने बंदिवानांची सारी जेवणीबिवणी झाल्यावर कंटकबाबू चाळीच्या बऱ्याच पुढे असलेल्या एक मोकळ्या जागी फिरू लागला. चाळीतील बंदिवानांना रात्री निजायची घंटा होईतो थोड्या अंतरापर्यंत मोकळेपणी फिरण्याबोलण्या-बसण्याची ती वेळ. त्यातही कंटक तेथला मुख्य बंदिबाबू! थोडा वेळ एकटा फिरल्यावर तो आजूबाजूला दूरवर साफ दिसेल अशा एका उंचवट्यावर बसला आणि त्याने हाक मारली,

“उद्दिन! रफिउद्दिन!!” त्यासरशी...

“जी! जी! कंटकबाबू? आता हूं!” असे अगदी आतुरपणे उत्तरत रफिउद्दिन कंटकबाबूचा शब्द निघतो केव्हा आणि आपण तो झेलतो केव्हा, अशा तत्परतेने उभा ठाकला.

आताशी रफिउद्दिनला असाच कंटकबाबूच्या अगदी अर्ध्या वचनात वागत असे!

कारण रफिउद्दिन ज्या दिवशी ती फटक्याची भयंकर शिक्षा झाली आणि तो तापाने फणफणून आजारी पडला, त्याच वेळी बंदिगृहातील रुग्णालयांत डॉक्टरच्या हाताखालच्या शिकाऊ मिश्रकात (Apprentice Compunder) कंटकची नेमणूक झाली होती. रफिउद्दिन त्या रुग्णालयात त्या तापाने बरेच दिवस अंथरूणाला खिळून पडला असता कंटकने त्याला त्या असह्य स्थितीत पुष्कळ साहाय्य दिले. औषधपाणी, बंदिवानांतल्या बंदिवानात अधिक सोय, चोरूनमारून थोडी दुधाची जास्त धार, साखरेची पुडी, तंबाखूची चिमटी देखील अधिकाऱ्यांचा डोळा चुकवून पुरविली होती. रफिउद्दिनला परत कोलूच्याच कामावर धाडण्याचा दिवस शक्य तो लांबवावा म्हणून “सक्त कामाला अजून अयोग्य” असा अभिप्राय डॉक्टरकडून कंटकनेच आर्जव करून देववला होता. रफिउद्दिनला गिन्यांचा उबारा नाहीसा झालेला, फटक्यांची त्याने आता चांगलीच धास्ती खाल्लेली, त्यामुळे तो पुढे पुढे दिलेले सक्त हस्तश्रम मुकाट्याने करीत राहिला. कंटक जसजसा वर चढत गेला, तसतसा रफिउद्दिन त्याचा अधिकाधिक ओशाळा बनत चालला, त्याची पायधरणी करीत चालला. त्याचा आपला काही एक लागाबांधा नाही असे कंटक अर्थातच वरवर, अधिकाऱ्यांना संशय येऊ नये म्हणून दाखवीतच होता. रफिउद्दिननेही तसेच करावे म्हणून ठरले होते. पण आतून रफिउद्दिनला सारे साहाय्य कंटकच करीत होता; म्हणून रफिउद्दिनचे दिवस नीट गेले आणि शेवटी तीन वर्षांच्या आतच त्याला कक्षकारागृहातूनच सोडून बाहेरच्या मोकळ्या चाळीतील बंदिवानांच्या कामावर धाडण्यातच आले. नंतर कंटकाची आणखी बढती होऊन तो लाकूड-तोडीचा

मुख्य बंदिबाबू होताच त्याने आतून युक्तीने रफिउद्दिनचीही भरती त्या कठीण कामाला लागणाऱ्या धट्ट्याकट्ट्या श्रमिकांत करून घेतली. कंटकाच्या आश्रयावाचून आपले हाल कुत्रेदेखील खाते ना, हे रफिउद्दिनला पूर्णपणे माहीत होते. त्यामुळे काळ्या पाण्यावर येताच कंटकाला चांगले वागविले जावे, ह्याचे रफिउद्दिनच्या दुष्ट हृदयाला जे वैषम्य वाटे ते जाऊन आता उलट तो सदासर्वदा मनापासून प्रार्थू लागला, 'दुवा' करू लागला की, 'कंटकबाबूची बढतीच बढती होवो!' त्याची दुष्टाई बदलली म्हणून नव्हे पण दुष्टांचाच, छलकांचाच, एक विशेष बहुधा असाच आढळून येतो की, ज्याच्या हाती त्याचे हिताहित अगतिकपणे गेलेले असते, त्याचे ते तोवर तरी अगदी मनापासून पाय चाटू लागतात!

रफिउद्दिन मूळचाच धाडसी, उलट्या काळजाचा, भयंकर उपद्व्यापी! चांगल्या कामात प्रकटता, उपयोजिला जाता, तर तोच गुण धैर्य, पराक्रम म्हणता येता असा धाडसी, जसा शिकारी कुत्रा! जो पाळील, ज्याच्या हाती त्याचे हिताहित, त्याने छू म्हणताच समोर येईल त्याला फाडून खाणार!

तो आता कंटकबाबूचा पाळीव कुत्रा होता! म्हणूनच कंटकबाबूने 'यू! यू' करताच त्याच्यापुढे उड्या टाकीत येऊन असा लाळ घोटीत उभा राहिला!

कंटकने त्याला "बैस" म्हंटले आणि दूरवर कोणी नाहीसे नीट न्याहाळून त्याशी कंटक हळूच बोलू लागला,

"उद्दिन! तुझ्या माझ्या अगदी काळ्या पाण्यावर आपण निघालो त्याच दिवशी काळ्या पाण्यावरून पळून जाण्याच्या आणाशपथा झाल्या होत्या ना? बस तर! त्या आता खऱ्या करून दाखवशील? चर्चा नको, केव्हा तरी नाही! अगदी आजपासून, शिर हातावर घेऊन त्या वाटेला लागायच आहे. आहेस तू सिद्ध?"

"एका पायावर! आपल्या जिवाला जीव देईन, मागे हटणार नाही. पण बेत मात्र अगदी सायसंगीत कडेकोट रचलेला हवा! फार दुर्घट कर्म ते! फसल्यास...."

"जिवंतपणी फसणेच नाही असाच बेत हवा! तसा रचशील तरच तू खरा रफिउद्दिन काळ्या पाण्यावरून पळालेला पटाईत पापी!"

ती स्तुतीच होती त्याची! छाती फुगवून रफिउद्दिन म्हणाला,

"कंटकबाबू, ती चर्चा मी आपणाशी पुष्कळशी वारंवार केलीच आहे, मीही माझा एक बेत योजला आहे. पण भयंकर...."

"सांग आधी तो काय तो? मग ते 'पण भयंकर' बघूं!"

रफिउद्दिन खाकरला, भोवती कोणी येते की नाही ते पुन्हा न्याहाळून आपला तो नुसता सांगताना ऐकतांनाही अंग थरथरविणारा भयंकर बेत सांगू लागला.

***

पंधरा

आठ-दहा दिवस झाले, वृद्ध अप्पाजी आपल्या त्या 'दाखलेवाल्या' गावातील झोपडीमध्ये अंथरुणाला खिळून पडले होते. सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धात सेनापती तात्या टोपे ह्यांच्या वतीने लढत असता गोळी लागून जायबंदी झालेल्या अप्पाजींच्या त्या पायात तीव्र वेदना होते होत्या. जन्मभर काळ्या पाण्यावरील बंदिवासात कठोर आणि सक्त अशी घ्याव्या लागलेल्या परिश्रमामुळे जर्जरलेली त्यांची देहयष्टी आता अगदी खंगून जाऊन आणि सत्तरी उलटलेल्या त्यांच्या वयोमानाने थकून जाऊन त्यांच्या हृदयातही आताशी मधून मधून असह्य कळा येत. ह्या दुखण्यामुळे अंगणात उघड्यावर सदोदित पडलेली ती त्यांची खाटेवरील बैठकही ह्या आठवड्यात ओस पडलेली असून त्यांनी त्यांचे अंथरूण झोपडीतच नेले होते. ह्या दुखण्यात न जाणो आपला अंतही केव्हा बोलता बोलता होईल, ह्याचा त्यांना भरवसा वाटत नसल्यामुळे एकदा कंटकने येऊन आपल्याला भेटून जावे, असा त्यांनी कंटकला तातडीचा निरोप धाडला होता. आजचा रविवार; कंटकबाबू बहुधा आज हरप्रयत्ने आल्यावाचून राहणार नाही, अशा अटकळीने अप्पाजी त्या आपल्या झोपडीतील अंथरूणावर कण्हत कण्हत पडून असतानाही खिडकीतून वरचेवर बाहेर डोकवीत होते आणि त्या टेकडीवरून उतरताना कंटक केव्हा दिसतो इकडे त्यांचे डोळे लागले होते.

त्यांच्या सन्मुखच्या अंगणात पाचपन्नास ओल्या नारळाच्या फाकी फाकी करून त्या वाळत टाकल्या होत्या. अंदमानात ओले नारळ असे कापकापून त्यांच्या फाकी किंवा गरगरीत वाट्या सुकवून त्या विकण्याचा धंदा दाखलेवाल्या लोकांच्या उपजीविकेचे एक साधन असते. त्याचे तेलही काढतात. तिकडे सहस्त्रावधी नारळींची सरकारी आणि घरगुती लागवड झालेली आहे. अप्पाजींचाही तो एक घरगुती व्यवसाय असे. त्या अंगणभर वाळत टाकलेल्या नारळांच्या फाकावर पक्ष्यांचे थवेच्या थवे येऊन बसत. हुसकले की उडावे, आजूबाजूच्या झाडावर जाऊन किलबिलाट करीत राहावे, पुन्हा संधी सापडली की नारळांच्या फाकावर झडप घालून ताव मारावा, अशा लूटमारीच्या धंद्यात तिकडील पक्ष्यांचे थवे अगदी पटाईत झालेले आहेत.

तिकडील रानातून आणि रंगीबेरंगी अशा अनेक सुंदर पक्ष्यांची रेलचेल झालेली असते. ह्यातील पोपट, मैना, निळ्या आणि पांढऱ्या सतेज रंगाचा, लांब, बळकट चोच असलेला, मासे मारण्यात पटाईत असा राघव पक्षी, मंजुळ दयाळ पक्षी आणि विशेषतः बुलबुल अशा किती तरी जातीच्या पाखरांना प्रथमतःच हिंदुस्थानातून वसाहत वसविताना, सरकारने तिकडे नेले असे म्हणतात. पण त्यांची भरभराट होण्यास ते रान आणि ती भूमी मूळचीच फार अनुकूल असली पाहिजे, हे त्यांची तिकडील आजची संख्या आणि चैन पाहता सहज दिसून येते. कावळे, चिमण्या ह्यांचा तर नुसता सुळसुळाट झालेला असतो तिकडे. अंदमानामधील बुलबुल तर फारच सुरेख! ते पाखरू चिमणीहून थोडेसे मोठे, डोक्यावर एक अवलासा फक्कड तुरा, डोळ्यापाशी टोकांना किंचित लाली, चिमुकली एक शेपटी ऐटीने सदान् कदा, वर उभारलेली, एखाद्या चित्रासारखी रेखीव आकृती, टुणटुण

उड्याच उड्या मारणारी आणि भुर्रदशी उडून जाण्याची चपलता तर काही विचारूच नये! आणि शब्द इतका मंजुळ, चुटुकला पण चुणचुणीत आणि गोड की, जसा कामिनीच्या हातातील कंकणांचा कलरव! अशा या अंदमानी बुलबुलांचे थवेच्या थवे वाळत टाकलेल्या नारळांच्या फाकीवर धाड घालीत असता अंदमानाच्या अंगणाअंगणातून किल-बिलाटलेले आढळतात.

अप्पाजीच्या अंगणभर वाळत टाकलेल्या ओल्या नारळांच्या फाकांवरही त्या बुलबुलाचे थवे मधून मधून धाड घालीत होते आणि त्या पाखरांना हुसकून देऊन त्या खोबऱ्यावर पहारा करण्याचे कामही करीत होते अप्पांचे दोन पाळीव बुलबुलच!-उषा आणि मोहन!!

कावळे, चिमण्या, मैना प्रभृति इतर पाखरांना हुसकण्यात जरी उषा आणि मोहन ही अगदी कसूर करीत नव्हती, तरी बुलबुलांचा थवाचा थवा अंगणात उतरला की त्यांना हुसकण्यापेक्षा त्यांची मौज पाहण्याकडेच त्या हौशी बालकांचा ओढा अधिक दिसून येई. बुलबुलांच्या त्या सदान् कदा उभारलेल्या ऐटदार शेपटीच्या खाली गुलाबी रंगाच्या मऊ मऊ पिसांचे एक चिमुकले सुरेख फूल असते. त्या पाखरांचा थवा त्या खोबऱ्याच्या गोड गोड फाकांना चोचून चोचून मिटक्या मारण्यात गुंग झाला की, त्यांच्या आनंदात उभारलेल्या त्या शेपटीच्या खालची ती रंगीत पिसांची वर्तुळे, गुलाबाची चिमुकली फुलेच फुले अंगणभर विखरून द्यावी तशी शोभू लागते. त्याची मोहनला आणि उषेला मोठी गंमत वाटे.

अप्पा देखील त्या बुलबुलांची गंमत पाहात असता असावधपणे त्यांनी त्यांचा दुसरा पाय पटकन् सरळ केला आणि त्यात एकदम कळ उठली. 'आई ग!' म्हणून ते किंचित ओरडले आणि कण्हू लागले.

"उषे, अग अप्पा कण्हताहेत!" घाबऱ्या घाबऱ्या अवस्थेत मोहन आणि उषा अंगणातून धावत अप्पांच्या खोलीत आली.

'क्या हुआ अप्पाजी?" गोरेमोरे तोंड करून उषेने हिंदीत पुसले. कारण ती मुले मराठीप्रमाणेच, किबहुना मराठीहूनही हिंदीतच अधिक बोलत असते. मराठी वाचकांसाठी म्हणून त्यांचे सारे बोलणे मराठीतच सांगावे लागते. अंदमानामध्ये बसलेल्या मराठी, बंगाली, मद्रासी, पंजाबी सर्व मातापित्यांच्या पोटी उपजलेली मुले हिंदीतच बोलू लागतात. तीच तिकडच्या मुलांची खरी मातृभाषा असते. आपापल्या प्रांतिक भाषा जे काही आईबाप हौशीने म्हणून मुलांना बोलायला शिकवतात, तितक्यांनाच काय ती ती येते.

"कुठे कळ आली माझ्या अप्पांना? इथे? मी चेपू? बघा तर खरे, आता बरे वाटेल!" उषेने आग्रह केला, मोहनने गळ घातली. अप्पांनी अनुमोदन देताच मोहन त्यांचे खांदे चेपू लागला आणि दुखत्या पायाचे पाऊल उषा दाबू लागली. अप्पा खिडकीतून बाहेर टेकडीकडे पाहात राहिले. कंटकची वाट पाहता पाहता त्याला काय सांगायचे त्या विचारात ते गुंगले.

तीन मिनिटे, चार मिनिटे, पाच मिनिटे!- उषा तिच्या कोवळ्या, चिमुकल्या हातांनी, देववेल तितके बळ देऊन पाय चेपीतच होती. पण अप्पांचे लक्ष विचारात गुंग! ते 'पुरे' म्हणायला

विसरले. उषेचे हात दुखत आले. 'पुरे बरे, बाळ,' असे कौतुकाने अप्पांनी म्हणावे आणि मग तिने काम पुरते केल्याच्या समाधानाने चेपणे बंद करावे अशी तिची हौस, पण तिचे हात थकत आले तरी अप्पा पुरे म्हणेनात. आपण होऊन 'थकले' असे म्हणून चेपणे सोडावे तर मोहन हसणार, ते तिच्या जिवावर आले. अधिक चेपणे पण जिवावर आले. थकता थकता ती रूसली, रूसता रूसता चिडली आणि शेवटी अप्पांच्या पाऊलावरचे तो राग काढीत, तिने दोन -चार चापट्या मारल्या आणि रडायला आरंभ केला!

"माझे हात तुटून गेले तरी तुम्ही काही पुरे म्हणून म्हणत नाही!"

त्या चापट्यासरशी आणि रडण्यासरशी अप्पा पण शुद्धीवर आले, हसले आणि कौतुकाने उषेला कुरवाळीत समजावू लागले,

"उगी, उगी! अग मग तू चेपीतच कशाला राहिलीस, बरे हात दुखतो? मला किनई इतके बरे वाटत होते तुझ्या चेपण्याने की पुरे म्हणवेच ना! ह्या चिमुकल्या हातात काही तरी जादूचा गुण आहे आमच्या उषेच्या! वैद्यांच्या औषधांनी आजवर बरी झाली नाही ती कळ अगदी नाहीशी झाली बघ तू चेपताच!"

" ते पाहा, तेऽऽ पाहा अप्पा, कंटकबाबू टेकडीवरून येताहेत!" मोहन मध्येच सांगून उठला.

अप्पा सावरून बसले. ती दोन मुले दुडूदुडू धावत सुटली. कंटकबाबूला सामोरे जाऊन कोण पहिल्याने शिवतो तोच एक त्यांना नवा खेळ झाला.

"कंटकबाबू, ह्या कळा माझ्या हृदयात मधून मधून उठू लागल्यापासून मी समजून चुकलो आहे की, माझा अंत जवळ आला!" एकान्तात घेऊन अप्पाजी कंटकला सांगू लागले, "पण त्यात दुःखाची गोष्ट नाही! आमच्यासारख्यांच मरण म्हणजे सुटका! पण तुमची एकदा भेट घ्यावी असे वाटू लागले. तुम्ही कित्येक महिन्यांपासून तुमची सुरक्षितता धोक्यात घालूनही इथे येता, माझ्या कुटुंबाला हस्तेपरहस्ते जुळेल ते साहाय्य देता, लोभ ठेवता; त्यामुळे आम्हालाही तुमचा लोभ वाटतो. तुमचे आभार आहेत!"

"पण त्यात तुम्ही माझे आभार मानण्यासारखे मी काहीच केले नाही, उलटपक्षी अप्पाजी, मीच तुमच्या उपकाराच अृण कधीही फेडू शकणार नाही. ह्या भयंकर बंदिवासात पडल्यापासून ममतेच्या माणसाची माझ्या हृदयाला नुसती भूक लागलेली होती! तुमच्या कुटुंबात ती ममता मला लाभली. वडिलांसारखे तुम्ही, बहिणीसारखी अनसूयाताई, पोटच्या लेकरांसारखी ही मुले, ह्या तुमच्या सगळ्यांच्या प्रेमळ सहवासात माझे जे काही क्षण गेले, तेवढेच काय ते मला जगाव असे वाटण्याइतके लोभनीय, दुष्टता, दुर्गुण नि दुराचार ह्यांनी बुजबुजाटलेल्या त्या बंदिवासाच्या उतप्त वातावरणातून ह्या तुमच्या कौटुंबिक ममतेच्या शीतले छायेत नि मुलांच्या प्रेमळ हास्याच्या चांदण्यात क्षणभर येताच मला नरकवासांत नंदनवनांच स्वप्न पडते आहेस वाटते!"

"तर मग कंटकबाबू, माझीही आपणाला हीच विनंती आहे की, आपण माझ्या मागे माझ्या ह्या मुलांलेकरांना माझ्या ठायी व्हाव. ती आपलीच असे समजून हेच घर आपले घर करावे.

आपल्यासारख्या सुबुद्ध, सुशिक्षित नि सुशील माणूस ह्या पापाचारी वस्तीत दुर्मिळ! ह्यासाठी मी हे माझे कुटुंब आज आपल्या पदरात टाकीत आहे. आपण पदरी घ्याल तर मी सुखाने मरेन!"

"अप्पाजी, आपल्याविषयी एखाद्या हुतात्म्याविषयी वाटावा तसा उत्कट आदर मला वाटते आहे. त्यातही जे यशस्वी होतात, त्या स्वातंत्र्यवीरांपेक्षा आपल्यासारख्या ज्या स्वातंत्र्यसैनिकांच्या दैवी यश लिहिलेल नसून ध्येयापायी केवळ छळच छळ, यातनाच यातना लिहिलेल्या असतात, त्यांचाच मला अधिक गौरव वाटतो! आपल्याला किंचित तरी सुखाने मरण यावे, असे कोणतेही कृत्य शक्य असते तर मी केलेच असते. पण मी स्वतःच आता सतीच वाण घेऊन उभा! ह्या काळ्या पाण्याच्या भीषण काळपाशांना तोडून, निसटून जाण्याचा जिवावरचा खेळ मी करणार! त्यात मरेन की जगेन कुणी सांगावे!"

'मी सांगतो, कंटक, त्या खेळात मरण हीच निश्चिती! यशाचा संभव अत्यंत तुरळक, अपवाद! आजवर शेकडो मारले गेले त्या साहसात, बुडाले समुद्रात! गेल्या पन्नास वर्षांत पन्नासजणदेखील काळ्या पाण्यावरून पळून जाऊन देशाला पोचल्याचे नि तिथे नांदल्याचे मला आठवत नाही!"

"पण तरीही त्या पन्नासांतच एकावन्नाव्याची भर मी टाकणार! नाही तर मृत्यूची वाट चोखाळणार! हे पाहा अप्पाजी, ह्या काळ्या पाण्यावरील करंट्या, दुराचारी नि असह्य गांजणुकीच्या क्षुद्र जगतात असे जन्मभर जगण्यात तरी काय राम आहे बरे? व्यक्तीचा विकास नाही, भावनेची भरारी नाही, माणुसकीला मान नाही, कुण्या उच्च नि भव्य ध्येयासाठी वा परोपकारापायी देह झिजवायचंही पावक पुण्य पदरी पडले नाही! न स्वार्थ न परार्थ!"

"थांबा, ह्या तुमच्या शेवटच्या आक्षेपाविषयी तरी तुम्हाला एक नवी दृष्टी द्यायची इच्छा आहे. परोपकाराची, कोणत्या तरी राष्ट्रीय नि उदार कर्तव्याला आपल्या आयुष्याच साध्य म्हणून पुढे ठेवायचीच जर ओढ तुमच्या चित्ताला लागली असेल, तर तो तुमच्या माणुसकीचा विकासच आहे. पण ह्या अंदमानात प्रेमाची, सुखाची, भोगाची, फार काय अन्नाची भूकसुद्धा भागणे कितीही दुर्घट असले तरी, परोपकाराची भूक किंवा राष्ट्रीय सेवेची भूक जर कुणाला लागली असेल तर, त्याची मात्र इथे उपासमार अशी कधीही होणार नाही! पतितांना उद्धारण्याच, सुधारण्याच कार्य हे केव्हाही राष्ट्रीय वा धार्मिक सेवेचे एक महत्वाचच उपांग असणार आणि अंदमान हे तर बोलून चालूनच अपराध्याची नि उद्दंडांची, पाप्यांची नि पतितांचीच वसाहत! अर्थात् परोपकारांच निवडक कार्यक्षेत्र!"

"ते जाणूनच आहे; आणि जर कधी मी ह्या जन्मठेपीच्या कचाट्यातूनच सुटून नि काळ्या पाण्यावरून निसटून स्वदेशात परतू शकलो नि तिथे निराळ्या नावाखाली स्वतंत्रपणे राष्ट्रसेवा करू शकलो, तर हिंदी बंदिवानांना ह्या काळ्या पाण्यावर धाडण्याची ही क्रूर प्रथा बंद करवून ही भयंकर वसाहत मुळापासूनच बंद पाडण्याची चळवळ शक्य त्या त्वरेने नि बळाने करायचे सोडणार नाही. हिंदुस्थानातही काही पुढाऱ्यांच लक्ष ह्या प्रश्नाकडे वेधलेल असून ही बंदिवानांची वसाहत

मुळातच बंद करावी नि ह्या मायभूमीतील ह्या साऱ्या अमानुष छळाला मुळातच पायबंद घालावा, असे प्रयत्न चालू आहेत.”

“पण ते प्रयत्न अगदी भलत्याच दिशेने करण्यात येत आहेत. हे पाहा कंटक, कोणत्याही देशात अत्यंत उद्दंड नि समाजाला सर्वतोपरी उपद्रवी असा चोर, दरोडेखोर, हत्यारी ह्यांचा एक वर्ग असणारच. असा समाजशत्रू झालेला जो वर्ग हिंदुस्थानातील असेल, त्याला नीति नि निर्बंध ह्यांच्या मर्यादा उल्लंघिणे अशक्य करून टाकण्यासाठी शक्तीने नि बळाने निग्रह केलाच पाहिजे. फाशी, जन्मठेप नि फटक्यांसारख्या ज्या शारीरिक शिक्षा, तसल्या उग्र दंडावाचून त्या उद्दंडांना केव्हाही नि कसलाही दरारा वाटत नाही. तो दरारा नि कडक शिस्त ह्यांच्याच पेचात ते पकडलेले नि जखडलेले राहिले, तरच निर्बंधशील नि समाजशील नागरिकांचा त्यांच्या उपद्रवापासून बचाव करता येतो. समाजात शांतता नि सुव्यवस्था नांदू शकते. तेव्हा सहस्त्रावधी दंडितांना अशा काळ्या पाण्यासारख्या वसाहतीत डांबून टाकणेच राष्ट्राच्या हिताच असते. नाही तर त्यांना ठेवणार कुठे?”

“देशातल्या देशातच बंदिगृहं नाहीत की काय? त्यात त्या जन्मठेप्यांना जन्मभर डांबून टाका. ह्या काळ्या पाण्यासारख्या पापभूमीत नि अशा अत्यंत छळक परिश्रमांत त्यांना जिवंत पुरून टाकणे ही निर्दयता तर आहेच आहे, पण राष्ट्रीय हितही त्यात विशेष काही साधत असेही नाही! तुम्हांआम्हाला ह्या नरकभूमीत ज्या यातना नि जे जीवन असह्य वाटते, तसे आमच्यासह असणाऱ्या ह्या सर्व जन्मठेप्यांना वाटत नसेल काय? ज्या दयेची अपेक्षा आम्ही करतो, तिचीच ते अत्याचारी असले तरी तेही करतात!”

“कंटकबाबू, नुसत्या उथळ दयेचाच प्रश्न घेतला तर दंडितांना दंडच न करता मोकाट सोडणे, हीच खरी दया ठरेल! तुम्हांला नि मला देशातल्या बंदिगृहात राहणे तरी आवडत कां? जन्मठेप तर राहोच पण एक दिवसही बंदी गृहांत कोंडून घ्यायला कोण सिद्ध होईल? मग काय, उथळ दयेसाठी अशा समाजाला भयंकर उपद्रव देण्यावरचे आपली उपजीविका नि चैन चालविणाऱ्या उग्रप्रवृत्ती अपराध्यांना मोकाट सोडायच? पुन्हा त्या हिंस्त्र, हत्यारी, बलात्कारी नि उपद्रवी अशा मूठभर नरश्वापदांच्या दयेसाठी बंदिगृहंच सताड उघडी कराल तर ज्या लक्षावधी सच्छिल, पापभीरू नि निरासन मनुष्यांना त्यांच्या उपद्रवाच्या जबड्यात तुम्ही ढकलाल, त्यांची दया नको का यायला? चार अत्याचारांवर दया करण्यासाठी निरपराध अशा लक्षावधी समाजावर ते अत्याचार होऊ देणे ही निर्दयता लक्षपटीनीं क्रूर नव्हे काय? तेव्हा दयेच्या दृष्टीने देखील लक्षावधी निरपराध्यांना उपद्रवापासून बचावण्यासाठी अपरिहार्यपणे जर चार उपद्रवी अपराध्यांना निर्दयतेने निग्रहाव लागले तर ती अल्प निर्दयताच एकंदरीने महनीय दया ठरते! अपराधविज्ञानाच वा दंडविज्ञानाचंही मूलभूत तत्व नि समर्थनही हेच!”

“ह्यात शंका नाही. पण देशातील बंदिगृहात....”

“तेच सांगतो, असे पाहा कंटकबाबू, देशातील बंदिगृहात जन्मठेप्यांना डांबून टाकल तरच त्यांना अधिक निर्दयतेने वागवल्यासारखे होते नाही का? त्यांना चार भिंतीच्या आत जन्मभर

कुजत पडाव लागेल. तितक्या स्त्रीपुरुषांची प्रेमाची, मोकळेपणाची, संततीची सारी भूक मारून मानसिक उपासमारीत तळमळ करीत त्यांना मराव लागेल. हा मानसिक अत्याचार नव्हे काय? पण जर त्यांना ह्या काळ्या पाण्यासारख्या एखाद्या स्वतंत्र वसाहतीत त्यांच्या उद्दंड प्रवृत्तीला माणसाळविण्याइतक्या कठोर निर्बंधांत राबवून घेतले आणि त्यातल्या त्यात जी स्वतंत्रता त्यांना देता येईल तितकी दिली, तर त्यांना कौटुंबिक नि वैयक्तिक असे अधिक सुख भोगता येईल आणि देशातील सच्छिल समाजाला त्या दंडितांना भोगू दिलेल्या स्वतंत्रतेपासून लेशमात्र उपद्रव होण्याचा संभवही मुळीच उरत नाही. ह्या काळ्या पाण्यावर आज ते सहस्त्रावधी उद्दंड नि उग्र लोकही पाहा कसे मोकळेपणी हिंडू शकतात, स्वतःच्या रुचीप्रमाणे खाऊपिऊ शकतात, घरंदार, शेतीवाडी करू शकतात, त्यांच्या प्रेमळ, वत्सल, कामुक भावनांचाही जन्मभर कोंडमारा न होता त्यांना विवाहसुख भोगता येत. मागच्या एका अपराधापाई त्यांच्या साऱ्या जन्माचा नि त्यांचा सत्यानाश न होता सुधारले जाण्याची नि संयमशील जीवन स्थापायची संधी पुनः पुनः मिळत राहते."

"हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात एक कारागाराच्या चार भितीत त्यांना डांबून टाकून जिवंतपणी थडग्यात पुराव तसे ठेवणे ही दया का काळ्या पाण्यासारख्या वसाहतीत त्यांना कठोर निर्बंधांच्या कैचीतच पण माणसाळवून माणुसकीने जीवनाचा आनंद काहीतरी उपभोगू देणे ही खरी दया? काळ्या पाण्यावर आल्यानंतर जे सुधारतात नि 'दाखलेवाले' होऊन त्यांच्या मुलांबाळांनी गजबजलेल्या घरात नवा जन्म झाल्यासारखे सुखाने नांदतात, असे शेकडो जन्मठेप बंदिवान आज अंदमानात आहेत. त्यांना 'हिंदुस्थानातील कारागृहातच जर जन्मभर डांबून ठेवले असते तर बरे झाले असते का?" असे विचारा म्हणजे ते त्या भयंकर कल्पनेसरशी कसे भितात नि 'आपण काळ्या पाण्यावर धाडले गेलो तेच बरं' असे कसे म्हणतात ते पाहा!"

"ते अगदी खरे आहे. जन्मठेप किंवा दहा-दहा वर्षांच्या दीर्घ बंदिवासाच्या शिक्षा झालेल्यांना हिंदी कारागृहांतून डांबून टाकण्यापेक्षा काळ्या पाण्यासरख्या वसाहतीतूनच असे हळूहळू स्वतंत्रपणे बसू देणे हे अधिक दयेच आहे. उद्दंडांना नि पतितांना सुधारण्याच्या दृष्टीनेही चांगल आहे आणि राष्ट्रातील सच्छिल नागरिकांना त्यांच्या उपद्रवापासून बचावूनही या दंडितांना स्वतः सुद्धा निर्बंधशील नि संयत जीवन घालावायची एक नवी संधी देण्याच्या दृष्टीने ही बंदिवानांच्या अशा स्वतंत्र वसाहतीच अधिक उपयोगी पडणाऱ्या आहेत."

"पण त्यातही ह्या अंदमानाच्या वसाहतीचा तर राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा आणखी एक विशेष आहे. तो हा की, हे महत्वाच बेट जे रोगट, ओसाड नि मनुष्यप्रतिकूल होऊन पडले होते आणि जे वसविण्यासाठी म्हणूनच काय ते हिंदुस्थानच्या कोणत्याही राजवटीने सहस्त्रावधी मनुष्य नि कोट्यवधी रुपये हेतुतः बळेबळे केव्हाही खर्च केले नसते, ते हे अंदमानाचे महत्वाच बेट, काळ्या पाण्यावर केवळ मरायला म्हणून धाडलेल्या त्या पतितांच्या कठोर परिश्रमांनी आज असे फळाफुलांनी डवरलेल, धान्यांनी समृद्ध, उपयुक्त, उपजाऊ नि मनुष्यवसतीने

गजबजलेल होऊन बसले आहे. वसाहतींना जिकण्यासाठी राष्ट्रांना युद्धे करावी लागतात, पराक्रम करावे लागतात. पण आपल्या राष्ट्राला ही एक नवी वसाहत केवळ आपल्या परिश्रमाने संपादून ह्या पतित नि परित्यक्त बंदिवान वर्गाने फुकटावारी मिळवून दिली आहे, हे एका अर्थी खरे नाही का? जर हे सगळे दंडित हिंदुस्थानातील बंदिगृहातूनच जन्मभर कोंडाल तर त्यांच्या परिश्रमाचा, साहसाचा, बुद्धीचा इतका उपयोग नि इतका लाभ आपल्या राष्ट्राला केव्हाच करून घेता येता ना! तुम्हाला हे सांगणे नकोच की, ह्या दंडित वर्गात शेकडो लोक मूळचे अत्यंत साहसी, चलाख, कर्तृत्ववान नि काटक असेच असतात!"

"ह्यात काय शंका? समाजाला उपद्रव देणाऱ्या दुष्ट कामी त्यांच्या त्या प्रवृत्तीचा दुरुपयोग झाला नसता तर हेच त्यांच धारिष्ट्य, काटकपणा नि शौर्य वीराला शोभल असते. अशाच उद्दंड अपराध्यांची सैन्यात भरती करून सैनिक शिस्तीत त्यांची तीच उद्दंडता राबवून कित्येक सेनापतींनी मोठेमोठे विजय मिळविले आहेत; कित्येक राष्ट्रांनी आपल्या स्वातंत्र्यसंग्रामांतील लढाया मारल्या आहेत! फार काय, पेंढाऱ्यांच्या अमरखान प्रभृति धडधडीत दरोडेखोर असणाऱ्या पुढाऱ्यांनीच टोकसारखी संस्थानंही स्थापलेली आहेतच की नाही?"

"आहेतच! कंटकबाबू, तेव्हा राष्ट्रात असताना उपद्रवी ठरलेल्या ह्या दंडितांच्या त्या साऱ्या गुणांना नि अवगुणांनाही कडक निर्बंधाच्या, सक्तीच्या नि भयाच्या दाबाखाली राबवून घेण्यासाठी अशा एखाद्या काळ्या पाण्यावर धाडणेच इष्ट. जे परिश्रम ते आपण होऊन राष्ट्रासाठी करते ना, ते त्यांच्याकडून कठोर सक्तीने करवून घेता येतात आणि त्यांच्या जीवनाचा राष्ट्रीय धन, मत्ता नि शक्ती वाढविण्याकडे उपयोग करून घेता येतो. ह्यासाठी ही अंदमानची बंदिवान वसाहत राष्ट्रीय दृष्टीने फारच उपयोगी आहे. तीत सुधारणा शक्य त्या त्या करा; पण अदूरदर्शी, घाईने नि अपात्री दयेपायी ती वसाहत केव्हाही बंद पाडता कामा नये. पुन्हा असे पाहा की, अशा काळ्या पाण्याच्या वसाहतीवर न धाडता त्या सहस्त्रावधी दंडितांना हिंदुस्थानांतल्या बंदिगृहांतूनच, स्त्रीपुरुष निरनिराळ्या कोठड्यांच्या पिंजऱ्यांतच, जन्मभर कोंडून टाकू लागलेच तर त्यांच्या तारुण्याची माती करणारा तो निर्दय कोंडमारा त्यांना किती असह्य होईल नि राष्ट्रालाही किती तोट्याचा! कारण त्यामुळे त्या सहस्त्रावधी स्त्रीपुरुषांच्या संततीलाही राष्ट्र मुकेल! राष्ट्राचे संख्याबळ घटेल. त्यापेक्षा काळ्या पाण्यासारख्या स्वतंत्र नि नव्या वसाहतीत त्या दंडित स्त्रीपुरुषांना विवाहित जीवन उपभोगायची संधी दिली तर प्रेमाच्या नि वात्सल्याच्या कोमल भावनांनीही त्यांची स्वतःची माणुसकीही विकसेल नि त्यांची संतती ह्या वसाहतीची भरभराट करून आपल्या राष्ट्राला एक नवा प्रदेश जिकून जोडावा, तसा मिळवून देऊ शकेल! आजच पाहा ना, एक नवा प्रदेशच नव्हे, तर ह्या अंदमानात आपल्या हिंदू संस्कृतीच एक नव जानपदही भरभराटत चालले आहे!"

"पण अप्पाजी, पापी, अपराधी नि दुष्ट असे जे दंडित असतात, त्यांच्या संततीतही ते ते अत्याचारी वा दुराचार दुर्गुण उरतात, असे अनुवंशविज्ञान सांगत म्हणतात, त्याविषयी काय?"

"ते एक भरमसाट तर्कट आहे, दुसरे काय! वैयक्तिक वा कौटुंबिकदृष्ट्या ते किती खरे आहे वा खोटे त्या अर्थी मी बोलत नाही; पण वसाहतींचा जो आपला प्रश्न चालू आहे, त्या विषयी तसा सिद्धांत प्रतिपादणे म्हणजे निव्वळ तर्कट होय. अहो, हा ऑस्ट्रेलिया पाहा; कानडा पाहा; आफ्रिकेतील वसाहती पाहा! इंग्लंडमधील अत्यंत नृशंस नि दुराचारी अशा दंडितांची नि जन्मठेप्यांची तारवेची तारवे भरून ते देश ओसाड असता प्रथम तिकडे नेऊन सोडीत. इंग्लंडच ते असे काळे पाणी पाणीच होते; पण आज त्याच दंडितांचे वंशज एकेक स्वतंत्र राष्ट्र होऊन बसले आहे! मोठे मोठे वीर, कारस्थानी, विधिमंडळ सभासद, निर्बंधपंडित त्यांच्यात निपजले. तेथील आजच्या प्रतिष्ठितांतील कित्येकांचे पडपंजे चोर, दरोडेखोर, बलात्कारी, पापाचारी दंडित होते! हे अंदमानच पाहा. इथेली तरुण संतती, स्त्रिया वा पुरुष, मुले वा मुली, हिंदुस्थानातील कोणत्याही नगरात नेऊन सोडा नि देखणेपणा, सुशीलपणा, बुद्धी, चलाखी, इत्यादी गुणांच्या कसोटीने त्यांना ओळखून काढा! ते हार जाते नाहीत असेच आढळेल!"

"हे माझ्याच कुटुंबाच उदाहरण घ्या. माझी पत्नी ही एक राजपूत स्त्री होती. हिंदुस्थानात लहानपणी तिच लग्न झाले. त्या लग्नाच्या तिच्या नवऱ्यास दोन बायका. त्या सवतीसवतीत भयंकर तेढ माजली असता नवऱ्याने हिलाच मारझोड करावी. हिच्या एका दुष्ट शेजाऱ्याने हिला शिकवले की, 'तुझ्या सवतीला मी देतो ती मंत्रीत पूड अन्नात घालून दे, तिच्या जाचातून सुटशील.' हिने त्या शेजाऱ्याला गळ्यातली सोन्याच्या मण्यांची माळ देऊन ती मंत्रीत पूड घेतली नि सवतीच्या अन्नात घालून ते तिला वाढल. ती पूड विषाची होती! सवत तत्काळ मेली नि ह्या अठराएक वर्षांच्या पोरीला त्या भयंकर अपराधीपायी जन्मठेपेची शिक्षा ठोठावली गेली; पण त्या शिक्षेच्या हबक्यासरशी कोणत्याही अशा दुष्कृत्याची तिच्या मनाने अशी धास्ती खाल्ली की, तिचा स्वभाव अत्यंत सरळ नि निर्बंधशील होऊन गेला. बंदिगृहाच्या मूककठोर दगडी भिंती ह्याचे काही जणांना कोणत्याही नीतीग्रंथापेक्षा अधिक पारिणामकारी संयम शिकवू शकतात! काळ्या पाण्यावरील जन्मठेपीत त्या रजपूत तरुणीच वर्तन इतके निर्बंधशील होते की, मला लग्न करायची अनुज्ञा मिळताच मी तिच्याशीच लग्न केले. दहाएक वर्षं तिने गृहिणीच कर्तव्य निरपवादपणे पाळल, सुखाचा संसार केला. पुढे ती वारली. तिच्यापासून मला झालेला माझा एकुलता एक मुलगाही चांगला निघाला.

"त्याची बायको ही अनसूया, माझी सून. हीही एक बंगाली कायस्थाची मुलगी बालविधवा झाली. तिच्या दिरानेच तिच्याशी अनैतिक संबंध ठेवला आणि शेवटी तिला गर्भ राहताच अत्यंत उग्र औषधे देऊन तिच्याकरवी भ्रूणहत्येचे भयंकर पाप करवले! पण समाजभयाने तिने जे पाप केले, तेच उघडकीला येऊन तिला समाजदंड भोगावा लागला. तिचा दीर बेपत्ता झाल्यामुळे तिला जन्मठेप - काळे पाणी झाले. पण म्हणून तिच्या स्वभावावरचे काही नित्याचा असा राक्षसीपणाचा छाप पडला आहे का? तिने काळ्या पाण्यावरील ठराविक शिक्षा भोगताच जेव्हा माझ्या मुलाशी लग्न केले, तेव्हापासून इतक्या प्रेमळ, सच्छील नि कष्टाळूपणाने आमच्या घरी ती नांदत आली

आहे की, अशी सून देशातसुद्धा शंभरात एखादीच आढळावी. पुढे माझा मुलगा तारवांवर नाखवा झाला. दुर्दैवाने दोन-एक वर्षांपूर्वी अपघात होऊन समुद्रात बुडाला, पण त्याच्यामागे राहिलेल्या ह्या दोघा लेकरांचाच नव्हे, तर माझा पण संभाळ ती करीत आहे, स्वतःच स्वैपाकपाणी, घरकाम चालवीत, दारिद्र्यातही किती समाधानाने वागत आहे, ते तुम्हीच पाहा! ह्या माझ्या लहान नातवंडांना ह्या तिच्या दोघा लेकरांना, ही माझू सून अनसूया जितकी जीव की प्राण करीत आहे, त्यापेक्षा कोणती आई अधिक वत्सल असू शकेल बरे? अगदी सभ्य नि कुलीन समाजातही आपल्या सर्वांना अनुभव असेल की, जगातील सर्व देशामध्ये कुमारिकांच्या अल्लड वयात भ्रूणहत्येचे भयंकर दुष्कृत्य समाजाच्या अत्युग्र भयापायी घडत, पण कित्येकींच ते कृत्य छपल गेले तर त्या इतर कोणत्याही कुमारिकांप्रमाणेच कुलीन नि सुशील समजल्या जातात; प्रेमळ पत्नी नि अत्यंत वत्सल माता होऊ शकतात; जशी कुंतीदेवी!

"त्याच कारण हेच की, दुष्कृत्यांचा छंदच लागलेले नराधम जसे असतात, तसेच दुष्कृत्यांची अत्यंत घृणा वाटत असताही केवळ असह्य छळाच्या भयानेच काय ते, ह्या क्षणिक बेभानपणाच्या शिणकींतच काय ते ज्यांच्या हातून दुष्कृत्य घडून जाते, अशीही अपराधी माणस असतात. दंडित वर्गांपैकी त्या पहिल्या राक्षसी प्रवृत्तीच्या अपराध्यांना कठोर दंडाच्या भयाने वठणीस आणता येत. ह्या दुसऱ्या पापभीरू प्रवृत्तीच्या अपराध्यांना सहानुभूतीच्या अभयदानाने सुधारता येत. तेव्हा दंडित म्हंटला की तो माणसांतून नित्याचा उठला, इतकेच नव्हे तर त्याची संततीही वंशपरंपरा पापप्रवणच असणार, असे समजणे म्हणजे मुळातच एक भरमसाट तर्कट! आणि त्यावर आधारलेला जो समज की, दंडितांच्या वसाहतीची संततीही जन्मतःच माणुसकीला मुकलेली अशी असणारच असणार, तो समज तर जितका भरमसाट तितकाच अत्याचारी आहे!"

"निःसंशय! निःसंशय! आणि अप्पाजी, त्या तर्कटाला जसे अंदमानातील तरुण संततीने लटक पाडल आहे, तसेच आणखी एका, विशेषतः आपणा हिंदूंच्या दृढ तर्कटालाही संततीने लटक पाडल आहे. हिंदु समाजातील सर्व जाती- निदान पुष्कळशा - एका पातळीत आलेल्या असताही त्यांच्यात स्पर्शबंदी, रोटीबंदी, बेटीबंदी, प्रभृति जे खंदक पूर्वीच्या सहस्त्रावधी वर्षांच्या परिस्थितीत हितकर म्हणून गणले गेले, ते तसेच ठेवणे आजही हितकर आहे; जर का ते खंदक बुजवले नि जातीजातीत रोटीबेटीव्यवहार चालू केला तर तो संकर मोठा अनर्थावह झाल्यावाचून राहणार नाही, संस्कृती निकृष्ट नि प्रजा अधम होईल, अशी जी एक धार्मिक छापाची भीती आपल्या देशांत हिंदु समाजाला ग्रासून टाकीत आहे ती किती भ्रान्त आहे, हेही अंदमानातील ह्या नवोदित हिंदु जानपदाने प्रत्यक्षपणे दाखवून दिले! अंदमानात गेली पन्नासएक वर्ष सर्व हिंदु जाती नि सर्व प्रांतिक वर्ग सरमिसळपणे एकत्र वाढत आले; पुष्कळ प्रमाणात अस्पृश्यतेची बेडी तुटली; रोटीबंदीची निदान स्पृश्यवर्गांत तर आठवणसुद्धा बुजली, बंगाली, पंजाबी, मद्रासी, मराठी, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य नि शूद्र कोण कोण हे विचारसुद्धा बुजून निदान स्पृश्य हिंदु तेवढा तरी एकत्र जेवतो नि बहुधा अस्पृश्यही! आणि मिश्रविवाह सरसकट चालू असल्याने बेटीबंदी तुटून जातीच नावच

राहिले नाही! आपलेच कुटुंब पाहा. आपण महाराष्ट्रीय ब्राह्मण, पत्नी रजपूत क्षत्रिय, मुलाच लग्न झाले बंगाली कायस्थ कन्येशी! आता ह्या तुमच्या नातवंडांची जाते हिंदु एवढीच काय ती! बरे, ह्या संमिश्र रक्तबीजांची ती नातवंडे तरी कशी? तर ही मोहन नि उषा! किती चलाख, देखणी, सुशील! पुणे, मुंबई, कलकत्त्यामधील कोणत्याही शाळेतील मुलांत नेऊन सोडली तर पहिल्या पाचातच चमकणार! जातीपाती तोडून संमिश्र विवाह केल्यास संतती निकृष्टच होणार ही भीती खोटी आहे, हे अंदमानाच्या हिंदुजानपदाने सप्रयोग सिद्ध करून दिले आहे.

भाषेच्याही दृष्टीने अंदमानाने आणखी एक अभिनंदनीय असा यशस्वी प्रयोग करून दाखवला आहे! येथील सर्व हिंदु जानपदाची भाषा एक-हिंदी! तरुण पिढीची मातृभाषाच हिंदी!

"पण अप्पाजी, सरकारी धोरणाची एक मात्र मोठी चूक होते आहे. ती ही की, हिंदु मुलामुलींनाही सारे शिक्षण उर्दू लिपितच बळे बळे देण्यात येत, ह्याविषयी मात्र चळवळ करून नागरी हीच अंदमानाची, निदान हिंदु जानपदाची तरी एकमेव लिपी बनवली पाहिजे. सरकारी लिखाण नि शाळाशिक्षण उर्दूतच चालवायचा सरकारी धोरणाचा हट्ट निद्य आहे. अंदमानमध्ये अशा अनेक सुधारणा करणे नि नव्या स्वतंत्र पिढीला आपल्या गुणांचा विकास करायला अनुकूल परिस्थिती लाभू देणे, ही दोन कार्य साधण्यासाठी काही त्यागी पुरुषांनी ह्याचे वसाहतीच्या उत्कर्षांच्या प्रश्नाला वाहून घेणे अवश्य आहे."

"हां कंटकबाबू, इथेच आपल्या ह्या चर्चेचा धागा आपल्या ह्या संभाषणाच्या आरंभीच्या माझ्या विधेयाशी गुंतलेला आहे. जर तुम्हांला हे मान्य आहे की, ह्या अंदमानच्या वसाहतीत निर्माण झालेले जे हे एक नव जानपदं, ते आपल्या हिंदूंच्या सांस्कृतिक साम्राज्यांत एक नवा प्रांत जिकून जोडावा तशा महत्वाच आहे, तर नव्या वसाहतींचा आर्थिक, सामाजिक, राजकीय नि सांस्कृतिक उत्कर्ष करण्याचच कार्य आपल्या जीवनाच ध्येय ठरवणे ही काय राष्ट्रसेवा नाही? एका तुमच्या माझ्यासारख्या बंदिवासग्रस्त आयुष्याची महत्वाकांक्षा व्हायला हे ध्येय का पुरेसे महनीय नाही? मग आपण त्यालाच आपल्या जीवनाच अतिकर्तव्यच का समजत नाही? कंटकबाबू, तुम्ही पाचएक वर्षांनी 'दाखला' मिळवून थोडेसे स्वतंत्र व्हाल, इथेच लग्न करून वसाल. ह्या वसाहतींला शाळा, देवालय, संस्था, संघटना ह्यांची उणीव, ती भरून काढा. आमच्या ह्या किशनशेठचे उदाहरण पाहा. तेही जन्मठेपीवर इकडे आले हातापायात बेड्या पडून! पण 'दाखला' मिळवून, नारळांच्या मोठाल्या बागा करून, चहाची लागवड वाढवून लक्षाधीश झाले आणि माझ्या विचारे त्यांनी सहस्त्रावधी रुपये ह्या अंदमानात जन्मलेल्या स्वतंत्र हिंदु तरुणांना पोटापाण्याला लावण्यात, शाळा बांधून देण्यात, अखिल हिंदूंच एक देवालय स्थापण्यात, शिष्यवृत्त्या देण्यात, धर्मार्थ औषधलयं चालवण्यात दान दिले. पंडित, पुराणिक, चिकित्सक, पुढारी ह्यांची इथे मोठी उणीव ती तुम्ही भरून काढा. ही वसाहत हिंदुस्थानचा, हिंदु साम्राज्याचा एक बलिष्ठ असा सामुद्रिक दुर्ग, जन्मठेपी असे तुम्ही सारे जण मिळून करून सोडा. ह्या कार्यी सहस्त्रावधी जीवने झिजली तर व्यर्थ गेली असे म्हणता येणार नाही.

“खरेच अप्पाजी! सामुद्रिक दुर्गाविषयीच तर मी अंदमानात उतरताच ह्या बेटांच ते सामुद्रिक महत्व माझ्या ध्यानी आले होते बरे का? तटबंद, शस्त्रास्त्र संभारही सुसज्ज, एखाद्या पोलादी कवचासारखा दुर्भेद्य, असा जर ह्या अंदमान बेटाचाच एक प्रचंड जलदुर्ग करून सोडला तर हिंदुस्थानच्या पूर्वसमुद्रात शत्रूच्या नाविक दलाच्या वाटेत तो एक जीवघेता सुरुंगच होऊन बसेल. ही सशस्त्र नि तटबंद बेटे म्हणजे आमच्या पूर्वसमुद्रात वेशीवर चढविलेली एक महाकाली तोफ आहे.

“आणि सध्या आपण युरोपच्या बातम्या ऐकतो, त्यावरून ज्या अर्थी मनुष्याला विमानांची विद्या हस्तगत झालीच असे दिसून येत, आज जरी लढाऊ विमाने तुरळक, तरी पाचपंचवीस वर्षांत मोठमोठी लढाऊ नि वहाऊ विमानांची पथकंच्या पथक आकाशात विहरू लागतील ह्यात ज्या अर्थी शंका वाटत नाही, त्या अर्थी पुढेमागे हे अंदमान म्हणजे हिंदुस्थानच्या पूर्वसमुद्रावर पहारा करणारा एक लढाऊ असा वैमानिक तळ झाल्यावाचून राहणार नाही. मग सांस्कृतिक, सामुद्रिक नि वैमानिक दृष्टीने अशा बऱ्याचशा महत्वाची असलेली ही वसाहत निर्मिण्याच्या, टिकविण्याच्या नि वाढविण्याच्या कार्यी ज्या सहस्त्रावधी दुर्दैवी हिंदी बंदिवानांच्या यातना, कष्ट, रक्त नि जिणे आज पन्नास वर्ष इथे खर्ची पडले, ते राष्ट्रकारणी लागले, पाप्यांच रक्तही पुण्यकार्यी सांडल, असेच म्हंटले पाहिजे. ह्यापुढेही ज्यांना इथेच जगणे अवश्य, त्या जन्मठेप्यांनी आपलंही जीवन ह्याचे कार्यी वेचाव, हाच त्यांचा अपरिहार्य धर्म.”

“इतके मलाही मान्य! अपरिहार्य तर दुसरा मार्ग अशक्य तर, जन्मठेप्यांनी जीवनांचे सार्थक ह्या वसाहतीच्या लोकसेवेतच मानाव. पण माझ्यापुरता तरी दुसरा मार्गच शक्य आहे. मी तरी काळ्या पाण्यावरून पळून जाण्यात यश संपादणार, असे मला निश्चितपणे वाटते. माझी कारणे मी तुम्हाला मागच्या भेटीत कळवलीच होती. त्यांत ही माझी बहीण कंटकी ही तर आणखी पाच वर्ष तर सोडाच, पण पाच महिनेही बंदिवासात जिवंत राहू इच्छित नाही. वेडाच्या म्हणा, पण तिला ह्या आत्मघाती लहरीने पछाडल आहे खरे. बरे, जर मला यश आले, जर मी स्वदेशी ह्या वर्षांच्या आत पोचलो नि जर मला तिकडे आपले आयुष्य येथील ह्या ध्येयाहूनही महनीय अशा ध्येयाला वाहता आले, माझ्या गुणांचा, शक्तीचा नि जीवनाचा इथे कधीही होऊ शकणार नाही इतका विकास नि सद्व्यय होऊ शकला, तर मग तरी माझे हे साहस चुकीच ठरणार नाही ना?”

“नाही! फार काय, तुम्हांला यश येवो, अशी मी प्रभूची प्रार्थनाही करीन. पण तुमचा तो ‘जर’च महा दुर्घट! असो तुम्ही केलेली योजना अपुरी होती. नक्की संधी केव्हा, कशी साधणार, ते काही ठरवले काय?”

“नाही! पण अनसूयाबाईंनी कंटकीला मी म्हंटले त्या ठिकाणी काम लावून दिले आहे, स्त्रीबंदिगृहाबाहेर विवाहेच्छू स्त्रीपुरुष बंदिवानांना परस्पर परिचय करून घेण्यासाठी जे त्यातल्या त्यांत मोकळे स्थळ आहे, त्यांत झाडलोट करण्याच्या कामी तिला लावण्याने कंटकी ठराविक वेळी बंदिगृहाबाहेर पडून तिथे येते-जाते. तिथे माझी तिची दृष्टादृष्टही झाली. बहुधा भेटही होईल. मग

काय ते नक्की करीन म्हणतो. तरीसुद्धा योग्य संधी साधून येईतो मी भलतीच घाई करणार नाही. बरे, आज अनसूयाबाई शेजारच्या गावी गेल्याचे कळले मोहनकडून; तेव्हा त्यांची भेट

"आता काही होणार नाही खरीच! उद्या येईल ती. तुमची जायची वेळही झाली, नाही का? मला तुमच्या ह्या धाडसी कटाविषयी पुष्कळ विचारावस वाटते, पण वेळ नाही. असली चर्चा सुरक्षितही नसते. तुमचे इथे येणेही आता तुम्हांला नि आम्हांला धोक्याचच."

"होय अप्पा!" कंटकने त्यांना संबोधिले. पण जो विचार तो सांगणार होता त्यानेच त्यांचे हृदय भरून आले. तो अडखळला, पुन्हा म्हणाला,

"अप्पा, ह्या दुखण्यापायी आपण नि ह्या साहसापायी मी मृत्युच्या जबड्यात केव्हा सापडू, ह्याचा आता क्षणाचाही भरवसा नाही. पण अप्पा, जर काळ्या पाण्याच्या भुयारातून मी बाहेर पडू शकलो, जीवनाचा निर्मुक्त वायु पुन्हा श्वासोच्छवासू शकलो तर, मी स्वदेशात निर्भयपणे नांदता आले तर स्वदेशी, न आले तर युरोप-अमेरिकेसारख्या कोणच्या तरी विदेशी- जिथे कुठे असेन तिथून ह्या तुमच्या नातवंडाची चिंता माझ्या पोटच्या लेकरांसारखीच वाहीन! अनसूयाताई माझ्या बंदिवासातील माझी बहीण. माझ्या दुर्दैवाच्या, संकटाच्या, दारिद्रयाच्या भाऊबीजेला जिने मला ओवाळल, तिला माझ्या वाट्याला जर कधी सख्ख्या बहिणीहूनही सुदैवाची भाऊबीज आलीच, तर माझ्या प्रेमाची नि साहाय्याची अधिक ओवाळणी घातल्यावाचून मी कधीही राहणार नाही! जातो आता, गेलेच पाहिजे आता मला!"

कंटक उठला, अप्पांना त्याने उभ्या उभ्या नमस्कार केला. तसाच त्यांच्याकडे थोडा वेळ पाहात राहिला, थोडा जाण्यासाठी वळलाही. पण पुन्हा परतून म्हणाला, "अप्पा, जरा ह्या लोडाशी थोडेस सावरून बसाला का? पाय असे थोडे हळूहळू पसरा - नाही पसरलेच पाहिजेत."

रुग्णशय्येवर जर्जर होऊन पडलेल्या त्या वृद्ध वीराला तसे बसवून कंटकाने त्यांचे पाय आपल्या हातानेच तसे व्यवस्थित पांघरूणाबाहेर ठेवले आणि त्यांच्यावर आपला माथा टेकून त्यांना साष्टांग दंडवत घातला.

"अप्पाजी, मघा ह्या अंदमानाची वसाहत हिंदुराष्ट्राला किती महत्वाची आहे ते आपण सांगत होतात, नाही का? ह्या बेटांच सामुद्रिक नि वैमानिक तळ ह्या दृष्टीने बरंच महत्व आहे. इथे एक नवहिंदु जानपद निर्मिल जाते आहे. मोठमोठ्या नारळाच्या बागा, चहाचे मळे, रबराची लागवड, प्रचंड वृक्षांच्या विस्तीर्ण रानातील नाना प्रकारच्या बांधकामी लाकडांच अगणित उत्पन्न ही सारी राष्ट्रीय संपदा महत्वाची आहे. तथापि ह्या प्रकारची संपदा इतर वसाहतींतही आपल्या हिंदुराष्ट्राला लाभू शकेल. पण जी संपदा इतर कोणत्याही वसाहतींतही लाभणे शक्य नाही, अशी जी एक संपदा ह्या अंदमानांतच काय ती साठवली गेली आहे आणि ह्या भूमीतच ठेवलेल्या ज्या अमूल्य ठेवीमुळे इतर कोणत्याही वसाहतींपेक्षा ही अंदमानाची भूमी* आपल्या हिंदुराष्ट्राला अधिक अभिलक्षणीय वाटणारी आहे, एक क्षेत्र भासणारी आहे, ती ह्या भूमीतील आमची राष्ट्रीय संपदा,

ह्या भूमीतील ती आमची अनर्घ्य ठेव म्हणजे तुम्हा सत्तावन सालच्या सहस्त्रावधी राष्ट्रवीरांची ह्या भूमीत विखुरलेली राख हीच होय! हिंदुस्थानाला अंदमान म्हणताच प्रथम होईल ती आठवण!"

"पण - पण असे म्हणणारा तूच पहिला हिंदु मला गेल्या पन्नास वर्षांत आढळलास!" उदास निःश्वास सोडीत अप्पाजी म्हणाले, "कसली आठवण घेऊन बसला आहेस अरे, हिंदुपदपादशाहीच्या संताजी, धनाजी, बाजी, चिमाजी, भाऊ, विश्वास, मल्हार, महादजी प्रभृति शतावधी विजयी सेनापतींच भाग्य जरी नसले, तरी निराशेत नि अपजयातच खरे कसोटीला लागणार जे रणचापल्य, चिकाटी, शौर्य, धैर्य, तितिक्षा, कारस्थान नि राष्ट्रभक्ति ह्या गुणांनी इंग्रजांसारख्या शत्रूलाही नाकी नऊ आणणारा त्या आपल्या हिंदुपदपादशाहीचा शेवटच्यातील शेवटचा रणधुरंधर सेनापती जो तात्या टोपे - ते तिथे स्वराज्यासाठी नि स्वधर्मासाठीच फासावर चढले, त्या स्थली त्यांच्या आठवणीचीसुद्धा एक शिलाही ज्या ह्या कृतघ्न पिढीने अद्याप उभारली नाही, तिला अंदमानात धिक्कृत होऊन राख झालेल्या आम्हा सैनिकांची कसली आठवण होणार! कंटक, ज्या दिवशी सत्तावनची असिलता तुटली, त्याच दिवशी हिंदुस्थानाची आशा सुटली!"

"नाही! अप्पा, नाही! आज हिंदु जाति अचेतन पडली आहे खरी; पण ती मूर्च्छा आहे- मृत्यू नव्हे! इतिहास तरी शपथेवर सांगत आहे की, अशा कित्येक मूर्च्छेतून पुन्हा जागून उठावी अशी उज्जीवक शक्ति ह्या हिंदु जातीत निवसत आहे हे नक्की! दशमुखी रावण गेले, शतमुखी गेले! अप्पा, हेही दिवस जाणारच नाहीत म्हणून कशावरून? नवे नवे विक्रमादित्य अवतरणार नाहीतच म्हणून कशावरून? किबहुना ही तुमची राखच त्यांच्या संभवाच खत आहे- हमी आहे!"

"तथास्तु! जेव्हा आणि जर तसा भाग्याचा दिवस पुन्हा कधीं खरोखरच उगवला, तर ह्या अंदमानात विखुरलेली ही आमची राख...."

"संकलित केली जाऊन तिच्यावर हे कृतज्ञ हिंदुराष्ट्र एक उत्तुंग स्मृतिस्तूप उभारील! आणि ह्या पूर्वसमुद्रातून जाणारी- येणारी हिंदुंची प्रत्येक राष्ट्रीय रणनौका त्या स्मृतिस्तूपाला तोफांची रणवंदना दिल्यावाचून पुढे पाऊल टाकणार नाही!"

कंटकच्या ह्या वाक्यासरशी त्या वृद्ध वीराच्या अंगावर उभे राहिले, त्याची जर्जर देहयष्टी तरारली, त्याच्या नेत्रांसमोर एखादा उत्तुंग स्मृतिस्तूप उभारलेला जणू काय दिसूच लागला आहे की काय असे सुदूर आकाशात क्षणभर खिळलेल्या त्याच्या अनिमेष दृष्टीवरून भासले. क्षणा दो क्षणाने ती अनिमेष दृष्टी आकाशावरून कंटककडे वळवीत तो वृद्ध वीर सकंप स्वराने म्हणाला.

"कंटक, सत्तावनाच्या क्रांतियुद्धानंतर, सहानुभूतीची नि माझ्या राष्ट्राच्या पुनरुत्थानाच्या सुभव्य आशेची आठवण देणारे हे असे शब्द चाळीस वर्षानंतर मी आजच पुन्हा ऐकले. बघ माझ्या हृदयात मी खोल खोल दडपून टाकलेल्या पूर्वीच्या आकांक्षांच्या ऊर्मी एखाद्या वादळासारख्या माझ्या रक्तारक्तातून उसळून येताहेत! कंटक, मला सहन होते नाही ह्या अनुकूल भावनांचाही हा हलकल्लोळ, ही हृदयाची तीव्र गती."

तोच चौकी बंद होण्याची घंटा दुरून घणघणत असलेली ऐकू आली! “घंटा!” वृद्ध वीर चमकला,”जा, कंटक जा, नाही तर पकडला जाशील!” लगबगीने कंटक उठला आणि लपत छपत त्या टेकडीवर भराभर चढत चालला.

आणि दोन-तीन दिवसांच्या आतच, सत्तावन्नाच्या क्रांतियुद्धापाई काळ्या पाण्यावर गेलेल्या त्या सहस्त्रावधी हिंदु सैनिकांतील त्या शेवटच्या वीरवृद्धाचाही अंत झाला!

त्या दिवशी त्याच्या त्या ओस झोपडीत त्याची अशी आठवण देणारी दोन फुले काय ती मागे उरली होती- मोहन आणि उषा!

***

## सोळा

अंदमानामधील रानात घरबांधणीच्या कामी उपयोगी पडणारे लाकूड इतके चांगले, भक्कम आणि सुबक प्रकारचे सापडते की, युरोपच्या पेठांतूनही त्याला भरपूर मागणी येते.

आज कंटक ज्या रानतोडाईच्या विभागात काम करीत असे, त्या तुकडीला अरण्याधिकाऱ्यांची विशेष आज्ञा सुटली होती की, लाकडाची युरोपातून आलेली नवी मागणी पुरविण्यासाठी आजवर तोडीत असलेल्या अरण्याच्या भागापलीकडच्या नव्या रानांत शिरून तोडाईचे काम चालू करायचे. त्या आजवर प्रवेशही न केलेल्या घनदाट रानात प्रथम चालचलाऊ वाट पाडायची, नंतर मोठमोठ्या वृक्षांच्या भोवतालच्या दाट जाळ्या आणि झुडपे काढून छाटून बांधकामी त्या त्या वृक्षांवर डांबरी क्रमांक टाकायचे आणि मग मोठमोठ्या करवती, कुऱ्हाडी आणि इतर हत्यारे घेतलेल्या दोनदोनशे बंदिवानांच्या टोळ्यांकरवी त्या प्रचंड वृक्षांना कापून, तोडून, तासून त्यांच्या सोटांच्या राशीच्या राशी रचण्याचे अतिशय सक्त आणि कठीण श्रम करून घ्यावयाचे.

ह्या निकडीच्या आज्ञेप्रमाणे कंटकच्या हाताखाली तुकडीही सज्ज करण्यात तो गढून गेला होता. अरण्याच्या आजवर न तोडलेल्या आणि अगदी सुदूर अशा विभागात पाय टाकणे हे अंदमानात धाडसाचे काम समजले जाई. इंग्रजांचा प्रवेश जसजसा त्या घनदाट रानाच्या अंतरंगात होते जाई, तसतसे तेथील मूळच्या रानटी आणि कडव्या टोळ्यांचे शत्रुत्व वाढत जाई. कारण, त्यांना त्या त्या मानाने मागे हटावे लागे; त्यांचे ते रानटी राज्य संपुष्टात येई. त्यामुळे इंग्रज असा घनदाट अरण्यात आणखी एक पाऊल पुढे टाकू लागला की, जर त्या भागांत त्या रानटी आणि कडव्या टोळ्यांपैकी एखादी टोळी वसत असली तर ती इंग्रजांच्या, रानतोडाईच्या बंदिवान टोळ्यांवर केव्हा तुटून पडेल आणि त्यांचे मुडदे पाडील, ह्याचा काही नियम नसे. ह्या रानटी निकडवट टोळ्यांत जरी अनेक पोटजाती आणि पोटनावे असते तरी त्यांच्यात जी अत्यंत रानटी आणि अत्यंत कडवी जाते आहे, तिचे नाव जावरा हे असल्याने बंदिवान लोकांच्या बोलण्यात त्या सर्वच रानटी टोळ्यांना ते जावरा हेच नाव लावण्यात येई. अशा नव्या घनदाट रानात प्रथमच घुसताना ते जावरा रान अडवायला नेहमीच येत असे नव्हते, पण केव्हा येतील ह्याचा नेम नसे. त्यामुळे कंटकने आपल्या टोळीतही नेहमीचे अलबते गलबते बंदिवान न घेता धीट, काटक आणि रानतोडाईत कसलेले असेच बंदिवान निवडले. त्यामध्ये रफिउद्दिनही होताच. तो करू लागला म्हणजे असे काबाडकष्ट करी आणि रानतोडाईच्या कामात तर तो पूर्वी काळ्या पाण्यावर होता तेव्हापासून इतका पटाईत झालेला होता की, तो पळून गेलेला बंदिवान असताही रानातील लाकूड तोडण्याचे उत्पन्न वाढविण्याच्या कार्यासाठी, त्याच्या बंदोबस्ताची हमी आपल्यावर घेऊन त्या टोळीवरील मुख्य जमादाराने त्याला बुद्ध्या मागून घेतले होते.

तो मुख्य जमादार रफिउद्दिनला मनुष्य म्हणतच नसे. रफिउद्दिनचे नाव त्याने ठेवले होते ‘रानतोडाईचे यंत्र!’ आजकाल आपला स्वतःचाच डाव साधण्यासाठी रफिउद्दिनही त्याच्यावरील

अधिकाऱ्यांची कृपा संपादण्यात दंग झालेला असे. त्या दिवशीच्या त्या धाडसाच्या कामी पुढे जाण्यास तोही एका पायावर सिद्ध झाला होता.

गेले दोनतीन दिवस कंटकशी रफिउद्दिनची पळून जाण्याच्या कटाविषयी पुष्कळ चर्चा झाली होती, पण नक्की बेत असा काही जुळेना. इतक्यात हे निकडीचे सरकारी काम निघाले. शेवटची संधी हाती येईतो आणि ती हाती यावी म्हणूनच कंटक आणि रफिउद्दिन असे दोघेही सरकारी कामी मरेमरेतो काबाडकष्ट करून अधिकाऱ्यांचा विश्वास आणि वाहवा संपादण्यात काही एक कसर ठेवीत नसते. त्याच धोरणामुळे त्या घनदाट आणि भयंकर अरण्यातील पूर्वी कोणीही न घुसलेल्या भागात घुसण्याचा आणि जावरांच्या यदाकदाचित् होणाऱ्या जीवघेत्या छाप्यासही तोंड देण्याच्या धांडसात सगळ्यांच्या पुढच्या टोळीत ते दोघेही आज शिरलेले होते. त्यांचे सारे लक्ष आज त्या कामातच वेधले होते.

कोंबडा अरवण्याच्या आधीच चाळीची घंटा झाली. अर्ध्या तासाच्या आत शेदोनशे बंदिवान पटांगणात ओळीने ठाकले. प्रत्येकाच्या एकेका पायात साखळबेडी कमरेपासून घोट्यापर्यंत जखडलेली, एक पाय मोकळा. "एक-दोन-तीन" अशी गणती होऊन दोनशेंची टोळी बाजूला काढली गेली.

ती त्यातल्या त्यात निवडक टोळी होती आणि आज लाकडांची मागणी पुरविण्याची निकड असल्यामुळे त्या टोळीवर जे विशेष जमादार नेमण्यात आले होते, तेही होते एकजात 'दंडावाले'! कष्टाळू अंगचोर, सरळ आणि उर्मट अशा दोन्ही प्रकारच्या बंदिवानांकडून जो जमादार काम नुसते पिळून काढू शकतो, सर्वांकडूनच काम अक्षरशः 'चोपून' घेतो, त्या जातीच्या जमादाराला बंदिवान 'दंडावाला' म्हणतात. 'आगे काम पीछे राम!' हे त्या जातीच्या जमादारांचे ब्रीद असते. म्हणजे काम चोपवून घेण्यात दये मायेचा धार्मिक प्रश्नच त्यांच्यापुढे नसतो. सगळा रोख 'ठोक' आर्थिक व्यवहार! उद्दंड आणि निर्ढावलेले दंडितही अशा जमादारांपुढे गोगलगाय होतात. ह्या 'दंडेवाल्या' जातीचे जमादार हे स्वतः कोणीतरी अट्टल दरोडेखोर किंवा उद्दंड वर्गातील पूर्वाश्रमीचे बंदिवान असून आता बंदिवानांवर बढती मिळून दुय्यम अधिकारी झालेले असतात.

एकेका पायात कंबरेपासून घोट्यापर्यंत असलेल्या साखळबेड्यांनी जखडलेले असे ते दोनशे बंदिवान त्या पहाटेस त्या पटांगणात तसे 'गिणति' होऊन उभे राहिले. दंडेवाले जमादार येताच 'बैठो' म्हणून आज्ञा सुटली. साखळबेड्यांची एकदम खळखळ होऊन ते बंदिवान ओळीने मटकन् खाली बसले, त्यांच्या कटोऱ्यात लगोलग कांजी वाढण्यात आली. ठराविक वेळ जाताच 'उठो'ची गर्जना झाली. कांजी कोणी खाल्ली वा कोणाचे खाणे होते आहे ते विचारात न घेता सगळ्यांना एकदम उठणेच भाग! लगोलग ती दोनशे बंदीची टोळी दुहेरी ओळीने रानाच्या वाटेला लागली. हाती वेताच्या छड्या परजणारे वॉर्डर आणि दंडे परजणारे हवालदार, जमादार त्या ओळीच्या दोहो बाजूंनी दहा-दहा बंदिवानांच्या अंतराअंतरावर चालत होते. जंगलातील लाकूडतोडाईचे काम सगळ्या कामात धोक्याचे. एखाद्या वेळी एखादा साहसी बंदिवान जंगलात नाहीसा होऊन पळून जाण्याला

सोडीत नाही. ह्यासाठी एखादा बंदूकवाला शिपाई ह्या टोळ्यांसह नेहमीच दिलेला असे की कोणी पळू लागला तर बेधडक गोळी घालावी. त्यातही आज तर जंगलाच्या अगदीच निबिड आणि हिंस्त्र जावऱ्यांचे भय पदोपदी असलेल्या भागात घुसायचे होते. ह्यासाठी तीन बंदूकवाले सैनिकही त्या साऱ्यामागून त्यांची पाठ राखीत आणि मधून मधून त्या साऱ्यांना 'चलो! जलदी चलो! और जलदी!" असे ओरडून हुसकीत येत होते.

पाऊस मी म्हणत होता! जंगली भागामध्ये वर्षातील दहा महिने तरी अंदमानात पाऊस सारखा पडते असतो. बंदिवान लोकांपाशी कपड्यांची एकेकच जोडी असते- चड्डी आणि कुडता. ती तरी परत चाळीत आल्यावर कोरडी घालायला मिळावी म्हणून ते तीही चाळीतच ठेवून रानतोडाईला जाते. एक लंगोटी तेवढी अंगावर. अंगे दिवसभर भिजून चिंब!

रान येताच त्या टोळीच्या ठराविक तुकड्या पाहून लाकूड- तोडाई-फोडाई-तासाईला आरंभ झाला. अर्धा मैल लांबीच्या अरण्याचा टापूत जिकडे तिकडे आरोळ्यांचा आणि कामाचा नुसता धुमधडाका उडाला. काल करवतीने कापीत आणलेल्या अजस्त्र फांद्यांवर करवतीचे शेवटचे कापणे चालून त्या कडकडकड करीत खाली कोसळत असता "भागो, बचावो!" म्हणून ओरड उठू लागली. मोठमोठे सोट दहापाच जणाच्या डोक्यावर चढवून वखारीकडे साठवायला नेण्यात येऊ लागले. मधूनच कोणी झाडावरून पडते होते. कोणाला विषारी जंतू चावून एकच बोंब उठत होती. वॉर्डर बंदिवानांना आणि जमादार- हवालदार वॉर्डरांना शिव्या हासडीत होते, जरा कोणी पडला, थकला, थांबला की वेताची छडी त्याच्या अंगावर सपासप उडत होती. मध्येच एखादा उर्मट वा अंगचुकारू दंडित बिथरला वा नेहमीच्या सवयीने काम नाकारून शिवराळपणा करू लागला, तर तीन-चार वॉर्डरांना त्याच्यावर घालून दंडुक्यांखाली तो दणादण पिटविला जाते होता. कारण आज नेहमीच्या चालचलाऊ जमादाराचे राज्य नसून, "भय्या, आज तो दंडेवाले जमादारका राज है!"

दुपारी बारा वाजेतो त्या बंदिवानांची हाडे कुऱ्हाडी आणि करवती चालविता चालविता खिळखिळी झाली. बारा वाजले हे देखील घंटा झाली म्हणूनच समजले. कारण सकाळी जसा तसाच मध्यान्हीही ह्या रानाच्या दाट झाडीत आणि सदा आभाळलेल्या आणि गळणाऱ्या वातावरणात स्वच्छ उजेड असा पडलेलाच नसे. घंटा होताच साऱ्या तुकड्या धावत पळत वखारीपुढे आल्या. पुन्हा 'एक-दोन-तीन' दोनशे बंदिवानांची गणती करून घेतली. त्यांची संख्या सकाळच्या वेळी होती तितकीच भरली- पण स्थिती किती पालटली होती! कोणी पायात विषारी काटे खोल रुतल्याने लंगडत होते, कोणी लाकडाखाली सापडल्याने वा वॉर्डर- जमादाराच्या माराने रक्तात भिजेतो घायाळ झाले होते. बहुतेकांनी दलदलीतला चिखल आपल्या साऱ्या अंगभर थापलेला होता- तो पावसाने धुतला की पुन्हां अंगाला लडबडून घ्यावा- कारण की, ह्या रानात सांचलेल्या पाला-पाचोळ्याच्या रेंद्यांत ज्या जळवाच जळवा असते, त्या खालून अंगाला चढत आणि वरून लक्षावधी डास, गांधीलमाश्या प्रभृति विषारी प्राणी अंगाला नुसती आग लावून देत. चिखलाची पुटेची पुटे त्या बंदिवानांनी अंगाला फासली होती, तरीदेखील जळवा जिथे बिलगल्या

तेथून उपटता उपटता पुरे व्हावे आणि कातड्याच्या त्या त्या दंशातून रक्ताच्या बारीक धारा त्यांच्या चिखलाने माखलेल्या अंगावर लांब आणि लाल फेसांसारख्या जेथे तेथे दिसाव्या! खाजव सारखी लागे, पण खाजवायला सवड नाही! आग सारखी होई, पण फुंकर घालायला फुरसत नाही! सतावून, दमून, थकून गेलेले ते चिखलात आणि रक्तात लडबडलेले बंदिवान त्या वेळी स्वतःला किती दयार्ह आणि अन्यायाने गांजलेले समजत होते! त्यांना सक्त कष्टांच्या चरकात असे पिळून काढणाऱ्या दंडपद्धतीला आणि त्या दंडेवाल्या जमादाराला किती दुष्ट समजत होते, किती शाप देत होते! पण ह्या दंडाला ते बळी का पडले, त्यांनी दुसऱ्याला केलेल्या कोणकोणत्या छळाचे प्रायश्चित्त ते भोगीत होते, त्याचा पश्चात्ताप म्हणाल, तर शेकडा एखाद्याच्या मनाला झाला असेल! इतकेच काय, पण त्यांच्यापैकी बहुतेक जण ती दंडेवाली जमादारी जर त्यांना मिळती, तर ती नाकारणार नव्हते- कित्येक तर सवाई दंडेवालेही झाले असते!

बाराची घंटा होताच जेवण यायचे. भुकेने व्याकुळलेले ते सारे दंडित झाडा-झुडूपात आड त्यातल्या त्यात बसता येईल तसे बसले. जाड्याभरड्या चपात्यांची रास येताच ती मी एकटाच खाऊन टाकू की काय, असे ज्याला त्याला होऊन गेले. दोन-दोन चपात्या आणि पालेभाजीचा एकेक लगदा त्यांच्या हातांवर टाकण्यात आला. रानतोडाईच्या टोळ्यांना अशा धांदलीच्या दिवशी थाळी देखील घेण्याची सोय नसते. एका हाताची थाळी करून त्यावर चपात्या आणि भाजीचा लगदा घ्यावा, दुसऱ्या हाताने खावे! वरून पाऊस! खाताखाता चपात्यांची मऊ कणीक व्हावी, भाजी वाहू लागावी!

जमादार, सैनिक आणि कंटकबाबू हे तेवढे तेथे उभारलेल्या तात्पुरत्या झोपड्यांतून जेवले. हांजी हांजी करणारी बंदिवानातील वशिल्याची काही तट्टेही झोपड्यात लाळ घोटीत घुसू शकत; एखादी अधिक चपातीही त्यांच्यापुढे फेकली जाई. रफिउद्दिनही ह्याचे वशिल्याच्या तट्टांत जमा असे, हे सांगणे नकोच. कारण, जमादार, हवालदार, सैनिकसुद्धा टोळीवरील मुख्य ‘बाबू’ जो असेल, त्याला वचकून असतात. कंटक तर नुसता बाबूच नव्हे, तर आपल्या चोख कामाने आणि निःस्पृह बाण्याने, इंग्रजी अधिकाऱ्यांच्याही आवडीतला. त्याला ते विशेषच दबत. ह्यांच्या अनेक चुकांवर आणि लटपटींवर पांघरूण घालील तर तोच घालणार आणि त्या कंटकबाबूच्या मागे मागे लांगूलचालन करण्यात रफिउद्दिन पटाईत. धाडसी आणि काबाडकष्टाच्या कामामुळे जमादारालाही हवासा झालेला. त्यामुळे कंटकबाबूच्या पायांत घुटमळत तोही झोपडीत जाऊ शकला. एक पायभर जखडलेली साखळबेडी ऐटीने मधून मधून खुळखुळवीत, बैल घुंगरांच्या साथीत वैरण खातो तसे रंगत, त्याने चार-पाच चपात्यांचा चारा कंटकबाबू होता, त्याच झोपडीच्या कोपऱ्यांत मांडा ठोकून गट्ट केला.

त्या दिवशी रफिउद्दिनने काबाडकष्ट पण तसेच केले होते. इतर बंदिवान तोडण्यात येत असलेले जंगल तोडीत असता, जे इंग्रजांच्या लोकांनी कधीही प्रवेशिले नव्हते, त्या पुढच्या जंगलात घुसून वाट पाडण्यासाठी जी पुरस्सरांची (Pioneers) टोळी कंटकच्या हाताखाली गेली,

तीतच रफिउद्दिनही होता. कुऱ्हाडी-कोयत्या- विळ्यांनी आडव्या तिडव्या फांद्या, झुडुपे, कांटेरी जाळ्या तोडून, अजस्त्र दगडधोंडे उचलून वा खड्ड्यात भर घालून, भक्कम अर्ध्या मैलाची चालचलाऊ वाट त्यांनी त्या दोन-तीन तासात मोकळी केली होती. कवळींत मावणार नाही असा एक जाडा अजगर स्वतः रफिउद्दिनने कुऱ्हाडीने डोके तोडून पाडला होता. त्या अजस्त्र प्राण्याचे ते भयप्रद धूड खांद्यावर टाकून आणि अंगाभोवती गुंडाळून तो जमादारापुढे नाचत होता. तीन दिवसांचे काम तीन तासांत करवून घेतल्यामुळे जमादारांसुद्धा सारे अधिकारी कंटकवरही प्रसन्न झाले. कंटक जरी बाबू होता तरी होता मूळचा बंदीच. त्यामुळे त्या घोर आणि घनदाट रानात सकाळीच जेव्हा तो पाच-सहा निवडक बंदी घेऊन गेला, तेव्हा त्याच्यासह आणि विशेषतः त्याचे सांगाती रफिउद्दिनसारखा पूर्वी पळालेला बंदी असल्यामुळे त्या सर्वांगावर पहारा देण्यासाठी एक बंदूकवाला सैनिकही दिलेलाच होता, त्यातही त्या रानाच्या एका नव्या तुकड्यात प्रथमच सरकारी रिघाव होणारा असल्याने जावऱ्यांच्या उपद्रवाचीही भीति होतीच. परंतु आता अर्धा मैल आत रिघाव होऊन त्या रानात चलाऊ वाटही निर्विरोध पाडली गेल्यामुळे जावऱ्यांच्या उपद्रवाची ती भीती खोटी ठरली होती आणि सगळ्यांचा जीव त्या प्रमाणांत खाली पडला होता.

जेवणाची सुटी संपल्यावर आता पूर्वीच्या बेताप्रमाणे कंटकचे काम त्या दिवसापुरते म्हणजे इतकेच उरले होते की, वाट पाडलेल्या अर्ध्या मैलाच्या त्या टापूत हाताशी त्या वाटेच्या बाजूचे जे जे उपयुक्त वृक्ष येतील त्यावर साधतील तसे डांबराने क्रमांक घालायचे आणि संध्याकाळी पाचाच्या आत परतायचे. त्यासाठी रफिउद्दिनसह चारपाच बंदी सांगाती घेऊन कंटकबाबू परत त्या जंगलात त्या पडलेल्या वाटेने घुसला. त्याच्या आगेमागे पहारा देण्यासाठी आणि रक्षणासाठी तो बंदूकवाला सशस्त्र सैनिकही गेला. बाकीचे शे-दीडशे बंदिवान लाकडे तोडण्या-फोडण्याचे काम सकाळच्याच स्थळी करू लागले. उरलेले बंदुकवाले सैनिक त्यांच्यातच वाटलेले होते.

पाऊस सारखा गळतेच होता. त्यातही कंटकची टोळी ज्या निबिड जंगलात गेली होती, तशा जंगलात तर वरचा आकाशातला पाऊस जरी तासभर थांबला तरी जंगलातला थांबत नाही. कारण उंच आणि विस्तीर्ण महावृक्ष, त्याखाली वृक्ष, त्याखाली झाडे, त्या सर्वांना लपेटून गुंतून एकच जंजाळ झालेल्या वेलीलता, जाळ्याझुडपे, बांडगुळे ह्यांची एकवट छपरावर छपरे. आकाशातील पाऊस गळणे थांबले तरी तास तास त्या जंजाळात गुंतलेला पाऊस अशा जंगलातून तसाच पडते राहतो, सरसरत, ठिपकत, निथळत राहतो. तीच गोष्ट प्रकाशाची. ऊन असे तर त्या निबिड झाडीत तळाला सहसा पोचतच नाही म्हणा; पण चारच्या वेळेलाच त्यात इतका अंधार झाला की, माणसाला जवळचे माणूस दिसे तेवढेच!

असा अंधेर आणि पाऊस पाहून पाच वाजेतो न थांबता चारलाच परतावे असे कंटक सैनिक पहारेवाल्याला म्हणाला. तो तर एका पायावर सिद्धच होता. बंदूक सारखी खांद्यावर ठेवण्याच्या कष्टाने, जंगलतोडाईच्या कष्टाने ते बंदिवान नसतील इतका तो त्रासून गेला होता. ह्यावेळी सोबतच्या दोघातिघा बंदिवानांना खुणा केलेल्या झाडांवर क्रमांक घालण्याचे काम सोपवून कंटक

आणि सैनिक त्या नव्या वाटेच्या पलीकडच्या टोकापर्यंत जंगलात घुसले होते. रफिउद्दिन त्यांच्याही पुढे काही अंतरावर असलेल्या खाडीच्या एका फाट्याशी पोचला होता. समुद्र पुष्कळ दूर होता, त्याची खाडीही झाडाच्या आड लपलेली होती. परंतु तिचा एक अरूंद पण खोल फाटा लांबवर जंगलात घुसून तेथे संपला होता. त्या फाट्यामुळे तेथे थोडे मोकळे स्थळ सापडले होते. कंटक त्या सैनिकांशी परतण्याचा बेत करीत असताच पुढे त्या फाट्याशी पोचलेल्या रफिउद्दिनने कंटकबाबूला दबती हाक मारली. कंटक झपाझप पुढे येऊ लागला, तोच त्याचा हात धरून त्याच्यासह एका भिताडासाख्या झाडाच्या बुंध्याआड उभे राहून रफिउद्दिन संशयी स्वरात म्हणाला,

‘बाबूजी, वो देखो! ती गिधाडं, घारी नि कावळे ह्या खाडीच्या फाट्याच्या काठाने मरून पडले आहेत ते! हे चिन्ह ठीक नाही!”

“का रे बाबा? मघा त्या जिवंत नि अजस्त्र अजगराला भ्याला नाहीसा नि ह्या मेलेल्या पाखरांना पाहून पांढरा फिकट पडतोस!” तेथे तितक्यात तो बंदूकवाला सैनिकही आला होता, त्याच्याकडे पाहून कंटक हसला.

“देखो, मरे चिडियांको रफिउद्दिन डरते है! भुतंखेत ज्या पक्ष्यांची रूपं घेऊन भटकतात असे जंगली लोक समजतात, तेच हे पक्षी आहेत असे ह्याला वाटत असावंस दिसते!

‘नही बाबूजी नही! यह चेष्टा की बात नही! देखो, ह्या रानटी लोकांत मी, पूर्वी पळून गेलो त्याच वेळी फार वावरलेलो आहे. ह्यांना जर कुणावर गुप्त छापा घालून मारायच असले तर हे लोक त्या आजूबाजूचे घारी, गिधाडं, कावळे मारून टाकतात. कारण त्यांची अशी समज असते की, पक्षी हे त्यांच्या हालचालीची बातमी उडत उडत जाऊन शत्रूंना कळवतात! ज्या अर्थी हे नेहमीचे खाद्य नसणारे पक्षी ईथे आजच मारल्यासारखे पडलेले दिसताहेत त्या अर्थी-”

“धाड् धाड् धाड्!” असे बंदूकांचे बार त्याच क्षणी बंदिवानांची मुख्य टोळी काम करीत होती त्या बाजूने ऐकू आले. मागोमाग आरडाओरड आणि गलका. तोच उंचवट्यावरील त्या झोपड्यापाशी असलेल्या घंटेचा भयसूचक ‘घणघण घणघण’ सारखा चालू झाला.

‘जावरे आले! आपल्या टोळीवर ते तुटून पडले असले पाहिजेत नि सैनिकांनी तिकडे त्यांच्यावर बंदुका झाडल्या असल्या पाहिजेत!” रफिउद्दिन घोगऱ्या आवाजात पण धिटाईने तर्कला.

त्यासरशी सगळ्यात कोणी घाबरला असेल तर तो त्यांच्या रक्षणाला आलेला पहारेकरी तो बंदूकवाला सैनिक!

“अरे बापरे! मग आता आम्ही काय करावे? सांग बाबा एकदाच! बोल, बंदूक झाडू का ही मी पण?”

“नको, नको!” कंटकने त्याला रोखले, ‘नुसत्या झाडापाल्यात बार काय कामाचा? उलट, आपण इथे आहोत हे माहीत नसल्यास ते कळून जावरे ह्या झाडीत घुसून आम्हांलाही गाठतील! मला वाटते, आपण आता धीर न सोडता असेच या वाटेने परतून मुख्य टोळीला जाऊन मिळाव.’

सैनिकाला तेच हवे होते. त्याने मनात म्हंटले,

“कुणी जावरे चालून आलेच तर ह्या दलदलीच्या बाजूनेच येणार. परतताना आपली पाठ इकडेच असणार. तेव्हा ह्या बंदीच्या पुढे आपण चलाव म्हणजे त्यातल्या त्यात आपल्या जिवाला धोका थोडा. जावऱ्यांचे दलदलीकडून येणारे बाण प्रथम ह्यांच्याच कुणाच्या तरी पाठीत रुतून पडतील. आपण पुढच्या पुढे निसटून ठोकावा सुंबाल्या! मनात अशी धास्ती खाऊन पण वरवर उलटा धैर्याचा आव आणून सैनिक म्हणाला,

“हं चला सगळे! भीता रे काय असे? हा मी तुमच्या पुढे चार पावले चाललो बघा! जावरे ते काय! त्यांनी ही पाखर जशी पटापटा पाडली, तशी ही माझी बंदूक त्यांना टपटप खाली पाडील. चलाव!”

सैनिक पुढे वाट चालू लागलासुद्धा; कंटक आणि रफिउद्दिन त्याच्यामागून. पण त्या सैनिकाने घेतलेल्या त्या ‘पुढाकारां’तील बिंग रफिउद्दिनच्या आणि कंटकाच्याही ध्यानात असल्यामुळे कंटकने त्या सैनिकाच्या त्या उसन्या अवसानाची वाटणारी गंमत नुसते डोळे मिचकावून रफिउद्दिनला व्यक्तविली; पण रफिउद्दिनला त्या धोक्याच्या आणि धांदलीच्या वेळीही चेष्टेवाचून चैन पडले नाही. तो त्या ओबडधोबड आणि काटेरी वाटेने झपझप चालता चालता कुचेष्टेने बोलला,

“हवालदारजी, देखो ये जावरा लोक रहेते है तो बडेही शूर! त्यांची रीत अशी की, ज्यांच्यावर छापा घालायचा त्यांच्या पाठीमागून कधी बाण सोडणार नाहीत! वाटेत तोंडाशी असेल त्याला समोरूनच आडवे येतील - तोंड देऊन बाण मारतील!”

रफिउद्दिनची ही थाप ऐकताच सैनिकांचे तोंड एकदम खरकले. आपण पुढे होऊनच जीव धोक्यात घातला असे मनात येताच तो इतका चमकला की, जावऱ्यांचा बाण समोरून सू सू करीत येतोच आहे की काय, असे त्याला होऊन गेले. आता भीती छपवून सहजीच मागे राहण्याचे काय निमित्त योजावे? खाकरता खातरता निमित्त सापडले.

एकदम थांबून, बंदूक भुईवर टेकून हवालदारांनी काडतुसांची पेटी काढली. ते थांबताच रफिउद्दिन आणि कंटकही थोडा थबकला. त्यांना दटावून हवालदारजी आज्ञापिते झाले,

“क्या गवार हो! चालू लागा की झपाझप! बंदुकीत काडतुस भरून पट्टा बांधून हा आलोच मी! भिता काय एकटे चालायला असे?”

ती वेळ खरोखरीच एक पळभरही रेंगाळण्याची नव्हती, हे कंटक जाणून होता. चेष्टेवारी जिवावर बेतायची, तेव्हां नुसते उपहासण्याने जितकी गंमत उपभोगता येईल तितकीच उपभोगून कंटक पुढे निघाला. त्याच्याच सांगाती रफिउद्दिन. थोड्या अंतरावर ते पुढे झालेसे पाहून काडतुसे भरलेली आपली बंदूक पुन्हा खांद्यावर टाकीत हवालदारजी आता त्यांच्या मागे चालू लागले. जावरे वाटेत आलेच तर पुढून येणार, त्यांच्या तीरांपुढे ह्या बंदिवानांच्या छातीची ढाल, तीमागे आपण; त्यातल्या त्यात जीव बचवण्याचा असा शक्य तो व्यूह रचला गेलेला पाहून हवालदारांनाही बरेच हायसे वाटले.

दोन- अडीचशे यार्ड त्या दुर्गम पाऊलवाटेने त्या निबिड अंधेऱ्या आणि पाऊस टपकत्या अरण्यातून ते तिघे त्या मुख्य टोळीकडे जाण्यासाठी परतले असतील नसतील, तोच...

दलदलीच्या काठच्या निबिड झाडीमधल्या एका उंच झाडावरून ती सारी हालचाल मघापासून टेहळीत असणारे दोन राकट जावरे खाली उतरले. झाडीतून सापासारखे सळसळत त्यांच्या पाठीमागून आले आणि तीर अचूक मारण्याइतकी उसंत आणि सोय सापडताच त्यांनी आपल्या धनुकल्या ताणून दहापाच बाण, त्या मागे असणाऱ्या बंदूकवाल्या हवालदाराच्या पाठीवरचे झणझणत सोडले!

"बापरे! मेलो! जावरे! मेलो!" असे अकस्मात् किचाळून तो सैनिक बंदुकीसुद्धा तोंडावरचा तोंडावर पडला. पाठीमागे वळून बघायलासुद्धा त्याला अवकाश मिळाला नाही. अचानक त्याच्या पाठीत दोन विषारी बाण जे घुसले ते कण्याच्या बाजूने थेट पोटात जाऊन रुतले. त्याच्या पाठीवर रुतून राहिलेल्या त्या बाणांच्या टोकांतील पिसे उडत्या पाखरांसारखी थरथर करीत होती, इतका आवेग आणि त्वेष त्यात भरला होता.

ती किचाळी ऐकताच कंटक खाडदिशी मागे वळून सैनिकाकडे धावला; पण रफिउद्दिनने त्याचा हात लगोलग पकडून त्याला झाडीत खेचले.

"बाबूजी, छुप जावे, छुप जावे पहिले!"

कंटक आणि रफिउद्दिन, जिवावर बेतातांच मनुष्य तात्काळ केवळ शारीरिक प्रतिक्रियेमुळे जसे काही करून जातो, तसे त्या झाडीत दडले. न काटे, न जळवा, न साप, न पालापाचोळ्याचा भिजट चिखल. त्यांच्या ध्यानातसुद्धा हे न्यूनतर उपद्रव आले नाहीत. उभे आत घुसणेही दुरापास्त. ते सापासारखे त्या भिजट चिखलातून जवळजवळ सरपटत जाववेल तितके झाडीच्या आत शिरत चालले. त्यांच्या हातातल्या कुऱ्हाडी मात्र त्यांनी सोडल्या नाहीत. पाचएक मिनिटे त्यांच्या मनात आणि हृदयात चिंता आणि धडधड ह्यावाचून दुसरी कशाची जाणीवच नव्हती. मग कंटकला एकदम सुचले की, सैनिक जो पडला त्याच्या हाती भरलेली बंदूक आणि कटीला काडतुसे तशीच आहेत. ती जावऱ्यांच्या हाती पडतील तर मोठाच अनर्थ कोसळेल.

"जावऱ्यांना बंदुकीची तितकीशी हौस नसते," रफिउद्दिन म्हणाला, "आणि आता झाडीबाहेर पडण्यांत जिवावरचे बेतायचा संभव!"

"पण बंदूक तशीच सोडून देण्यात तर तो संभव अधिकच भयंकर! न जाणो, ते नेतीलही ती! त्यातल्या त्यात बंदूक आपल्या हाती असण्यातच अधिक बळकटी, सुरक्षितता!" अशा आग्रहाने कंटक छपत, दबत पुन्हा झाडीच्या तोंडाशी आला, जिकडे तिकडे सामसूम पाहून झपकन् पुढे झाला. बंदूक, काडतूसे, शिकारी चाकू, खंजीर काढून घेतले. सैनिकाच्या तोंडातून रक्ताच्या उलट्या चालल्या होत्या. त्या रक्तात त्यांचे प्रेत लडबडून गेले होते.

"मेला बिचारा!" असे निश्वसून कंटक त्या हत्यारांसह पुन्हा झाडीत घुसला. रफिउद्दिन म्हणाला,

"एक-दोन वायबार काढा बंदुकीचे. जावरे बंदुकीच्या बारांना फार वचकतात. जवळपास असतील तर पुढे घुसणार नाहीत. नाही तर त्या सैनिकांच्या पाठीत शिरलेला त्यांचा बाण काढून घ्यायला ते यायचा संभव आहे. त्यांच्यापाशी बाण मोजके असतात. पारध करताना सोडलेले बाणच ते पुन्हा शक्यतो वेचून परत नेतात. नीट करून पुन्हा कामी लावतात.

त्याप्रमाणे कंटकने वाटेच्या कडेपाशी येऊन एकदोन बार केले आणि मग त्या झाडीच ते दबा धरून राहिले.

टोळीतील सैनिक आणि जमादार काही लोकांनिशी त्यांना सोडविण्यास किंवा त्यांना शोधण्यास हजार अंशांनी त्या वाटेने येणारच, असे त्यांना एकदा वाटे; पण संकटघंटा (Alarm Bell) जी वाजत होती आणि जो सुदूर टेकड्यातील गलका मधून मधून ऐकू आला, तो आता अगदी बंद पडला होता. त्यावरून त्यांना एकदा वाटे, की जावऱ्यांच्या माराला भिऊन ते सगळे बंदिवान घेऊन जमादार सरकारी चाळीकडे परतलाही असेल!

कंटकने विचारले,

"जावऱ्यांचे कितीसे लोक छापा घालायला आले असतील?"

रफिउद्दिन उत्तरला,

"कितीशे? ते शेकड्याने कधीच येत नाहीत! आहेतच मुळी मूठभर बिचारे! त्यांचे येणे म्हणजे पाचपन्नास धनुर्धर! झाडीतून दबून, पाचपन्नास विषारी बाण अकस्मात् हाणून, दहा-वीस मुडदे पाहून पळून जाणे, ही त्यांची लढाई! झाडी घनदाट, अंधारी, बेवाट! बंदूकवाल्यांच सैन्यदेखील कुचकामाच ठरते त्यांचा पाठलाग करायला. त्या सोयीमुळेच ते अद्याप ह्या रानचे राजे आहेत. इंग्रजांना त्यांच्या पिच्छाच पुरवायचा तर पुरवता येईल; पण इतकी प्राणहानी, त्रास नि व्यय करण्यासारखे ह्या यःकिंचित एका अरण्यमय वसाहतीत युद्ध पुकारून मिळणार आहे काय इंग्रजाला? म्हणून आडवे येतील तेव्हा नि तितकेच कापीत इंग्रज चालढकलीवारी नेतो. हं, आता ही विमाने का कायस जे निघत आहे म्हणतात ना, तसे साधन निघाले तर मात्र आकाशातून टेहळणी करून जावऱ्यांची ठाणी अचूकपणे शोधून काढायला नि शे-सवाशे भयंकर स्फोटगोळे वरून फेकून जावऱ्यांचा सत्यानाश करायला इंग्रजाला एक आठवडाही लागणार नाही! पण ती पुढची गोष्ट. आज तरी जावरे आलेच असतील छापा घालायला, तर मागे इंग्रजांशी माझ्यासमक्ष झालेल्या अशाच एका झटापटीप्रमाणे ते पन्नासच्या आत बाहेर असतील नसतील. टोळीवर बाणांचा मारा करून ते निसटून गेले असतील दुसऱ्या रानात!"

"तसाच संभव असेल, तर मग इथे कुठे उंदरांसारखे बिळात बसलो आहोत आपण? चल, बाहेर पडू. अजून पाऊलवाट दिसते आहे, जवळ बंदूक आहे, टोळीकडे चल. टोळीतील आपले लोक इकडेच येत असतील तर गाठ जवळच पडेल. ते पण काय संकटात आहेत, आहेत की गेले, गेले असले तरी जवळपासच गाठता येईल. अजून सहा वाजले नाहीत. घंटीच्या वेळी चाळीत.."

“पुन्हा बंदिवान म्हणून आपण होऊन त्या चाळीत जाऊन गणती द्यायची? छट्! कंटकबाबू, आता माझ्या मनात एक भयंकर विचार येत आहे! जी पळून जायची संधी आपली आपल्याला सापडते नव्हती, तीच स्वतः दैवाने आपल्या हातीही आणून दिली नसेल कशावरून? आज सकाळी चाळीतून निघतानाच पाल अनुकूल चुकचुकली! बाबूजी, पालीच्या चुकचुकण्यावरून शुभाशुभ हटकून कळत बरे!”

“मग ते तेव्हाच का नाही कळले तुला? पुढे शुभ झाले म्हणजे मागचे शकुन आठवतात! शंभरदा तरी त्या शंभर चुकलेल्या चुकचुकी माणस विसरून जातात. ते काही असो, आपल्याकडे टोळीतील जमादाराने काही माणस धाडली आहेत की नाही, हे पाहण्यासाठी तरी टेहळणी केलीच पाहिजे की नाही? चल तर, बाहेर पड.”

ते दोघे हत्यारबंद होऊन हळूच झाडीबाहेर पडले. टेहळीत वाटेच्या आरंभापर्यंत आले. पाहतात तो सारा शुकशुकाट!

कारण, चारपाच वाजण्याचा मध्यंतरी जेव्हां त्या टोळीतील बंदिवानांवर दाट झाडीतून दहापंधरा जावऱ्यांनी निरनिराळ्या तीनचार ठिकाणांवरून विषारी बाणाचा अकस्मात् मारा केला, तेव्हा त्या बंदिवानांपैकी दहा-बारा बंदिवान घायाळ होऊन पडलेले पाहताच त्या टोळीत एकच धावपळ झालेली होती. बंदूकवाले दोघे जण जे होते त्यांनी बंदुका झाडल्या, पण त्या गोळ्या आणि छरे त्या दाट झाडीच्या पालापाचोळ्यात कोठे तरी गडप झाले! अशा पन्नास बंदूकांचा मारा केला, तरी अरण्यात दबा धरून शरसंधान करणाऱ्यांचा केसही वाकडा होणार नव्हता. संध्याकाळची वेळ ती, अंधेरात आणि पावसात त्या पुढे रानी घुसून चाल करण्याची त्या बाजारबुगण्यांत कोणाची माय व्याली होती? आणि त्या बंदिवान लोकांचे अडले तरी काय होते नसता जीव धोक्यात घालायचे? मरो तो इंग्रज आणि ते जावरे! जमादारासुद्धा जो तो जीव घेऊन तेथून शक्य तितके लवकर निसटायचे कसे, ह्या मार्गाला लागला. कंटकसह गेलेल्या आणि वाटेच्या अर्ध्यामुर्ध्या भागात झाडांवर क्रमांक घालीत असलेल्या चारपाच बंदिवानांनी टोळीत हाहाकाराची उठलेली आरोळी ऐकताच धूम ठोकून परत पावली तळ गाठला होता. कंटकबिटक जे कोणी वाटेच्या पलीकडच्या टोकाला अडकले होते, ते जिवंत की मेले, त्याची विचारपूससुद्धा करण्याचे भान कोणाला उरले नाही. बंदूकवाले सैनिक काय, जमादार काय, पाय पुढे न टाकता संकटघंटा घणाणवून, जमले ते बंदिवान घेऊन, घायाळांना ह्याच्या त्याच्या खांद्यावर चढवून माघारे चाळीकडे निघाले. जावऱ्यांनी त्यांच्या पळत्या पाठीवरही आणखी चारपाच बाण फेकताच ती टोळीची टोळी नुसती धूम ठोकून पळू लागली.

चाळीकडे येताच अरण्य विभागाच्या इंग्रज अधिकाऱ्याला सैनिकांनी आणि जमादाराने गोष्ट अवाच्या सवा फुगवून प्रतिवेदिले (रिपोर्ट दिला)

“जावऱ्याचे एक सैन्यच सैन्य त्या रानात युद्धाला आले आहे, साब!”

“किती असतील ते जावरे साधारणतः?” साहेबांने पुसले.

"हजारएक तरी असलेच पाहिजेत, साब!"

त्या टोळीतील लोकांची ही त्रेधा उडाल्यानंतर ते वीस-पंचवीस जावरेही त्या रानातून पळून आपल्या सुदुर्गम आणि सुदूर असणाऱ्या गावठाणाकडे निघून गेले होते. कंटकच्याकडे तुकडीवर बाण टाकणारे दोघे जणही कंटकने बंदुकीचे टाकलेले बायबार ऐकताच दलदलीकडे पळून गेले होते आणि आपल्या ह्या इकडच्या परतत्या जावऱ्यांत मिसळले होते. त्या दिवशी त्यांनी इंग्रजांच्या लोकांवर जरी छापा घातला, पूर्वी काही वर्षांमागे झालेल्या झुंजीत इंग्रजाने जी त्यांची म्हणून सीमा ठरविली तिच्या पलीकडे जावऱ्यांच्या म्हणून ठरलेल्या रानात आज इंग्रजांनी चोरटा प्रवेश केल्याविषयी त्यांनी इंग्रजांच्या लोकांपैकी पाचपंचवीस जणांना घायाळ करून जरी सूड उगवला होता, तरी जावरेही जाणून होते की, इंग्रजही परत सूडासाठी दोनतीन दिवसांच्या आत सशस्त्र सैन्याची तुकडी घेऊन त्या रानात घुसल्यावाचून राहणार नाहीत! क्वचित् तो उद्याच्या उद्याही येईल! कारण इंग्रजांचा एक बंदूकवाला सैनिक त्यांनी ठारच केला होता. त्याच्या आणि तशा चुकलेल्या बंदिवानांच्या शोधाला इंग्रजांचे लोक जर उद्याच्या उद्या आलेच तर? ठाण मांडून ठराविक रणावर सामना असा जावरे तो काय देणार? तो त्यांचा रण संप्रदायच नव्हे. भुतांसारशा त्यांचा संचार, अदृश्यता, त्यांचे अस्त्र आणि बळ. इंग्रज त्यांना शोधील तेथे ते हटकून सापडणार नाहीत; न शोधतील तेथूनच ते हटकून छापा घालणार! म्हणूनच त्यांनी त्या रानाकडे पुन्हा ढुंकूनही बघायचे नाही, असे ठरवून दुसऱ्या अरण्यातून इंग्रजांच्या लोकांवर म्हणजेच सक्त कामकरी वा स्वतंत्र गावकरी बंदिवानांवर पुढचा छापा घालायचा बेत ठरवूनही टाकलेला होता.

अशा रीतीने बंदिवानांच्या टोळीपैकी किंवा जावऱ्यांपैकी कोणीही त्या वाटेच्या पुढील वा मागील रानांत उरलेले नसल्यामुळे कंटक आणि रफिउद्दिन हे दोघ तेथे येताच त्यांना सर्वत्र शुकशुकाट दिसला.

तशा शुकशुकाटात, तशा जिवावरच्या बेतलेल्या प्रसंगात आणि त्या घोर अरण्याच्या काळ्याकभिन्न होते चाललेल्या जबड्यात स्वतःला सापडलेले पाहताच कोण्या दिङ्मूढ भीतीने त्या दोघांचेही मन चरकले आणि दोघांच्याही मनाचा ओढा नवनव्या भीषण संकटात न पडता सरळपणे सरकारी चाळीकडे जाऊन आपल्या बंदिवान बंधूंना आणि अधिकाऱ्यांना भेटण्याकडे होऊ लागला.

पण दोघांच्याही मनात पळून जाण्याची शिणक, पोटात कळ उठावी तशी, सारखी उठत होती- चैन पडू देईना.

रफिउद्दिनने मघा कंटकाला जेव्हा स्पष्टपणे सुचवले की, 'काळ्या पाण्याच्या बंदिगृहाला फोडून पळायच तर त्याची हीच संधि खरी!' तेव्हा त्याच्याही आधी कंटकाच्या मनात तीच धाडशी कल्पना आली होती! पण त्या कल्पनेच्या मागोमाग त्याला आठवले की,

"अरे, पळायच खरे; पण मला एकट्याला नव्हे! तर माझ्या मालतीला सोडवून, तिच्यासुद्धा निसटायच आहे. जर आता असा एकटा ह्या अरण्यांत घुसलो तर पुन्हा मालतीला बंदिवान

वसाहतीतून सोडवून आणायचा मागचा पूलच उडवून दिल्यासारखे होणार! एकदा अरण्यात घुसलो की मग पुन्हा वसाहतीकडे फिरकणेच अशक्य. अशा अतर्कितपणे आजच संधि येईल ह्याचे स्वप्नसुद्धा पडले नव्हत, नाही तर तिला हरप्रयत्ने सोडवायची काही तरी योजना आधीच ठरवून मग आजची संधी साधली असती!"

ह्या अडचणीमुळे कंटक तात्काळ पळून जाण्याच्या रफिउद्दिनच्या आग्रहाला धड 'हो'ही म्हणेना, 'नाही'ही म्हणेना. रफिउद्दिनला कंटकची वरील खरी अडचण माहितीच नव्हती. त्यामुळे तो त्या संधीच्या इतर लाभांनाच कंटकच्या मनानर पुनःपुन्हा ठसवीत, शेवटी म्हणाला,

"बाबूजी, सबसे बढकर बात यह है कि आज सरकार आपका पीछा भी न करेगी! आणखी चारपांच दिवस तरी सरकारला बहुधा असेच वाटत राहणार की, आपण पळालो नसून जावऱ्यांनीच आपल्याला त्या सैनिकाप्रमाणे ह्या रानांत कुठेतरी गाठून मारले असावे! सरकारी लोक आपल्या शोधाला इकडे येतील, पण 'भगोडे' म्हणून नव्हे तर 'मारे गये' म्हणून! आणि ह्याचे रानात शोधतील पहिल्यानं. ह्यापेक्षा अधिक सवलत ती काय मिळायची! खरोखर, ज्यांना पळायच त्या बंदिवानांना सरकारनेच आपण होऊन सरकारी खर्चाने बंदूक, काडतुस, हत्यार पुरवून, पहाऱ्यातून सोडून ह्या दाट अरण्यापर्यंत स्वतः सुरक्षितपणे पोचवून, वर आणखी आश्वासन द्यावे की, 'चार-पाच दिवस आम्ही तुमचा पाठलागसुद्धा करणार नाही बरे! जा आपले, तेवढ्यात शक्य तितके दूर पळून जा!' असे भाग्यवान् भगोडे (पळकाढे) बंदिवान ह्या अंदमानाच्या साऱ्या इतिहासात आपणच दोघे काय ते निघालो! आता इतक्यावर न पळता जो उलट आपल्या पावलांनी चाळीकडे जाऊन सरकारी बंदिगृहात परत घुसून बसेल तो केवळ बंदिगृहातच सडून मरायच्या योग्यतेचा म्हंटला पाहिजे! तेव्हा बोला, तुम्हांला तेच हवे, तर तुम्ही चाळीकडे परत निघा. मी तरी आता जीव गेला तरी परतणार नाही. ती बंदूक तेवढी मला द्या, की मी घुसलोच बघा अरण्यात, गाठतोच बघा हिंदुस्थान!"

त्याच्या ह्या निकराच्या वाक्यासरशी सांगू की नको अशी कंटकाच्या मनात चाललेली चलबिचल निकालात निघाली. बेताने पण आता सांगणेच इष्ट, असा त्याचा निश्चय होऊन कंटक म्हणाला,

"दोन-चार दिवसांपूर्वी ही संधी येती, तर मीच ह्या आज पळण्याच्या कामी तुझ्या चार पावले पुढे असतो; पण तुला माहीत नाही. ह्या तीन-चार दिवसांच्या ह्या नव्या निघालेल्या सरकारी कामाच्या निकडीत मला सांगायलाही झाले नाही तुला की माझी जन्मठेपेची शिक्षा झालेली बहीण ही इथेल्या स्त्रीबंदिगृहात गेल्या आठवड्यात आली आहे! जर मी पळणार तर तिला घेऊन पळणार. सर्व सरकारी अधिकाऱ्यांना माझ्या शिक्षावृत्तावरून ठाऊकच आहे की, ती माझी सख्खी बहीण कंटकी. आम्हां दोघांवर दोघांनी मिळून केलेल्या हत्येचा एकत्र आरोप आला, दोघांना काळे पाणी झाले. जर मी एकटा पळालो तर ते किंचित माझा सूड म्हणून, निदान तिला ही माहिती असलीच पाहिजे हा संशय म्हणून, तिचा छळ करायला ते सोडणार नाहीत. पुन्हा ती बंदिगृहाच्या

थडग्यातच पुरलेली असता मी त्यातून उठून जिवंत झालो तरी मेल्यासारखाच आहे! ही माझी आजच पळायच्या वाटेतील मुख्य अडचण! एकदा आता पळालो की पुन्हा तिला सोडवायचा कट रचू काय, तिच्याकडे परत भेटायला जायची देखील गोष्ट अशक्य! ती घाबरेल, माझा बेपत्ता-'भगोडा' होण्याचे ऐकताच, ती जीवसुद्धा देईल काळजीने खंगून!..."

"थांबा. हीच ना अडचण? तर मी तुम्हांला प्रतिज्ञेवर सांगतो की, तुमच्या बहिणीला बंदिगृहातून सोडावयाची गोष्ट आपण स्वतःच बंदिवान होतो, पळालो नव्हतो, त्यापेक्षा पळून गेल्यानंतर, स्वतंत्रपणे वावरू लागल्यानंतरच अधिक सुसाध्य होणारी आहे. आज आम्ही अरण्यातून पळून गेलो म्हणजे पुन्हा ह्या बंदिवान वसाहतीत येताच येणार नाही ही भीती चुकीची. मी मागे पळालो ना, तेव्हा तीन-चार महिने रात्री उघडपणे राही ह्या जावऱ्यात नि दिवसा गुप्तपणे भटके या वसाहतीत. कंटकबाबू हे काम माझे. मी तुमची बहिण बंदिगृहातून अलगद उचलून, अरण्यात तुम्ही असाल तेथे तुमच्यापुढे उभी करतो. पाहा तर खरी माझी कर्तबगारी. थोडा मोकळा सुटू द्या. जंगलाचा चारा नि वारा ह्या वाघाने एकदा पुन्हा खाल्ला की आलीच ह्याच्या ह्या सध्या गंजलेल्या नखांना पुन्हा ती पूर्वीची वाघेरी धार! कंटकबाबू, तुम्हांला माझा पूर्वीचा पराक्रम माहीत नाही. तुमची आमची ओळख म्हणजे माझ्या हाती बेड्या पडल्यानंतर काळ्या पाण्यावर येताना 'महाराजा' बोटीवर झाली तीच! पण त्या दिवशी जी भाईबंदीची शपथ आपण घेतली, ती तुम्ही पाळून ह्या कठोर बंदिवासात माझ्यावर अनेक उपकार जे केलेत, ते मी जन्मोजन्मी विसरणार नाही. त्याच बोटीवर काळ्या पाण्यावर येताना मी काळ्या पाण्याच्या बेड्या तोडायच तुम्हाला वचन दिले होते. आज ते अंशतः खरे केले आहे. उद्यापरवा पूर्णपणे खरे करून देईन, कंटकबाबूस बेड्या पडून पिंजऱ्यात कोंडला गेलेल्या रफिउद्दिनच तेवढा तुम्ही पाहिला आहात, म्हणून तुम्हांला माझी बोलणी वल्गना वाटतील, पण जर का पिंजऱ्यात पडायच्या आधीचा माझ्यात असलेला वाघ तुम्ही पाहिला असतात ना, तर माझ्या कर्तबगारीवर मी न सांगताच तुमचा विश्वास बसला असता!"

रफिउद्दिनच्या ह्या शेवटच्या दहा-पाच वाक्यांनी कंटकचा त्याच्याविषयीचा विश्वास वाढवणाऱ्या ठायी त्याच्याविषयीची धास्तीच वाढत गेली होती. रफिउद्दिन बोलत होता कंटकशी, पण रफिउद्दिनचे ते बोलणे ऐकत होता किशन! कंटकला पिंजऱ्यातला रफिउद्दिनच माहीत होता, हे खरे, पण किशन मूळच्या रफिउद्दिनलाही चांगलाच ओळखून होता. तो थोडा वेळ स्तब्ध राहिला. मग मनात म्हणाला,

"तरीही हा काय करणार? ह्यांच्यातला पहिला वाघ जरी पुन्हा चवताळला, तरी काय चिंता! हा वाघ, तर अंदमानात आल्यापासून मीही झालेलो आहे एक पटाईत दरवेशी! हा बिघडलाच तर ह्याचे बंदुकीने उडवून देईन त्याला पाहता पाहता!"

"मग काय? कंटकबाबू, बोला. जायच ना पळून? जन्मठेपेची बेडी तोडून टाकायची ना ह्याचे क्षणी?"

“तोडून टाकायची ना काय विचारतोस? तोडून टाकलीच आहे की ती आता! पळून जायची गोष्ट कशाला? हे पळून आलोच आहोत की इथे!! आता पुढच पाऊल कुठे टाकायच ते बोल.”

“भले वीर? पुढच पाऊल हिंदुस्थानात! स्वदेशी!”

कंटक हसला.

“पण अंधःकाराचा नि संकटाचा एक समुद्राचा समुद्र - हा काळ्या पाण्याचा समुद्र - आडवा पसरला आहे ह्या पावलांच्या नि स्वदेशाच्या मध्यंतरी! तो?”

“तो उल्लंघून!” पोहण्याच्या पावित्र्याचे दोन हात त्या आंधळ्या वातावरणात आवेशाने मारून रफिउद्दिन उत्तरला, “तो काळ्या पाण्याचा संकटसमुद्र उल्लंघून स्वदेशी जायच हाच निर्धार! जाऊच जाऊ ही निश्चिती!”

***

सतरा

“कंटकबाबू!” त्या घनदाट, ओसाड आणि अंधारी रानात अर्धाएक तासभर चर्चा झाल्यानंतर रफिउद्दिन रचल्या जाणाऱ्या कटाच्या चर्चेचा उपसंहार करू लागला, “त्या दिवशी रात्री चाळीपुढच्या मैदानात आपण हीच चर्चा करीत होतो तेव्हा जावऱ्यांच्या गावी आश्रयाला जायच म्हणजे भयंकर मरणाच्याच आश्रयाला जायच असे तुम्ही म्हणाला होतात, नव्हे का?”

“होय. तू त्या जावऱ्यांच्या आश्रयाला जाताना जी संकटे सोसावी लागतात म्हणून सांगितलेस, ती होतीच तशी! विजातीचा नि विशेषतः सुधारलेल्या माणसांचा वास येताच जर ते बहुधा एकदम चारी दिशांना विषारी तीरांचा मारा करीत सुटतात, तर त्यांचा आसरा मागायला जाणे म्हणजे मरणाचा आसरा मागायला जाण्याइतकेच आशाळू काम नव्हे काय? पण आता त्याच काय? ह्या जावऱ्यांच्या जंगलात नि त्यांच्या वसतीतील तू मागं पळालास तेव्हा स्वतः अनुभवलेली जी जी संकटे वर्णिलीस नि त्यांच्याच जबड्यात उडी घ्यायचा बेत सुचवलास, तो मला तेव्हा कितीही भयंकर वाटलेला असो, तो आता तसा वाटत नाही खरा. कारण आता बेत असा एकच काय तो हाताशी आहे. संपीव ती काथ्याकूट सध्यापुरती. मला आता जर खरोखरी काही भयंकर भासत असेल, तर तो तुझा कटाचा बेत नव्हे, पण ही मला लागलेली असह्य भूक!”

“माझ्याही पोटात भुकेची नुसती आग उठली आहे! पण आता उद्या पहाट उजाडेतो तरी ती विझवायचा उपाय उरला नाही! हां, एक उपाय तेवढा आहे ही पोटाची आग शमवायचा!” रफिउद्दिन अंधेरात हसरे तोंड करून म्हणाला.

“कोणचा तो? सांग तरी!” कंटकाने विचारले.

“दुसरा कोणचा! तुम्ही रुचकर पदार्थांची नाव घेत चला. खमंग पुलाव, पुऱ्या, भजी, सागुती, भाजीचा मसालेदार रस्सा, रसरसलेली जिलबी, त्यांच्या नावासरशी नि नाव घेताच येणाऱ्या खमंग वासासारखी माझ्या तोंडाला जे हे पाणीच पाणी सुटत आहे, त्याच्या माऱ्याने ती पोटातली भुकेची आग काय विझेल ती विझेल!” खाऊन नाही तर हसून तरी पोटभर घेतले रफिउद्दिनने.

“ठीक आहे! तुझ्यापुरता पोट भरायचा तो उपाय तू करतो आहेस, तोवर माझ्यापुरता दुसरा काही तरी उपाय मलाही योजला पाहिजे. दिवसभर पावसात भिजून भिजून थिजून गेलो बुवा!” असे त्रासिकपणे उद्गारत कंटक उठला आणि बंदूक घेऊन इकडे तिकडे दोन-तीन येरझाऱ्या घालीत, हात चोळीत, पाय आपटीत अंगात ऊब आणू लागला. तोच त्याला शेजारी अर्ध्याएक मैलावर असलेल्या त्या रानकडेलगतच्या सरकारी नारळबागेची आठवण झाली. तो झपकन् रफिउद्दिनकडे वळला,

“ऊठ! सैपाक सिद्ध आहे सारा. अमृत प्यायला, मेवामिठाई खायला चल! पलीकडच्या नारळबागेत जायच!”

“आणि? नारळ म्हणजे काही झाड हालवताच तळाशी पडणाऱ्या लिबोण्यांच्या सडा नव्हे! आणि हाताने नारळ तोडावे इतका काही मी उंच नाही!” रफिउद्दिन हसला.

"अंदमानात दोनदा राहून नारळाच्या झाडापेक्षा ठेंगू राहिलेला मनुष्य तूच पहिला भेटलास मला! पण कोणचंही नारळाच झाड माझ्यापेक्षा तरी उंच नाही हे मी दाखवून देतो तुला, चल."

ते दोघे उठले. मागेपुढे शुकशुकाट आहे असे पाहून सरकारी सडकेला लागले; थोड्या वेळाने बागेकडे वळले. त्यांच्या सवयीचीच ती बाग. नारळांच्या दाट लागवडीत येताच सुऱ्या कटीला बांधून दोघेही दोन उंच नारळावर चढले. त्या झाडांना प्रथमच बोटे रुपण्या टेकण्यासारखे खवले पाडलेले असतात. दोघेही पटाईत चढणार. टोकांना बिलगून त्यांनी नारळ तोडले. ते नारळ धपाधप खाली पडले, तोच त्यासरशी बागेच्या पलीकडच्या बाजूला असलेल्या रखवालदारांच्या झोपडीकडून सूंऽसणणण करीत गोफणीच्या दगडांचा मारा होऊ लागला.

दोघांच्याही पोटात धस्स झाले. कंटकने नारळावर चढण्याच्या आधी बंदूक आणि कुऱ्हाड नारळाच्या झावळ्यांच्या आणि पाचोळ्यांच्या ढिगाऱ्यांच्या भुईवरचे लपवून ठेवली होती, इतके बरे केले होते; पण जर ती हत्यारे, आता कोणी दिवे घेऊन शोधायला आले आणि त्यांना सापडली, तर? कंटकच्या एकदा मनात आले की, साहस करून खाली उतरावे आणि बंदूक झाडावी. पण तशा काराने सारे जागून उठणार! तोही मूर्खपणाच! वरचे बसावे तर एखादा दगड सणसणत कानशिलात बसला की सारेच प्रकरण निकालात निघणार!

अशा दुहेरी भीतीने ते ठिकच्या ठिकाणी चूप बसले. पण भूक चूपही बसू देईना. भीतीपेक्षा भुकेनेच ते कासावीस झाले होते. सरतेशेवटी झाडावर बिलगून बसल्याबसल्याचे त्यांनी कोवळे नारळ कापले, सुरीने सोलले, वरचे जाड झिलके तेथील झुबक्यातच अडकवले आणि त्या शहाळ्यातले पाणी ते प्याले, मलईसारखे मऊ खोबरे खाल्ले, ते ह्या वेळी किती मधुर लागले म्हणून सांगावे! सोनेरी कळसाच्या राजवाड्याच्या गच्चीवर बसून सोन्याच्या पेल्यातून मद्य पिणाऱ्या राजासारख्या त्यांनी मिटक्या मारल्या. गोफणीचे दगड मधून मधून सणसणत त्यांच्या आजूबाजूंनी जातच होते आणि तरीही आणखी एकेक शहाळे सोलून ते ते मधुर पाणी पीतच होते, मलई खातच होते.

त्यांना आता चांगली तरतरी आली. दगडही बंद पडल्यासारखे वाटले. खाली उतरावे अशा बेताने रफिउद्दिन झाडाला घसरत खाली थोडासा उतरूही लागला; तोच त्या पलीकडच्या झोपडीत कोणी कंदील पेटवावा तसा उजेड दिसला. दचकून रफिउद्दिन अर्ध्या झाडावरून उतरता उतरता पुन्हा सापासारखा सरसरत शेंड्यांपर्यंत गेला. कंदील झोपडीबाहेर हलतांना दिसू लागला. कोणीतरी येते आहे आपल्याला शोधायला हे नक्की! एक सोडून दोन कंदील! बंदुका? खांद्यांवर काय त्यांच्या? होय! बंदुका भरून दोन पोलिस शिपाई, जे त्या रात्री जावऱ्यांशी झालेल्या संध्याकाळच्या झटापटींमुळे त्या बागेत विशेष देखरेखीसाठी ठेवले गेले होते, ते आवाज कोठून झाला तो पाहण्यासाठी जिकडे तिकडे बघत चालले आहेत. मधूनच गोफणीचे दगड त्यांच्यासह असलेले एक-दोन बंदिवान फेकत आहेत! अगदी ह्याचे बाजूला - शेवटी इकडेच येत आहेत ते!

कंटक आणि रफिउद्दिन शेजारशेजारच्याच ज्या दोन उंच नारळाच्या झाडांवर चढून बसले होते, त्यांच्या अगदी बुंध्याशी ते पोलिस आले! कंटकच्या आणि उद्दिनच्या छातीत एकच धडकी भरली. तोफेच्या तोंडी बांधलेल्यांचे हृदय जसे तोफ आत्ता सुटते, आत्ता सुटते, असे प्रत्येक स्पंदनी धडकत राहते, तसा प्रतिक्षणी पोलिसांचे लक्ष आपल्याचे झाडांवर जाऊन त्यांच्या बंदुकीची गोळी सुटते की काय, असा त्यांचा थरकाप होते होता. आपण कोलमडून खाली पडतो की काय, असा धाक वाटत होता. पण झाडाला अधिकच बळकटपणे बिलगून गप्प बसणे हा एकच मार्ग काय तो त्यांना उरला होता - मरण ओढवून घेण्याचा आणि मरण टाळण्याचाही!

जसजसे ते पोलिस कंदिलाचे किरण वरवर होते त्यांच्याजवळ येऊ लागले, तसतसा कंटकचा आणि उद्दिनचा जीव त्यांना सोडून दूर जाऊ लागला.

तोच शेजारच्या दहापाच नारळाच्या शेंड्यांवर फडफडाट झाला. पोलिस चमकून तिकडे धावले आणि एकाने झटकन् बंदूक झाडली. त्यासरशी घू घू घू करीत काही घुबडे वर उडून गेली आणि एक घुबड टपकन् खाली पडले. पोलिस खो खो करून हसले.

एकाने ते घुबड दुसऱ्याला दाखवले,

“हा पाहिलात तुमचा चोर! घुबडे फडफडत होती. तुम्ही हट्ट धरलात, चोर नारळ तोडताहेत! परता आता, चला!”

तो घोळका पुढे जाते चालला तसतसा कंटकच्या आणि उद्दिनच्या जिवात जीव येत चालला. रफिउद्दिन मनाशीच हसला, “जिवावर आले होते ते घुबडावर गेल!”

पण पुन्हा जिवावर आणायचे नसेल, तर ते पोलिस आपल्या झोपडीत कंदील मालवून जाऊ लागेतो त्या झाडांच्या शेंड्यांवरचे ताटकळत बसणे भाग होते. तसे ते दोघेही बसले. पण त्या दिवसाचा पूर्वीचा असह्य थकवा आणि आताची निष्क्रियता ह्यांनी त्या दोघांनाही गुंगी येऊ लागली. शेंड्याला घट्ट कवळून ते डुलक्या घेऊ लागले. अर्धाएक तास झाला तरी पोलिस कंदिलाभोवती विड्या फुंकीत बसलेलेच! कंटक आणि उद्दिन पुन्हा तिकडे पाहात, पुन्हा डुलक्या घेत, केव्हा काय की गाढ झोपेत सुन्न होऊन गेले.

त्या सुन्नपणातच उद्दिनची झाडाला मारलेली मिठी केव्हातरी ढिली झाली, बैठक चळली आणि तो सरकन घसरला. त्यासरशी त्याचा देहच जसा मनाच्या आधी जागावा तसे होऊन त्याच्या हातापायांनी झाडाला सापासारखा विळखा घातला. निद्रारोग्यांचेही असेच होते. ते झोपेत, त्यांचे पाय अगदी जागे, उंच आणि अरूंद भितीवरून जीव बचावेल असे जपून सरळ चालतात; तसा उद्दिन त्या उंच झाडावरून झोपेत घसरला, पण झाडाला लपेटून सरपटत घसरला तो थेट पायथ्यापाशी येऊन पोचला. त्याची छाती, मांड्या साऱ्या सोलून निघाल्या. पण वरून कोसळून कपाळमोक्ष व्हायचा, तो टळला ते पाहून त्याला त्या रक्ताळ खरचटण्याचे काहीच वाटले नाही. खाली येताच त्याला सगळी परिस्थिती आठवली. झोपडीकडे पाहतो तो कंदील विझलेला, जिकडे तिकडे सुन्न. थोडे थांबून त्याने कंटक होता, त्या झाडाशी दोन-तीनदा हळूच टाळी वाजवली.

कंटकला गुंगीत सावधपणाचा चटका होता, तो समजला. त्याने उलट हळूच एक टाळी दिली. "तू उतरलास? ठीक. मी पण हळूच उतरतो, थांब!" इतका सगळा अर्थ त्या टाळीत होता.

कंटक खाली येताच दोघेही थोडा वेळ दबा धरून गप्प बसले. उत्तररात्र झाली असावी, असे तर्कून मग त्यांनी ती बंदूक, कुऱ्हाड इत्यादी वस्तू लपविल्या ठिकाणाहून पुन्हा काढल्या. पहाटेच्या आधी परतून कोण्यातरी घोर कांतारात त्यांना गडप झालेच पाहिजे होते. ह्यास्तव ते तेथून सडकेकडे निघाले. निघतांना उद्दिन पाचोळ्यातून काही उचलीत आहे असे पाहून कंटक कुजबुजला,

"काय रे खटपटतो आहेस उगीच?"

"उगीच? मघा तोडून पाडलेले ते दोन-तीन नारळ काय टाकून द्यायचे इथे?"

"किती भुक्कड आहेस! कुठले दीड दमडीचे नारळ ते! सोड!"

"दीड दमडीचे? ह्याचे दीड दमडीच्या नारळापायी दोन संबंध डोकी छाटली जाते होती की मघा आमची!"

रफिउद्दिनने एक-दोन नारळ सापडले ते खाकेत मारले. त्या सडकेने आले होते तसेच ते माघारे त्या नव्या रानवाटेपाशी आले. फटफटण्याच्या संधीला ते त्याच वाटेने रानात घुसले. वाटेत तो पोलिस जमादार काल जेथे जावऱ्यांच्या तीराने ठार होऊन पडलेला होता, त्याचे पोलिशी कपडे आणि अंगावरील आगपेट्या विड्यासुद्धा सारे पदार्थ त्यांनी काढून घेतले. जावऱ्यांचा तो तीर तेवढा त्याला तसाच खुपसून राहू दिला. नंतर त्यांनी ती वाट तेथेच सोडली.

मग त्या रानाच्या त्या बाजूपासून लांब अशा एका घनदाट भागाच्या आत घुसण्याचा त्यांनी शक्य तितका यत्न केला. वाटेत एक रुंद आणि खोल खाडी आली. तिचे वाळवंट ह्या वेळी उघडे, सुकलेले आणि पांढरे फटक झाले होते. अंदमानच्या सिंधुतटावर मधून मधून पडणारे कडक ऊन त्या वेळी पडले होते आणि त्यामुळे ते वाळवंट त्यावरील रंगीबेरंगी शिंपा आणि पांढरी स्वच्छ रेती यांही करून नुसते चमचम करीत होते. वस्तुतः ते नको इतके तापलेले होते. पण गेले दोन दिवसरात्र एकसारख्या कामाच्या घामात, पाऊस पाण्यात, सडक्या पाचोळ्यात, चिखलात भिजून भिजून घामटपणाने आणि थंडीने नकोसे झालेल्या या दोघा 'भगोड्यां'ना म्हणजे काळ्या पाण्यावरून पळालेल्या बंद्यांना, ते नको इतके कडक ऊन आणि तापलेले वाळवंटच फार हवेसे वाटले. जेथे मनुष्य असा फिरण्याचा संभव अगदी नाहीसाच, असे ते दुर्गम आणि दुःसाध्य स्थान. तेव्हा तेथे आता थोडे उघड्यावरही वावरण्यास हरकत दिसेना. म्हणून मग त्या दोघांनी त्या खाडीवर आपल्या सांगाती असलेले सारे कपडे चांगले चोळून मोळून धुतले आणि त्या कडक उन्हात वाळत टाकले. त्यांच्या अंगाची गेल्या दिवसरात्रीतून जळवा, मच्छर, कांटे आणि ह्यांच्या दंशानी एक जाळीच केली होती. त्यावर त्या रानाचे औषध म्हणजे चिखलमातीचा लेप, तो त्यांनी अंगभर लावला, उन्हात सुकवला आणि मग दगडमातीच्याच साबणाने अंगे घासून घासून त्या खाडीत ते यथेच्छ डुंबत राहिले.

नंतर जी खमंग भूक लागली ती तशा जिवावरच्या श्रमांनंतर तसे स्नान केलेल्या बळकट प्रकृतीच्या माणसांनाच कळू शकेल. पण तेथे अन्न म्हणजे मृगयेचेच काय ते मिळणार. त्यातही बंदूक उडवून रान जागे करणे त्यांना अजूनही धोक्याचे वाटत होते. पण त्या रानी मिळत काय ते उदंड रानडुक्करे! आणि उद्दिन हा त्या रानात तो मागे पळाला होता तेव्हापासून जावऱ्यांसारखाच सर्व प्रकारच्या शिकारी करण्यात पटाईत झालेला होता. अर्धाएक तास घळीतून लपतछपत गेल्यावर त्याला एक शिकार सापडली नि हातातील कुऱ्हाडीच्या एका घावासरशी त्याने तिला जमिनीवर लोळवले. नंतर वाळलेल्या वाळवंटातील लाकूडफाटा जमवून जावऱ्यांच्या सुपशास्त्रानुसार ते मांस विधिपूर्वक भाजले आणि एका पानावर ते वाढून घेऊन त्यांनी जेवायला प्रारंभ केला.

आणि तरी देखील ते पक्कान्न उभ्या जन्मात प्रथमच खाताना कंटकला वेडी-वाकडी तोंडे करून कसेबसे गिळावे लागले. सोबतच्या नारळांच्या तुकड्यांचे तोंडी-लावणे होते म्हणूनच उलटीपर्यंत पाळी आली नाही; तरीही जिभेला ते तितके जड गेले तितके पोटाला मुळीच गेले नाही. सारे चट्टामट्टा केल्यानंतर कंटकला पोटभर समाधानाची अशी एक ढेकर आली आणि एक अशी तरतरी वाटली की यंव! ते पाहून उद्दिन हसला....

“बाबूजी, दोन-तीन दिवसांच्या आत हा ‘जावरी’ खुराक तुम्हांला इतका मानवणारस दिसते की, माझ्या वाट्याला काही उरेल की नाही ह्याची मलाच भीती वाटावी!”

त्यांचे जेवण असे हसत खिदळत चालले आहे तो आकाश अंधारल्यासारखे झाले. कंटक म्हणाला,

“तो बघ पाऊस पुन्हा कसा भरून येत आहे तो! तेव्हा आता पुढची हालचाल नक्की ठरेतो ह्या रानी प्रथमतः निवाऱ्याची दरी-खोरी कुठे तरी हुडकली पाहिजेत. कालची रात्र झाडावरचे निजून काढली, पण तशा शय्यामंदिरातील ते विलास प्रतिरात्र सोशीत जायची मला तरी काही हौस नाही. ह्या रानात आमचा वाटाड्या तू. तू हुडकून काढला पाहिजेस एखादा फक्कड बंगला संध्याकाळच्या आत! चल ऊठ!”

“पण मी ह्याचे बाजूला जे तुम्हाला आणल ते बंगलेच बंगले, एकसंधी, सुरेख, दगडी बांधलेले, हवे तितके मिळावे म्हणूनच होय! ही टेकडीची झाडी तेवढी ओलांडूया.”

ती झाडी ओलांडून ते टेकडीवर चढले. तेथून समुद्र दूरवर दिसते होता. त्या टेकडीच्या पायथ्याशी गुहाच गुहा असून पुढे वाळवंटापर्यंत प्रचंड अशा सुट्या शिलांचा संघच्या संघ पसरला होता. जणू काय हत्तींच्या थवाचा थवा सिंधुपुलिनावर उतरला आहे!

त्या गुहा दाखवून उद्दिन म्हणाला,

“देखीये बाबूजी! बंगल्याशेजारी बंगला कसा लागून गेला आहे! जैसे की बंबईकी मलबार हिल्! पाहा आता भाडं-बिडे कोणत्या बंगल्याचे स्वस्त पडते ते!”

त्यांनी गुहांची पाहणी चालविली. पाहता-पाहता दोन धिप्पाड शिळा एकमेकींना टोकांशी टेकून तंबूसारख्या उभ्या असलेल्या आणि दोघां मस्त हत्तीनीं झुंज खेळताना मदोन्मत्त मस्तकाशी

मस्तक रेटून टाकावे तशा पावित्र्यात शोभत असलेल्या त्यांना आढळल्या. त्या शिळांच्या त्या तंबूसारख्या दर्शनीठेवणीच्या आत लांबवर तंबूसारखीच ऐस-पैस पोकळी होती. तिच्यात पुन्हा लहान-लहान दोन-तीन गुहा खोल्यांसारख्या भिंतींच्या दोन बाजूंनी पाडलेल्या दिसते होत्या. ते पाहताच उद्दिनला तेच स्थान वननिवासास छान वाटले. तो लगेच आत जाऊन मधल्या भागात मांडी ठोकून बसला. पण बसला न बसला तोच एकदम "घात! घात!" असे घोगऱ्या आवाजात ओरडून घाबऱ्या घाबऱ्या बाहेर आला.

"काय रे, काय झाले काय?" बंदूक सावरीत कंटक जिज्ञासला. "माणूस म्हणा, भूत म्हणा, पण कंटक, एक हिडिस प्राणी त्या आतल्या कोपऱ्यातल्या गुहेत दबून बसलेला आहे! त्याचे डोळे त्याच्या तोंडाच्या काळोखात पणतीसारखे मिणमिणत आहेत!" उद्दिनने भीतीदेखील त्याच्या सवयीप्रमाणे हसून व्यक्तविली.

"मग? गोळी घालू या झटकन्!" कंटकने बंदूक उगारली.

"नको नको! अगदी जिवावर बेतेतो बार नको! नसती गडबड रानभर माजेल एखादे वेळी! प्रथम डवचळूया त्याला. आहे तरी कोणता प्राणी तो!"

उद्दिनने असे बोलता-बोलता एक लांब लाकडाची काठी पुढे पडली होती ती उचलली आणि थोडा आत घुसून त्याने त्या भगदाडात ती ढोसली. त्यासरशी एक केविलवाणा चीत्कार उठून कसले तरी पण काकुळतीचे शब्द आले.

"अरे! हा तर कोणी जावरा आहे!" रफिउद्दिनला जावऱ्यांची जी मोडकीतोडकी बोली समजे, तीवरून त्याने ताडले. "मारू नका मला, असे हा आपल्यालाच काकुळतीने विनवीत आहे बहुधा!"

"मग त्याला सांग कसंबस की, तू बाहेर ये, आम्ही जावऱ्यांचे मित्र आहोत. शत्रू नव्हे!"

रफिउद्दिनने जावऱ्यांच्या बोलीत कसे बसे ते सांगितले आणि पुरतेपणी समाजावून देण्यासाठी म्हणूनच की काय त्या लाकडाने त्या बिळात पुन्हा एकदा खडखडविले.

"आलो, आलो" असे केविलवाणे उत्तरे त्या बिळातून लगोलग आले. हळूहळू प्रथम डोके बाहेर काढून नि मग ढुंगणावर घसरत घसरत एक दुःखीकष्टी जावरा त्या बिळाच्या बाहेर पडला. बाहेर पडताच त्याने एक पाय पसरून त्याच्या पोटरीकडे बोट दाखवले नि डोळ्यात पाणी आणून तो कण्हू लागला.

कंटक नि उद्दिन त्या पोटरीकडे पाहतात, तो तेथे काही तरी रक्ताळ दुखापत झालेली दिसली. काही खुणांनी, काही शब्दांनी, उद्दिनच्या इतके नक्की समजण्यात आले की, काल जावऱ्यांनी जो इंग्रजी बंदिवानांच्या तुकडीवर छापा घातला, त्या वेळी इंग्रजी पोलिसांनी केलेल्या उलट गोळीबारात ही एक गोळी ह्या जावऱ्यांच्या पायाला लागली; त्याचे साथीदार जीव घेऊन पळत असता ह्याला पळणे अशक्य झाल्याने हा तेथेच टाकला गेला.

रफिउद्दिन ती वस्तुस्थिती ध्यानात येताच हाती एखादे घबाड अकस्मात् सापडावे तसा आनंदला. कंटकला थोडे बाजूला नेऊन तो म्हणाला,

"टाळी घ्या बाबूजी आधी!" जावऱ्यांच्या वस्तीचा आपल्याला आसरा घ्यायचा होता. पण सध्या ते इंग्रजांवर बिघडलेले! आपण इंग्रजी बंदिवानांतले लोक. शरण म्हणून गेलो, तरी दुरून पाहताच संशयाने जावरे तीरांचा मारा करतील, ही जी मोठी अडचण आपल्या वाटेत होती, ती ह्या जावऱ्यांच्या मैत्रीने निभावून नेण्याची संधी आपल्याला मिळेलस वाटते. जावऱ्यांच्या राज्यात बेखटक जायच. हा जावरा म्हणजे एक जिवंत चालत बोलत प्रवेशपत्रच (परवानाच) मिळाल म्हणायचे आम्हांला! तेव्हा ह्याची शुश्रुषा आपण चांगली करू या."

कंटकच्याही तो बेत मनाला आला. अंदमानाच्या कक्षागारात असता प्रथमोपचारांचे नि औषधांचे काम त्याने पुष्कळच केलेले होते. ते वैद्यकीय चालचलाऊ ज्ञान त्याला आता उपयोगी पडले.

त्या जावऱ्याला त्यांनी धीर दिला. त्याच्या पोटरीच्या सुरीनेच करवला तसा फाड करून गोळी काढून टाकली. दुखापतीला धुऊन-पुसून काही वनस्पती लावून पट्टी बांधली. गोळी निघताच असह्य वेदना उणावून त्या जावऱ्याला हायसे वाटू लागले त्याचे उपकार तो नाना प्रकारच्या खुणांनी आणि शब्दांनी व्यक्तवू लागला.

त्याच स्थली ते तिघेही दोन-तीन दिवस तसेच लपून राहिले. रानांतील पशु-पक्ष्यांची जी काय मृगया बार-बीर न काढता करता येईल ती त्यांनी केली. त्या जावऱ्यांपासून त्याच्या वस्तीची माहितीही त्यांनी काढली. आपण काळ्या पाण्यावरून कसे पळालो. इंग्रजांचे आपणही कसे शत्रू झालेलो आहोत आणि जावऱ्यांच्या वस्तीलाच कसे शरण जाणार आहोत हेही त्याला त्यांनी सांगितले. त्या जावऱ्यानेही अगदी मनापासून त्यांना आश्वासिले की, त्याला त्यांनी दिलेल्या जीवदानाच्या उपकाराची फेड करण्यासाठी शक्य ते साहाय्य त्यांना केल्यावाचून जावरे राहणार नाहीत. कारण जावऱ्यांच्या ज्या जातीतला तो घटक होता, त्या जातीच्या नायकाचाच तो मेहुणा होता आणि एक विश्वासू नि शूर पाईकही!

तो जावरा बरा होईतो तेथेच चोरून लपून राहण्यात त्यांचे जे तीन-चार दिवस गेले, त्या काळांत रफिउद्दिन अगदी निश्चिंत आनंदात होता, पण कंटक मनातल्या मनात अगदी सचिंत. रफिउद्दिला वाटले होते त्यापेक्षाही अगदी सुलभपणे त्याचा पळून जाण्याचा बेत ह्या टप्प्यापर्यंत पार पडला होता, अपेक्षित नव्हत्या अशा कित्येक अनुकूल संधी त्याच्यापुढे चालून आल्या. तो स्वतः तर असेच समजे की, आपण काळ्या पाण्यावरून पळालोसुद्धा! पण कंटकच्या मनाला चिंता सारखी जाळीत होती. त्याच्यापुढे त्याच्याच सुटकेचा प्रश्न नव्हता, तर होता मालतीच्याही सुटकेचा!

तिला कशी सोडवावी? सोडवली तर तिला येथे ह्या रानांत, ह्या गुहेत, ह्या भयाण पेचात किंवा जावऱ्यांच्या वस्तीत ठेवावी कशी, सांभाळावी कशी? रफिउद्दिनवाचून तर पाऊलही पुढे टाकणे दुर्घट. तो सध्या जरी अत्यंत एकनिष्ठ दिसते असला, तरी होता मूळचा एक जातिवंत हिंस्त्र पशू! तेव्हा त्यावर किती विश्वासावे? पुन्हा जरी त्याला कंटक हा किशन आहे ह्याची आता

शंकासुद्धा येणे शक्य नव्हते आणि म्हणूनच कंटकीशी मालतीपणाच्या कोणत्याही स्मृतीचा धागादोरा त्याच्या मनात गुंतलेला असणे असेभव होते आणि जरी कंटकीही वयाने, रूपाने नि काबाडकष्टामुळे आलेल्या क्षीणतेने हीच मालती असे सांगितले तरी पाहताच ओळखता येणे कठीण होते, तरीही न जाणो तिला पाहताच ह्या उद्दिनने ती मालतीच आहे असे ओळखले तर? एखादा भयंकर प्रसंग गुदरणारच नाही कशावरून? ती तरी ह्याला ओळखणारच! तेव्हा ह्याची पूर्वीची नीचता किंवा तिचा पूर्वक्रोध भडकून त्या आगीत सर्वांचीच राखरांगोळी होऊन जाईल. ह्या असल्या घनदाट कांतारातील एकान्तात ती, मी, आणि हा! ह्याच्या साहाय्याने मी तिची मुक्तता करणे म्हणजे रावणाचे साहाय्य घेऊन रामाने सीतेला सोडविणे होय! पण....उपाय दुसरा असा कोणता?

उद्दिनच्या मनात मात्र त्यावेळी प्रतारणेचा भाव लवलेशही नव्हता. त्याची अडचण असली तर ती एकच होती. --पैसा! जावऱ्यांच्या वस्तीत लोकप्रिय व्हावयाचे तर मद्य हवे आणि पुढे काळ्या पाण्याला रामराम ठोकण्याची तारवे, कपडे, हत्यारे, खाद्य इत्यादी साधने जुळविण्यास पैसा हवा. त्याला मार्ग दोनच होते. एक तर बंदिवानांच्या वस्तीत रात्री-बेरात्री पुन्हा शिरून दरोडे घालणे किंवा कंटकबाबूची जी हजार दीड हजारांची ठेव ते देणार होते ती मिळविणे. पूर्वीचा त्यांचा बेत असा ठरे की, रक्कम कंटकने सांगाती घेऊनच बंदिवानांच्या चाळीतून पळावयाचे. पण मध्यंतरी ती जावऱ्यांच्या छाप्याची अनपेक्षित संधी मिळाल्यामुळे ते अचानक रानात घुसले. त्यायोगे इतर सारी संकटे टळली, पण पैसा तेवढा सांगाती घेण्याचे हुकले. तेवढी अडचण तो कंटकपुढे मांडी आणि विचारी, “काय करावे बोला! दरोडा घालावा का तुम्ही ती ठेव काही युक्तिने अजूनही परत मिळवू शकता?”

कंटकने म्हणावे, “नको नको, दरोडा नको! आपण होऊन मृत्यूला आव्हानू नये शक्यतो! मी माझी ठेव ह्या ना त्या युक्तिने परत मिळवीन. अजून आशा आहे मला. दगडाखाली गुंतलेला हात अलगत शक्य तो काढणे बरे! नाही तर दांडगाईने हातच तुटायचा.”

दोन-तीन दिवस असे लोटताच काही अंशी राहवेना म्हणून, काही अंशी निरूपाय म्हणून कंटकने उद्दिनपाशी आपली बहीण सोडविण्याच्या बेताचा विषय काढला. उलट-सुलट अनेक बेत त्या दोघांनी योजून पाहिले. नक्की असे काही न ठरताच ते निजावयाला गेले.

पण उद्दिनच्या मनात त्या दिवसभर कंटकीच्या सोडविण्याच्या कल्पना सारख्या चालत असल्यामुळे तिच्यासंबंधीच्या इतर जिज्ञासाही साहजिकपणेच डवचल्या जाऊ लागल्या. अंथरूणावर पडता-पडताच तो चितू लागला, ‘ती कशी दिसते असेल? सोडवून आणलीस तर तिच्या संगतीत आपलाही वेळ गमतीत जाईल! कसा असेल तिचा स्वभाव? आणि जर ती चांगली दिसते असली नि स्वभावाने प्रेमळ असली, तर?’ अकस्मात् त्याची लालसा जागून उठली आणि म्हणाली, ‘तर तिला तू नि तुला ती हवीशी वाटणार नाही कशावरून? बरे, कंटक तर तिचा सख्खा भाऊच. तेव्हा

तिच्या कामुक अभिलाषात तरी तो प्रतिस्पर्धी होणे शक्यच नाही. फार तर त्याला तिचा माझा प्रेमसंबंध भाऊ नि पालक ह्या नात्याने आवडणार नाही, इतकीच भीती. पण, पण पण.....

उद्विनच्या अवचित एक उपाय सुचला, 'कंटकबाबूंचे उपकार जे आपल्यावर झाले तर फेडण्यासाठी आपण त्यांच्या जिवाला जीव देऊन त्यांना नि त्यांच्या ह्या बहिणीला काळ्या पाण्यावरून सोडवून सुरक्षितपणे परतीला पोहोचविण्यात सेवेची नि प्रामाणिकपणाची इतकी पराकाष्ठा करू या की, त्याच्या बहिणीने आपण होऊनच मला मागणी घालावी नि कंटकबाबूने ती आनंदाने पुरवावी!' लहाडी आशेला असंभव काय वाटणार?

पण ह्या लहाडी आशेने उद्विनची कंटकवरील निष्ठा नि अवलंब होता त्याहूनही अधिकच बळकट झाला खरा. पुन्हा, पैशाच्या वा सहकार्याच्या आवश्यकतेनेही कंटकवाचून त्याचे पदोपदी अडणारे होते ते निराळेच.

अशा मनःस्थितीत तो जावरा बरा होण्याची वाट पाहत ते तेथे जे दोनचार दिवस लपून राहत होते त्या अवधीत तिकडे त्यांच्यामागे सरकारी अधिकाऱ्यांच्या हालचालीही त्यांना अनुकूल अशाच होते होत्या. त्या संध्याकाळी जावऱ्यांच्या छाप्यासरशी रान सोडून नि जीव घेऊन सरकारी बंदिवानांची टोळी चाळीत परत गेल्यानंतर दुसऱ्या दिवशीं एक सशस्त्र सैनिकांची तुकडी त्या रानात धाडण्यात आली. त्यांना त्या वाटेवर जावऱ्यांच्या तीराने मारलेल्या त्या जमादाराचे प्रेत सापडले. तीरही सापडल्यामुळे त्याला जावऱ्यांनीच मारिले हे उघड होते. त्यावरूनच त्याच्या सांगाती असलेले जे दोन बंदिवान, कंटक नि उद्विन, त्यांनाही एकटे गाठून जावऱ्यांनी कोठे तरी त्या रानात ठार मारिले असावे, असाच तर्क सरकारी अधिकाऱ्यांनी केला आणि तो खोटा पाडण्यासारखा सबळ पुरावा मिळेतो त्या बंदिवानाचे नाव 'भगोडे' म्हणून घोषिण्याचेही स्थगित केले. ह्यामुळे त्या दृष्टीने त्यांचा पाठलाग वा टेहळणी कित्येक दिवस सरकारकडून कोठेही झाली नाही. हे कंटकच्या नि उद्विनच्या चांगलेच पथ्यावर पडले. दलदलीपर्यंत त्या रानाचा तो नवा भाग मात्र इंग्रजांने नित्याचाच वसाहतीत सामावला, त्यावर सक्त पहारा बसविला आणि जावऱ्यांनीही आपले बळाबळ ओळखून नेहमीप्रमाणे त्या भागांतली ये-जा बंद केली, आणखी एक पाय मागे घेतला आणि प्रकरण बिनबोलता मिटवून टाकले.

चार-पाच दिवसांनंतर त्या जावऱ्याचा पाय थोडा बरा झाला आहेसे पाहताच त्याला पुढे घालून त्याच्याच वशिल्याने त्याच्या जातीच्या जावऱ्यांकडे आसरा घेण्यासाठी कंटक नि उद्विन त्या घनदाट अरण्यातील त्या जावऱ्याच्या पूर्ण सरावाच्या असलेल्या चोरवाटांनी जावऱ्यांच्या त्या रानवट 'राजधानी'कडे चालू लागले.

पण जाता जाता त्या जावऱ्याच्या पोटात सारखी धडकी भरली होती की, जावरे त्यांचे स्वागत झाडांवरून अकस्मात् सणसणत येणाऱ्या विषारी शरांच्या माऱ्याने तर करणार नाहीत ना? कारण जावरे केव्हा केव्हा 'भगोड्यां'ना शरण येताच आसरा देतात हे जरी खरे असले आणि त्यांच्या स्वतःच्या जातीत कित्येत वर्षे आसरा दिलेला एक 'भगोडा' जरी त्याच वेळी नांदत होता, तरीही

ती त्यांची लहर ह्या प्रकरणी तशीच लागेले की नाही, ह्याची त्या जावऱ्यालाही शंकाच होती. कारण सध्या ते इंग्रजांवर म्हणजेच इंग्रजी बंदिवानांवरही उलटलेले होते. काही बंदिवानांना 'भगोड्या'च्या मिषाने त्यांच्या वसतीचा पत्ता लावण्यास हेर म्हणूनही इंग्रज धाडील, अशीही जावऱ्यांना धास्ती वाटत असतेच.

प्रत्येक पावली जावऱ्यांची ती रानवट राजधानी जसजशी जवळ येत चालली, तसतसे कंटकच्या नि उद्दिनच्या मनात धस्स होते होते की, ह्या जावऱ्याच्या संगती आपण जात आहोत म्हणून जावरे आपणासच आश्रय देतात, का आपल्यासारख्या 'इंग्रजांच्या माणसां'सह हा जावरा येत आहे म्हणून ह्यालाही जातिद्रोही समजून आम्हां सर्वांनाच विषारी बाणांचे भक्ष्य करतात! प्रत्येक पावली झाडीत थोडेसे कोठे खुट् झाले की त्यांना धडकी भरे की, टेहाळणीच्या एखाद्या जावऱ्याचा बाणच सणसणत सुटतो आहे की काय इथून की इथून की - इथून! ती राजधानी दोन- तीन मैलांवर आली, तेव्हा रात्र पडलीसे पाहून ते तिघे जण तिथेच थबकले. ती रात्र त्याच झाडीत त्यांनी काढली.

***

अठरा

पाहा जावऱ्यांची एक अनादी राजधानी!

एक राजधानी म्हणण्याचे कारण असे की, अंदमानातील आदिम मानवांच्या ज्या रानटी टोळ्या आहेत त्या तेथील विस्तीर्ण आणि घनदाट कांतारामध्ये मोठमोठ्या टेकड्यातून निरनिराळ्या स्थानी बसल्या तशाच पृथकपणे वसलेल्या आहेत. त्यांचे सगळ्यांचे मिळून काही राज्य नाही, संघ नाही. जी टोळी जेथे राहते त्यांची तेवढीच राजधानी, ती एक जातच निराळी होऊन पडलेली तशा निरनिराळ्या जातींपैकी ज्या जातीने इंग्रजांवर त्या दिवशी छापा घातला, ती टोळी येथे राहते. ही तिची राजधानी.

घनदाट झाडाझुडपांनी ह्या टेकडीच्या मध्यावर पठारासारखे एक मोकळे स्थळ होते. त्यांच्या बाजूला त्या टेकडीवरील खडकांत, लेण्यांच्या भागांत असतात तशी मोठमोठी चार-पाच फूट उंचीची आत खोलवर गेलेली आणि सलग लांब असलेली पाच-सहा भगदाडे होती. हेच त्या राजधानीचे तटबंद दगडी भक्कम गावठाण होय. त्या भगदाडात ते सारे नागरिक धर्मशाळेच्या सलग सोप्यात प्रवासी खेचाखेचीने जेवतात, निजतात, बसतात, तसे सामाईक कुटुंबाप्रमाणे पिढ्यान् पिढ्या वसत आलेले आहेत. ह्या विस्तीर्ण राजधानीतील प्रजाजनांची लोकसंख्या म्हणजे स्त्री-पुरुष बालिकांसुद्धा दीडशेच्यावर नसली तरी उणी तर नव्हतीच नव्हती.

त्या खबदाडातून भिंती नव्हत्या, तट्ट्या नव्हत्या, पोटभाग नव्हते. सारी राजधानी मिळून ते एकच घर होते आणि घरही खोली, माडी, मधले घर, सैपाकघर प्रभृति कोणताही विभाग असा पाडलेले नव्हे, तर एक सलग सोपा.

त्या खबदाडापुढील मोकळ्या पटांगणाला त्या खबदाडीतील मुख्य राजधानीचे उपनगर म्हणण्याला काहीच प्रत्यवाय नव्हता. त्या उपनगरात उघाडीच्या दिवसात उन्हामध्ये किंवा रात्री चांदण्यामध्ये विलासण्यासाठी काही विलासमंदिरेही प्रमुख घराण्यांनी बांधलेली होती. ज्यांना आपण घरे म्हणतो ती ती नव्हतीच; पण ज्यांना आपण झोपड्या म्हणतो तशीही ती नव्हती. बांबूच्या उभ्या- आडव्या चिरफळ्या बांधून केलेली एक लांब ताटी दोन-तीन झाडांना बांधून टाकली की ते विलासमंदिराचे बांधकाम उभारले गेलेच म्हणून समजावे. त्याच्यावर छप्परदेखील असण्याचे जावऱ्यांच्या शिल्पशास्त्राप्रमाणे वैध नव्हते, मग खिडक्या नि दारे ह्यांच्या अडगळीचे तर नावच नको. उंच खडकांच्या टोकावर खाली पाय सोडून मंडळी बसली असता मागे टेकण्यास हवे, तेवढ्यापुरती ती बांबूची ताटी बांधून टाकलेली असली की झाले ते विलासमंदिर.

त्या टोळीचा राजा जो नानकोबी त्यानेही स्वतःच्या राणीकरिता असे एक विलासमंदिर त्या राजधानीपुढील त्या उपनगरात बांधलेले होते. तेथील खडकाच्या लांब नि सलग पलंगावर आपल्या राणीसह आणि मुलांसह बसून त्या बांबूच्या ताटीला टेकीत नि खाली खोलगटात पाय सोडून झुलवीत राजा नानकोबी हा दुपारी ऊन खात असता किंवा रात्री चांदण्यांमध्ये त्याच मंचकावर सुखशय्येचे विलास उपभोगित असता उघडीच्या वेळी आढळे. पण पाऊस नेहमीचाच, ह्यास्तव

त्याचा बहुतेक काळ त्या खबदाडातील मुख्य राजधानीत इतर प्रजाजनांसहच सामाइकपणे नि सलगपणे जेवण्या-बसण्या-उठण्या-निजण्यात जाई.

दिवसभर ते राष्ट्रचे राष्ट्र जंगलात मृगयेसाठी निघून जाते असल्यामुळे सगळी राजधानी बहुतांशी ओसाडच असे. रात्री सगळेचे सगळे नाच असला तर त्या पटांगणात नाचत, नाही तर त्या दोन-तीन खबदाडांतून सारे पुरुष, बायका, मुले, एकदंडाळी, कोणत्याही अंथरूण-पांघरूणावाचून अगदी उल्लिंग अवस्थेत हसत-खेळत झोप आली की झोपी जाते; विवाहित स्त्री-पुरुष जोडप्यांनी आणि अविवाहित स्त्री-पुरुष ते सारे सरमिसळ!

त्यांचा तोच धर्म होता, नव्हे, सनातन धर्म होता. धर्माधर्मांत वडीलकीचा मान आजच्या आमच्या कोणत्याही धर्मांना लाभणार नाही. जावऱ्यांचेच नव्हत तर आपल्या मनुष्याजातीचेही 'तानि धर्माणि प्रथमान्यासन्'

त्या धर्माप्रमाणेच त्यांची दिनचर्याही जवळजवळ सनातनच होती. ती राजधानीच पाहा. ती तेथे केव्हा वसली हे सांगणे इतिहासाला वा स्मृतीलाही शक्य नव्हते. तरीसुद्धा तिच्या वयाची काही गणति करण्यासारखे एक कालमापक यंत्र तिला जोडलेले होते. ते यंत्र म्हणजे त्या टेकडीच्या त्या पटांगणाच्या बाजूला असलेला एक सडक तुटून खोलवर गेलेला हा नैसर्गिक खड्डा. ह्या वसतीतील जावऱ्यांच्या पिढ्यांमागून पिढ्या समुद्रावरील शिंपल्यांतले प्राणी धरून आणीत आल्या. आपण जसे शेंगा सोलून दाणे तोंडात घालतो नि फोलपटे खाली टाकतो, तसे ते त्या शिंपल्यातील प्राणी तोंडात टाकून त्या शिंपल्या त्या खड्ड्यात पिढ्यानपिढ्या फेकीत आले, त्या शतावधी वर्षे थरावर थर चढत शिलास्थि होऊन गेलेल्या (fossilised झालेल्या) शिंपल्याच्या अगडबंब ढिगाऱ्यांवरून काल वर्णन जर केले, तर युगोयुगे ही वस्ती तशीची तशीच तेथे वसत आलेली असली पाहिजे, ते जावरे प्रत्यही दुपारी समुद्रशिंपल्यांतील प्राणी शेंगाच्या दाण्यासारखे सोलून खात नि शिंपले त्याच खड्ड्यात टाकीत त्यांच्या त्याच सैपाकघराशी तसेच मिटक्या मारीत बसत आले असले पाहिजेत.

त्या राजधानीतले सारेचे सारे नागरिक त्यांच्या नेहमीच्या समुद्रनृत्याला आज पुन्हा जाणार होते. पुन्हा म्हणण्याचे कारण असे की, इंग्रजांशी मध्यंतरी ते 'युद्ध' चालू झाल्याने दहा-पंधरा दिवस त्या गडबडीतच गेले होते आणि नेहमीचा नाच-बीच झालेला नव्हता. त्यातही आजचा नाच त्यांच्या राष्ट्रीय विजयाचा होता. त्यांच्या मताप्रमाणे इंग्रजांशी झालेल्या युद्धात जावरेच जय पावले होते. त्या दिवशीच्या छाप्यात त्यांच्या मूठभर लोकांपुढे इंग्लिशांचे ते सहाशे-सातशे लोकांचे सैन्य पण उधळून जाऊन जीव घेऊन पळून गेले. इतकेच नव्हे, तर इंग्रजी सैन्यातला एक मोठा अधिकारी (म्हणजे तो सशस्त्र पोलिस) जावऱ्यांच्या एका वीराने नेमका बाण मारून ठार केला होता! तो वनाचा भाग जरी इंग्रजांनी घेतला तो घेतलाच, तरी त्याची काय खिसगणती! वाटेल तितकी रानडुकरे, दोन पायांनी जाता जाववत नाही इतके विस्तीर्ण घनदाट कान्तार आणि ज्याच्या टोकाला दृष्टी पोहोचत नाही इतका एकान्त सिंधुतट नि वाळवंटे जोवर निर्वेधपणे

आपल्याला मोकळी आहेत, तोवर अरण्याचा इंग्रजांच्या हाती पडलेला तो नवा तुकडा म्हणजे लक्षाधीशाच्या खिशातून सांडलेली एक कवडी! युद्धाचा हेतू ते अरण्य हा तितका नव्हता की जितका होता जावऱ्यांचा अपमान! त्याचा सूड त्यांनी उगवला होता.

आणि सूड हाच जावऱ्यांचा जय असतो. त्यांचा क्रोध जितक्या लवकर भडकून उठतो, तितक्याच लवकर शमतो, त्यांच्या वैयक्तिक शत्रूचासुद्धा तेथल्या तेथेच तो आहे तोवर सूड उगविण्यास ते सोडणार नाहीत. पण जर तो काही वर्षे बेपत्ता झाला, तर त्याचे त्यांना इतके विस्मरण होते की, तो पुन्हा त्यांच्यात परतला तरी त्याचा राग त्यांना आठवत नाही. तो मिसळून जाऊ शकतो त्यांच्यात. इंग्रजांनी केलेल्या आगळिकेचाही त्या छाप्यात त्यांनी जो सूड उगविला तेवढा त्यांचे समाधान करण्यास पुरेसा झाला. त्या त्यांनी मिळविलेल्या जयाच्या उत्साहात त्यांना अद्याप आठवावे असे शल्य इतकेच होते की, राजा नानकोबीचा तो मेहुणा तेवढा पायात गोळी लागून घायाळ झाल्यामुळे तिकडेच कोठे दडलेला होता. पण तो सुखरुप परत येणार, ह्याविषयी त्यांना शंकाच नव्हती. कारण तो काही इंग्रजांच्या हातात पडलेला नव्हता, तर होता हातात पडलेला त्या दुष्ट अरण्यभूतांच्या त्या 'एरेमचौगा'च्या!

होय, त्या जावऱ्यांत जी एक पंचाक्षरीण होती, तिला परवा रात्रीच राजा नानकोबीने त्याच्या त्या हरवलेल्या मेहुण्याचा पत्ता मंत्र-तंत्रबळाने काढण्यास सांगितले होते. तेव्हाच्या पंचाक्षरीण स्त्रीने आगीसमोर बैठक मारली. विस्तवाकडे टक लावून त्या ज्वाळात काहीशी आकृती बघत ती बराच वेळ गुंगल्यासारखी बसली, मग आवेगाने एकदम उठून त्याने तिच्या गळ्यातली प्रेताच्या हाडकांची माळ घेतली आणि ती त्या आगीभोवती किचाळत नाचू लागली. "हां हां! समजले, हा पाहा तो 'एरेमचौग'! बोल! काय खाष्टपणा केलास, बोल!"असे आव्हानून वाऱ्यातून कोणी बोलावे नि आपण ऐकावे तसे ऐकू लागली आणि मग म्हणाली,

"अस्सं! अस्सं! ऐकलेस राजा नानकोबी? आपल्या जावऱ्यांचा शत्रू जो हा एरेचौग, हे अरण्याच खाष्ट भूत, त्यानेच तुझ्या मेहुण्याचा विश्वासघात केला बघ! तो वीर दाट झाडीत छपून इंग्रजांवर बाण मारतो आहे, पण इंग्रजांना तो दिसते नाही; इतक्यात ह्या खाष्ट अरण्याच्या भुताने त्या साऱ्या फांद्या बाजूला वाकविल्या बघ! त्यासरशी तो वीर उघडा पडला. इंग्रजाने पाहिले, नेम धरला, जावरा वीराच्या पायाला गोळी लागली! नाही तर इंग्रजांची काय बिशाद होती की जावऱ्याला तो पाहू शकता! रे दुष्टा एरेमचौगा, आता झाले ते झाले, आता तुझ्याच अरण्यात तू अडकवून ठेवलेला आमचा तो वीर दोन-तीन दिवसांच्या आत आमच्याकडे सुरक्षितपणे आणून पोचीव, नाही तर ह्या रानात जिकडे-तिकडे मोठमोठ्या आगीच पेटवून देईन नि ह्या चिंधीसारखा तुला त्या आगीत जाळून टाकीन!"

असे बोलत आपल्या कटीभोवती बांधलेली एक लाल कपड्यांची बोटभर रुंदीची चिंधी ती सोडू लागली. पायांपासून माथ्यापर्यंत तिच्या अंगावर, जावऱ्यांच्या कोणत्याही स्त्रीप्रमाणे वस्त्र असे नव्हतेच आणि ती लाल चिंधी तिने जी कटीला बांधली होती ती देखील एक मंत्रतंत्राला करगोटा

म्हणून! करगोट्यासारखीच ती चिंधी बारीक होती. तिच्यायोगे कोणताही अवयव झाकण्याचे दुष्कर्म घडणे मुळीच शक्य नव्हते.

ते अरण्यातले भूत, ते एरेमचौगा, आगीला भयंकर भितो. ती चिंधी त्या पंचाक्षरिणीने आगीत टाकताच जशी भुरकन् जळून गेली, तशी आपलीही गत होईल, अशी धास्ती खाऊन त्या अरण्यभुताने तिला वचन दिले की, दोन-तीन दिवसांत त्याने अरण्यात अडकविलेल्या जावऱ्याला राजा नानकोबीकडे सुखरुपपणे परत धाडण्यात येईल!

ह्या आश्वासनामुळे अर्थातच जावऱ्यांची त्या युद्धातली होती नव्हती ती हानीही भरून निघणार, असे पाहून सर्वांनाच मोठा आनंद झाला होता, आणि म्हणूनच आजचे ते होणारे त्यांचे सिंधुपुलिनावरील विजयनृत्य मोठ्या थाटामाटाने पार पाडण्यास जो तो जावरा उत्सुकला होता.

पहाटेसच ते राष्ट्राचे राष्ट्र नित्यक्रमाप्रमाणे मृगयेला निघाले. बायका, पुरुष, मुले, सारेचे सारे! ज्याचे-त्याचे धनुष्यबाण लहान मोठ्यासुद्धा ज्याच्या-त्याच्या हाती. राजधानीत घर असे नव्हतेच, तेव्हा मागे दारे लावण्याचेही कारण नव्हते. दारच नसल्याने कडी -कुलुपाचे तर नावच नको. आणि कडीकुलपाला नाव नाही मुळी जावऱ्यांच्या भाषेत! मागे सामान असेही काही राहणारे नव्हते. ज्याचा-त्याचा संसार म्हणजे जो तो आणि त्याच्या हातातील तिरकमठा, गळ्यातील कवड्यांची व मण्यांची माळ! काही हत्यारावाचून अडगळ अशी नाही त्यांच्या घरात. वस्त्राचे तर नावच नव्हते. अन्नाविषयी तर धान्याचा साठा, बळदे, पोती, पेवे, डबे, मिळून साठवण अशी म्हंटली म्हणजे ते अरण्य नि तो समुद्र! कालच्या संध्याकाळचे खाणे कालच चट्टामट्टा करून टाकलेले. आजचे आता जे मृगयेत मिळेल ते. “ Enough unto the day the evils thereof. Let Tommorow take care of its own. सहस्त्रावधी वर्षांपूर्वीपासूनच ते जावरे ख्राइस्टचे हे धर्मसूत्र प्रत्यही आचरीत आलेले आहेत.

राजधानी एखाद्या वाटेवरील धर्मशाळेसारखी ओस पाडून जावऱ्यांचे ते राष्ट्रचे राष्ट्र त्यांच्या प्रत्यहीच्या दिनचर्येप्रमाणे सकाळीच असे रानावनात मृगयेला निघून गेल्यानंतर थोड्याच वेळात त्यांच्यातील मंडळी ज्याच्या-त्याच्या लहरीप्रमाणे नि सोयीप्रमाणे वेगवेगळ्या मृगयेच्या मागे लागते रानभर पांगून गेली. काही बायका-मुले धनुष्य-बाण वा दगड-धोंडे घेऊन पक्षी मारीत चालली. काही स्त्री-पुरुष मोठमोठ्या रानडुकरांच्या मागे लागले. काही समुद्राकडे वळून खडका-खडकांवर मोठमोठे मासे वर उफाळतात केव्हा नि त्यांना बाणांनी विधतो केव्हा, असे उतावळे होत्साते बगळ्यासारखे टपून राहिले.

राजा नानकोबी नि त्याची राणी, ‘फुली’ ही जरी राजा-राणी असली, तरी इतर कोणत्याही प्रजाजनांप्रमाणे त्यांची मृगया त्यांनाच करावी लागे, नाही तर उपाशी राहावे लागे! जावऱ्यांत राजाला कोणीही कर देत नसतो, राजापाशी एकही पोलिस वा चाकर वा चाकराणी राजा म्हणून नसते. संधि-विग्रह, संकटबिकट अशा प्रसंगी तो त्यांचा पुढारी असतो, त्याच्या विचाराचे विशेष महत्व असते, इतकेच त्याचे राजेपण. त्याच्याकडे जाती जातीतील भांडणांविषयीचे, न्यायांन्यायाचे

कामदेखील निर्बंधदृष्टीने नसते. कारण जावऱ्यांत जो ज्याच्याशी भांडेल, त्याने ज्याचे जमेल तसे पारिपत्य करावे वा करू नये. जातीय न्यायालयाचा तो प्रश्नच नसतो. व्यक्तीच्या शत्रूला व्यक्तीने ठार मारावे वा मारू नये. तो व्यक्तीचा प्रश्न, जातीचा नव्हे. न खटला, न चौकशी, न दंड, न कारागार, न पोलिस, न पाटील. अशी आहे त्यांची राज्यघटना आणि असा मुकुट तर काय पण लंगोटीसुद्धा न धारण करणारा राजा नि कटीखाली अचभर लटकावलेल्या एखाद्या झाडाच्या सुरेख कातरपानांवाचून पैठणी अशी जिला ठाऊकच नाही अशी असते त्यांची राणी!

त्या दिवशी सगळ्यांसहच मृगयेला निघताना राणी तिच्या एक वर्षाच्या मुलालाही आपल्या पाठीवर उभे करून नेले होते. आपल्या जिकडे कातकरी प्रभृति बाया मुलाला पाठीशी एखाद्या झोळीत ठेवून नेतात किंवा मूल आईच्या पाठीमागून गळ्याला हातांची नि पोटाला पायांची मिठी मारून पाठंगुळी बसते; पण अंदमानी स्त्रिया एक पट्टी डोक्याच्या टाळूवरून अडकविलेली पाठीवर सोडतात, मूल पाठीशी घेतले की त्या पट्टीवर टेकते किंवा आईच्या ढुंगणावर घडवंचीवर टेकावे तसे पाय टेकून पट्टीला धरून उभे राहते. त्या पट्टीच्या नेहमीच्या बोजामुळे त्या स्त्रियांच्या टाळूवरचे हाड अगदी स्पष्ट दिसावे इतके दबून त्याला नित्याचीच एक खळणी पडते. त्यात ती पट्टी पक्की बसते आणि तिकडील प्रौढ स्त्रियांच्या कटीचे हाड नि ढुंगण मूळचेच इतके प्रशस्तपणे वर आलेले आणि रूंदावलेले असते की, मूल त्या ढुंगणावर अगदी सहज पाय टेकून उभे राहू शकते. ह्यामुळे आपल्या इकडील स्त्रियांच्या पाठंगुळी मूल बसते जसे असे म्हणावयाचे, तसे तिकडच्या स्त्रियांच्या पाठीशी मूल ‘उभे राहते’ असेच म्हणावे लागते.

राजा नानकोबीच्या त्या मुलाचे नाव, राणी फुली गर्भवती झाली तेव्हा ‘कोरी’ असे ठेविले होते. कारण जावऱ्यांच्या स्मृतिशास्त्राप्रमाणे स्त्रिया गर्भवती झाल्या की त्या मुलाचा नामकरणसंस्कार लगोलग करावा लागतो. अर्थातच मुलांमुलींच्या पहिल्या नावात भिन्नता नसते. त्यायोगे त्या मुलाच्या ‘कोरी’ नावावरूनच ते जावऱ्यांचा युवराज वा राजकन्या होती, हे वाचकांना कळवण्यासारखे नसल्यामुळे मुलगा होता, युवराज होता, हे स्वतंत्रपणे सांगणे भाग आहे. मुलगी असती तर तिचे हे पहिले गर्भारपणातील सामान्यलिंगी नाव ती वयात येताच पालटून त्या तिच्या पहिल्या अृतूंतू जी फुले फुलली असतील, त्यातील एक नाव तिला देण्यात आले असते. नामकरणांची ही पद्धत हा त्यांचा सनातन धर्माचाच एक जातीय संस्कार आहे. प्रत्येक मुलीचे हे नाव पालटते, तसेच राणीचेही तिच्या जन्मापूर्वीचे, तिच्या आईला तिचा गर्भ राहिला तेव्हाचे जे सामान्यलिंगी नाव होते, ते पालटून ती राणी ऋतूमती झाली तेव्हा जिकडे तिकडे फुलेच फुले फुलली असल्यामुळे तिचे दुसरे नाव हे ‘फुली’ असेच ठेवण्यात आले.

त्या जावऱ्यांपैकी जे लोक समुद्रावर मासे मारण्यास गेले होते, तिकडेच राजा नानकोबी नि त्या मुलाला पाठंगुळी उभे केलेली राणी फुली ही पण गेलेली होती. उंच खडकांच्या सुळ्या-सुळ्यांवर धनुकलींना बाण जोडून जावरे उभे होते. खाली समुद्राच्या लाटांवर लाटा त्या खडकाच्या भितीशी टक्कर घेत धडाधड फुटत होत्या. मधूनच एखादा मासा वा माशांचा थवा त्या लाटांवर

उसळून येत होता. पांढरे शुभ्र असे गिधाडांसारखे पक्षी आकाशातून समुद्रावर उंच-निच असे सारखे घिरट्या घालीत होते. त्यांच्या पडछाया ह्या लाटात उमटत, तेव्हा वाटे की, ते पक्षीच लाटांवर पोहत आहेत. पण केव्हा केव्हा जेव्हा कोणी पाणजीव समुद्रावर थव्याच्या थव्याने उसळून येत, तेव्हा ते अनेक अवजड सुशुभ्र पक्षी झेप घालून खरोखरीच त्या लाटांवर पोहू लागते, त्यांची रांगची रांग लाटांवर नि पडछाया लाटांतून डोलताना ती निळ्या समुद्राची लाटची लाट अशी पांढरे शुभ्र दिसे की, जशी ती क्षीरसागराच्याच दुधासारख्या लाटातील एक चुकून इकडे वाहवत आली आहे.

पाण्यावर येणाऱ्या मोठाल्या माशांवर जावऱ्यांचे नेमके बाण सुटताच ते मासे सळ्कनी समुद्रात गडप होते. असे तासभर बाण मारीत राहिल्यानंतर राजा नानकोबीने आणि त्याच्या मागोमाग इतर जावऱ्यांनी त्या उंच सुळक्यांवरून त्या सखोल समुद्रात धडाधड उड्या घेतल्या, तीन-तीन पुरुष खोल पाण्यात बुडी घेऊन ते समुद्राच्या तळाशी गेले. पाणबुडीपणात जावरे लोक अत्यंत पटाईत असतात. तो त्यांचा प्रत्यहीचा खेळच असतो, उपजीविकाही असतेच. ज्या माशांमध्ये ते त्यांचे तीक्ष्ण शर खिळून गेलेले असतात, ते मासे अर्थातच तळाशी जाऊन पडलेले सापडतात. त्यातील शक्य तितके मासे पाठीवर घालून वा बांधून त्यांना ते वर घेऊन आले. वाळवंटावर येताच ते घबाडचे घबाड त्यांनी खाली टाकिले. सारे जण त्याच्याभोवती जमून हसत, खिदळत, कोणत्या बाणाने कोणा माशाला मारले त्याची चर्चा नि बढाई करण्यात रंगून गेले. मग त्यांनी मोठी आग पेटविली. तीवर ते काही मासे, त्यांच्या बायकामुलांनी पारध केलेले पक्षी, इतरांनी आणिलेली एक-दोन रानडुकरे, असे ते साऱ्या टोळीने मिळून उपार्जिलेले खाद्य अवश्य तितके त्या आगीत काही भाजले, काही संध्याकाळला ठेविले. त्या वेळेपर्यंत सकाळी फुटून गेलेले त्यांचे सगळे लोक बहुतांशी परतलेले होते. मग शुभ्र नि प्रशस्त वाळवंटात उन्हाच्या उबेत यांचे वनभोजन चालू झाले. त्या घनदाट झाडीतील पावसात नि समुद्रातील पाण्यात सकाळपासून भिजून भिजून ते चिंब झालेले नि कुडकुडत होते. त्यामुळे त्या उन्हात त्यांची अंगे वाळत असता शीतले चांदण्यात जेवताना जशी आपल्याला गंमत वाटते, तशी त्यांना त्या उन्हातील भोजनात मोठी गंमत वाटते होती. काही भाजलेले, काही अर्धे-कच्चे, काही कच्चे मास-ज्यांना जसे आवडले तसे त्यांनी गट्ट केले. कठीण हाडे दोन्ही हातांनी कडाकड मोडीत त्यांच्या सांध्यातील रस कोणी सुपसुप चोखला तर कोणी कोवळी-कोवळी हाडके जशीच्या तशीच दातांनी कचाकच चावून चावून खाऊन टाकली. जावरे सर्वच पदार्थ कच्चे खातात तसे मांसही कच्चेच खातात. अगदी पक्कान्नाचाच बेत ठरला तर भाजलेले मांस! पण भाजण्यापुढे शिजवणे, रांधणे, मसाला घालणे, फार काय सैपाक करणे हा शब्दसुद्धा त्यांच्या भाषेत नाही.

इतक्यात राजा नानकोबीने हातवारे करीत विचारिले,

“डोलकाठी? विलायती पाणी!”

जावऱ्यांच्या भाषेत शब्द असे आधीच मोजके. त्यातही त्यांना शब्दापेक्षा डोळे नि हातवारे ह्यांनीच शक्य तितके बोलण्याची आवड, शब्दांचा कंटाळा. ह्यामुळे सबंध वाक्य बोलायचे, तर एक शब्दांत बोलतील आणि त्यांचा उरला अर्थ हावभावांनी पुरा करतील. राजा नानकोबीने जेव्हा नुसता 'डोलकाठी' इतकाच शब्द उच्चारला, तेव्हा त्यानेही त्या वाक्याचा उरला भाग हाताने नि डोळ्याने भरून काढला होता. ते सारे शब्द नि हावभाव मिळून मराठीत तेच वाक्य लिहिले, तर त्या एका शब्दाचा सारा अर्थ असा होईल-

"काय, तो आपला 'डोलकाठी' कुठे गेला आहे? बरेच दिवस येत नाही आताशी इकडे? का बरे? तो असता तर ते 'विलायती पाणी' - ती दारू यथेच्छ पाजता! तिची तेवढी उणीव आहे आता."

त्याला एका जावऱ्याने दोन शब्द नि दहा हातवारे नि दृष्टिविभ्रम करून जे उत्तरे दिले त्याचा भावार्थ एवढा होता- "तो 'डोलकाठी' जावऱ्यांच्या जातीची जी एक दुसरी 'टटोबी' नावाची टोळी त्या अरण्याच्या एका दुसऱ्या विभागात वसत असे, त्यांच्यातही त्याची ओळख असल्यामुळे तिकडे गेलेला आहे आणि थोड्याच दिवसांत परतणार आहे."

पण त्याच्यासाठी आजचे विजयनृत्य थोडेच थांबावयाचे होते! मृगया नि नाच हा तर जावऱ्यांच्या जीवनाचा श्वासोच्छवास! त्यातही त्या इंग्रजांशी झालेल्या लढाईच्या गडबडीत नाच असा झालेलाच नव्हता! त्या हौसीच्या उपासमारीचे आज केवळ पारणेच होते! असे नाचासाठी उत्सुकलेले ते जावरे पुरुष, स्त्रिया, मुले, सारे त्या प्रशस्त वाळवंटातील नृत्यांगणात धो-धो जमले. कोणी मोठमोठ्याने दंड थोपटू लागले, कोणी उगाच एकेकटे उड्या नि कोलांट्या मारू लागले, कोणी गर्जू लागले, कोणी तीन-चार शब्दांचेच गाणे कसल्या तरी एकस्वरी सुरावर सारखे म्हणत घुमू लागले. बहुतेक स्त्री-पुरुष अगदी नागवे. काही नटवे स्त्री-पुरुष एखादे-दुसरे छानदार पान कटीपुढे पण ओटीपोटाच्या खाली फारसे लांबणार नाही अशा बेताने लटकविलेले - तेही शृंगार म्हणून, आच्छादन म्हणून नव्हे! दोघे-तिघे-चौघे हातात हात घालून नाचू लागता-लागता चाळीस-पन्नास स्त्री पुरुषांच्या हाताची साखळी गुंफलेली एक वर्तुळचे वर्तुळ मध्यंतरी शास्त्रोक्तपणे राखलेल्या एका वाटोळ्या रंगाभोवती नाचू लागले. त्या एकसुरी थोट्या नि तुटक्या तालाच्या गाण्याला सारखे गात-गात घुमत घुमत त्या नाचाचे नुसते थैमान झाले. एक दमला की साखळीत दुसरा घुसे. दमणे हा तर वैयक्तिक उणेपणा समजला जाईच, पण साखळी तुटू देणे किंवा ते घुमणे नि थैमान ढिलावू देणे हा जातीय उणेपणा ठरणारा होता. त्यांचा राष्ट्रीय देव जो भगवान पुलगा त्याच्या उपहासाला नि धिक्काराला पात्र होणे होते, जावऱ्यांच्या सनातन धर्माच्या विरूद्ध असे ते पापाचरण झाले असते. शेवटी जेव्हा नाचाच्या समाप्तीची वेळ आली, तेव्हा तर त्या वर्तुळाच्या नृत्योन्मादाला सीमाच राहिली नाही. भरभर नि गरगर फिरणाऱ्या त्या नाचत्या वर्तुळावर डोळा ठरेनासा झाला!

आजच्या युरोपमधल्या कोणत्याही नग्न संघाचे सभासद जर त्या वेळी तेथे असते, तर या जावऱ्यांच्या त्या सरमिसळ स्त्री-पुरुषांना त्या उल्लिंग नृत्यात तसे देहभान विसरून गेलेले

पाहताना तोंडात बोटे घालून म्हणू लागते, “वा रे वा! नंगा नाच असावा तर असा असावा!” मार्क्सच्या शतावधी वर्षांपूर्वीपासून जावरे जसे समाजसत्ताक होते, तसेच आजच्या युरोपियन नग्नसंघाच्या अत्युच्च महत्वाकांक्षा शतावधी वर्षांपूर्वीच त्यांनी व्यवहारून टाकिलेल्या आहेत.

तो नाच संपतो न संपतो तोच एक जावरा मोठ्याने टाळी वाजवून बोट दाखवीत ओरडला, “डोलकाठी! डोलकाठी!” पाहतात तो डोलकाठी खरोखरीच येत आहे आणि त्याच्या काखेत नि हातांतही ‘विलायती पाण्या’च्या बाटल्या आहेत! जावऱ्यांच्या आनंदाला पारावार नाहीसा झाला!

जावऱ्यांना तंबाखू प्रथमपासूनच फार आवडते नि गेल्या चाळीस-पन्नास वर्षांपासून त्यांच्यात विलायती मद्याचाही शिरकाव थोडा बहुत झालेला आहे. ते जर दारूच्या व्यसनाच्या पूर्ण आहारी अद्याप गेले नसले, तर ते त्यांना अतिशय आवडत नाही म्हणून नव्हे तर मिळत नाही म्हणून. हा ‘डोलकाठी’ जो त्यांच्यात आजकाल इतका आवडता झाला आहे, तो त्याच्या मनमिळाऊ गुणांमुळेच होय.

ज्या मनुष्याचे नाव जावऱ्यांनी असे ‘डोलकाठी’ ह्या अर्थाच्या जावरी शब्दात ठेविले होते, तो एक मूळचा ‘भगोडा’च होता. इंग्रजांच्या काळ्या पाण्यावरील जन्मठेप बंदिवानांपैकीच तो एक असून बऱ्याच वर्षांपूर्वी तो बंदिवासातून पळून गेला होता. पण हिंदुस्थानात परतण्याचा त्याचा बेत एकदा फसल्यामुळे आणि त्या साहसात काही जावऱ्यांची नि त्याची रानामध्ये ह्या विलायती पाण्याच्या वशिल्यानेच दाट ओळख झाल्यामुळे ह्या जावऱ्यांच्या टोळीत त्याला गेली तीन-चार वर्षे आसरा मिळाला होता. तो चोरून-मारून अंदमानाच्या इंग्रजी वसाहतीत जाई, जावऱ्यांनी दिलेले अनेक सुंदर नि मोठमोठे शंख आणि दोन-दोन फुटीचे वेळण्या-ताटल्यांसारखे रुंद नि गुलाबी शिंपले त्या बंदिवान वसाहतीतील व्यापाऱ्यांना चोरून-मारुन विकी, बहुतेक पैसे गाठीला घाली आणि उरलेल्यापैकी थोडेसे विलायती मद्य नि पुष्कळशी तंबाखू गुप्तपणे जावऱ्यांना आणून देई. त्यांच्यात तो अगदी त्यांच्या जातीचाच एक आप्त असावा तसा मिसळून गेला होता. तो त्यांची बोली बोले, खाणे खाई, नागवा राही, रंगी मातीचे पट्टे अंगावर फाशी, त्यांच्या सुख दुःखात समवेदक होई, त्यांच्या स्त्री-पुरुषांत ते जसे सरमिसळ नाचत, निजत, तसाच तोही मिसळून नाचे, निजे.

ते जावरे त्याला आवडीने ‘डोलकाठी’ ह्या अर्थाच्या नावाने जे संबोधित, तेही त्याला अगदी शोभेसेच होते, कारण त्याच्या कटीपर्यंत लागणाऱ्या त्या ठेंगू आणि बूटपॉलिशासारख्या काळ्या कुळकुळीत जावऱ्यांच्यामध्ये तो निमगोरा नि सहा एक फूट उंचीचा हिंदु भगोडा उभा राहिला की दिसेच मुळीं डांबर फासलेल्या तारवाच्या मधोमध उभारलेल्या एखाद्या ‘डोलकाठी’सारखा! ह्या साम्यावरूनच जावरे विनोदात त्या नावाने त्याला संबोधू लागले.

ज्यांनी त्याला त्या पाळीला शंख नि शिंपले दिले होते, त्यांना त्यांना त्याने चार-चार घोट मद्य पाजले, इतरांना यथेच्छ तंबाखूचे बोकणे भरविले आणि राजा-राणीला तर मद्याचे दोन सबंध पेले काठोकाठ भरून अर्पण केले. त्या रंगात राजा नानकोबी नि राणी फुली ह्यांनी

'डोलकाठी'चा एकेक हात धरून आणि त्याला मध्ये घेऊन त्याच्या सन्मानार्थ आपल्या तिघांचा एक स्वतंत्रच नंगा नाच चालू केला.

जावऱ्यांच्या त्या विजयनृत्याचे ताबूत शेवटी सिंधुतटावर 'विलायती पाण्या'त असे थंडे होते असता तिकडे मागच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे त्या घायाळ जावऱ्यांसह कंटक नि रफिउद्दिन त्या राजधानीपासून मैलाच्या अंतरावर येऊन थबकले होते. त्या घायाळ जावऱ्याने त्यांना 'डोलकाठी' नावाच्या भगोड्यास जावऱ्यांनी गेली दोन वर्षे कसे सांभाळले आहे आणि जर कंटक नि रफिउद्दिन त्यांना तसेच उपयोगी पडतील, मद्य नि तंबाखू पुरवितील, तर त्यांनाही जावऱ्यांचा सर्वतोपरी पाठिबा नि प्रीती कशी मिळू शकेल ते सांगितले होते. पण पहिली अडचण होती ती ही की, ते हिंदी बंदिवान इंग्रजांचे लोक! आणि जावरे त्या वेळी इंग्रजांवर बिघडलेले! त्यामुळे जर त्यांनी त्या घायाळ जावऱ्याला त्यांच्या सांगातीच येताना पाहिले, तर ते जावरे क्वचित् अकस्मात् त्या जावऱ्याचीही शंका घेतील. चिडून उठतील, विषारी बाणाचा पाऊस पाडतील! ती आपत्ती टाळण्यासाठी शेवटी असे ठरले की, कंटक नि रफिउद्दिन ह्या दोघांनी ती रात्र त्या अरण्यातच छपून काढावी; त्या घायाळ जावऱ्याने एकटेच पुढे जाऊन आपल्या टोळीला मिळावे; म्हणजे त्यांचे स्वागत शेकडा नव्याण्णव अंशी बिनधोक केले जाईल. मग त्याने जावऱ्यांना कंटक-उद्दिनच्या जोडीनेच त्यास कसे वाचविले, ती जोडी इंग्रजांचे लोक नसून त्यांचे सध्या कसे कट्टर शत्रू आहेत, 'भगोडे' आहेत आणि जावऱ्यांना नाना प्रकारच्या मद्य, तंबाखू, काचमणी, रंगी रेशमी वस्त्रांच्या पट्ट्या प्रभृति वस्तूंचा सदैव पुरवठा करणार आहेत, ते युक्ती-युक्तीने सांगावे आणि मग त्या घायाळ जावऱ्यांचा जीव वाचविण्याच्या उपकारासाठी त्या नव्या भगोड्यांना आश्रय देण्यास टोळीचे आणि राजा-राणीचे मन कळवावे. तितके काम साधताच त्या जावऱ्याने ह्या अरण्यात परत येऊन कंटक-उद्दिनला सांगाती घेऊन जावे, असा बेत ठरला.

ह्या बेतामुळे जावरा बराचसा निर्भय झाला आणि लगोलग जावऱ्यांच्या राजधानीकडे निघाला. कंटक नि रफिउद्दिन हे त्या रानातच थबकले. त्यांच्या पोटात मात्र जावरे काय करतील नि काय नाही, अशी धडकी भरलेलीच होती. त्यातही रफिउद्दिनच्या मूळ आततायी वृत्तीविषयी कंटक नेहमीच मनातल्या मनात साशंक नि सावध असल्यामुळे आणि आपण आता घडवून आणू इच्छितो त्या मालतीच्या मुक्ततेनंतर हा राक्षस पूर्ववैर उघडे होऊन आपल्यावरही ह्या एकान्तात उलटेल की काय, अशी धास्ती त्याच्या मनात सारखी डोकावत असल्यामुळे, कंटक ती बंदूक नि तो दारूगोळा अगदी न विसरता पण वरकरणी सहजपणे आपल्याचे हाती राखून ठेवू लागला होता. त्यातही त्या दोघांच्या पुढे आता एक नवीनच प्रश्न उभा ठाकला- हा 'डोलकाठी' कोण? जावऱ्यांवर इतकी वर्षोनुवर्षे छाप पाडणारा हा हिंदी 'भगोडा' कोणी तरी कर्ता माणूस असला पाहिजे! तो त्या जावऱ्यात तेथेच असा का राहिला आहे? तोही समुद्र उल्लंघून पळण्याची संधी पाहात आहे की काय? साधने जुळवीत आहे की काय? कोणी तर कर्ता माणूस आहे त्या अर्थीच तो झाल्यास उपयोगी मित्र नाही तर उपद्रवी शत्रू! कोण ठरेल तो?

आणि सगळ्यात मोठी नि निकडीची विवंचना म्हणजे ह्या घायाळ जावऱ्याला भेटताच राजा नानकोबी काय म्हणतो, काय करतो?

***

एकोणीस

जावऱ्यांचे जयनृत्य संपल्यावर सूर्य तिकडे अस्ताचलाकडे जाते असता ते इकडे आपल्या राजधानीकडे परतू लागले. राजा नानकोबी त्या खबदाडातील आपल्या राजवाड्यात न जाता त्या पटांगणातील त्याच्या त्या विलासमंदिरातच गेला. त्या विलासमंदिरातील राजशय्या होती एक शिळा; छत म्हणजे आकाश, तीन बाजूंच्या भिती म्हणजे दिशा, चौथ्या बाजूची भित म्हणजे टेकण्यापुरती झाडांना बांधलेली ती बांबूची ताटी, तोच होता त्या राजशय्येवरील लोड! पण! त्याला टेकून शिला-शय्येवर नानकोबी बसला. "फुलीऽऽऽऽ" अशी त्याने एक प्रेमळ हाक मारताच राणी फुली पण हसत हसत आली. त्यांच्या डोळ्यात कामुक लंपटता नि हृदयात ते 'विलायती पाणी' सळसळत होते.

पावसाची त्या वेळी उघाड होती. संध्याकाळच्या उन्हाची रंगी-बेरंगी कोवळी किरणे हलत्या-डुलत्या झाडीतून जिकडे-तिकडे बागडत होती. प्रणयाच्या लडिवाळ हावभावांना करीत राणी फुली, एका हाताने एक काचेची धार लाविलेला तुकडा पुढे करून आणि दुसऱ्या हाताने एखाद्या ब्रशाइतके नि ब्रशासारखे केस वाढलेल्या आपल्या मस्तकास दाखवून आर्जविती झाली, "तास नं"

त्या तिच्या अभिनयाचा नि शब्दांचा मिळून एकत्र अर्थ होता की, 'केस किंचित वाढल्यामुळे विशोभित झालेल्या माझ्या ह्या मस्तकाची ह्या काचेच्या तुकड्याच्या वस्तऱ्याने गुळगुळीत श्मश्रू कर न! डोई कर न प्रियकरा, माझी अगदी तुझ्या स्वतःच्या हाताने!'

आपल्या इकडे प्रिय पत्नीच्या केशकलापाची कोण्या विलासी पतीने स्वहस्ते वेणी घालणे हा जसा प्रणयाचा लाडिकपणा आहे, बैल आपल्या शिगाने गायीला खाजविताना किंवा चाटताना जसा प्रेमात आलेला असतो, तसे प्रेमात आले असता आपल्या प्रियकरणीच्या मस्तकावरील वाढू लागलेले केस अगदी हलक्या हाताने 'तासून' तिची गुळगुळीत डोई करणे ही जावऱ्यातील लडिवाळ प्रेमिकांची एक हौस असते. त्यांच्या रतिविलासातील तो एक शृंगार आहे. विधवेचे केशवपन हे आपल्या धर्मशास्त्राप्रमाणे जितके अनिद्य-नव्हे जसा एक अनुल्लंघ्य धर्मसंस्कार, तसेच सधवेचे केशवपन हे जावऱ्यांच्या धर्मशास्त्राप्रमाणेही एक सौभाग्यलक्षण नि एक धर्मसंस्कार समजला जातो!

आपल्या प्रिय पत्नीची ती हौस पुरविण्यासाठी नानकोबीने लगेच तिला जवळ घेतले. शिलाशेजेवर तिला निजवून, तिचे डोके आपल्या मांडीवर घेऊन त्या काचेच्या धारदार तुकड्याने तो लडिवाळपणे आणि हळूवार हस्ते तिची डोई करू लागला. डोई झाल्यावर ती जेव्हा उठून बसली तेव्हा तिच्या गुळगुळीत मस्तकाने अधिकच शोभणारी ती विकेशा राणी फुली त्याला इतकी आकर्षक भासू लागली की, त्याने आवडीने तिचे एक चुंबन तेथल्या तेथेच घेतले आणि आपण जशी शृंगारात तिची हौस पुरविली तशी तिनेही आपली पुरवावी, अशी विनवणी जावऱ्यांच्या रीतीप्रमाणे अभिनयाच्या भाषेत करीत, तो काचेचा तुकडा एका हाताने पुढे करून दुसऱ्या हाताने आपले डोके दाखवून नानकोबी आपल्या प्रियकरणीला आर्जवू म्हणाला."तास!"

तेव्हा राणी फुलीने नानकोबी त्याच दगडी गादीवर निजवले, त्याचे डोके आपल्या विवस्त्र मांडीवर घेतले आणि काचेच्या दुसऱ्या एका कोऱ्या करकरीत धारदार वस्तऱ्याने ती जावरा सुंदरी आपल्या पतीची डोई करू लागली. तितक्यात नानकोबीची बहीण आणि एक दोन मुलेही तेथे आली. ताजे ताजे असे पाट्या दोन पाट्या सजीव शिंपले त्यांनी फराळाला आणिले होते. त्यांच्या शिंपल्या सोडवून आतील नानविध जीव शेंगांच्या दाण्यासारखे तोंडात आणि त्या शिंपल्या टेकडीखालच्या या पुरातन खड्ड्यात टाकीत ती सारी जणे गप्पा छाटीत बसली.

तोच, "आला! आला! ऊऽऽऽऊऽऽऽ" असे अकस्मात् किचाळून नानकोबीची बहीण जवळ जवळ नाचतच उठली. दूरच्या झाडीकडे बोट दाखवून तिने साऱ्यांचे लक्ष जिकडे वेधून घेतले होते, तिकडे नानकोबी जो पाहतो, तो त्याला त्याचा हरवलेला तो घायाळ जावरा, त्याच्या त्या बहिणीचा नवरा, थोडा लंगडत पण एकंदरीत अगदी निर्भय, निश्चिंतपणे आपल्या राजधानीकडे येत आहे असे आढळले. त्यारसशी आनंदाने टाळी पिटून ती सगळी उभी राहिली आणि नाना प्रकारचे हातवारे करीत आणि विचित्रपणे किचाळत, "चल चल लवकर ये! तुझे स्वागत असो!" असा भाव व्यक्तवू लागली.

आपल्याविषयी आपल्या जातीभाईंच्या मनात कोणतेही किल्मिष आलेले नाही, हे पाहून हर्षलेला तो जावराही आनंदाने नि उत्साहाने धावतच पुढे आला. पण त्या आपल्या भाऊबंदाच्या सन्मुख येताच एकदम थबकला. नानकोबी, फुली नि त्या जावऱ्याची बायको अशी सारी न हसता, न बोलता ताठ उभी राहून त्याच्याकडे पाहू लागला. हळूहळू त्याच्यावर डोळे वटारले, तोही ताठ उभा राहिला आणि रागाने बघावे तसे त्यांच्याकडे डोळे वटारून पाहू लागला.

मग ते दोन्ही पक्ष एकामागून एक खाकरू- खोकरू लागले. पाच सहा वेळ असे खाकरणे झाल्यावर ते पुन्हा निश्चलपणे एकमेकांवर डोळे वटारून उभे राहिले.

कारण जावऱ्यातील शिष्टाचाराचा तोच नमस्कारचमत्कार असतो. कोणतीही व्यक्ती, मग ते पोटचे अपत्य का असेना, चार दिवस दूर राहून परतले की त्याला भेटण्याचा आधी हा असा नमस्कार चमत्कार करावा लागतो.

ह्या रूढीचे मूळ जावऱ्यांच्या स्मृतीक्षीणतेत असावे. त्यांना आठवण अशी फार राहात नाही. त्यामुळे मनुष्य थोडे दिवस नाहीसा होऊन परतला की त्याची ओळख पुन्हा पटेतो त्याला नीट निरखूनपारखून घ्यावे लागते. खाकरून-खोकरून तो शत्रू वा मित्र ते विचारपूर्वक ठरवून टोळीत पुनरपि घुसू देणे सावधपणाचे एक कर्तव्य असते. ह्या मूळच्या आवश्यकतेचीच पुढे शिष्टाचारी रुढी झाली आणि ओळख पटलेली असली तरी पाहुण्यांशी तसा नमस्कार-चमत्कार केल्यावाचून न बोलण्याचीही पद्धतच पडली असावी.

तो शिष्टाचार होताच त्याच्या वटारलेल्या डोळ्यातून आनंदाची आसवे घळघळ वाहू लागली आणि आपल्या त्या हरवलेल्या वीरबंधूच्या गळ्यात त्याच्या बांधवांची नि पतीच्या गळ्यात पत्नीची प्रेमळ मिठी पडली.

त्याच्या सुटकेचा अद्भुत वृतान्त सांगताना त्या पुनरागत जावऱ्याने कंटकच्या नि रफिउद्दिनच्या त्याच्यावर झालेल्या उपकारांना इतके वारंवार उल्लेखिले होते की, जेव्हा त्याने शेवटी त्या दोघा 'भगोड्या'ना जावऱ्यांनी आश्रय द्यावा आणि त्यांनी त्यास दिलेल्या जीवनदानाचे उतराई व्हावे, अशी कळकळीची विनंती तोवर तेथे जमलेल्या त्या टोळीतील अनेक जणांना उद्देशून केली आणि त्या भगोड्याकडून यथेच्छ तंबाखू नि दारू मिळण्याचे आमिषही दाखविले. तेव्हा तिला मान न डोलविणारा असा जावरा कोणीही आढळला नाही. तरीही किंचित विचार करणारी, पुढाऱ्याला शोभेशी मुद्रा करून नानकोबी थोडा वेळ चूप बसला आणि मग हातवाऱ्यांनी वाक्याचा बहुतेक भाग व्यक्तवीत शब्द असा एवढाच उच्चारता झाला, 'डोलकाठी!'

त्यात इतका अर्थ भरलेला होता की, "अशा भगोड्यांची खरी परीक्षा डोलकाठीलाच आहे! त्यालाच आमच्या वतीने तिकडे धाडा. जर कंटक नि रफिउद्दिन ह्यांना डोलकाठीने आश्रयार्ह ठरवल, तरच आश्रय देऊ!"

त्यांची ती भेट त्या संध्याकाळी होते असता जिकडे कंटक नि रफिउद्दिन हे दोघेही सूर्य अस्तास जाण्याच्या आधी काही पारध करून ते मास आगीने नुसते भाजून खाऊन, रात्र पडताच त्या भयानक जंगलात आपापली अंथरूणे घालण्यासाठी त्या दलदली नि चिखली रानात पलंग पाहू लागले. तेथला पलंग म्हणजे पलंगाची मूळ प्रकृती जे झाड, तेच होय. झाडाची पाहणी करता-करता दोन रूंद नि मोठमोठ्या फांद्या उंचावर जेथे एकमेकीस चिकटून गेलेल्या आढळल्या, तेथे त्या तशा निरनिराळ्या झाडांवर जे चढले, ते त्या झाडांच्या फांद्यांनी झालेल्या माळ्यांवर निजले. गाढ झोपेत गडगडून खाली कोसळण्याचे भय फारसे उरू नये म्हणून त्यांनी स्वतःला रानवेलीच्या दोरखंडासारख्या चिवट सोलांनी त्या फांद्यांच्या पलंगाशी स्वतःला बांधून घेतले होते. पावसाची बराच वेळ उघाडी होती, तरी पाणी झाडीतून ठिबकतच होते. मधून सरही येतच होती. पण तरीही ते लवकरच गाढ झोपी गेले खरे, पण ती गाढ झोपच होती वा ग्लानीची बेशुद्धी होती, ते त्यांचे त्यांच्याही ध्यानात आले नाही.

पहाटेच उद्दिन उठला. त्याला त्या गाढ झोपेनंतर इतके बरे वाटले होते की, तो आपल्या डोक्यावर जिवावरच्या संकटाची तरवार लटकते आहे, हेसुद्धा थोडा वेळ विसरला. जवळच दुसऱ्या झाडावर कंटक निजला होता, तिकडे त्याने पाहिले तो कंटक अंगपिळ्या देत जागा होतच होता. थोडी थट्टा करण्याची लहर येऊन उद्दिनने कंटकला पुरतेपणी उठविण्यासाठी उंच आणि सुरेल आवाजात भूपाळी छेडली-

घनश्यामसुंदरा, श्रीधरा, अरुणोदय झाला ।<br>
उठो कंटकबाबूजी! उदयाचली सूर्य आला ।।

कंटकला हसू आले. तोही उठून फांद्यांवर किंचित काळ बसला. वाघाच्या पाळतीवर माचा बांधून मृगयू जसे बसतात, तसा कंटक दिसते आहेसे पाहून उद्दिनने चेष्टा केली,

"क्यौं बाबूजी, कितने वाघ मारे!"

कंटक उत्तरला,

“भैया, जो सचमुच वाघ, वो तो अभी आनेवाला है! ते जावरे काल ठरल्याप्रमाणे आताच परत येतील तेव्हा एक तर माणसाळलेले दिसतील नाहीतर वाघाळलेले! बाणांच्या नखांनी फाडफाडून खातील तुला मला!”

कंटक इतके बोलतो आहे, तोच समोरची झाडी सळसळू लागली. अगदी शंभर पावलांच्या आत येताच जावऱ्याने आपल्या रानटी भाषेतील ‘ऊऽऽऽऊऽऽऽऽ’ अशा उंच हाका मारण्यास आरंभिले. त्या जावऱ्याला ओळखताच कंटक झटदिशी झाडाखाली उतरला. रफिउद्दिन मात्र आपल्या झाडावरचे रेंगाळत राहिला. काही अंशी त्याने स्वतःला बांधून घेतलेल्या वेलींच्या जाड सोपटाना तो झटपट उलगडू शकला नाही म्हणून. परंतु काही अंशी तो जो तसा रेंगाळला, तो त्याच्या अंगाच्या मुरलेल्या लुच्चेगिरीमुळेही होय! त्या जावऱ्यासह तो अपरिचित ‘डोलकाठी’ही आलेला होता. त्या दोघांचा बेत कंटकला आणि उद्दिनला आश्रय देण्याचा ठरला होता किंवा जावऱ्यांच्या टोळीकडून पकडविण्याचा ठरला होता, हे नक्की कळावयाचे होते, तेव्हा अशा शंकाकुल स्थितीत आपण पुढे न होता, कंटकलाच पुढे तोंडाशी द्यावा, अनुकूल फासा पडतोसा दिसला तर आपण तेथे जावे, प्रतिकूल दिसला तर मागच्या मागे निटसून जाता यावे, असा कपटभावही रफिउद्दिनच्या त्या मागच्या मागे राहण्यात नव्हताच असे नाही.

कंटकला पुढे आलेला पाहताच त्या जावऱ्याने आनंदाच्या किकाळ्या मारीत त्याला मिठी मारली. ‘हाच कंटकबाबू!’ असा त्याचा परिचय ‘डोलकाठी’ला त्याने करून दिला. लगेच डोलकाठीही पुढे होऊन कंटकला म्हणाला,

“कंटकबाबू, मला वाटलेच होते तुम्हीच ते असाल म्हणून! मी जरी गेली दोन-तीन वर्ष ह्या जावऱ्यांत असा नागडा होऊन एक जावराच बनलो असलो, तरी वेषांतराने काळ्या पाण्याच्या वसाहतीत सारखा हिंडत असतो. मी तुम्हाला अनेकवार पाहिले आहे. तुमची अधिकाऱ्यातील पत, अधिकार नि पळून जाण्याचा बेतही मला ठाऊक आहे. सत्तावनच्या स्वातंत्र्यवीर अप्पांचा मीही एक विश्वसनीय मित्र होतो. तुम्हाला साहाय्य द्यायला त्यांनी मरताना मला सांगितले होते. तो गुप्तमंत्र मनुष्य! त्याने माझी माहिती तुम्हाला दिली नव्हती. कारण तुमची त्यांची ओळख नवखी, माझी जुनी. मला काळ्या पाण्यावरून पळून जायला हवा तसा सवंगडी म्हणजे तुम्हीच! कंटकबाबू, तुमची बहीण कंटकी सोडवून आणण्यात मी बोलता-बोलता यशस्वी होईन! दचकू नका! मला सर्व काही माहिती आहे. कसे ते प्रसंगी सांगेन. तुम्हांला जावऱ्यांकडून मी आश्रय देववीला आहे. पण तुमचा तो दुसरा साथीदार भगोडा जो आहे, त्याला पाहिल्यावाचून त्याविषयी मी काही वचन देऊ इच्छित नाही. कारण, कारण , कारण त्याच जे नाव ह्या जावऱ्यांच्या मोडक्या तोडक्या उच्चारात मला जुळवता आले, ते रफिउद्दिन असे काहीसे बनत आणि कंटकबाबू, मला त्या नावाचा तीव्र तिटकारा आहे. पण तो मनुष्य पाहिल्यानंतर त्या नावाइतका जर तो अधमाधम नसेल, तर मी त्यालाही आसरा देववीन. नीट नाव काय त्याच?”

चपापत कंटक म्हणाला, “रफिउद्दिन हेच! पण तो मनुष्य इथेवर पळून येण्यात मुख्य साहाय्यक झालेला; त्याला माझ्यासाठी तरी आसरा....”

कंटकला अडवून मध्ये डोलकाठी म्हणाला, “तो तो मनुष्य पाहिल्यावरचा प्रश्न आहे तो?”

हे त्याचे बोलणे चालले आहे तो रफिउद्दिन आपल्या अंगाभोवतालची बंधने सोडवून त्या दूरच्या झाडाखाली उतरून पुढे येतच होता. त्या जावऱ्याने कंटकला मारिलेली ती हसती मिठी, ते आनंद चीत्कार, डोलकाठीने कंटकाशी केलेले ते हसतमुख हस्तांदोलन, ह्या सर्व लक्षणांवरून जावऱ्यांनी आपल्याशी स्नेहसंबंधच जोडलेला आहे, ह्याविषयी त्याला शंका उरली नव्हती. पुढे जाणे आता सुरक्षित असे त्याला ठाम वाटले होते. इतक्यांत कंटकने हाकच मारिली मोठ्याने, “रफिउद्दिन, आगे आव! जावरे आपले मित्र झाले.” रफिउद्दिन मनमोकळेपणी हसत पुढे आला. डोलकाठी त्याच्याकडे निरखून पाहात होता. पण रफिउद्दिन जवळ येताच ह्या रफिउद्दिनहूनही उंच, धिप्पाड नि काटक असणाऱ्या नागड्या डोलकाठीच्या भुवया संत्रस्तपणे आकुंचित होऊ लागल्या. तो वारंवार मोडीत असताही त्याच्या कपाळावर क्रोधाच्या आठ्या पुनःपुन्हा पडू लागल्या. उसळत्या मद्याच्या बाटलीचे बूच ताडकन् उडू पाहावे तसा त्वेषाने त्याचा देह उसळून जातो की काय असे त्याला झाले आणि ते त्या बाटलीचे उसळते बूच आपण घट्टपणे वरून जसे दाबून धरतो, तसे तो भूमीला आपले पाय घट्टपणे दाबून धरू लागला. इतक्यात त्याच्या मनात जी कोणती शंका क्षोभिली होती, तिची मागणी निःशेषपणे पुरविणारी एक क्लृप्ति त्याला सुचली. त्याने तोंडावर बळे-बळे एक हसू आणिले, आणि रफिउद्दिनशी प्रेमाने हस्तांदोलन करण्यासाठी म्हणून आपला हात पुढे केला. “आईये! आईये!” डोलकाठाने असे स्वागतात्मक संबोधताच रफिउद्दिन खुलून गेला. त्याने आपले दोन्ही हात पुढे करून डोलकाठीचा हात त्यात धरिला आणि शिर लववून डोलकाठीला प्रत्याभिवादिले.

रफिउद्दिनच्या पंजाकडे पाहताच डोलकाठीला हवी होती ती निर्णायक खूण पटली. रफिउद्दिनच्या उजव्या करंगळीचे एक पेर तुटलेले होते. हा रफिउद्दिन तोच रफिउद्दिन! आणि त्यासरशी डोलकाठीने दात-ओठ खाऊन हडसले,

“तूच! तूच! रफिउद्दिन! दुष्टा....”

त्या भयंकर अवसानाचा नि आरोपाचा अर्थ कंटकला तर काय, पण स्वतः त्या रफिउद्दिनलाही कळण्याच्या आत डोलकाठीने त्याच्या हातात गवसलेला उद्दिनचा हात खाडकन् हिसडला, बाहेरीचा पेच मारून पाठीकडून पोटात घेतला, त्याच्या कटीला डाव्या हाताचा घट्ट विळखा घालून, उजवा हात दोन्ही टांगातून खुपसून त्याला वर उचलला आणि पछाडून धाड्दिशी भुईवर आपटला. लगोलग त्याच्या छातीवर बसून आपल्या दोन्ही हातांनी डोलकाठीने उद्दिनचा कंठ करकचून आवळला. आता उद्दिनच्याही ध्यानात आले की, हा त्याचा एक पुरातन शत्रू त्याच्या छातीवर चढला आहे. उद्दिनने त्याला ओळखले, पण त्याच्या तावडीत तो पुरता सापडल्यानंतर!

“हां! हां! सोड सोड!” असे म्हणत कंटक घाबऱ्या घाबऱ्या मध्ये पडते आहे, तोच अत्यंत निर्वाणीच्या निश्चित आणि निष्ठुर स्वरात डोलकाठी ओरडला,

“बाबूजी, तुम्ही थोडे चूप राहा. हा माणूस नाही. सैतान आहे! तुमच्या हितासाठीसुद्धा त्यांचा काटा उपटलाच पाहिजे. माझा तर हा केवळ हाडवैरी! ते सारे मग सांगेन! बोल, रफिउद्दिन, तूच ना माझा त्या वेळी जीव घेतलास? तुझ्यापरी तू मला ठार केले होतंस नाही? हा माझा पुनर्जन्म. आता माझ्यापरी दुष्टा, मी तुला ठार करतो.”

दात-ओठ खाऊन विक्राळ क्रोधाने डोलकाठी आपल्या वज्रमुष्टीचे प्रहारामागून प्रहार उद्दिनच्या डोळ्यावर, नाकावर, छातीवर हाणू लागला. उद्दिनच्या डोळ्यातून, नाकातून, तोंडातून रक्ताच्या धारा उसळल्या, तो लोळागोळा होऊन बेशुद्ध पडला.

इतक्यात डोलकाठीचा शत्रू तोच आपला एवढेच काय ते कारण पाळीव नि प्रामाणिक कुत्र्याला पुरते तसे जावऱ्यांचेही वैर जागृत होण्यास पुरेसे होऊन, त्या जावऱ्याने आपली धनुकली उद्दिनवर ताणली आणि त्याचा सणसणता विषारी बाण खिळा ठोकावा तसा तेथल्या तेथेच उद्दिनच्या छातीत ठोकून दिला. रफिउद्दिन ठिकच्या ठिकाणी ठार होऊन पडला.

लगेच तो डोलकाठी त्या अघोर समाधानाच्या आवेशात कंटककडे वळून म्हणाला,

“कंटकबाबू, ऐका. मी ह्या उद्दिनला असा बोकडासारखा बुकलून का मारला ते! तुम्हाला वाटले असेल की, मीच आततायी; पण ह्या उद्दिनला तुम्ही ओळखता त्याच्या आधीपासून मी ओळखीत आहे, ह्याने असाच गळा दाबून कित्येकांचे जीव घेतले आहेत, हा पूर्वी एकदा काळ्या पाण्यावर जन्मठेप बंदिवान होता, तेव्हा मीही जन्मठेप बंदिवानच होतो. मला लाकडे भरून नेणाऱ्या तारवावर काम मिळाल्यामुळे मी नौकानयन विद्येत चांगलाच पटाईत झालो. हा माझ्या हाताखाली लाकूड-जमादार होता. पुढे आम्ही पळून जायचा कट केला.. त्या साहसात ह्याचे मला साह्य झाले, पण ह्याच्यापाशी नव्हती दमडी मि माझ्यापाशी होती हजार दोन हजारांची रोकड. मी ज्या तारवावर काम करी, तेच तारू एक संधी साधून आम्ही हाती घेतले नि रातोरात समुद्रात सोडले .

“वारा अनुकूल सुटून आम्ही ‘भगोडे’ समुद्रात चांगले वाटेला लागलो. अशा प्रसंगी ह्याने माझ्याजवळची रक्कम लाटण्याच्या दुष्ट हेतूने, मी ह्याचा दुसरा कोणताही अपराध केला नसता, माझा घात करण्याचा बेत केला नि मी एक फळीवर तारवराच्या काठी उभा राहून पाठमोरा झालो असता ह्याने ती फळी अकस्मात् उलटून माझ्यासुद्धा त्या भर समुद्रात लवंडली. मी लगोलग पुन्हा तारवाला जो धरू जातो, तो ह्याने वल्ह्याची दांडी माझ्या डोक्यात घातली. मी चक्कर येऊन पाण्यात गटांगळ्या खाऊ लागले, बुडालो, तारू झपाझप पुढे गेल, मी बुडालो.

पण अद्भुत योगायोगाने मी जो उसळून पुन्हा पाण्यावर येतो, तो तीच फळी लाटेच्या फटाकाऱ्यासरशी माझ्या हाती आली. तिला धरून मी जीव वाचविण्याची पराकाष्ठा करीत आहे, तोच जावऱ्यांची एक थोरली, ‘डुंगी’ पुढे घुसून माझ्याजवळ आली नि त्या जावऱ्यांनी त्या त्यांच्या

नौकेत, त्या डुंगीत घालून मला वाचवले. पण ह्याच्या मते मी मेलोच होतो! आणि ह्याचे पुढे काय झाले ते मला ह्या क्षणापर्यंत माहित नव्हत. आणि आता तरी ह्यांच नाव ऐकताच नि ह्याला प्रत्यक्ष असा इथे पाहताच हाच तो दुष्ट इतके मी ओळखल आणि ह्याने माझ्यावर नि इतर अनेक जणांवर केलेल्या अत्याचारांचा हा असा वचपा काढला! आता तुम्ही मला 'ठीक केलेस' म्हणा वा म्हणू नका!"

"ठीक केलेस असेच म्हणणार मी! तुम्ही ह्या नीचाला आत्ता एकदा मारलंत तसे तीनदा मारलंत ना, तरीही मी ते ठीकच केलेस असे म्हंटले असते. इतके त्याचे अघोर अपराध मलाही ठाऊक आहेत! जे मीच करायला हवे होते, पण परिस्थितीच्या पेचात असल्याने जे करू शकलो नाही, तेच तुम्ही केले! माझ्या पायात रुतलेला जो काटा मला काढवला नाही तो तुम्ही काढलात! त्यापायी माझ्या पुढील बेतात न येत्या त्या अडचणी जरी आल्या, तरी त्याची मला चिंता नाही!"

"नव्हे, नव्हे, हा असता तर ज्या अडचणी तुमच्या पुढील बेतात नक्की येत्या, बहुधा माझ्यासारखाच हा तुमचाही घात करण्यास जो चुकता ना, ते संकट हा अधम साप आता ठेचला गेल्याने उलट नाहीसे झाले आहे. तुमचा पुढील बेत अधिक निर्वेध झाला आहे, असेच तुमच्या प्रत्ययाला मी लवकरच आणून देतो. मी कोण...."

"होय, तेच थोडेस कळायची मला उत्कंठा नि आवश्यकताही आहे."

"पण माझ्या मते तेच विचारू नये, मी सांगू नये. कारण, तुम्ही अविश्वासू आहात म्हणून नव्हे, स्वर्गवासी अप्पाजींनी तुमच्या चारित्र्याविषयी मला जे प्रशस्तीपत्र दिले आहे, तेच त्या शंकेच निर्विवाद निराकरण आहे. पण अंदमानातील अघोरी अपराधांच्या जगतात त्याच अपराध्यांच्या सहकाऱ्याने काळ्या पाण्यावरून पळून जाण्यासारखा जिवावरच्या कटात पडायच, त्याने दोन गोष्टी सोडल्याचे पाहिजेत. एक गोष्ट म्हणजे कामाला अपरिहार्य त्याहून अधिक अशी स्वतःची पूर्वपीठिका दुसऱ्याला सांगणे नि दुसरी गोष्ट म्हणजे जिवाची आशा! ह्या दोन गोष्टी सोडणे अवश्य, हे मी अनुभवाने ठाम ठरवून टाकल आहे. तुमची पूर्वपीठिका अवश्य ती मला माहित आहे. मी हा डोलकाठी, इतकी माझी पूर्वपीठिका तुम्हांला ह्या कामी सध्या पुरे आहे. प्रसंगी लागेले तशी हप्त्याहप्त्याने मी होऊनच ती आणखी कळवीन. आता प्रथम जावऱ्यांकडे चला. राजा नानकोबी हा माझ्या अनुकूल अभिप्रायामुळे स्वतः तुमच्या भेटीला उत्सुकला आहे. हो, पण तुमच्यापाशी एक बंदूक, काही दारूगोळा नि पोलिसी कपडेही होते ना? हा जावरा सांगत होता ते!

"आहे तर! पण मी ते लपवून ठेवीत आलो एका कारणासाठी. जावऱ्यांनी आमच्या हाती तशी हत्यार पाहून बिचकू नये; आणि त्या वस्तू माझ्याच हाती ठेवीत आलो ह्या अधम उद्दिनवरील माझ्या अंतःस्थ अविश्वासाने!"

“पण खरे म्हणाल, तर आपल्यापाशी त्या पळून जाण्याच्या साहसाला अत्यंत अवश्य नि माझ्यापाशी ज्यांची उणीव अशा वस्तू आहेत, हे ऐकल्यानेच मला आपल्या सहकार्याची इतकी निकडीची ओढ लागली. चला, आणा त्या वस्तू इकडे आधी.”

पाल्या पाचोळ्यात दडविलेल्या त्या साऱ्या वस्तू कंटकने तेथे आणताच डोलकाठीने प्रथम त्या बंदूकीवर बुभुक्षिताने पक्कावन्नावर घालावी तशी अगदी झडपच घातली आणि मोठ्या ऐटीने ती बंदूक त्या नागड्या वीराने खांद्यावर टाकून पुढे होऊन कंटकला अगदी सैनिक तोऱ्याची आज्ञा सोडली.

“चलो, आव मेरे पीछे पीछे!”

“वा!” कंटक हसला, “बंदुकीच्या स्पर्शासारखी तुमची पावलंसुद्धा एखाद्या सैनिकासारखी टपटप करीत पडू लागली बुवा! अंगात कोण्या सैनिकाचा संचारच झाला जसा!”

“कोण्या सैनिकाचा कशाला! मी स्वतः एक सैनिकच होतो की पूर्वी एकदा! मी लढाई पाहिलेली आहे. बाबूजी, लढलोही आहे प्रत्यक्ष रणांत.....”

पण तोंडातून झटकन् निघून गेलेली स्वतःच्या पूर्ववृत्तांताची इतकी माहितीच अधिक झाली असे वाटून की काय, डोलकाठी एकदम चूप झाला आणि तो कंटक नि तो जावरा ह्या दोघांच्या सैन्याचे म्होरकेपण घेऊन त्या रानात एखाद्या सेनानीसारखा त्या नानकोबीच्या रानवट राजधानीकडे चाल करून जाऊ लागला.

***

वीस

कैद्यांच्या बंदिगृहातील सैंपाकाच्या छपरीमध्ये एका मोठ्या भाजीपाल्याच्या लोखंडी 'डेगी'खाली जाळ करीत कंटकी उभी होती. बंदिवान स्त्रियांच्या वेशाप्रमाणे एक गुडघाभर जाडे-भरडे लुगडे, वेणी-फणी तेलावाचूनच आठवडा-आठवडा करावी लागते असल्यामुळे आणि अगदी ओंगळ नि नीच अशा अनेक बंदिवान स्त्रियांमध्ये रात्रंदिवस सरमिसळ राहावे लागते असल्यामुळे विस्कटलेले नि उवांचा बुजबुजाट झालेले केस, रखरखलेल्या मोठमोठ्या चुल्यांच्या उत्तापात सतत राबता राबता धुरकटलेले नि घामाघूम झालेले अंग, पण तशा परिस्तितीतही मूळचीच सुभग असलेली ती युवती, ती कंटकी, मालती त्या आगीने भडकलेल्या मोठमोठ्या चुल्यांमध्ये पंचाग्नीसाधनात तपस्या शोभावी, तशी शोभत होती.

निदान तिच्यापुढे त्या वेळी उभ्या असलेल्या आणि तिला नकळत तिच्याकडे सहृदय कौतुकाने निरखून पाहणाऱ्या अनसूया जमादारिणीला तरी ती कंटकी तशीच शोभत आहे अशी भासली. तेथे काम करीत असलेली दुसरी एक बंदिवान स्त्री जी होती, ती पिठाची पोती आणण्याच्या कामावर निघून जाताच तेथे एकट्या उरलेल्या कंटकीला सावध करण्यासाठी अनसूया जमादारिणीने चुटकी वाजवली. कंटकीने वर पाहिले, थोडी पुढे झाली, आजूबाजूस न्याहाळले आणि अनसूयेच्या हातची एक चिठ्ठी चटकन् घेऊन बाजूला लाकडाच्या ढिगाआड जाऊन लपली, अनसूया जमादारीण कोणी आत येऊ नये म्हणून दारातच उभी राहिली. एक-दोन मिनिटांतच कंटकीने ती चिठ्ठी वाचून जाळात फेकली न फेकली, तोच अनसूयेने 'काम झाले ना?' असे विचारणारी मान वेळावून कंटकीनेही होकारार्थी मान हलविताच तेथून पाय काढला. कंटकीशी आपला काही स्नेहसंबंध आहे ह्याची कोणाला शंकासुद्धा येऊ नये, ह्या हेतूने अनसूया आताशी कंटकीशी चकार शब्दसुद्धा बोलत नसे. इतर बंदिवान स्त्रियांशी बोले, तितकासुद्धा कंटकीशी कामकाजाच्या पश्नातही संबंध येऊ देत नसे.

ती चिठ्ठी वाचताच कंटकीचे हृदय कोण्या उत्कट आशेच्या उसळीने आणि साहसाच्या भीतीने धडधडू लागले. तिचा देह वावरत होता त्या बंदिगृहातून तिचे मन तेवढेच जसे अलगद उचलून कोण्या दुसऱ्याच जगात नेऊन सोडावे, तसे तिला झाले. त्या चिठ्ठीत जे भयंकर पण शुभंकर असे तिला कळविण्यात आले होते, त्यातील तिच्या वाट्याला येणारी भूमिका कशी पार पाडावयाची इकडे तिचे सारे लक्ष वेधले होते. ती मनातल्या रंगभूमीवर आपली साहसी भूमिका पुनःपुन्हा करून पाहात होती, बेत ठरवीत होती. लवलेशही चूक होऊ नये म्हणून अवश्य ते--ते कृत्य, हालचाल आणि प्रसंगाची जुळणी कशी पार पाडायची, ते तंतोतंत ठरवून टाकीत होती आणि तरीही लवलेश जरी काही कोठे चुकले. तिच्या वा इतरांच्या हालचालीत लवलेशही फरक जरी पडला, तरी ती होती त्या संकटातून किती भयंकर अशा दुसऱ्या संकटात ती पडेल ह्या जाणीवेने ती मधूनच थरथर कापत होती. पण जर तो सारा कट तंतोतंत जुळून आला तर?.... एका चोवीस तासांच्या आत सुखाच्या स्वर्गात पाऊल आणि किशनच्या गळ्यात मिठी!

तिच्या मनात हे वादळ चालू होते; पण तिचे वर्तन ह्या बंदिगृहातील घड्याळासारखे, बंदिगृहाने आखून दिलेल्या शिस्तीप्रमाणे तंतोतंत चालले होते. साऱ्या बंदिवानांची जेवणे होऊन दुपारच्या वेळी सैंपाकविभागातील बंदी स्त्रियांना जी थोडी सुटी मिळते, तीत कंटकी नित्याप्रमाणे वरवर थोडी स्वस्थ पडली. पण तिचे मन असह्य अस्वस्थेने आणि साशंक अपेक्षेने काय होईल, कसे होईल, अशा चिंतेत वर-खाली होते होते. ती वरचेवर अनसूया जमादारिणीच्या वाटेकडे डोळे लावून बसे. तीनचे ठोके घड्याळात पडताच तिला वाटले, चारचेच पडले. तिची बाहेरच्या कामावर जाण्याची वेळ एकदाची आली; पण तीनच वाजले, हे कळताच ती ओशाळलीशी होऊन पुन्हा खाली बसली. इतक्यात खरोखरच चार वाजले, अनसूया जमादारिणीने बंदिपालाच्या सांगण्यावरून नेहमीप्रमाणे 'कंटकी!' अशी हाक मारिली. सर्वासमक्ष कंटकीला तिच्या संध्याकाळच्या कामावर बाहेर जाण्याची आज्ञा मिळाली.

हे बाहेरचे काम म्हणजे त्या बंदिवानासाठी काढलेल्या बंदिगृहाबाहेरील प्रेमोद्यानात जाऊन झाड-लोट करण्याचे आणि व्यवस्था ठेवण्याचे होते. कंटकीची चोख चाल-रीत पाहून बंदिपालाने ते तिच्याकडेच दिलेले होते. ती प्रत्यही त्या प्रेमोद्यानात जाण्यासाठी अशीच बंदिगृहाच्या दाराबाहेर पडे. संध्याकाळी झाडलोट व्यवस्था संपून प्रेमोद्यान बंद झाले की पुन्हा त्या दाराच्या आत येऊन बंदिगृहात स्वतःही बंद होऊन पडे, पण आज.....?

आज त्या बंदिगृहाच्या दारातून बाहेर पडावयाचे ते पुन्हा काही आत न येण्यासाठीच पडावयाचे, हा तिचा कृतनिश्चय झालेला होता. कंटकने गुप्तपणे अनसूयेच्या हस्ते धाडलेल्या त्या चिठ्ठीतील साहसी कटाप्रमाणे पळून जाण्यात यश आले तर तसे; फसले तर तत्क्षणी पोटात सुरा भोसकून आत्महत्येच्या द्वारे --पण आज आता बंधमुक्त व्हावयाचेच, पुन्हा काही ह्या दारातून ह्या बंदिगृहाच्या आत यावयाचे नाही, अशा निर्धाराने ती त्या दारातून बाहेर पडली. 'आज जन्मठेपीची शिक्षा ही इथेच संपली की!' असे ती मालती-- ती कंटकी--आपल्या मनात मोठ्याने आपल्यालाच बजाविती झाली. प्रेमोद्यानाची झाड-लोट करणाऱ्या झाडूसहच तिने आज सांगाती सैपाकघरातील एक तीक्ष्ण सुराही छपवून घेतलेला होता. तो तिने पुन्हा एकदा चाचपून पाहिला आणि दारावरील ओळखीच्या पहारेकरांपैकी कोणालाही झडती घ्यावयाचीसुद्धा आवश्यकता वाटू नये अशा सालस, बावळट आणि हसऱ्या ढिलाईने ती त्या बंदिगृहाच्या दाराबाहेर पडली. अनसूया त्या वेळी तेथे ढुंकून पाहण्यासाठी आली नव्हती. आपल्या गावीसुद्धा ते प्रकरण नव्हते असे पुढे सांगता यावे, ह्या हेतूने अनसूयेने बंदिगृहातील दुसऱ्याच एका कामामध्ये गढून गेल्याचा बहाणा करण्याचा चाणाक्षपणा दाखवून बंदिगृहामधल्या अगदी मधल्या चौकात ती केव्हाच निघून गेली होती.

बंदिवानांतील चांगल्या चालीच्या स्त्री-पुरुषांना विवाहाची अनुज्ञा मिळाल्यानंतर ते काळ्या पाण्यावरील बंदिवान आपल्याला आवडेल असा जोड निवडण्यासाठी त्या बागेत येत. ते नेहमीच्या रीतीप्रमाणे तेथे त्या दिवशीही गोळा होऊ लागले, परस्परांच्या सांगाती बोलण्या-बसण्यात गुंग

झाले. झाडलोट करून कंटकीही त्यांच्या अधून मधून फिरू लागली. पण तिचे चित्त सगळे त्या बागेपुढून जाणाऱ्या सडकेकडे होते. पाचचे ठोके पडले, पण अजून तिला हवा असलेला मनुष्य त्या सडकेवर दिसेना. ती अस्वस्थ झाली, दृष्टी ताणताणून पाहू लागली. पाचनंतरचे प्रत्येक मिनिट तिला तासासारखे दीर्घ वाटू लागले. सव्वा पाच झाले! तो कोण?.....पोलिस?

होय, होय! पोलिसच तो. पण कंटक कोठे आहे? सडकेवर चिठीत लिहिल्याप्रमाणे पोलिस दिसला; पण कंटक?

इतक्यात त्या पोलिसाने ठराविक खुणेप्रमाणे हात हलवला. कंटकी झटकन् प्रेमोद्यानाच्या बाहेर पडून सडकेवर आली. तो पोलीस शिपाई धीटपणे पुढे झाला आणि त्याने कंटकीच्या हात धरिला. त्या स्पर्शाने म्हणा वा जवळ आल्यामुळे निरखल्याने म्हणा, पण कंटकीने ताबडतोब ओळखले की, जो पोलिस तोच हा कंटक त्याच्या मागोमाग एक उंच, निमगोरा, पण तिला अपरिचित असा दुसरा पोलिस शिपाई!

पहिला पोलिस कंटक होता, दुसरा 'डोलकाठी'! त्या दोघांनी पोलिसांचा वेष करून, खांद्यावर बंदुका, कमरेस सरकारी पोलिसी पट्टे. थेट पोलिसी ऐटीने त्यांनी पुढे येऊन कंटकीचा हात धरून तिला मोठ्याने आज्ञापिले, "तुम्हाला चीफ कमिशनरसाहेबांच बंगल्यावरचे बोलावणे आहे! न्यायला आम्ही आलो आहोत!" कंटकीच्या मागोमाग त्या बागेवरील बंदिगृहाचा एक पहारेकरी जो पहारा करी, तोही जवळ येत होता. त्याला त्या दोघा पोलिसांनी सांगितले, "ह्या बाईला आम्ही चीफ कमिशनरकडे नेत आहोत! काय? बंदिपालाला कळवायच? ते आम्ही आधीच कळवले आहे. चीफ कमिशनरच्यापेक्षा काही बंदिपाल श्रेष्ठाधिकारी नाही! तुम्ही फार तर हे आमचे क्रमांक टिपून घ्या! चल, कंटकी, पुढे हो!"

त्या पोलिसांची ती कडक भाषा आणि निर्भीड ऐट पाहून तो पहारेकरी वरमला. नाही म्हणावे तर कमिशनरच अंदमानचे मुख्य सरकार! हे त्याचे पोलिस! ह्यांच्यापाशी 'हो नाही' करीत तेरी-मेरीवर येण्याने वेळी आपणच गोत्यात येऊ, अशा शंकेने तो पहारेकरी गोंधळात पडला आहे, तोच त्या पोलिसांनी कंटकीला पुढे घालून "चलो!" असे आज्ञापिले. त्या आज्ञेची वाटसुद्धा न पाहता कंटकीही आधीच वाट चालू लागली होती. पाच मिनिटांच्या आत ती तिघे एका वळणाने दुसऱ्याच वाटेला निघूनही गेली!

तो पहारेकरी ती दिसेनाशी होईतो त्या वाटेकडेच पाहाच राहिला. मग अर्ध्यापाऊण तासाने ती बाग वेळच्या वेळी बंद करून तो बंदिगृहात गेला. संध्याकाळी गणती करताना एक स्त्री बंदिवान उणी भरली आणि ती कंटकीच होय. असे कळतांच बंदिपालाने त्या पहारेकऱ्याला दटावले. त्याने ताठ उत्तरे केले,

"चिफ कमिशनरसाबको पूछिये. मेरी क्या कसूर? पोलीस हपसरने कंटकीको पकडकर उसको साथ चल दिया!"

चीफ कमिशनरच्या बंगल्यावर बंदिवानांना अचानकपणे अनेकवार बोलण्यात येते. हिंदुस्थानचे नवे वॉरंट किंवा इतर काही सुटका, बंदीची सूट इत्यादी कामकाजात असे नेहमी घडते, पण बंदिपालाला न विचारता परस्परे हत्यारबंद पोलिस धाडून एका तरुण स्त्रीबंदीला पकडून नेणे हे पद्धतीला तरी सोडूनच! ह्यास्तव बंदिपालाने कमिशनरच्या बंगल्यावर तात्काळ दूतांना धाडले. नावेतून त्या बंगल्यावर जावे लागे. तितके लांबून जाऊन दूत रात्री परत येताच त्यांनी कमिशनरचा निरोप आणिला की, "इकडून कंटकी नावाच्या कोणत्याही स्त्री-बंद्याला बोलावणे गेलेल नाही!"

अर्थात्, कोणा तरी दोघा पोलिसांनी त्या तरुण स्त्रीबंदीला पळविले असले पाहिजे! हे स्पष्ट होताच बंदिपाल गडबडला. बंदिगृहाच्या 'संकट-घंटा' एकदम ठणठणठण करीत मोठमोठ्याने वाजू लागल्या. जिकडे तिकडे शिपायांची धाव-पळ नि शोध नि नाकेबंदी होऊ लागली. विशेषतः पोलिसांच्या चाळीतून ते दोघे पोलिस कोण, ह्याच्या कडाक्याचा शोध चालला. कारण त्या मुलीला धरून नेणारे कोणीतरी दोघे पोलिस शिपाईच होते असा पुरावा जिकडून तिकडून मिळत चालला वाटेने जाता-येता दोघे हत्यारबंद शिपाई एका मुलीला घेऊन जाताना आपण पाहिले, पण पोलिसच असल्याने सरकारी काम समजून आपण तिकडे चित्त घातले नाही, असे पुष्कळ वाटसरूंनी सांगितले. रात्रभर शोध चालला, पण ते पोलिस कोण हे उमगेना, त्या मुलीला घेऊन ते गेले कोठे ते कळेना!

अशा रीतीने बंदिगृहात कमिशनरकडचा उलगडा घेऊन दूत रात्री परत येईतो कंटकी पळविली हे नक्की ठरविता आले नव्हते. त्यामुळे कंटक आणि डोलकाठी ह्यांना चार-पाच तास निर्वेध मिळाले. तोवर त्यांचा पाठलाग असा आरंभिलासुद्धा गेला नव्हता. पोलिसांचा वेष करण्यात त्यांनी दाखविलेला चाणाक्षपणा त्यांच्या चांगलाच उपयोगी पडला. कारण सरकारला शंका भलत्याच बाजूची आली, शोध नको त्याच दिशेला चालला. त्याचा कंटकने पुरेपूरा लाभ घेतला. मागे जावऱ्यांनी इंग्रजी बंदिवानांवर छापा घातला तेव्हा जो इंग्रजी पोलिस जमादार मारला गेला आणि ज्याची बंदूक नि कपडे-पट्टे कंटकने काढून नेले होते, ते आणि डोलकाठीपाशी असाच एक उपटून आणिलेला त्याचा स्वतःचा बंदूक-पट्टा आणि पोलिसी कपड्यांचा असलेला एक संच; अशा त्या पोलिसांच्या दोन बंदुकांच्या आणि वेषांच्या उपयोगाने त्यांच्या कटाचा तो साहसी प्रारंभ तरी निर्विघ्न पार पडला.

त्याच्याजवळ पोलिसी वेषातच असलेल्या 'डोलकाठी' हा गेली कित्येक वर्षे 'भगोडा' म्हणून पकडावा असा हुकूम सुटलेला असताही काळ्या पाण्यावरील सरकारी वसाहतीत छद्म वेषाने हिडण्यात आणि लगोलग अरण्यातील त्या जावऱ्यांच्या राजधानीत जाऊन लपण्यात अगदी पटाईत झालेला होता. सत्तावन्नच्या स्वातंत्र्ययुद्धातील वृद्ध वीर जे अप्पाजी त्यांच्याकडेही तो ह्याचे छद्मवेषाने नित्य जाई-येई. कंटकला जावऱ्यांनी आश्रय दिल्यानंतर डोलकाठीने ह्या विद्येत कंटकलाही पटाईत करून सोडले. कंटकच्या बहिणीला- कंटकीला बंदिगृहातून सोडविण्याचा हा

धाडसी कट डोलकाठीनेच रचिला. त्यानेच कंटकसह ह्या छद्मवेषांत अनसूयेची भेट तिच्या घरी घेतली; कंटकने तिच्याकडे ठेव म्हणून ठेविलेली हजार दीड हजारांची रक्कम कंटकच्या सांगण्याप्रमाणे तिच्याकडून परत घेतली आणि कंटकीला बंदिगृहांत देण्यासाठी ती कटाविषयीची गुप्त चिठ्ठी अनसूयेच्या हाती धाडली होती, त्या चिठ्ठीप्रमाणे कंटकीने ठराविक वेळी धीटपणे त्या बागेतून निसटून ह्या पोलिसी छद्मवेषात आलेल्या आपल्या सवंगड्यासह जन्मठेप बंदिवासाच्या बेड्या एका क्षणात तोडून टाकण्याचे हे जिवावरचे धाडस केले होते.

कंटक आणि डोलकाठीसह कंटकी जी निसटली, ती सडक सोडून लगोलग एका आडवळणाने समुद्रतटावर आणण्यात आली. तेथे एक 'डुंगी' सज्जच होती. वृक्षांच्या एका भल्या मोठ्या बुंध्याला तोडून त्यात मध्यंतरी कोरून नावेसारखे खोलगट बनवून, नावेच्याच आकाराचा करून, त्या अखंड ओंडक्याचा जो एक मचवा अंदमानातील लोक करतात आणि समुद्रतटाला लागून ज्यायोगे द्रुत जलप्रवास करण्यात त्यांचा हातखंडा असतो, त्या अगदी पूर्वकालिन नावेला तिकडे 'डुंगी' असे म्हणतात. मनुष्याने नौका विद्येत लावलेला तो अगदी पहिला शोध. जावरे ह्या प्रकारच्या डुंग्यांतून समुद्रात प्रवास करण्यात मोठे पटाईत! तशीच एक डुंगी समुद्राच्या एका दुलर्क्षित आणि आडवळणी तटभागाशी कंटकने सज्ज ठेवली होती. कंटकीला घेऊन ते पोलिस वेषांतील हत्यारबंद दोघेजण त्या डुंगीत बसले आणि डुंगी झपाझप समुद्रात घुसू लागली. तटावरील ज्या काही थोड्या लोकांनी ती डुंगी त्या तरुणीला घेऊन दूरवर जातांना पहिली त्यांनाही तो देखावा बराचसा चमत्कारिक वाटला असताही हत्यारबंद असे दोन पोलिस शिपाईच तिच्यात आहेत, असे पाहून काही गवगवा करण्याची बुद्धी वा छाती झाली नाही. थोड्याच वेळाने डुंगी काळ्या पाण्याच्या ओसाडातील ओसाड आणि निबिड, निर्जन अरण्याच्या काठाशी असलेल्या समुद्राच्या भागात शिरली.

कंटकच्या अंगाशी टेकून कंटकी बसली होती. ती त्याची सख्खी 'बहीण'च आहे असे मानणाऱ्या डोलकाठीला त्यात काहीच विशेष वाटले नाही. परंतु तिची ती मनोहर तनुलतिका आणि ते मनमिळाऊ हसणे, बोलणे, वागणे पाहून पाहून त्या डोलकाठीला वरचेवर असे मात्र वाटल्यावाचून राहिले नाही की, जर ही युवती आपल्याही अंगाशी अगदी अशीच टेकून बसली तर किती गोड वाटेल!

ती डुंगी निर्जन आणि निर्विघ्न समुद्रभागात शिरताच जलौघावर जसे जशी सलीलपणे डुलू लागली, तसेच कंटकीचे हृदयही आनंदौघावर सलीलपणे डोलू लागले. पिंजऱ्यातून सुटलेल्या पाखराला निस्सीम आनंद होतोच, पण त्या बंदीतून निसटलेल्या मालतीचा आनंद त्याहूनही निस्सीम होता. कारण पिंजऱ्यातून सुटलेले पाखरू दिसेल त्या झाडावर जाऊन बसते खरे, पण त्याचे आप्तेष्टमित्र असलेले इतर पक्षी त्याला हूसकू लागतात. त्याला निर्भय असे घरटेच लगोलग सापडणारे नसते. पण जन्मठेपीच्या बंदीतून निसटलेले हे जे पाखरू ह्या डुंगीत हसत खिदळत आहे, त्याला त्याच्या एकुलत्या एका मित्राने, इष्टाने, लगोलग आपणावलेले आहे; किशनच्या

प्रणयप्रिय लोभात ह्या पाखराला स्नेहमय संगतीची आवडती ऊब देणारे एक गोड घरटे लगोलग सापडलेले होते! ते पाखरू, ती मालती त्या सुटकेच्या उल्हासात आणि किशनच्या संगतीत एकदम जितकी रंगून गेली की, तिला जन्मठेपेची भयंकर शिक्षा आपणाला कधी काळी झालेली आहे, आतासुद्धा त्या शिक्षेची कृत्या आपल्याभोवती घिरट्या घालीत आहे, ह्याची त्या क्षणापुरती तरी विस्मृतीच पडल्यासारखी झाली. सध्या आपण कंटकी आहोत, मालती नव्हे, हेसुद्धा ती विसरली. तिच्यात खग्रास ग्रहण लागलेली शशिकला जशी आकाशात, तशी 'मालती' जी अदृश्यच झालेली होती, ती 'कंटकी'च्या जाणिवेने ते ग्रहण सुटताच पुन्हा पहिल्याइतकीच सुंदर, सुभग आणि सुखद अशा स्वरूपात प्रकटली. त्या आनंदाच्या भरात मालती मालतीसारखीच पुन्हा एकदा हसू, रुसू, डोलू, बोलू लागली. किशन पण तिला पुन्हा किशनसारखाच भासू लागला. ती 'डुंगी' त्या समुद्राच्या सलिल लाटांवर उंच-सखल होतांना थोडी जरी कलती झाली तरी त्या निमित्ते सगळाच तोल सुटल्याचा लडिवाळ बहाणा करून मालती किशनच्या वक्षःस्थलावर झोक टाकून पडे, किशन तिला आपल्या बाहूत सावरून धरताना आलिंगून धरी. असे स्वच्छंद सुख आस्वादिता-आस्वादिता त्यांची निशाच चढून तीत तिच्याभोवती अद्यापही असलेल्या छद्मतेच्या आवरणाला मालतीने पटकन् दूर सारले आणि असावधपणे बोलून गेली,

"किशन, बघ, बघ त्या लहानशा लाटेत ती सूर्याची सांजकिरणे घुसताच रंगी-बेरंगी गुलाबफुलांच्या हारासारखीच ती लाट कशी शोभू लागली बघ! समुद्रातील रंगी-बेरंगी गुलाबांचा हार कसा असतो, ते दाखविण्यासाठी ही लहानशी फुललेली लाट अशीची अशीच उचलून अंदमानाचे एक आश्चर्य म्हणून आठवणीसाठी आईला नेऊन दाखवावी, असे मला वाटते! ए किशन....."

ती पुढे काही बोलणार, तोच किशनने तिची करंगळी सावधपणाच्या सूचनेसाठी दाबली, तीही चपापली. कारण दोनदा तिने किशनला 'किशन' म्हणूनच हाक मारिल्यामुळे डोलकाठीला साहजिक जिज्ञासा होऊन तो विचारता झाला,

"काय? 'किशन!' म्हणजे कंटकबाबूच घरच खरे नांव किशन होते की काय? आणि तुमची आई आहे अजून? कुठे असतात त्या? कंटकबाबूंच खरे नाव जसे किशन, तसे तुझेही खरे नाव कंटकी नसून दुसरे काही आहे की काय? खरेच तुझ्यासारख्या फुलपाखराला एखादं फुलाच वा पाखराच सुरेख नाव असायला पाहिजे!"

डोलकाठी आपल्या धटिंगण स्वभावानुसार वाटले ते उद्दंडपणे बोलून गेला. किशन मनात चपापला. आपले अज्ञातवासातले छद्मी स्वरूप झुगारून देण्याइतके काही संकटाच्या कैचीतून आपण मुळीच सुटलेलो नाही. हे तो जाणून होता. विनोदाचा रुपलेला काटा विनोदाच्याच काट्याने काढून टाकण्यासाठी किशन हंसला.

"नावापुरताच बोलायचे तर तुम्हांलाही 'डोलकाठी' हे नाव काही पाळण्यातच ठेवले गेलेल नसावे, आणि मी तुम्हाला तुमचे खरे नाव वा वृत्त विचारल, तेव्हा तुम्हीच मला काय सूत्र शिकवलंत? काळ्या पाण्यावरून ज्यांना यशस्वीपणे पळून जायच, त्यांनी आपले पूर्ववृत्त दुसऱ्याला

उगीच सांगणे नि जिवाची भीति ह्या दोन गोष्टी वर्जाव्यात!’ ठीक तर मग, त्याच उपदेशाप्रमाणे आम्हा बहीण-भावंडांची खरी नाव आम्ही तुम्हाला तोवर सांगत नाही की, जोवर तुम्ही तुमचे डोलकाठीहे खोटे नाव सोडीत नाही.”

“म्हणजे तुमची खरी नाव कंटक, कंटकी ही सोडून दुसरी कोणती तरी आहेतच तर! हे तरी बोलून गेलातच की स्वतः! आणि तुमचे तर नाव ‘किशन’हेच......’

हा सगळा गोंधळ झटकन् संपवावा म्हणून मालती मध्येच म्हणाली,

“नाही हो मी किनी ह्या सुटकेच्या आनंदाने झपाटल्यामुळे वेडीपिशीच झाले आहे. माझ्या लहानपणाच्या एका नातलगाच नाव तोंडी बसलंल, तेच पटकन् तोंडी आले माझ्या कंटकभाऊला हाक मारताना?”

परंतु ह्या चुकीच्या जाणिवेसरशी आपल्याला झालेला ह्या सुटकेचा इतका आनंदही चुकीचाच, ही सुटका म्हणजे सुटकेच्या प्रयत्नाचा फलोन्मुख आरंभ होय, अंतिम सफलता नव्हे, हे तिच्या कडवटपणे लक्षात आले. ती किचित्शी विमनस्क होऊन बसली.

मघा त्या सखोल समुद्रावर पाखरांसारखी उडत बसत चालणारी ती डुंगी त्या जलवीची, ती रंगीबेरंगी किरणे आणि बंदिवासातून आपण सुटलो ही उन्मादक जाणीव ह्यांच्यातच ती मग्न होती; पण आता ती आनंदाची नौका ज्यावर तरंगत चालली होती, तो समुद्र किती खोल आहे. तिकडेही तिचे लक्ष गेले.

“किती खोल आहे रे हा समुद्र, नि किती लहान आहे ही आपली डुंगी!” समुद्राच्या भीषण खोलीत डोकावत विमनस्क मालती किशनला म्हणाली.

“हो, पण अशा लहान नौका अशा सखोल समुद्रांना तरून परतीरालाही जाऊ शकतात की कितीतरी!” किशनने तिच्या मनाला त्यावेळी हवे तेच उत्तेजक उत्तरे केले.

“किती गोड बोलतोस रे तू!” लडिवाळपणाने किशनच्या पाठीवर हळूच एक थाप मारीत मालती मराठीत म्हणाली. तिला वाटले डोलकाठीला मराठी येत नसावे. कारण इतका वेळ अंदमानात सर्व जण नेहमी बोलतात, त्या हिंदीतच ती सगळी बोलत नाही.

“पण माझ्या पाठीवर तुम्ही तसेच लडिवाळपणे थोपटून विचाराल नं, तर मी पण तसेच गोड बोलेन की!” डोलकाठी त्याच्या सैनिक बाण्याच्या घसमुसळ्या विनोदाने मराठीतच मध्येच म्हणाला. इतकेच नव्हे, तर निष्कपट सलगीने मालतीच्या पाठीवर आपण होऊन त्याने तशीच एक हलकी थाप मारली.

मालती चमकून म्हणाली, “म्हणजे? तुम्हालाही मराठी येत वाटते? महाराष्ट्रातच घर आहे की काय तुमचे मूळच?”

“हं! एकमेकांना विचारायच नाही काही एक पूर्ववृत्त असे! एकमेकांनी जे आपण होऊन कोणी सांगेले तेवढे ऐकायच काय ते! कंटकबाबूंचा नि आमचा असा ठराव झाला आहे आधीच!”

डोलकाठी हे बोलत आहे, इतक्यात शेजारच्या सिंधुतटाकडील पहाडावरून ‘ऊऽऽऽ!’ अशा उंच किकाळ्या नि टाळ्या ऐकू आल्या. लगोलग कंटकने आणि डोलकाठीने डुंगी त्या तटाकडे वल्हविली. त्यांनी रचिलेल्या कटाप्रमाणे भरतीओहटीच्या मानाने जेथे सुरक्षित स्थळ असेल, तेथे उतरून घेण्यासाठी जावरे त्या बाजूला येणार होते आणि अशा खुणा करणार होते. त्याप्रमाणे ते पंधरा-वीस जावरे धनुष्यबाणांनी सज्ज होऊन एका आडोशाच्या उतारापाशी आले होते. तेथे ती डुंगी येताच त्यांनी कंटकसह सर्वांना उतरून घेतले. दाट अरण्यातून वळणे घेत घेत अंधार पडतो न पडतो तो ते सारेजण राजा नानकोबीच्या त्या रानटी राजधानीला येऊन पोहोचले.

जावरे लोक एक मोठी आगोटी पेटवून त्या वेळी तिच्या भोवती बसलेले होते. त्या आगोटीवर एक रानडुकराचे धूडचे धूड उलटे टांगलेले होते. त्यांची सामाइक पारध असली, म्हणजे तो प्राणी अशा आगोटीवर ते टांगून ठेवतात आणि तो तसा खूप धुमसला, भाजला म्हणजे मग त्याला काढून त्याच्या त्या अर्ध्या कच्च्या मासाचे तुकडे सगळ्यांना वाटून देण्यात येतात. ती जेवणावळ उरकली की त्या आगोटीभोवती ते सारे स्त्री-पुरुष सरमिसळ नि उल्लिंग अवस्थेत आपला नंगा नाच चालू करतात. अशा आगोट्या वेळी प्रसंगी तीन-चारही असतात आणि त्याभोवती जेवणावळींच्या आणि नाचाच्याही निरनिराळ्या तीन-चार पंक्ती झडतात. त्या ठराविक कार्यक्रमात हे तिघे पाहुणे त्या जिवावरच्या साहसातून असे यशस्वी होऊन परत येताच आता एक निराळाच रंग भरला. ते सारे त्या तिघांभोवती घो घो जमा झाले.

त्यातही ज्याचे त्याचे लक्ष कंटकीकडे. राजा नानकोबीला ह्या साहसी कटाची माहिती होतीच. त्याच्या विचारानेच कंटक आणि डोलकाठी कंटकीला सोडवून आणण्याच्या कामगिरीवर गेले होते. कंटकीला इंग्रजांच्या थेट जन्मठेपीच्या बंदिगृहातून अशी छिनावून आणण्यात इंग्रजांच्या कडेलोट बंदोबस्ताच्या बढाईचाच पाणउतारा केला आणि तोही आपल्या जावऱ्यांच्या साहाय्याने, जावऱ्यांच्या आश्रितांनी! असा राजा नानकोबीला स्वतःचाच गौरव वाटला. त्या विजयाची पताकाच असलेली ती कंटकी तिला पाहता-पाहता त्यालाही पुरेसेच होईना. पण त्या सगळ्यात जावऱ्यांच्या बायका-मुलींची लगबग तर विचारूच नका! आगटीच्या भडक उजेडात तिच्याकडे त्या आपुलकीने पाहात, हसत, खुणावीत घोळ घालून उभ्या राहिल्या. पण तिच्यापेक्षाही जर त्यांना कशाकडे विशेष निरखावेसे वाटत असले, तर ते तिच्या त्या साडीकडे!

मालतीला त्या जावऱ्यांच्या विवस्त्र स्त्रिया सारख्या खुणावू लागल्या, “हे काय? त्या स्त्रीने शरीराभोवती हे काय अभद्र गुंडाळल आहे? तशी ती दिसते आहे किती तरी सुरेख! मग कपड्यात कशाला झाकते आहे स्वतःला अशी लाजून? काय नेसली आहे हो ते?” असे नाना प्रश्न त्या आपसात विचारीत होत्या.

डोलकाठीने त्यातील एका स्त्रीला उत्तरे केले, “ती साडी आहे साडी. लुगडे म्हणतात त्याला.”

त्यासरशी त्या साऱ्या जणी तोंडावर हात ठेवून खुदकन् हसल्या आणि नाक मुरडून म्हणाल्या, “अश्श! बायका का कधी लुगडे नेसतात? काही मर्यादा?”

विवस्त्र असणाऱ्या त्या जावऱ्यांच्या स्त्रियांना स्त्रीने वस्त्र नेसणे ही जशी स्त्रीपणाला न शोभणारी अमर्यादा वाटली, त्याहूनही शतपटीनी त्या जावऱ्या स्त्रियांना अगदी आपादमस्तक नागड्या असलेल्या आणि निःसंकोचपणे पुरुषांमध्ये तशाच वावरताना पाहून मालतीलाही पराकाष्ठेची लाज वाटली. तिने एकदा -दोनदा तर डोळेच झाकून घेतले. मग खालीच पाहात उभी राहिली.

राजा नानकोबीलासुद्धा जरा पेचच पडला. त्याच्या राणीने, त्या फुलीनेसुद्धा हट्ट धरला की, “कंटकीने आपल्या इथे असे तो लुगडे बिंगडे नेसू नये. तिच हे उदाहरण पाहून आपल्या मुली-बाळींना असेच वळण लागायच!”

कंटकीची त्यांना दया येत होती. तिच्या यातना ऐकून आणि तिच्याकडे पाहून सर्व स्त्रियांना आपुलकीही वाटत होती; पण वस्त्र नेसण्याच्या ह्या तिच्या अश्लीलतेची तेवढी त्यांना किळस येई. शेवटी राणी फुलीने कंटकीच्या साडीच्या पदराला थोडासा हिसका देऊन ममतेने खुणावले, “सोडून टाक हे लुगडे नि स्त्रीला शोभा देणाऱ्या विवस्त्रपणे वागण्याचा शिष्टाचार पाळ!” पण त्या हिसक्याने उतरलेला पदर सावरून मालतीने तो अधिकच घट्ट धरला.

आता प्रकरण विकोपाला जाते की काय, अशा भयाने डोलकाठीने मध्ये पडून, सारे हसण्यावारी नेऊन हमी घेतली की, “कंटकीची वस्त्र नेसायची ही जन्माची खोड! एकदम ती कशी सुधारणार? दोन-चार दिवसात सभ्य स्त्रियांप्रमाणे विवस्त्र राहण्याची सवय तिलाही होईलच होईल. तोवर शिष्टाचारांची तिच्यावर सक्ती नसावी, नेसण्याच्याच नव्हे, पण खाण्याच्या, गाण्याच्या, नाचण्याच्या प्रकरणीसुद्धा!”

***

एकवीस

"सोड, सोड सोड बाण! निसटला बघ तो वराह त्या झुडूपातून!"

किशनच्या ह्या शब्दांसरशी झाडावर दडून बसलेल्या मालतीच्या धनुकलीवरून सणासणसण करीत बाणांमागून बाण सुटू लागले. तो रानडुकर झुडपात दबून बसला होता, त्याच्यामागून एका लांब भाल्याने किशन त्याला किती वेळ तरी हुडकून- हुसकण्यास झटत होता. त्या त्रासाने वैतागून शेवटी तो वराह झुडूपातून किशन होता त्याच्या उलट दिशेने बाहेर पडला आणि मुसंडीसरशी भरधाव पुढे घुसला. त्याची तेथेच वाट पाहत मालती एका झाडावर धनुर्बाण सज्ज करून बसलेली होती. जावऱ्यांच्या रानात राहू लागल्यापासून जावऱ्यांच्या स्त्रिया जशा त्यांच्या पुरुषांसह मृगयेला स्वतः जाते असते, तशी तीही किशनसह प्रत्यही जाऊ लागली होती आणि त्या रानांतील निवासाच्या गेल्या तीन-चार महिन्यात धनुष्य-बाणाच्या उपयोगात आणि मृगयेच्या धाडसात जावऱ्यांच्या स्त्रियांप्रमाणेच तीही आता पटाईत होते चालली होती. आज वराहाची मृगयासुद्धा स्वतः करण्याचा आग्रह तिने धरिल्यामुळे त्याचा पहिला धडा किशन तिला देत होता. वराहाला हुडकीत-हुसकीत बाणांच्या चांगल्या टप्प्यात, सुरक्षिततेकरिता मालती ज्या झाडावर पाळत राखून बसली होती त्या बाजूला त्याला आणून सोडण्याचे किशनकडे असलेले काम त्याने चोख बजावले आणि त्या झुडूपात तो वराह भरधाव बाहेर पडताच मालतीने त्याच्यावर बाणांचा मारा केला.

तिचे पहिले दोन बाण जे त्या बलिष्ठ रानडुकराला लागले. ते जशी कुसळेच बोचावी तसे दुलर्क्षून तो पशू तसाच धावत राहिला. इतक्यात तिने होते नव्हते ते सारे बळ खर्चून मारिलेला तिचा शेवटचा बाण त्याच्या थेट कुशीतच घुसला. थोडासा धडपडते तसाच पुढे जातो, तो तो वराह धाड्दिशी भूमीवर कोसळला.

हे पाहताच मालती झाडावरून खाली उतरली, दुरून धावतच येणाऱ्या किसनला तिने मध्येच हटकले आणि आपल्या शौर्याची वाखाणणी त्याच्याकडून, प्रजेकडून कर उकळावा तशा अधिकाराने, उकळण्यासाठी त्याला म्हणाली,

"काय? केली की नाही मी जिवावरची मृगया आज?"

"झाडावरची म्हण! जिवावरची नव्हे!" किशन हसला, "ज्याने पायदळी पाठ लागून त्या हिंस्त्र प्राण्याला तुझ्यापुढे आयत आणून सोडले , त्याने जिवावरचे काम केले! सुरक्षितपणे झाडावर बसायच काम तेवढे तू केलेस."

"प्रत्येक राणी, जी मृगया करते तिच्या हाताखाली हाक्ये ठेवलेलेच असतात! तू चांगला हाक्या आहेस इतकेच काय ते म्हण हवे तर! पण ज्याचा बाण, त्याची मृगया! ह्या वराहाच्या कुशीत घुसलेला हा बाण आहे माझा, अर्थात् मृगयाही माझीच!"

"चालेल! तो सगळाचा सगळा रानडुक्कर तू एकटीच खा, मग तर झाले! नाही तरी मी आता शाकाहारीच होणार आहे. ज्याला रानडुकराचे गुण हवेत त्याने रानडुकरच खावे; मी केळी, बटाटे..."

“अगदी योग्य! ज्याला आपल्या डोक्यात बटाटेच भरायला हवेत, त्याने तेच खावेत!” मालतीने त्याला मध्येच अडविले.

इतक्यात ‘ऊऽमऽऽऊऽऽऽऽ’अशी जावऱ्यांची हाक मारणारी उंच किंकाळी आली. वळून पाहतो, तो किशनच्या हाताखाली आताशी काम करीत असलेला एक जावरा त्यांच्याकडे धावत धावत येत असलेला आढळला. तो येताच त्याने रडण्याचा एक हेल काढून, डोळे चोळून आणि एक-दोन शब्द बोलून त्या हावभावांनी आणि शब्दांनी मिळून जो निरोप दिला, त्याचे सगळे वाक्य असे झाले असते.

“बाबूजी! चला चला, तुम्हाला राजा नानकोबी रडायला बोलवतो आहे!”

तो त्याचा भावार्थ समजून किशनने मालतीला शब्दात सांगितला, “ऐकलेस? राजा नानकोबी मला रडायला बोलावतो आहे!”

“अश्श! म्हणजे रे काय? तुला रडायला बोलावतो म्हणजे काय? त्याला रडायच तर रडो बापडा!”

“अग पण तो एकटा रडून कसे भागेल? त्याच्या नातलगातला एक जावरा जो काल फेफऱ्याने आजारी होता ना, तो मेला आहे. त्याच्यासाठी त्याच्यामागे राहिलेले लोक जितके अधिक जमून जितके मोठमोठ्याने रडतील तितका त्या मृताचा आत्मा त्याच भूत संतुष्ट होईल; नाही तर ते जिवंत आप्तेष्टांना त्रासवीत राहील, अशी त्यांची समजूत असते. म्हणून कोणी मेल की ते सर्वांना ‘रडायला या’ असे आमंत्रितात. हसतेस काय? आपल्यातही पूर्वी अशीच समजूत असे. आजही आपल्यातील अनेक जातीत मोलकरी आणून रडायला बसवतात, ‘मोले घातले रडाया नाही आसू आणि माया ।।’ ख्रिश्चन मुसलमानांतही प्रेत पुरून ती पुढे उठणार आहेत म्हणून जतन करून ठेवावी, अशी जी धर्मसमजूत आहे, ती जावऱ्यांच्या ह्या परलोक विद्येचाच धडा गिरवीत आलेली आहे, नाही का? जावरे तर मेलेल्यांसाठी जिवंतांनी नुसते रडले की पुरे एवढेच मानतात; पण पूर्वी मिसर ते जपानपर्यंत अनेक राष्ट्रे मेलेल्यांच्या सोबतीसाठी जिवंत आप्तेष्टांनी स्वतःलाही पुरून घ्यावे नि परलोकी जावे असे मानीत! मेलेल्यांच्या जिवंत बायका, चाकर, दासदासी ह्यांनाही त्यांच्या थडग्यात पुरीत असते! बरे....” त्या जावऱ्यांकडे कळून किसन त्यास म्हणाला, “जा, नि आम्ही रडायला लवकरच येतो असे नानकोबीला सांग जा. पण थांब; हे बघ, हा वराह पण पाठीवर टाकून घेऊन जा नि आमच्या वतीने राजा नानकोबीला ही भेट दिली आहे म्हणून सांग, जा!”

त्या जावऱ्याने त्या वराहाला त्यांच्या विशिष्ट पद्धतीने बांधून ते धूड पाठीवर टाकले आणि तो निघून गेला.

“किती ग दमली आहेस!” किशनने मालतीला प्रेमळ दृष्टीने निरखीत आणि तिचा एक हात आपल्या हातात घेत संबोधिले. “मालती, मृगयेच्या नादात सावजापाठीमागे सकाळपासून धावपळ करीत तू किती घामाघूम झाली आहेस नि थकलेली दिसते आहेस! आणि त्यामुळेच किती सुंदर!

हे बघ घामाचे स्वच्छ नि शुभ्र बिंदू मोत्यांच्या बिंदीसारखे तुझ्या निटिलाला नि हा गुलाबी रक्तिमा तुझ्या गालांना कसा खुलवीत आहे! ये, बैस ये थोडी अशी माझ्याजवळ, विसावा घे थोडासा नि मग जाऊ आपण जावऱ्यांकडे.” तिला गोंजारीत किशन तेथील एका खुर्चीसारख्या शिलातलावर खाली पाय सोडून बसला आणि तिच्या त्याने हातात घेतलेल्या डाव्या हाताला एक प्रेमळ हिसका देऊन आपल्याकडे ओढले.

हवे तेच गोड निमित्त मिळाल्यामुळेच प्रसन्नलेली मालती अलगद जाऊन किशनच्या मांडीवर बसली. आपला उजवा हात त्याच्या मानेभोवती टाकीत, पाय त्याच्या पायावर लांबते रुळवीत आपले मुखमंडळ तिने त्याच्या प्रशस्त वक्षःस्थलावर टेकले, लोचन मिटून मंद मंद श्वासोच्छ्वासीत ती विसावा घेऊ लागली.

तिच्या भालावर भुरुभुरु उडणारे कुंतले मधून-मधून सावरीत, मधून-मधून तिच्या गालांवर अलगद थोपटीत, आता तिच्याकडे प्रेमळपणे पाहात तर मग तिच्या मस्तकावर आपले आनतमस्तक टेकून डोळे मिटीत, किशनही त्याच्या त्या प्रियकरणीच्या गाढ आलिंगनाचे सुख आस्वादाण्यात मग्न झाला.

तशा गुंगीत क्षण गेल्यानंतर मालतीने आपले लोचन उघडले आणि त्याच्या वक्षःस्थलावर तशी पडल्या पडल्याचे आपले सुंदर मुखमंडल तिने किशनच्या मुखाशी उचलून धरिले.

तिची मूक विनंती तीच त्याची अभ्यर्थना होती. त्याने तिच्या त्या वर केलेल्या सुंदर मुखाचे चुंबन घेतले. तिने पुन्हा आपली मान त्याच्या वक्षःस्थलावर टेकून नेत्र मिटले.

तिला लागलेली गोड गुंगी काहीशी पुरी होताच ती त्याच्या मांडीवरचे पण उठून ताठ बसली आणि तिच्या गुंगीतच जो विषय तिच्या मनात चर्चिला जाते होता, तो तसा काही किशनलाही ऐकू जाते होता, अशाच संततपणे तिने तो चालू ठेवून त्याला लडिवाळपणे विचारले,

“खरे नाही कारे हे? तुला पण नाही का असेच वाटते?”

“कसे! गोड नं? वाटते तर! तुझ्या अशा प्रेमळ आलिंगनात जर नकळत येईल, तर मालती मरणसुद्धा गोड वाटेल! मग जीवनाच काय विचारतेस!”

“मग सांगू का तुला मी काय विचारीत होते ते? साऱ्या आयुष्यभर, स्वतःचा कोणताही आततायी अपराध घडला नसता, एकसारख्या अपेष्टाच अपेष्टा सोशीत आलेल्या मला दैववशात् लाभलेले हे तुझ्या प्रणयप्रेमळ संगतीच अमूल्य सुख अधिक सुखाच्या लालसेपायी पुन्हा धोक्यात ढकलण्याच साहस आता करवत नाही! खरेच किशन, मी म्हणते, आता इथून पुन्हा पळून जाण्यासाठी जीव धोक्यात का बरे घालावा? भर समुद्राला टाकाऊ तारवाने ओलांडणे, प्रबळ शत्रूंचे सरकारी पहारे समुद्रावर नि भूमीवर सारखे टपलेले, ते टाळून देशी जाण्याची आशा धरणे, हे अगदी वेडेपणाच नाही का आता ठरते? दुसरा उपायच नव्हता. माणुसकीने जिवंत राहण्यास, तेव्हा वाटेल ते साहस करणे भागच होते. पण आता जिथे तुझ्या संगतीत स्वच्छंदपणे असे जीवन जर

नेता येत आहे, तर इथेच ह्या जावऱ्यांच्या आश्रयाला, ह्या अरण्यात, असेच आनंदात का राहू नये जन्मभर?

"ज्या गुहेत आपण दोघे आताशी राहतो ना, ती गुहा सुखाच प्रत्यक्ष गोकुळ वाटते मला! कोणतीही राणी तिच्या हिऱ्या-माणकांनी नि गाद्या-गिरद्यांनी सजावटलेल्या रतीमंदिरात आधिक सुखी नसेल! किशन, राजवड्यांतही राजे-राण्या आत्महत्या करतातच, नाही का? माझी आई किनी नेहमी म्हणत असे की, आवश्यकतेपलीकडे जो पसारा, तो असला नसला सारखाच. सुख नुसत्या पसाऱ्यात नसते, समाधानात असते. ती म्हणे, पन्नास वाडे जरी असले तरी देहाच्या लांबी-रूंदीइतक्याच स्थलावर निजाव लागणार! हाडे पुष्कळ म्हणून काही देह वाढवता येत नाही. तसेच जिलबीचे ढीग पडलेले असले तरी वीतभर पोटास मावेल तेवढीच खाता येणार! म्हणून म्हणते, आता जास्त सुख देशात जाऊन तरी कोणत असे मिळणार आहे, की ज्याच्यासाठी अक्षरशः संकटाच्या समुद्रात अशी उडी आम्ही पुन्हा घ्यावी? मला किनी इथे काही कमी वाटत नाही. किशन, ही जी अशी मी तुला आलिंगून आहे, ती कुठेही गेले तरी अशा आलिंगनाच सुख इतकेच असणार! स्वच्छ पाणी पोटभर इथे ह्या वनांत प्याल म्हणजे तहान शमताच जे गोड वाटते, ते अगदी सिंधुनदीवर गेले, तरी तहान शमण्यासारखे सुख तसेच नि तितकच असणार!

"सकाळीच अशी मृगया खेळत समुद्रकाठी वा राना-वनातून स्वेच्छ संचाराव, दमून भागून मग तुझ्या वक्षःस्थलावर असा विसावा घ्यावा, असे कुरवाळून घ्यावे, मग गुहेकडे जाऊन खमंग भुकेल्या तोंडी मांस, मत्स्य, फळं, कंद, यथारुचि खावे, दुपारी समुद्राच्या वाळवंटावर जावऱ्यांच्या स्त्रियांचे खेळ खेळत, गाणी गात नाना रंगरुपांच्या शंख-शिंप - गारा वेचीत वनश्रीचे नि जलश्रीचे चमत्कार पाहावेत नि दिवसभर अतस्ततः स्वच्छंद उडून उडून थकलेली पाखरांची जोडपी घरट्याला जाऊ लागली की, तसेच तुझ्या हाती हात घालून आपल्या त्या गुहेच्या गोकुळात परत जावे नि बिलगून निजाव! मनाच्या मापानेच जे मोजले जाणार ते प्रिय संगतीच सुख ह्या गुहेतील आपल्या रतिशेजेवर जे समाधान देत, गोकुळात गेले तरी ते तितकेच असणार! मग आता इथूनही पुढे पळून जाण्याच्या प्रयत्नात जिवावरच्या नव्या संकटांना का बरे स्वतःवर बळे - बळे ओढून घेतोस? इथे असेच जन्मभर राहू ये आपण. माझ्या सुखा-समाधानाच्या पलंगाला ती गुहा अगदी पुरेशी आहे."

"पण ती गुहा पलंगाला पुरेशी असली तरी पाळण्याला पुरेल का? उद्या पाळणा बांधायची वेळ आली म्हणजे?" किशनने तिला गुदगुली केली.

"चूप! बाष्फळ कुठला!" मालतीने एक हळूवार चापटी किशनच्या गालावर रागवल्यासारखी मारली आणि लोभावल्यासारखी खुदकन् हसली. "चेष्टेवारी नकोस न नेऊ मी काय म्हणते ते!"

"नाही सखे, चेष्टेवारी नाही नेत. पण पुन्हा समुद्रपार पळून जाण्याच जिवावरचे संकट का ओढून घ्यावे हे विचारताना तू हे विसरलीस की, जुनी जिवावरची संकटे आपल्या भोवती अजून घिरट्या घालीत आहेत! मी पळूनच गेलो हे जरी काळ्या पाण्याच्या सरकारी अधिकाऱ्यांना अजून

नक्की पटल नाही, मी जावऱ्यांच्या चकमकीत मारलाही गेलो असेन, असे जरी त्यांना अद्याप वाटते आहे, तथापि तू भर दिवसा बंदिगृहातून पळवली गेलीस ह्यात तरी त्यांना काहीच शंका नाही. तुला नि तुला पळविणाऱ्यांना पकडून देणारास हजार-हजारांची पारितोषिके देण्यात येतील, अशी सरकारी प्रसिद्धक -जाहिराती -सर्वत्र फडकत आहेत! कसून शोध चालला आहे. त्यांच्या हेरांना नि नौकांना जर आपला इथला सुगावा लागला तर? किंवा ह्या शेकडो जावऱ्यांतलाच एखादा मनुष्य इंग्रजाला फोडता आला तर? अशी उदाहरणे क्वचित् क्वचित् घडतातही! असा प्रसंग गुदरला तर आपल्या हाताने आपला जीव घेणे हेच त्या बंदिवासाच्या भयंकर यातनात पुन्हा जाऊन पडण्यापेक्षा बरे वाटणार नाही का?

"त्या संकटापेक्षा समुद्रपार होण्याच साहस केव्हाही कमी धोक्याच आहे. पुन्हा इथे पशुपक्ष्यांच्या जोडप्यासारखे जरी जगलो, तरी पशुंसारखेच जगू; मनुष्यासारखे नाही. स्वदेशीची, स्वराष्ट्राची, मानुषकाची काही सेवा, काही देवकार्य जर हातून घडत नसेल, तर मनुष्याच्या जीवनात माणुसकी ती काय उरली? आणि सखे, तुझ्या कुसव्यास यथाकाली धन्यविणाऱ्या चिमुकल्या देवदूताला ह्या जावऱ्यांच्या नि रानडुक्करांच्या संस्कृतीची दीक्षा का द्यायची आहे? तेव्हा देशाला हे गेलेच पाहिजे, समुद्र हा उल्लंघिलाच पाहिजे. यातही आपल्याला काळ्या पाण्याच्या बंदिगृहातून पळून आल्यापासून तरी गेल्या तीन-चार महिन्यात दैवही अनुकूल होते चालले आहे. त्या नराधम रफिउद्दिनचा ह्या डोलकाठीच्या पराक्रमाने अनायासेच सूड उगविला जाऊन तुझ्या मार्गात इथेसुद्धा आडवी येणारी धोंड दूर झाली.

"तो प्रच्छन्न शत्रू रफिउद्दिन ज्या साहाय्यासाठी जवळ ठेवावा लागला, ते समुद्रतरणाच साहाय्य देणारा असा एक जिवाचा मित्रही त्या डोलकाठीतच आपणाला मिळाला. नाविक विद्येत तो तज्ज्ञ, धाडसी; गेल्या तीन-चार महिन्यांत जिवाला जीव देणाऱ्या त्याच्या स्नेहाची कसोटी पुरती उतरलेली! त्यान एक फक्कड तारू किती परिश्रमाने बांधून नि साहित्य जमवून सज्ज ठेवले आहे बघ! आता अनुकूल वाऱ्यांची तेवढी वाट पाहात तो थांबला आहे. ते वारे सुटले की आपण तिघं समुद्रात ते तारू सोडून स्वदेशाकडे निघणारच निघणार."

"पण त्या डोलकाठीच्याही मनात माझ्याविषयी एक दुराशा जी उत्पन्न झाली आहे, मी त्याची पत्नी व्हावे असा जो अभिलाष संचारला आहे, त्याचा दुष्परिणाम आज ना उद्या वैरातच होणार नव्हे का?

"सहसा तसे होणार नाही. कारण त्याला तुझी अभिलाषा असली, तरी ती नराधम रफिउद्दिनसारखी राक्षसी अभिलाषा नाही. आज तरी ती सात्विक अभिलाषा आहे. तू माझी सख्खी बहीण कंटकी आहेस हे आपण दाखवीत असलेले नातंच तो खरे मानीत आहे नि ह्यासाठी साहजिकच त्याला तुझ्यासारख्या कुमारिकेला मागणी घालावीशी वाटली. तो तुला कुमारिका समजत आहे. त्याला जेव्हा आपले खरे नात सांगून टाकायची वेळ येईल....."

“मग सांगूनच का टाकीत नाहीस ते? खरेच किशन, मला किनी आता तुला वरकरसुद्धा ‘भाऊ म्हणायची लाज वाटते गडे!”

“ती का?” किशन तिला डिवचून हसला.

“अश्श! का म्हणून काय विचारतोस आणखी? प्रियकराला भाऊ म्हणतात वाटते कुणी? जावऱ्यांतसुद्धा भावाबहिणींची लग्ने माणुसकीची रीत समजत नाहीत!”

“जावऱ्यांत नसतील, पण माणुसकीच्या कक्षेत बहीण-भावंडांची लग्नं अगदी कधी झालीच नाहीत, असे मात्र समजू नकोस, मनुष्य समाजाने सर्व प्रकारच्या विवाह प्रकारांनाच नव्हे, तर स्वच्छंद संभोगांनाही ज्या ज्या परिस्थितीत ते इष्ट वा अपरिहार्य वाटतील, त्या त्या परिस्थितीत धर्म्य मानलेले आहेत. प्रत्यक्ष गौतम बुद्धांचा जन्म ज्या कुलात झाला, त्याच कुलाची कथा ग्रथान्तरी अशी सांगितली आहे की, सूर्यवंशाच्या एका राजपुत्राला नि त्याच्या बहिणीला संकटपरत्वे एका निर्जन अरण्यात जन्म काढावा लागला. तेव्हा त्या बहीण-भावंडांनी आपसात विवाह केला नि त्यांच्या संततीच्या पोटीच पुढे काही पिढ्यांनी बुद्धासारखा महात्मा निपजला!

“राजकुलाच रक्तबीज दैवी! त्याचा मनुष्यांशी संबंध घडू नये, ते अशुद्ध होऊ नये, असा अनुवंशाचा अतिरेकी सोवळेपणा राखण्यासाठी ब्रह्मदेशाच्या, मेक्सिकोच्या नि इतरही काही ठिकाणच्या प्रख्यात ‘दैवी’ राजवंशांमध्ये राजपुत्राच लग्न त्याच्या सख्ख्या बहिणीशीच झाले पाहिजे, अशी ‘धर्माज्ञा’च होती, शिष्टमान्य रूढीच होती. ज्या समाजांना त्या धर्माचे दुष्परिणाम होतातस वाटले, त्यांनी त्यालाच अधर्म म्हणून ठरवल. आजही हिंदु-मुसलमान ख्रिश्चनादिक कुठे मामेबहीण, कुठे मावसबहीण, प्रत्यक्ष सख्ख्या चुलतबहिणींशीसुद्धा लग्न लावणे अधर्म समजत नाहीतच. मग आपण तर जिवावरची संकटे टाळण्यासाठी हा नुसता भाऊ-बहिणीच्या नात्याचा बहाणा करीत आहोत.”

“खरेच, काल काय रे तो म्हणत होता तुला, माझ्याकडे इतके हसत-हसत बोट दाखवून?”

“अग, तो डोलकाठी खरोखरीच एक सैनिक बाण्याचा मनमोकळा मनुष्य आहे. छक्के पंजे त्याला माहीत नाहीतच. जसे काल ते तारू झक्क झाले, तेव्हा मोठ्या आनंदाने त्याने मला ते दाखवले नि विचारल,

“ह्या तारवाने तुला नि तुझ्या त्या गोमट्या बहिणीला जर देशात सुखरूप नेऊन पोहोचवल, तर ह्या नावाड्याला ह्या तरीच भाडे तू काय देशील?”

“मी म्हंटले, ‘काय हवे तुला?

“तेव्हा तो तुझ्याकडे बोट दाखवून म्हणाला, ‘ती सोन्याची पुतळी तेवढी हवी!’

“मी हसलो, ‘माझी मुळीच हरकत नाही. जर तिच मन तुला वश करता आले तर पैलतीरावर पोहोचताच तुमचा विवाह उरकून टाकीन.’

“तेव्हा एकदम छातीवर हात मारून तो डोलकाठी हसला, ‘ते काम माझे! मी शीळ घातल्यावर ते पाखरू माझ्या हातावर येऊन बसले नाही, तर माझे नाव बदलून देईन!’

"लगोलग त्याने माझे वचन घेतल, जर कंटकी अनुकूल झाली, तर मी तिला डोलकाठीला आनंदाने देईन."

"वा रे वा तू, नि वा रे तुझे वचन! किशन!" त्याच्याकडे रुसव्याने टवकारीत मालती म्हणाली, "किशन, सगळा वाईटपणा नि दायीत्व माझ्याकडे देऊन आपण नामानिराळा झालास! पण काय रे, जर तो आता माझ्याशी लाडीगोडी करू लागला नि मी त्याला खरोखरच अनुकूल झाले तर.....?"

"तर काय? तुझ्या इच्छेस पुरवून तुला आनंदविण्यासाठी मी स्वतःला त्यानंतर खरोखरच तुझा सख्खा भाऊ समजू लागून त्याच्याशी तुझा विवाह आपल्या हाताने लावून देईन!"

फणकाऱ्याने त्याच्या मांडीवरून उठू पाहणाऱ्या मालतीला हात धरून तसेच बसवीत किशन गोंजारू लागला.

"रागावतेस काय अशी? प्रश्न विचारलास तेव्हा कसे तुला बरे वाटले? मग द्यावे तसे घ्यावे! पण मालती, खरोखरच सांगतो तुला की, तुझ्यासारखा सुंदर नि गोमट्या तरुणीला माझ्यासारखा काळा-सावळा, कुरुप नि कोणतीही विशेषता नसलेला प्रियकर अनुरुप नाही, हे मी मनांतून प्रथमपासून जाणून आहे. मला नुसता तुझा स्नेह जरी लाभला, तुझ्या संगतीत सेवक म्हणून जरी मी राहू शकलो, तरी माझ्या योग्यतेप्रमाणे मला जे मिळणे इष्ट ते सर्व मिळेल, असे मी मानीत आलो आहे. माझ्याहून जो तुला अधिक अनुरूप तो प्रियकर निवडायला तू सर्वतोपरी स्वतंत्र आहेस."

"होय ना? मग मी स्वतंत्र आहे, म्हणूनच तुझ्या नेत्राने वा मापाने निवड न करता मी माझ्या मापनाने ह्याचे प्रियकराची निवड केली आहे! किशन, सखया!"

मालतीने सद्‌गद होऊन किशनला मिठी मारिली आणि त्याच्या वक्षःस्थलावर आपले मस्तक टेकून ती क्षणभर निःस्तब्धपणे प्रेमाश्रू ढाळीत राहिली. मग पुन्हा मान वर उचलून खोचक दृष्टीने किशनला निरखीत हसली.

"किशन, तुम्हा पुरुषांना रूप-रंगाचीच जाणीव अधिक. कारण तुमची प्रीती तुमच्या डोळ्यांत असते. पण आम्हा ललनांची प्रीती आमच्या हृदयात असते. ललनांची प्रीती आमच्या हृदयाच्या नयनांतून पाहते आणि म्हणूनच तिला रूप नि रंग हे दिसतात, पण शील, स्वभाव नि सद्‌गुण हे विमोहवितात, पराक्रम नि पौरुष ह्यांच सौंदर्य रूपाहून वा रंगाहून किती आकर्षक असते, हे घनश्यामल रामाला वरणाऱ्या सुवर्णगौरी सीतेला विचार, सावळ्या श्रीकृष्णाला वरणाऱ्या नि शिशुपालादिक गोऱ्या-गोमट्या नि नवरदेवकरंट्या लंपटांना झिडकारणाऱ्या स्वरूप-शालिनी रूक्मिणीला विचार! ह्यामुळेच ललनांचा लोभ हा रूप-रंगाचा दोन दिवसांचा सुकणाऱ्या गवताप्रमाणे चंचल नसतो, तर शीलाच्या आम्रतरूप्रमाणेच सरस, सुस्थिर नि सफल असतो!"

"निदान असावयास पाहिजे होता खराच!" किशन तिला डिवचून म्हणाला, "पण स्त्रियांच्या अर्ध्या हृदयात त्यांची प्रीती निवसते हे तुझे म्हणणे जर रुक्मिणीच्या उदाहरणाने खरे मानायच,

तर स्त्रियांच्या उरलेल्या अर्ध्या हृदयात कपट निवसत हे माझे म्हणणेही त्याच उदाहरणावरून तुलाही मानले पाहिजे. कारण रुक्मिणीचे चोरटे पत्र्यव्यवहारही प्रसिद्धच आहेत! तेव्हा तू माझ्यासाठी तरी डोलकाठीला एकदम निराश करू नकोस. देशी गेल्यावर तुझ्या प्रेमयाचनेला स्वीकारीन अशी आशा त्याच्यापुढे सतत धर. तो सज्जन आहे हे निश्चित, पण एका निष्कपटी धटिगणही आहे तो थोडासा. तेव्हा तो जी लाडी-गोडी लावीत आहे, तिला एकदम धिक्कारू नकोस. कारण देशात गेल्यावर तुझ्या प्राप्तीची त्याची आशा सुटली, तर न जाणो तो आपल्या समुद्रलंघनाच्या कामी देत असलेल्या धाडसी नि तत्पर साहाय्यात ढिलाई करू लागेल. बरे, तुझे-माझे खरे नातेनि पूर्ववृत्त सांगावे, तर आपल्या प्रेमाचा मत्सरही त्याच्या मनात घर करून बसणारच नाही कशावरून?

"आणि आपण ज्या हत्येच्या अपराधासाठी शिक्षा पावलो, त्याविषयीच्या खटल्याच्या वेळी ज्या संकटाकरिता आपली कंटक-कंटकी ही बनावट नावे नि बहीण-भावंडाचे बनावट नाते आपण प्रसिद्धीले, ती संकटे, ही खोटी नावे नि नाते उघडकीस येतांच आपणावर पुन्हा संकट कोसळण्याचाही संभव अजून आहेच. तेव्हा देशी पोहोचेतो सध्याची नाटकी भूमिका अशीच ठेवणे भाग. देशी पोहोचल्यावर डोलकाठीच्या प्रेमाला तू सुखेनैव अव्हेर. तो सज्जन आहे. तुझ्या इच्छेविरूद्ध तुझ्यावर बळाने प्रेम लादणारा दुर्जन नाही, पण क्वचित् तसा बिघडला नि वैर धरू लागला, तर तिकडे त्याला तोंड देणे किंवा गुंगारा देणे आपणास शतपटीने अधिक सोपं जाईल. आज आपण सर्वस्वी नाडलेलो; त्याच्या सहाय्यावाचून समुद्र उल्लंघिणे आपणाला बहुधा दुर्घट! ज्या उद्दंड नि उच्छृंखल माणसात अनवस्था हीच समाजव्यवस्था होऊन बसते, त्यांच्या संगतीत ज्याला जगायच त्याला आपद्धर्म हेच सद्धर्म मानले पाहिजेत!"

इतक्यात पुन्हा 'ऊऽऽऽऽ! कंटकबाबू ऽऽऽऽ' अशा किकाळ्या आल्या.

"ऊठ ऊठ. ते बघ जावरे पुन्हा बोलवायला आले. गेलेच पाहिजे आता त्यांच्यासह समारंभपूर्वक रडायला!"

कंटक आणि कंटकी जावऱ्यांच्या त्या पहाडावरील खबदाडाकडे जो येतात, तो त्या जावरा मृताचा प्रेतसंस्कार अगदी भरात आला होता. तो मृत जावरा राजा नानकोबीचा एक विशेष स्नेही आणि जावऱ्यातील एक 'दादा' असल्याने त्याच्या प्रेतसंस्कारार्थ ते सारे जावरे आले होते. त्या प्रेताला मध्ये ठेवून, बायका, मुले, माणसे, सारी अगदी उल्लिंग, नागवी, उघडी सरमिसळपणे त्या प्रेताभोवती एका वर्तुळात बसली. त्या मृताच्या पत्नी नि मुलांना स्वाभाविकच दुःखाने आधीच विव्हळ केले होते. परंतु प्रेतसंस्कारार्थ सर्व जाते जेव्हा अशी सार्वजनिक शोक करण्यास त्या प्रेताभोवती जमली, तेव्हा त्या देखाव्यासरशी त्या मृताच्या पत्नीने, शोकाचा आवेश अधिक आला म्हणूनच नव्हे तर त्या प्रेतसंस्कारातील कर्तव्याची जाणीवही असल्यामुळे स्फुंदता-स्फुंदता मध्येच गळा काढलाय. त्यासरशी एका विशिष्ट सुरावर नि ठेक्यातच ते सारे जावरेही रडू लागले. प्रथम प्रथम प्रेतसंस्कारातील एक कर्तव्य म्हणून जरी ते रडू लागले, तरीही सामाजिक भावना ह्याही

रोगाप्रमाणे एक सामाजिक साथच असल्याने, कर्तव्य म्हणूनच रडता-रडता ते शेवटी खरोखरच रडू लागले. साऱ्यांचे डोळे पाण्याने डवरून आले.

तो सार्वजनिक नि संगीत आक्रंद आवरता आवरेनासा झाला. मध्यंतरी त्यांच्यातील वृद्धांनी त्या प्रेताची एक मोट बांधली आणि ती घेऊन ते सगळे जण छाती ठोक्याठोक्याने पिटीत नि एकाच सुरावर गळे काढून रडत एका प्रचंड वृक्षाकडे गेले. त्या वृक्षाला उंच भागी एक ढोली होती, तिच्यात ती प्रेताची मोट अशा रीतीने बसवली की, जणू काही तो मनुष्य मांडी घालून तोंड वर करून सर्वांकडे जिवंत मनुष्यासारखाच बघत आहे. जावऱ्यांच्या खुजा जातीला ते इतके उंच वाटले की, त्यांच्यातील कोणालाही ते प्रेत त्या ढोलीपर्यंत उंचावणे दुर्घट व्हावे. म्हणून डोलकाठीने ती मोट त्या ढोलीत स्वतः बसविली. जावऱ्यांच्या प्रेतसंस्कारातील हा विधी होते असता सर्वांनी तालबद्ध आक्रोशाची परमावधी केली.

नंतर त्या सर्व जावऱ्यांनी आपल्या अंगावरील रंगीबेरंगी शृंगारिक मातीचे पट्टे पुसून टाकले. गुळगुळीत डोई केलेल्या सर्व सुवासिनींनी नि पुरुषांनी सुतकाचे चिन्ह म्हणून नुसती भुऱ्या रंगाची माती आणिली आणि ती सर्व स्त्री-पुरुषांनी आपल्या अंगांना नि 'तासलेल्या' विकेश डोक्यावर फासली, नंतर मृताचे शेवटचे दर्शन घेण्यास ते सर्व जावरे उभे राहिले. त्यांच्यात धार्मिक पुरोहित असा कोणीही नसतोच. त्या-त्या वेळी जो कोणी पुढारीपणा पावलेला वृद्ध असेल, तोच रूढीप्रमाणे सर्व संस्कार करवितो.

तसा त्या वेळचा एक वृद्ध पुढारी मग पुढे आला आणि तुटक अशा ठराविक चार-पाच शब्दात उद्दंड हावभावांची भर घालून आपला जो भाव व्यक्तविता झाला तो नुसत्या शब्दातच सांगावेयाचा तर असे सांगता येईल--

"आता त्या आपल्या मृत आप्तांच्या प्रेताकडे तीन महिनेपर्यंत कोणीही ढुंकून बघता कामा नये. त्याचा एकान्त भंगला, तर त्याच भूत रागावेल. आपण त्याला विसरतो की काय, त्याच्या प्रीतीशी कृतघ्न होतो की काय, हे त्याच ते भूत ह्या उंच ढोलीत बसून सारखे निरखीत राहील. त्यासाठी हे तीन महिने कुणीही शृंगार-साज वा अमोद-प्रमोद (ख्याली-खुशाली) करता कामा नये. नाचरंग सारे तीन महिने बंद! रंगीत मातीचा नखरा बंद! भुरी माती तेवढी अंगाला फासावी." (कारण विषारी डास-बीस जे रानात नागड्या जावऱ्यांना डसतात, त्यांच्यापासून देह रक्षण्यास कोणत्या तरी मातीचा लेप अवश्यच असतो.)

एका विशिष्ट आवाजाने सर्व जावऱ्यांनी त्या आदेशास होकार दिला आणि ते सारे आपल्या खबदाडाकडे परतले.

किशन नि मालती पण आपल्या स्वतंत्र गुहेकडे निघाली. निघताना त्यांनी मोठ्या आर्जवाने डोलकाठीला पण सांगाती यावयाला विनविले.

डोलकाठीला त्या वेळी तत्वज्ञानाचा चक्कर आला होता. आपल्या विद्वत्तेचीही छाप मालतीवर पाडण्यासाठी तो किशनशी जावऱ्यांच्या प्रेतसंस्काराविषयीच वाटेने बोलत चालला,

"बघ, मृतांविषयी प्रीती नि भीती ह्या दोन भावनांवरचे सारे प्रेतसंस्कार कसे उभारलेले आहेत ते! ह्या धर्मशून्य नि वन्य जावऱ्यांच्या रानटी प्रेतसंस्कारांचीच आमचे वैदिक प्रेतसंस्कार, और्ध्वदैहिक नि सुतकश्राद्ध ही धार्मिक संस्करणे आहेत. हिंदु, ख्रिश्चन, मुस्लिम -- साऱ्यांचे सारे प्रेतसंस्कार तेवढे इथून तिथून मृतांविषयीची प्रीती नि भीती ह्यावरचे उभारलेले आहेत. कसे ते पाहा. ह्या जावऱ्यांच्या प्रेतसंस्कारांनाच मधून-मधून हसत होतीस नाही, मालती? पण त्यांच्या ह्या तुला रानटी नि वेडगळ वाटणाऱ्या प्रेतविषयक प्रत्येक चालीचा प्रतिध्वनी आपल्या सुधारलेल्या वैदिक-ख्रिस्ती-मुस्लीम प्रभृति ईश्वरोक्त धर्म म्हणून स्तोम माजविलेल्या प्रेतसंस्कारात उमटतो आहे असे जर मी दाखवून दिले तर तू मला काय देशील? आदिम मानव प्रेताच भूत होऊन उठू नये म्हणून त्यावर दगडांची राशी रचतो, त्यांच्याच पोटी ही ख्रिस्ती-मुस्लिमांची कबरस्थानामध्ये कबरी नि पिरॅमिड्स् जन्मले! मृतांची नौका वैतरणी तरण्यास समर्थ व्हावी म्हणून...."

"पुरे रे बाबा, तुझे ते तत्वज्ञान!" किशनने तत्वज्ञानाच्या धारेत हा आता भरमसाट वाहवत जाणार असे पाहून डोलकाठीला मध्येच हटकले. "मृतांना वैतरणीपार नेणाऱ्या नौकांची माहिती देण्यापेक्षा तू प्रथम जित्यांना तारणाऱ्या एखाद्या नौकेची माहिती देशील तर अधिक उपकार होतील! वैतरणीचा मृतसमुद्र तरण्यासाठी एखादी नौका मेल्यावर आमच्या प्रेतांना कुठेही मिळेल! न मिळाली तरी त्या वेळी त्या वेळच पाहून घेऊ. पण आज आता काळ्या पाण्याचा समुद्र जिवंतपणी तरून जाण्यासाठी उपयोगी पडेल अशी नौका, जी तू बांधीत होतास तिच्याविषयी काय ते आधी बोल. जे तारू तू मला परवा दाखवलेस, ते समुद्रात आता ढकलायच तरी कधी? परवा म्हणालास, आता पूर्वसिद्धता जय्यत झाली अं! पण पुन्हा आपला दिवसगत लावतोसच आहेस! आत जीवाची होडी त्या संकट समुद्रात कधी ढकलतोस ते बोल! अगदी नक्की दिवस बोल. मग दैव तारो वा बुडवो! पण आता एक दिवसही केवळ भयासाठी म्हणून इथे रेंगाळायच नाही! बोल, दिवस बोल!"

"अगदी नेमका दिवस सांगतो. तीन महिने नि तीन दिवस संपताच जो उगवेल त्या दिवशी समुद्रात तारू ढकलणार!"

"बाप रे! का आता एकदम इतकी दिरंगाई का? परवा जय्यत पूर्वसिद्धता झाली म्हणालास; मग आता तीन महिने तीन दिवस असे अगदी ज्योतिषी थाटात का बोलतोस? मुहूर्ताची - बिहूर्ताची लहर आली की काय?"

"छट्, ज्या दिवशी सिद्धता पुरी त्याच दिवशी डोलकाठीचा मुहूर्त असतो. पण मुहूर्ताची लहर सोडली तरी आपल्याला दोन लहरी तरी सांभाळल्याचे पाहिजेत. एक लहर समुद्राची, दुसरी नानकोबीची! राजा नानकोबीने आताच मला बजाविल की, ह्या आज मेलेल्या जावऱ्यांच सुतक संपेतो तारू वल्हविणे नाही. ते हे जावऱ्यांच सुतक तीन महिन्यांनी संपणार! त्यानंतर ते आपणासाठी दोन-तीन दिवसांनी त्यांच्या डुंगी साहाय्यास देऊन त्या समुद्राच्या तीरापासच्या

आडवळणातून वाट काढीत काढीत भर समुद्रात आपले तारू त्याच्या पहाऱ्यात काढून देणार आहेत आणि अनुकूल वारे नी समुद्रही त्या संधीस साहाय्यक होऊ शकणार, ह्यासाठी थांबण भाग पडते आहे रे बाबा! अरे, देशी जायची घाई तुला आहे, त्याहून मला कमी असेल असे तुला वाटत तरी कसे! तुला असेल नुसती घाई, पण मला तर आहे लगीनघाई! काय कंटकी, खरे की नाही। कंटकीने मला नाव परतीराला पोहोचविण्याच्या कामासाठी जो दाम द्यायचा ठरविला आहे, त्याची हुंडी पटणार आहे तुझ्या प्रेमाच्या पेढीवर, बरे का?" धटिंगणपणे डोलकाठीने हसत-हसत कंटकीच्या गालावर एक लडिवाळ टिचकी मारिली.

"पण, काम झाल्यानंतर दामाचा प्रश्न! कंटकने दिलेली हुंडी पेढीवर पटायची तर त्या दिवशी पटेल, हे नावाड्याने पण विसरू नये!" माशाला आमिष तेवढे दिसेल, अशा चलाखीने मालतीने जाळे फेकले.

***

बावीस

“किशन, ए किशन!” आपल्या गुहेच्या दाराशी हिरमुसलेले तोंड करून उभ्या असलेल्या मालतीने मनाशीच दोन-तीनदा हाक मारल्या. मालती मनाशीच पुटपुटली,”कुठे गेला काय की बोलता बोलता! पहाटेचा गेला तो आता घटकाभर दिवस आला तरी तिकडेच गुंतला आहे कुठे त्या जावऱ्यांच्या नादात! हं? पण हा कोण त्या बांबूच्या बेटातून येतो आहे, त्या बांबूसारखाच उंच? डोलकाठीच दुसरा कोण? माझी मनधारणी करण्यासाठी किती झटत असतो बिचारा! इतका प्रेमळ नि प्रामाणिक माणूस आहे हा की, मला खरोकरच दया येते त्याची. पण काय करावे? त्याच प्रेम मला स्वीकारताही येत नाही नि नाकारताही येत नाही. आज महिनोगणती सकाळ झाली की ह्या रानाची ताजी फुल नि ताजा ताजा मध घेऊन ती भेट मला द्यायला हा एकदादेखील चुकला नाही. मी ह्याला पती मानाव असा त्याला जो अनावर मोह झाला आहे, तो सोडून तो जर मला म्हणेल ना की, ‘तू मला भाऊ मान,’ तर मी आत्ता त्याला मनापासून माझा भाऊ मानीन, कारण एकंदरीत मला तो आवडू लागला आहे खराच.”

मालती मनाशी इतके बोलते आहे, तोच डोलकाठी गुहेपाशी येऊन पोहोचला. त्याच्या एका हातात तिकडची सिंधुपुलिने ज्यासाठी प्रसिद्ध आहेत, त्या जातीचा गुलाबी छटांचा तासून घासून वर वेलबुट्टी काढून शोभिवंत केलेला एक सुरेख शंख होता आणि दुसऱ्या हातात एका हिरव्यागार पानांच्या द्रोणात ताजी फुले होती. तिकडे रानांत मधाची मोठमोठी मोहोळी विपुल. जावरे लोक त्या मोहोळांना पाडून बोलता-बोलता वाटेल तितक्या ताज्या मधाला पुरविण्यात पटाईत. तसा ताजा पुष्कळसा मध त्या शंखाच्या कुप्यात भरून डोलकाठीने जो आणला होता, तो त्याने कंटकीला दिला. तिने तो गुहेत ठेविला. मग त्याने ती फुले तिला दिली आणि काही तिच्या स्वतः खोवावी म्हणून हात पुढे केला. हो ना करीत तिने त्याला ती खोवू दिली. उरलेल्या फुलांचा द्रोण दोन्ही हातांनी वर धरून त्यांना हुंगीत नि त्यांचे रंग-रंग पाहात प्रसन्नलेली कंटकी म्हणाली,

“किती सुरेख फुल आहेत हो ही! आभार आहेत बरे तुमचे!”

“पण कंटकी, त्या सगळ्या फुलांहून सुरेख असे आणखी एक फूल आहे ह्या रानात; पण ते काही अजून माझ्या हाती आले नाही!”

“कशाचे हो ते इतके सुरेख फूल?”

“तुझ्या सौदर्याचे! कंटकी....” डोलकाठीने दंडमपणे आपला दणकट हात तिच्या कोवळ्या हनुवटीला लावण्यासाठी पुढे केला.

“अश्श!” हनुवटी चुकवून, मागे सरून, पण न रागावता कंटकी प्रत्युत्तरली, “अं हं! ते फूल असले जरी समुद्राच्या ह्या अंदमानी तटावरील रानांतल, तरी हाती यायचे तर येऊ शकत समुद्राच्या त्या पल्याडच्या भारतीय तटावरील रानात!”

“त्याच आशेवर तर मी जगून आहे नि मी बांधलेल तारूही जर तरणार असेल तर त्याच आशेवर तरेल! झाले. आता अवघे तीन दिवस उरले. आजच जावऱ्यांचे ते तीन महिन्यांच सुतक

संपत. आपणाला आता तिकडेच जायच आहे. ते संपल की तेरवा आपण आपल्या साहसाचे तारू समुद्रात ढकललेच म्हणून समज. देशाला नेणारे वारे पण अगदी अनुकूल सुटले आहेत. मग एवढ्यावर काय देव करील ते खरे!"

"अगदी चांगल तेच करील हो देव. आज मला असा एक शुभशकुन झाला की, मला आता त्यात शंकाच राहिली नाही. मी कंटकदादाला सकाळीच सांगितले तो."

"काय तो? मला नाही का सांगता येणार? शकुन खरे असतात खरे का!"

"सांगते तर. हे पाहा, काल रात्री माझी लाडकी आई मला स्वप्नात दिसली. ह्या अंदमानी समुद्राच्या ह्या काळ्या पाण्याच्या त्या पल्याडच्या तटावर, आपल्या देशाच्या तटावर, जशी ती उभी आहे! आपले दोन्ही हात पुढे पसरून मला म्हणते आहे, 'अग चल, बाळे चल! ह्या माझ्या बाहूत घुसून मला कडकडून भेट ये! टाक उडी, भिऊ नकोस, मी झेलते बघ तुला अलगद!' आईचे हे शब्द ऐकताच मी जशी एकदम उडी घेतली नि पाण्याच्या धारेला ओलांडावे तशी समुद्र पटकन् ओलांडून आईच्या बाहूत घुसले. इतक्यात जसे किनी एकदम दृश्यांतर होऊन आमच्या घरच्या झपाळ्यावर मी नि आई झोका घेऊ लागलो नि मला ज्या फार आवडतात त्या ओव्या आई मला गाऊ लागली! खरेच, डोलकाठी, त्या स्वप्नापासून मी अगदी अधीर होऊन गेले आहे, माझ्या आईच्या त्या ओव्या माझ्या कानात सारख्या गुणगुणत आहेत, माझी आई मला कधी भेटेल असे मला होऊन गेले आहे!" कंटकी स्फुंदू लागली.

"उगी, उगी! तुला तुझ्या आईची आठवण विव्हळ करते ना, तशीच मला पण माझ्या आईची आठवण आली की अगदी कासावीस होते. माझी आई आणि माझी एक लहानशी दहा-बारा वर्षांची लाडकी बहीण! माझ्यावाचून त्यांना कोणाचाही आधार नव्हता! त्या माझी पण अशीच वाट पाहात असतील! माझी नि त्यांची अशीच ताटातूट झालेली आहे! त्यांना मी कधी भेटेन, असे मला पण झालेले आहे!" इतके बोलता बोलता डोलकाठीचा पण कंठ दाटून आला आणि डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहू लागल्या.

धिप्पाड, रूक्ष आणि आडदांड दिसणाऱ्या त्या डोलकाठीला असा गहिवरलेला पाहून एखादा उंच आणि राकट खडक पाझरताना दिसताच जसे आपल्याला कौतुक वाटते, तसे कौतुक कंटकीला वाटल्यावाचून राहिले नाही. त्याच्याकडे क्षणैक तसेच निरखीत राहून मग तिने जिज्ञासिले,

"तुमची ती लहान बहीण आता मोठ्ठी झाली असेल?"

"कसली मोठी! असेल विशीच्या आत. तिची खोडी काढायची म्हणजे मी तिला अशी दोन हातांवर पाळण्यातल्यासारखी घेऊन ती ओरडू लागे तो गरगर फिरवाव. आतासुद्धा मी जेव्हा तिला भेटेन नं, तेव्हा पहिल्या धडाक्याला तशीच हातांवर घेऊन तिला भोवळ येई तो नि आई रागावून ओरडे तो तशीच गरगर फिरवणार आहे. ती विशीची झाली तरी माझ्या मावणाऱ्या ओंजळीतच! तुझ्या भावाने तुझे कधी तरी इतके लाड केलेत का उभ्या जन्मांत?"

“खरे सांगू का...” मालती भावनेच्या भरात चटकन् बोलून गेली, “मला पण एकुलता एक असा प्रेमळ भाऊ होता--”

“म्हणजे?” डोलकाठीने खाडकन् हटकले, “होता म्हणजे? मग हा कंटक आहे हा कोण तुझा?”

त्या प्रश्नासरशी मालती इतकी गोंधळली की. तिची मुद्रा गोरी-मोरीच झाली. पण इतक्यात कंटकच तिकडून येताना दिसल्यामुळे तो विषय सहजी बंद पाडता आला तिला.

“तो बघ कंटक! नाव निघताच आला ग बाई! शंभर वर्षे आयुष्य आहे हो तुला!” हसत हसत तिने धावत जाऊन कंटकला मिठी मारिली.

“वा डोलकाठी, वा! गृहस्था, तुला कंटकीला लवकरच घेऊन येण्यासाठी मी इकडे धाडला तो तू आपला इकडेच गप्पा छाटीत रमलास! सुतक फेडण्याच्या संस्कारांसाठी ते सारे जावरे निघाले की तिकडे! राजा नानकोबी आपली वाट पाहात आहे सारखा. चला चला, लवकर!”

“छट् कंटकबाबू, मी आणलेला ताजा मध आपण सगळ्यांनी खाल्ल्यावाचून पाऊल पुढे टाकायच नाही इथून! कंटकी, आण तो मध इकडे!”

डोलकाठीच्या आग्रहाला मान तुकवून मालतीने मध आणिला, हिरव्यागार पानावर त्या सुरेख शंखाच्या झारीने तो वाढला आणि ती गोड वन्य न्याहारी उरकताच ती तिघे जावऱ्यांच्या त्या खबदाडाकडे लगबगीने निघून गेली.

जावऱ्यांच्या पद्धतीप्रमाणे तीन महिन्यांचे सुतक आज संपणार होते. त्यांच्या त्या मृताच्या और्ध्वदेहिकाचा शेवटचा संस्कार करण्यासाठी ते सारे स्त्री-पुरुष अंगाला नि डोक्याला भुरी माती फासून मोठमोठ्याने एका सुरावर नि तालावर रडत ज्या झाडाच्या ढोलीत तीन महिन्यांपूर्वी ते प्रेत मोट बांधून बसविले होते, त्या झाडाकडे जमावाने चालले. ते अवाढव्य झाड येताच ते थांबले. मग डोलकाठीने त्या उंच ढोलीतून ती मोट खाली आणिली. पाऊस, वारा, ऊन आणि गिधाडे ह्यांच्या एकत्रित कामगिरीने त्या मोट बांधलेल्या प्रेतांवरील मास-मांस तेवढे गेल्या तीन महिन्यांत नाहीसेच झालेले होते. हाडांचा सापळा काय तो उरलेला होता. त्याला मध्ये ठेवून जावऱ्यांच्या एका पुढाऱ्याने त्याची मान कडकड मोडून काढली. मग कवटीसुद्धा तो शिराचा सापळा त्याने हातात उचलून वर धरिला. त्या मृताची विधवा पुढे आली. तिने पसरलेल्या हातात ते तिच्या नवऱ्याने मुंडके टाकीत पुढारी म्हणाला, “हा वाटा तुझा!”

त्या विधवेने ते मुंडके धुऊन पुसून, घासून त्याला भोके पाडली, त्यांत दोरी ओविली आणि तो शिराचा हाडकी सापळा तिने सर्वासमक्ष गळ्यात बांधून आपल्या पाठीशी टाकला. आपल्याकडे काही जातीत विधवेचे चिन्ह म्हणजे जसे केशवपन नि काषायवस्त्र, किंवा इंग्रजात वैधव्याचे चिन्ह म्हणजे विधवा, जसे एक काळे प्रावरण पदरासारखे डोक्यावरून पाठीवर सोडते, तसेच ह्या जावऱ्यातील विधवा, त्या जोवर विधवा राहतात, तोवर आपल्या मृत पतीचे मुंडके तिच्या गळ्यात बांधून पाठीवर वागवितात. त्यांनी जर पुनर्विवाह केला, तर तो दुसरा नवरा काय तो ते मुंडके तिच्या गळ्यातून सोडून काढू शकतो.

त्या विधवेला तो शिराचा सापळा दिल्यानंतर मृताच्या धडाचे सांधेन् सांधे ठेचून ठोकून कडाकड मोडण्यात आले. हाडूकन् हाडूक वेगळे वेगळे केले गेले. त्यातून काही हाडके मृताच्या मुलांना ‘हा मुलांचा वाटा’ म्हणून दिली गेली. काही विशिष्ट आप्तांना ‘हा आप्ता’चा वाटा म्हणून मिळाली. उरली ती सारी त्या जावऱ्यातील चेटकीने आपल्यापुढे रचून निवडीत-चिडवीत शेवटी त्याचे तीन भाग केले. एक अरण्याचा भुतावरचा उतारा, एक आगीच्या, एक समुद्राच्या. ज्याला ज्या भुतावरचा तोडगा हवा, त्याने तो-तो हाडकाचा तुकडा घेतला. मृताच्या ह्या हाडांच्या तुकड्यांचे निरनिराळे दागिने, माळा, ताईत करून जावरे स्त्री-पुरुष गळ्यांत वा अंगावर घालतात आणि त्यायोगे रोगापासून आणि त्या त्या भुतापासूनच रक्षण होते, अशी यांची श्रद्धा असते.

त्यातही तो मृत जर जावऱ्यातील कोणी प्रतिष्ठित आणि थोर गृहस्थ असला, तर त्याचे एखादे हाड वापरण्याचा अधिकार असणे हे मोठे भूषण समजले जाते. अशा मृतांची हाडे स्नेह्यांना आणि पाहुण्यांना मानाची भेट म्हणूनही दिली जातात.

डोलकाठी हा राजा नानकोबीचा आवडता स्नेही सहाय्यक, त्याला सन्मानासाठी त्या मृताच्या हाडातील जी हाडे समुद्राच्या भुतावरील तोडगा म्हणून त्या चेटकीने निवडली होती, त्यातील एक चांगलेसे नि चिमुकलेसे हाड उचलून राजा नानकोबीने डोलकाठीला मानाची भेट म्हणून दिले आणि हातवारे नि शब्द मिळून आश्वासिले की, “आता तुम्हाला समुद्राची भीती नाही! तुमच्या देशी तो तुम्हांला सुरक्षितपणे तारून नेईल.”

डोलकाठीच्या मनावर पण त्या भयाण प्रेताचे मस्तक, धड, हाडे, सांधे, कडाकड मोडण्याचा नि फोडण्याचा त्या एकंदर संस्कारांचा कोणता तरी एक गंभीर परिणाम होते आला होताच. त्यातही ती चेटकीण त्याला जावरा भाषेच्या तुटक शब्दांनी खुणाविती झाली.

“इकडे! जरुविन!! हाडकू, मंत्र!” म्हणजे इकडे ये, ‘जरुविन’ ह्या समुद्राच्या भुतावरील हा मंत्र सांगते, तो म्हणून मग ते हाडकू गळ्यात बांधले पाहिजे.

डोलकाठीच्या कंबरेपर्यंत त्या बहुतेक जावरा स्त्रिया त्यांच्या बुटकेपणामुळे पोहोचू शकत. अर्थातच त्या चेटकीच्या तोंडाशी तो गुप्त मंत्र ऐकण्यासाठी कान न्यायला डोलकाठीला खालीच बसावे लागले. मग तिने एक विचित्र मुद्रा आणि अंगात यावे तसे हातवारे करून त्याच्या कानांत फुंकर घातली आणि आपल्याकडे मांत्रिक जसे ऱ्होम्, ऱ्हुम्, ठोम् असे अर्थशून्य एकाक्षर उच्चारतात, अगदी तसेच एक निरर्थक अक्षरमंत्र म्हणून त्याच्या कानात एकवार उच्चारले. जावऱ्यांच्या वातावरणात वावरता वावरता जावराच होते आलेल्या डोलकाठीच्या भाबड्या मनाचा त्या मंत्रावर नि हाडकांच्या तोडग्यावर अढळ विश्वास असे.

सुतक फिटताच जावऱ्यांनी आपापले हौशीचे मंगल शृंगार करण्यास आरंभिले. त्यांनी अंगाला फासलेली भुरी माती धुऊन पुरुषांनी लाल, पिवळ्या, भगव्या, पांढऱ्या मातीचे शोभिवंत पट्टे नागव्या अंगावर आडवे-तिडवे ओढले. सुवासिनी स्त्रियांनी आपल्या डोक्यावर वाढलेले केसांचे खुंट काढून टाकून मस्तके छान गुळगुळीत दिसावी ह्यासाठी आपापल्या प्रियकरांकडून किंवा सखीकडून

काचेच्या धारदार तुकड्यांनी आपली डोई करून घेतली. परस्परांची वेणी-फणी करीत आपल्या सुवासिनी जशा सणाच्या दिवशी गुंग झालेल्या दिसतात तशा त्या जावऱ्यांच्या अगदी विवस्त्र सुवासिनी आणि कुमारिका मोठ्या प्रेमाने एकमेकांच्या डोक्यांची गुळगुळीत श्मश्रू करून आपला शृंगार साजरा करताना टोळक्याटोळक्यांनी हसतखिदळत बसल्या. मग पोवळ्यांच्या वा रंगीत शिंपल्यांच्या वा मृतांच्या हाडकांच्या माळा गळ्यात घातल्या. विधवांनी आपापल्या मृत पतीची मुंडकी नि हाडकी माळा धारण केल्या. अशा सगळ्यांचा साज शृंगार झाल्यानंतर, सुतकामुळे गेले तीन महिने त्यांची जी नाचाची हौस तुंबली होती, ती फेडून घेण्यासाठी सुतक फिटल्याचा जो मोठा संघीय नाच आज सिंधुतटी व्हावयाचा होता, तिकडे ते सारे नागडे आबाल-वृद्ध स्त्री-पुरुष सरमिसळपणे जाऊ लागले. आणि इकडे 'येतोच आम्ही नाचायला थोड्या वेळाने' असे राजा नानकोबीस सांगून कंटक-कंटकी आपल्या गुहेकडे डोलकाठीसह जावयास निघाली.

गुहेपाशी जाऊन तेथील शिलातलावर ती तिघे बसले. मग कंटकीने कित्येक फळे. शाहाळी, मध आणि भाजलेले मास आणिले. भुकेच्या तोंडी ते वन्य भोजन मिटक्या मार-मारून सगळ्यांनी सेविले.

“झाले. ह्या रानची ही मेवा मिठाई आता आणखी दोन दिवस काय ती उरली! परवा वनभोजन संपून समुद्रभोजनास आरंभ!” डोलकाठी कंटकच्या पाठीवर थाप मारून त्याला आश्वासिता झाला.

“आणि देवाची कृपा तेवढी असली, तर पुढच्या महिन्यांच्या ह्या मितीस आपले आपल्या घरी, आपल्या देशी, आपल्या प्रियजनांमध्ये हसत-खेळत प्रियभोजन चाललेल असेल!” कंटकने कंटकीच्या पाठीवर आश्वासक प्रेमळपणे थोपटले.

“देवाची कृपा असली तर' असे का म्हणतोस आता?” डोलकाठीने अत्यंत उल्हासित वृत्तीने कंटकाला हटकले, “देवाची कृपासुद्धा झालीच आहे की आज! कंटकबाबू, मी तारू उत्तम बांधल, पोलिसी वस्त्रं, बंदुका, दारूगोळा जय्यत ठेवला. जावऱ्यांच्या पटाईत नाविकांच्या डुंगी दूरवर सोबतीस येणार. तारवात मास, मध, फळं, मद्य, भरपूर अन्न पाणी साठवून ठेवल. मासे धरायला जाळी घेतली. देशी उतरताच रोकड द्रव्य हवे, ती मोठी रक्कम तुझ्या माझ्या पातीने जुळवली. लाडके कंटकी, मनुष्ययत्न तो सायसंगीन जुळवला; पण अशा ह्या खटनट समुद्रात, ज्याला काळे पाणी उगीच म्हणत नाहीत, त्या ह्या काळाच्या तोंडात साधं वाऱ्यावरचे तारू ढकलून जायच त्यात यश शेवटी दैवाधीनच असणार, देवाचीच कृपा हवी, ह्या जाणिवेने माझ्या मनात नेहमी धुगधुग वाटे. पण आज समुद्राच्या त्या 'जुरुविन' भुतावरचा बंधक असलेला एक मंत्र नि हा तोडगा त्या जावरा चेटकीने जेव्हा मला दिला, तेव्हा मला खरेखर हायसे वाटले! दैवी कृपेची ही बघ ती लेखी वचन-चिठ्ठी!” असे बोलत डोलकाठीने त्या जावरा मृताचे ते चेटकीने दिलेले पेराएवढे मंत्रित हाडूक गंभीरपणे कंटकाच्या पुढे धरिले.

“शीः! डोलकाठी, किती रानटी झाले आहे तुझे मनदेखील! भाबडा रे भाबडा!”

कंटक उपहासला.

'भाबडा? रानटी? कंटक, ह्या रानटी जावऱ्यांतच नव्हे, तर आपल्या अगदी आर्यातही मृतांच्या अस्थीत दैवी गुण असतात ही जाणीव नाही की काय? काही ब्राह्मणादिक ज्ञातीत मृताच्या कवटीच थोडेस चूर्ण खिरीत घालून श्राद्धाच्या दिवशी पितरस्थानीय पुरुषांनी नि यजमानाने खावे असा शास्त्राचार नव्हता का? बुद्धादिकांच्या दंत-अस्थि प्रभृति अवशेषाचे केवढे स्तोम क्षत्रिय-वैश्य-शूद्रदिक पंथीयात होते ते पाहा. ख्रिश्चन-मुसलमानांविषयी तर बोलणेच नको. मृताच्या अस्थीवरचे त्यांच्या कबरा उभारलेल्या आणि कबरीतील मेलेल्यांच्या अस्थी जतन करण्यासाठी जिवंतांच्या अस्थी कबरीत पुरण्याची पाळी येईतोसुद्धा दंगेधोपे करायला ते कचरत नाहीत. मृतांच्या अस्थीचा बडेजाव नि त्यात धार्मिक वा मांत्रिक वा दैविक गुण निवसतात, ही भावना जावऱ्यांतच नसून जगभर आहे बरे का! जावऱ्यांना तेवढे रानटी का म्हणतोस? म्हणायचे तर सगळ्यांना म्हण! निदान माझा तरी ह्या मंत्रीत अस्थींवर पूर्ण विश्वास बसला आहे खरा. ज्याच्या गळ्यात हा ताईत मला त्या चेटकीने दिलेल्या मंत्रासह बांधला जाईल, त्याला 'जरुविन'च त्या समुद्राच्या भुताचे--- भय नाही; तो समुद्रात कधीही बुडणार नाही. समुद्रप्रवासी सुरक्षित पैलतीराला जाणारच जाणार, हे त्या चेटकीच आश्वासन खोटेच आहे असे तरी तू त्याचा प्रयोग करून पाहण्याच्या आधी कशावरून म्हणणार? अनुभवाच्याही आधी खोटेच म्हणणे, हाही एक भाबडेपणाचा नाही का तुझ्या मनाचा, ते खरेच म्हणणाऱ्या भाबडेपणासारखाच टाकाऊ?"

"बरे बुवा, तसे का होईना! बांध त्या हाडकाचा ताईत तू समंत्रक आपल्या गळ्यात! तारवाने नाही तर त्या ताईताने, कशाने तरी पण समुद्र तरून देशी सुखरुपपणे पोचविले गेलो म्हणजे झाले!"

"छे छे, माझ्या जीवनासाठी माझ्या गळ्यात नाही. माझे जीवन म्हणजेच ही माझी लाडकी कंटकी, ही तुझी बहीण नि माझी प्रियतमा! ती सुखी, ती सुरक्षित, तर आपण सुखी, सुरक्षित, ह्यासाठी मी हा ताईत कंटकीच्या गळ्यात बांधणार नि मला दीक्षा देताना त्या चेटकीने मला दिला तोच गुप्त मंत्र तिच्या कानात मी यथाविधी उपदेशीणारा. हा ताईत तुझ्या गळ्यात जोवर राहील ना, तोवर लाडके, तुझ्या जीवाला भर समुद्रात भय नाही. तुला आमचे तारू फुटले तरी नुसत्या आपल्या लाटांवर वाहून स्वतः समुद्रावरचे परतीरास सुखरूप पोचवेल! चल ये अशी, सार तो पदर थोडा खाली!"

डोलकाठी अगदी निःसंकोच प्रेमळपणे कंटकीच्या खांद्यावर हात ठेवून तिच्या अपुऱ्या वस्त्राच्या पण ऐटीने कसलेल्या पदराला ढिले करून खांद्याखाली सारू लागला.

त्याच्या अंगलट येण्यात उपद्रवी लंपटता मुळीच नव्हती. भाबडा आणि थोडा आडदांड अमर्यादपणाच काय तो होता. त्या बोलण्यात कपट असे काहीच नव्हते. अशा त्या त्याच्या प्रेमाने कंटकीला त्या डोलकाठीचा राग तर नव्हेच, पण उलट कळवळा नि कीवच वाटू लागलेली होती. परंतु त्याच्या आतुर प्रणयाला अगदीच मोकाट उत्तेजन देत गेल्यास देशी पोहोचल्यावर मग त्याच्या लग्नाविषयीच्या मागणीस झिडकारण्यास आपणाला मुळीच तोंड राहणार नाही आणि

त्याला संशयात न ठेवता जर आपल्या वाचेने वा वर्तनाने आपण त्याला वरणारच अशी त्याला निश्चिती वाटू दिली, तर मग पुढे जेव्हा आपण लग्न लावण्याचे नाकारू तेव्हा त्याच्या मनात विश्वासघाताच्या जाणिवेचे भयंकर वैरही जागून उठण्याचा संभव आहे, असा धाक कंटकीच्या मनात आताशी नेहमी वाटत असे.

त्याने तिच्या पाठीवर थोपटून खांद्यावर जो हात ठेविला, तो कामुक प्रणयापेक्षा वत्सल लाडाचाच होता हे तिला कळले असूनही आणि त्याचे ते तसे अंगलट येणे कोण्या मायाळू वडील भावाने अंगलट यावे तसे तिला आवडले असूनही ह्या वरील धाकामुळेच तिने डोलकाठीचा हात काहीसा झिडकारून दूर सारला आणि ती पदर कंबरेला पुन्हा खोवीत फणकारली,

"ताईतच बांधायचा ना, तर माझा कंटकदादा बांधील. तुम्हीच नको काही नसती अंगलट करायला!"

कंटकीच्या त्या झिडकारण्याने डोलकाठीच्या प्रेमळ मनाचा अकस्मात्! इतका विरस झाला की, त्याच्या डोळ्यातून अश्रुच टपकले आणि शब्दातून राग पण! तो कंटकीपासून दूर जाऊन उभा राहिला. तो अपमान थट्टेवारी नेण्याचे सोडून तो कंटकीला कळवळून बोलला,

"कंटकी, माझ्याशी अजून इतका परकेपणा ठेवीत आहेस अं तू? तुझ्या स्वयंवराचा तो पण म्हणूनच ना मी भर समुद्रात हे तुटपुंजे तारू नि तुम्हाला काळ्या पाण्याच्या पार पळवून देशाला न्यायचे हे जिवावरचे साहस करीत आहे? पण जर तुझ्या मनांत इतका परकेपणा अजूनही असेल, तर बळे-बळे तुझ्यापुढे नाचत नि तुला त्रास देत, स्वतःचा पाणउतारा करून घेणारा मनुष्य हा डोलकाठी नव्हे! तू मला आजवर माझ्याशी पुढे विवाह करायच्या थापांवर झुलवीत आलेली असशील, तर ते तुला मात्र शोभत नाही! त्याचा परिणाम...."

इतके गंभीर नि इतके विषादाने डोलकाठी बोलल्याचे ज्याने पूर्वी कधीही पाहिले नव्हते, त्या कंटकलाही डोलकाठीचा राग-रंग असा बिघडलेला दिसताच दचकल्यासारखे झाले. देशी गेल्यावरचे जे ह्याचे वैर कंटकी मिळण्याच्या निराशेने जागण्याचा संभव होता, त्याचा हा सूत्रपात येथेच होतो की काय, ज्या बंदुका नि जो दारूगोळा आम्ही परस्परांच्या संरक्षणार्थ एकत्र केला, तोच आता परस्परांवर झाडण्याचा प्रसंग येतो की काय, आज ना उद्या ह्या डोलकाठीचा ह्याचे मालतीपायी दुसरा एक रफिउद्दिन होऊन मालतीच्या आणि आपल्या जिवावर उठतो की काय, अशा भयप्रद शंकांनी कंटकच्या पोटात धस्स झाले. पण तो अनिष्ट प्रसंग शक्य तो आजचा उद्यावर तरी ढकलीत, निभेल तो निभावणे हेच काय ते हाती होते आणि काही झाले तरी डोलकाठी हा सौजन्याला अगदीच पारखा होणार नव्हे, अशी निश्चिती कंटकला अद्यापिही वाटल्यावाचून राहात नव्हती. त्यायोगे डोलकाठी पुढे काही विकोपाचे बोलणार तोच कंटक मनमिळाऊ स्वरात त्याला समजावू लागला,

"कसला परिणाम मित्रा? अशा स्त्रीसुलभ संकोचाच कौतुक वाटाव का राग यावा? छे, छे! प्रेयसीच अनुरंजन कसे करावे, ती कला त्या अडाणी जावऱ्यांना कळते, तितकीदेखील तुला कळत

नाही. बांध तो ताईत तूच कंटकीच्या गळ्यात. मी तिचा वडील भाऊ. माझा काही अधिकार नको का तिने मानायला? ह्यासाठी ही चाणाक्ष मुलगी मी-तिचा वडील भाऊ-सांगे तो वरवर तुला नकार देती झाली. हं, ताई, बांधू दे डोलकाठीला तो ताईत तुझ्या गळ्यात हो!"

"रागावला एवढ्यानेच? हा रे वेड्या!" कंटकीने प्रसंगावधान राखून वेळ मारून नेण्यापुरते एक असे आकर्षक स्मित करून डोलकाठीची करंगळी हळूच ओढली की, त्या हलक्या ओढीने हत्तीने ओढावे तसे अवश होऊन तो बिचारा डोलकाठी झटकन् तिच्याजवळ पुन्हा आला आणि प्रसन्नपणे विनवू लागला.

"तूच सार तो पदर खाली; हं, पुरे तेवढा गळ्यात बांधता तर आला पाहिज ने ताईत? पण तुझ्या कानांत मला आधी मंत्र सांगायचा आहे. सांगू न? आणू न तोंड तुझ्या अगदी कानाजवळ? हो, नाही तर पुन्हा अमर्यादा व्हायची तुझी नि फणकारायचीस तू!" डोलकाठी अगदी प्रेमात आला. थेट कानाशी तोंड नेऊन, एक हात तिच्या गळ्याभोवती उलट्या खांद्यावर टाकून त्याने तिला जवळ घेतले आणि त्या चेटकीणीचा तो निरर्थक अक्षरांचा मंत्र तीनदा तिच्या कानात उच्चारला.

तो मंत्र शंभरदासुद्धा उच्चारित डोलकाठी तसाच उभा राहिला असता, इतके ते कंटकीला लगटून उभे राहणे त्याला गोड वाटत होते. पण कंटकी पुन्हा केव्हा बिघडेल ह्याची धागधूग त्याला लागलेली असल्याने त्याने पडले तेच सुख पदरात पाडून घेऊन अगदी लघळपणाच दिसू नये म्हणून मंत्राची दीक्षा अवश्य ते तीन उच्चार होताच संपविली आणि डोलकाठी हातातला ताईत नीट करीत दूर सरला.

"लवकरच संपवलेस?" कंटकी खोचकपणे हसली. पण खाचा-खोचीचे गुलाबी काटे बोचण्याइतके भान डोलकाठीच्या त्या आनंदात वाहावलेल्या प्रांजल मनाला कोठले असणार? तो आपला सरळपणे उत्तरला,

"वा! संपले कसले? आता हा ताईत बांधायचा आहे की तुझ्या गळ्यात. अस्सा! हं, सन्मुख हो अशी. गळा नीट वर कर. करू ग दे तो पदर खाली! पुनःपुन्हा हात काय मध्ये घालतेस तो सावरायला? हं, अशी ताठ उभी राहा अं!"

तिच्यासमोर अगदी जवळ उभे राहून तो ताईत तिच्या वक्षःस्थलावर नीट रुळेल अशा बेताने डोलकाठी बांधू लागला.

इतक्यात तिच्या वक्षःस्थलाच्या नि गळ्याच्या मध्यंतरी काही रक्ताळल्यासारख्या खुणा आहेत असे त्याला दिसले.

"हे काय? ओरखडे कसले हे रक्ताळलेले तुझ्या गळ्याखाली? मृगया करताना काट्यात तर नव्हती पडलीस?" असे तिला तो विचारीत आहे, तोच ते ओरखडे नसून लाल रंगात वेलपत्तीत गोंदलेली अक्षरे आहेत असे त्याला दिसले. क्षणार्धात त्याने ती वाचली "मालती"

"काय? मा ल ती! ---मालती?"

हे मोठ्याने वाचताच नि तो शब्द जुळताच डोलकाठीची मुद्राची मुद्रा पालटून गेली. त्याच्या अंगावर रोमांच उठले.

गाढ बेशुद्धीतून हळूहळू शुद्धीवर येणाऱ्या माणसासारखा तो कंटकीला अनिमिष दृष्टीने न्याहाळू लागला. क्षणार्धात त्याने अत्यंत स्निग्ध पण अत्यंत विस्मयपूर्ण स्वरात कंटकीला विचारिले,

"खरे सांग, शपथ आहे तुला तुझ्या लाडक्या आईच्याच गळ्याची, हेच तुझे खरे नाव न? तू मालतीच नं? कुणी गोंदले हे नाव तुझ्या वक्षःस्थलावर इथे!"

आपले खरे नाव डोलकाठीच्या असे अकस्मात् लक्षात आलेले दिसताच कंटकी जरी थोडीशी दचकली, तरी त्यात काही विशेष हानी आहे असे वाटण्याचे कोणतेही कारण न दिसल्यामुळे डोलकाठीने तिला तिच्या लाडक्या आईच्या गळ्याची शपथ तशा कळवळ्याने घालताच त्या तिच्या आईच्या स्मृतीने गाहिवरलेसे होऊन ती सांभाळून बोलून जाताही खरे तेच बोलून गेली,

"ते कनी माझ्या लहानपणाच एक टोपण नाव होते. माझ्या वडील भावाने लाडिकपणे ते असे लाल रंगात माझ्या अंगावर गोंदल होते एकदा पण माझे मूळच नाव कंटकीच."

"नाही. मालती, तू मालतीच आहेस. ही पाहा त्या नावाभोवतालची वेलपत्ती, तो पाहा हे नाव गोंदता गोंदता माझ्या हातून झालेल्या चुकीमुळे 'ल'ला अधिक पडलेला काना ते चुकलेल रूप 'मालाती!' छट्, हे सगळे अशक्य. पण ते कशाला!" गद्गद स्वराने डोलकाठी मालतीला नखशिखान्त न्याहाळीत म्हणाला, "ही पाहा तुझी प्रत्यक्ष मूर्ती. हे केस, ही कपाळापासून पावलांपर्यंतची ठेवण. माझ्या बेशुद्धीच्या धुक्यात झाकाळलेली तुझी आकृती, मी शुद्धीवर येताच, ते धुक ओसरताच, कशी नखशिखान्त माझ्या मालतीच्याच स्वरूपातच प्रकटली आहे. कंटकबाबू, तुम्ही कुणीही असा, पण ही तुमची मानलेली बहीण कंटकी माझी सख्खी बहीण मालती आहे! खरे सांगा आता काय ते. मी तुमचा आहे, मला भिऊ नका."

ह्या डोलकाठीच्या अत्यंत अनपेक्षित वाक्यासरशी कंटकाला धक्काच बसला. फार वर्षापूर्वी मालतीचा वडील भाऊ शिक्षा होऊन काळ्या पाण्यावर गेला होता, हे त्याला झटकन् आठवले. परंतु जर डोलकाठी हा मालतीचा सख्खा भाऊच ठरला, तर कंटकच्या मार्गात डोलकाठीच्या मालतीविषयीच्या वैषयिक अभिलाषेमुळे जे वैर आडवे येण्याचे भय होते, ते संकट अचानक नाहीसे होऊन पडल्यास सगळाच डाव अनुकूल पडण्याचाच संभव आहे, हेही प्रत्युत्पन्नपणे लगेच त्याच्या ध्यानात आले आणि तो डोलकाठीला म्हणाला,

"मित्रा, खरे तेच मीही तुला सांगेन, पण -पण- थांब, ह्या माझ्या मालतीचा ते नाव गोंदणारा जो वडील भाऊ होता, तो पुढे एका लढाईवर गेला आणि तिथे त्याला डोक्यावर एक घाव लागला होता. त्या घावाची एक नित्याची खूण त्याच्या डोक्यावर आहे असे आम्हाला अगदी नक्की कळलेल होते. तशी एखादी खूण तुझ्या डोक्यावर...."

कंटक आपले वाक्य पुरे करतो तोच डोलकाठीने आपल्या कपाळावर झुडपासारखे पसरलेले झिज्यांचे जंजाळ मागे सारीत नि फाकून धरीत आपले मस्तक कंटकाच्या पुढे केले. लढाईत

झालेल्या दोन-दोन अंगुलांच्या दुखापतींचा एक मोठा वण तेथे ढळढळीतपणे आढळत होता. कंटकला खूण तर पटली.

कंटकने आपली कहाणी जशी घडली तशी सांगण्यात आरंभ केला. त्याचे नाव किशन आणि तिचे नाव मालती असता कोणत्या संकटात सापडून त्यांना ती नावे पालटावी लागली आणि कंटक-कंटकी अशी टोपण नावे घ्यावी लागली आणि इतर सारा वृतांत निवेदिला.

कंटक म्हणाला, " 'तुमच्या मुलाला लढाईत एक घाव डोक्यावर लागलेला असला पाहिजे असे अंतर्ज्ञानाने दिसते,' म्हणून त्या अधम कितवाने, त्या रफिउद्दिनने, साधूच्या वेषात जेव्हा सांगितले, तेव्हाच मालतीच्या आईची त्याच्यावर श्रद्धा बसली. ह्या संकटात सापडण्याला एका अर्थी जो असा कारणीभूत झाला, तोच हा तुझ्या त्या घावाचा वण आज तुम्हा बहीण-भावंडांच्या ताटातुटीचा अंत करून तुमची ओळख पटविणारी साक्ष झाला, मालतीला संकटातून सोडवणार साधन झाला. तसेच त्या अधम कितवाला! (लफंग्याला) त्या रफिउद्दिनला, तुझ्याच हस्ते प्राणदंड भोगावा लागून तुझ्या ह्या भगिनीचा सूड नकळत पण तिच्याच भावाने उगवावा, हाही योगायोग जितका आल्हादक, तितकाच आश्चर्यक!"

"छे रे--" तो तापट डोलकाठी ताठ उभा राहून आणि आपला दणकट बाहू वातावरणात फेकून दात-ओठ आवळीत पुटपुटला, "त्या उद्दिनला मी माझा सूड म्हणून मारले. माझ्या बहिणीचा सूड म्हणून त्याचा गळा पुन्हा एकदा असा करकचीत त्याला पुन्हा एकदा असे ठार केले पाहिजे!" रागाच्या आवेशात वातावरणाचाच गळा डोलकाठीने करकचून आवळला.

"सोड दादा तो राग आता!" तिच्या भावाच्या आणि लहानपणापासूनच्या त्या साऱ्या सुखदुःखाच्या आठवणींनी डोळे भडून आलेली मालती आपल्या भावाचा तो हात हळूच खाली ओढून आणि आपल्या हातात चेपीत-चेपीत त्याला लडिवाळपणे शांतवू लागली.

"माले, ताई- माझ्या हातून तुझे काहीच कल्याण असे झाले नाही. तुला मी भाऊ असून नसून सारखाच झालो! तुझ्या मनाजोगे..."

"दादा, तू मला भेटलास नं, ह्यातच माझ्या मनाजोगे सगळे काही झाले आहे बरे! जर मनजोग असे अजून काही राहिलेच असेल, तर ते म्हणजे आपल्या आईची काय ती भेट. दादा, घे मला अशी पोटाशी एकदा!"

"माले! ताई!" आपल्या गळ्यात पडलेल्या त्या त्याच्या बहिणीला आईने लेकराला कुरवाळाव तसें केसांवरून नि पाठीवरून कुरवाळीत तो त्या भेटीच्या गोड गुंगीत मधून-मधून उगीच हाक मारीत होता, "माले!" ताई!" आणि ती लाडीकपणे हळूच होकारत होती--"उं!" "ओ!" "दादा!"

क्षणभराने मालतीची मिठी सोडून तो तिचा भाऊ त्या किशनकडे वळला.

"किशन, माझी बहीण अनेक संकटातून तू म्हणूनच वाचविलीस. तुझे माझ्यावर अनंत उपकार आहेत. पण हे बघ, माझेही तुझ्यावर काही कमी उपकार नाहीत अं! तू माझी बहीण मला परत

दिलीस; मी पण, ही घे, तुझी प्रियकरीण तुला परत देतो. माझ्या आशीर्वादाच्या हुंड्यासह ह्या माझ्या भगिनीच मी तुला यथाशास्त्र कन्यादान करीत आहे!”

“लग्नानंतर नं?” किशन हसला!

मग त्या ठरलेल्या दिवशी त्या बिचाऱ्या आतिथ्यशील जावऱ्यांनी मोठ्या थाटामाटाने त्या तिघांना निरोप दिला. ज्या वेळी किशन, मालती आणि तिचा दादा (डोलकाठीला आता सगळेच दादा म्हणू लागले) हे त्या तारवात बसून चांदण्या रात्री अगदी गुपचूपपणे त्या काळ्या पाण्याचा तट सोडते झाले, त्या वेळी समुद्राच्या भुताला, त्या ‘जुरूविन’ला प्रसादविण्यासाठी जावऱ्यांनी त्यांना माहित होती नव्हती तितकी चेटके केली; आणि दोन तीन ‘डुंगी’ सह त्या जावऱ्यांतील पटाईत ते-ते नाविक त्या किशनच्या तारवाला तटालगतच्या खाड्या-खाड्यातील आडवळणातून, इंग्रजांचे ठराविक ठिकाणचे पहारे चुकवीत, काळ्या पाण्याच्या भर समुद्रापर्यंत पोहोचविते झाले.

काळ्या पाण्याच्या भर समुद्रात! ते केवळ वाऱ्यावर सोडलेले लहानसे तारू! रात्रीच्या काळोखात तर चारी दिशांना प्रत्यक्ष काळच आ वासून उभा राही, इतके घातक, इतके ओसाड, इतके असहाय धाडस ते! मध्यरात्री काळ्याकुट्ट काळोखात तो अफाट समुद्र गर्जू लागला की, मृत्यूच घोरतो आहे असे वाटावे. पण जन्मठेपेच्या बंदीत पिचण्यापेक्षा त्यांना ते धाडससुद्धा सुखाचे वाटले.

काळ्या पाण्याच्या त्या भयाण समुद्रात केवळ वाऱ्यावर सोडलेले ते तारूही बेछूट चाललेले होते. वारा अनुकूल होता, शिडाचे पोट भरभरून तट्ट फुगलेले होते. पाळीपाळीने ती तिघे वल्ही मारीत होती. मालतीसुद्धा वल्हविण्याची आपली पाळी यथाशक्ती पार पाडी.

आकाशात मधूनच वादळ साचून काळाकुट्ट अंधार पडे, मधूनच ऊन पडे, दिशा हसू लागते. समुद्रही मधूनच खवळून रागीट दिसे, मधूनच झुळूझुळू तरंग उठणाऱ्या सरोवरासारखा प्रसन्न दिसे. जरा कोठे खुट् झाले की, त्या तिघांच्या तोंडावरही मनात दाबून ठेविलेल्या भयाची काळछाया एकदम उठून पसरे. पुन्हा तिला दाबूनदडपून ते एकमेकांना धीर देत, हसत, गातसुद्धा वल्हविताना.

अनुकूल वारा त्यांच्या तारवाच्या शिडात भरलेला होता, पण तेवढ्यावरचे काही ते तारू बेधडक चाललेले नव्हते. जन्मठेपीच्या बेड्या तोडून आपण काळ्या पाण्यावरून पळून जाते आहोत, ह्या कल्पनेच्या आनंदाचे वारे त्यांच्या हृदयाच्या शिडातून जे भरलेले होते, मुख्यतः त्यावरचे ते तारू असे बेछूट चाललेले होते.

मनुष्याच्या आशा-निराशा, पाप-पुण्य, न्याय-अन्याय, साध्य-असाध्य, ह्यांच्या कसोटीवर जगाची उलाढाल काही पारखून घेता येत नाही, त्याच्या खिसगणतीतसुद्धा तो विचार नसतो. आपल्याला संभवनीय वाटते ते अकस्मात् असंभव होते, असंभव वाटते तेच कधी कधी अकस्मात् घडून येते. ह्यालाच आपण योगायोग म्हणतो. म्हणजेच त्या उलाढालीचा आमच्या इच्छेच्या वा तर्कांच्या अनुरोधाने काहीच उलगडा होते नाही. अशी आपण मान्यता देतो.

अगदी राजवाड्यात शेकडो दास -दासी लालन - पालन करीत असता किंवा प्रत्यक्ष राजा-राणी आपल्या कडेवर घेऊन खेळवीत असता नवसा-सायासाने लाभलेले राजबिडे लेकरू उंच प्रासादावरून राणीच्या वा राजाच्या कडेवरून निसटून खाली फरशीवर पडते. आणि चक्काचूर होऊन जाते! श्रीमंत रघुनाथराव पेशवे ह्यांचे एक अपत्य, त्याला लाडाने श्रीमंत हाती उचलून खेळवीत असता खाली पडून पिचून गेले असे सांगतात. उलटपक्षी केट्टा किंवा बिहार येथे झालेल्या भीषण भूकंपाच्या धक्क्यासरशी जेव्हा नगरेची नगरे कोसळून भूईत गडप झाली, तेव्हा चार-चार मजली चिरेबंदी वाडे वरून धाड् धाड् कोसळून खाली फाटलेल्या भुईच्या खड्ड्यात ढीग होऊन पडले. माणसे, आई-बाप, लेकरे ठेवून, लगदा होऊन दगडांच्या राशीत चुन्या-चिखलासरशी चिणून गेली आणि त्यातच खणता-खणता त्या ठेचून गेलेल्या कोणा आईच्या कुशीस निजलेले एखादे मूल दोन दगडांच्या तंबूत सुरक्षित असलेले सापडले! हाच योगायोग! दैव! ज्याची कार्यकारणाची गुंतागुंत आम्हाला सोडविता येत नाही किंवा आमच्या इच्छेप्रमाणे सुटत नाही, त्यालाच आम्ही दैव म्हणतो. दैव योगायोग म्हणजेच आमचे अज्ञान, आमची निराशा!

काळ्या पाण्याच्या भर समुद्रात वाऱ्यावर सुटलेल्या ह्या लहान तारवातील प्रतिक्षणी मृत्यूच्या खडकावर आपटू पाहणाऱ्या त्या तीन जिवांच्या दैवी त्या उलट सुलट योगायोगापैकी कोणता योगायोग येणार आहे?

ह्याचे काय होईल? कसे होईल? आज आठवा दिवस तर एकदाचा उगवला! संकटाशी झगडता-झगडता त्यांचे भय पण किंचित उणावले. अन्नाचा नि पाण्याचा पुरवठा पण संपत आला इतकेच वाईट; पण प्रवासही अर्धा-अधिक संपला. मासेही मधून मधून ते धरीत आणि खात, त्यावर निभाव लागे. क्षीणता मात्र वाढली. त्यातही मालती अधिक थकली, पण अर्धा-अधिक प्रवास संपल्याचे तिला तिचा दादा सांगे आणि म्हणे,

आततायी, पापी--त्या रफिउद्दिनसारखे कितव जर ह्या काळ्या पाण्यावरून तरून कधी कधी आपल्या देशाला पोहोचलेले आपण पहातो, तर तुझ्यासारख्या निरागस, निरपराध नि सुशील अबलेला हात दिल्यावाचून तो दयाळू देव कसा राहिले? तुझ्या पुण्याईने आम्ही सगळे तरू, देशी पोहोचू. पुन्हा तो ताईत, ती चेटक, ते शुभ शकूनर ते काय लटके आहेत थोडेच?"

असा धीर तिला त्याने दिला म्हणजे तिचा शरीराचा नसला तरी मनाचा थकवा निघून जाई. रात्र पडताच किशनच्या मांडीवर जेव्हा ती डोके टेकून निजे आणि तो तिला थोपटी तेव्हा तिला चिंता शिवतसुद्धा नसे. इतकी झटकन् नि इतकी गाढ झोप लागे की, ती सकाळीच काय ती जागी होई आणि अगदी टवटवीत होऊन उठे.

आठवा दिवसही निर्विघ्नपणे पार पडला. त्या संध्याकाळच्या सूर्यास्ताची शोभा आणि त्या शांत समुद्राचे आश्वासक वर्तन ह्यामुळे त्या तिघांनाही विपुल उल्हास वाटू लागला. वारा तेवढा किंचित मंदावला होता. ह्यासाठी त्यांनी आपली वल्हो अधिक नेटाने मारावयाला आरंभ केला. पण प्रत्येक वल्ह्याच्या फटाकाऱ्यांसरशी स्वदेशाचे तीर भराभर सन्निधच येत चालले आहे, ह्या

जाणिवेने त्या श्रमाचा त्रास असा त्यांना काहीच वाटेना. उलट उल्हासाच्या भरात किशनला कोणतेसे चुकत-माकत जे एक नावाड्याचे गाणे येत होते, ते तो गाऊ लागला, मधूनच मालतीकडे पाहून चेष्टेने हसू लागला. तिचा दादा पण त्याच गाण्याची साथ धरीत ताला-तालावर वल्हवू लागला, आपणही मोठमोठ्याने गाऊ लागला-

वायवारू । हकाल तारू ।।

रे नावाड्या । वल्हिव गड्या ।। चल भराभरा ।।

सांवळी सुंदर नार - चालली माहेरा ।।

सांवळी सुंदर नार - चालली माहेरा ।।

सांवळी सुंदर नार - चालली माहेरा ।।

एक चरण ह्याने तर एक त्याने गात-गात आणि घोळीत घोळीत ते दोघे सपासप वल्ही मारीत चालले. तारू सपासप पुढे घुसत चालले. स्वदेश सपासप जवळ येत चालला. काळोख पडून चांदण्यात जिकडे-तिकडे चमचम करीतो ते गातच होते आणि वल्ही मारीतच होते.

ते गाणे ऐकत आणि त्या तारवाच्या झुलत्या पलंगावर किशनच्या कुशीत उशी करून मालतीला केव्हा झोप लागून गेली ते तिला कळलेसुद्धा नाही.

वारा पुन्हा अनुकूल त्याच दिशेने चांगला सुटला. शीड भरून गेले, वल्हवणे मंदावले, मध्यरात्र झाली, चंद्र उगवला. इतक्यात तारवापासून थोड्याशा अंतरावर सळ- सळ- सळ असा मोठा आवाज होऊन एक उंचच उंच असा पाण्याचा भला मोठा खांब वर उफाळला!

दादाने निरखून पाहिले; तो एक प्रचंड मासा अर्धा-अधिक उभा राहावा तसा तळपू लागला. समुद्रात अनेकवार वावरलेल्या त्या डोलकाठीने तात्काळ ओळखले की, हा मासा माशातील भयंकर जातीचे एक धूड आहे. त्यासरशी त्याने बंदूक उचलली तोच पुन्हा पाण्याच्या लांढ्याचा एक मोठा खळखळाट होऊन मासा पाण्यात बुडी मारून नाहीसा झाला. संकट टळले म्हणून डोलकाठीचा नि किशनचा जीव खाली पडला.

त्या भयंकर माशावरून तशा माशांच्याच गोष्टी निघाल्या. डोलकाठी सांगू लागला, “मोठमोठ्या आगनावांना आपल्या वीज असलेल्या प्रचंड शेपटीच्या फटकाऱ्याने उलथंच्या पालथ घालणाऱ्या दुष्ट मत्स्यांची महासागरातून कधी कधी गाठ पडते, असे सिंधुप्रवासी सांगतात, लहान वारा वाहू तारवांचा तर कित्येक मासे आडवळणातून पिच्छाच पुरवतात. त्यांत कित्येत माणूसखाऊ जातीही आहेत!”

किशनच्या अंगावर काटाच उभा राहिला. “नरभक्षक! खरेच की काय?”

पण किशनच्या ह्या प्रश्नाला उत्तरे देण्याचे डोलकाठीला कारणच पडले नाही, वेळच मिळाला नाही!

कारण, किशन ते विचारतो न विचारतो तोच एखाद्या दुर्बळाच्या तोंडात एखाद्या राक्षसाने भडकावून द्यावी, तशी त्या लहानशा तारवाच्या लाटेवर चढलेल्या बाजूला एक कळकट चपराक बसली आणि वाटी पालथी घालावी तसे ते तारू समुद्रावर अलगद उलथेचे पालथे होऊन पडले!

एक प्रचंड लाट उठली. एक भयंकर माशाचे धूड तारवाभोवती भरभर फिरले. तो मघा बुडी देऊन निसटलेला मासाच त्या तारवावर गुप्तपणे असा चाल करून आला आणि फटकाऱ्यासरशी त्याने ते तारू उलथून पाडले. त्यातील कोणी माणूस बाहेर फेकला गेला आहे की नाही हे पाहून त्याचा घास घेण्यासाठी तो राक्षसी मासा आणि त्याचा जोडीदार असे घिरट्या घालीत वर उसळले होते,

तारू उलथताना त्या चपराकीसरशी दूर फेकून दिला गेलेला किशन होता. त्या राक्षसी माशाने त्यावर झेप घातली आणि त्याला समुद्रात ओढून नेले.

इकडे डोलकाठीने त्याच्या उलटलेल्या त्या तारवातून बाहेर पडण्याची घडपड केली. पण ती त्याची प्राणान्ताचीच धडपड झाली न झाली, तोच संपली! नाका तोंडावर लाटांच्या थपडा खाऊन जीव गुदमरून डोलकाठी बोलता बोलता बुडाला!

आणि मालती? ती बुडाली हेसुद्धा तिला मुळी कळलेच नाही. ती गाढ झोपेत होती. तिला त्या झुलत्या तारवामुळे सुखस्वप्न पडते होते की, तिच्या लहानपणाच्या त्या झोपाळ्यावरचे ती बसली आहे, तिची आई तिला त्याच प्रेमळ ओव्या म्हणते आहे, झोपाळा उंचच उंच जाऊन एकदम खाली सरकताना तिला किती तरी गोड वाटत आहे!

त्या गोड स्वप्नांत ती त्या तारवात जशी निजलेली होती तशीच्या तशीच, ते तारू पालथे होताच, समुद्राच्या लाटांवर निजवली गेली! जाग अशी तिला पुन्हा कधी आलीच नाही!

ते सुखस्वप्न हीच तिची शेवटची जाग होती, तिची शेवटची जाणीव होती, म्हणजेच तिच्यापुरती ती सुखरूपपणे घरी जाऊन आईला भेटलीच! तिच्यापुरती तिच्या जाणिवेची शेवटची ओळ होती सुखान्तच!

***